श्री.

# प्रस्तावना.

१ राष्ट्राच्या सर्व तऱ्हेच्या गतचरित्राचें कालानुक्रमिक व सगतवार स्मरण ह्मणजे इतिहास. तो दोन प्रकारचा. तोंडी व लेखी. पैकीं दुसऱ्या प्रकारच्या इतिहासाच्या तयारीकरिता साधनाचा हा दहावा खड आहे.

२ ज्या लोकाची स्वचरित्राची स्मृति हारपली, ते लोक मृतवत् असून पहावे तेव्हा सदाच मूढावस्थेंत असल्यासारखे दिसतात. उदाहरणार्थ, हिंदुस्थानातील भिल्ल, खोड, कातकरी वगैरे लोक घ्या. हिंदुस्थानात ह्या लोकाची वस्ती आपणा आर्याच्याही पूर्वींची आहे. तेव्हा ते ज्या मूढावस्थेंत होते त्याच अवस्थेंत ते सध्याही बहुतेक आहेत. कारण, आपल्या गतचरित्राची स्मृति त्याना नाहीं. स्मृति जाज्वल्य तऱ्हेने जागृत असली, ह्मणजे गतचरित्राचा आढावा घेता येतो, आढावा घेता आला, ह्मणजे आपले राष्ट्रीय गुणदोष कळू लागतात, आणि गुणदोप कळले, ह्मणजे दोपाचा बीमोड करून गुणाचा परिपोप करण्याकडे सहज प्रवृत्ति होते.

३ राष्ट्राचा इतिहास ह्मणजे राष्ट्रातील सर्व लोकाच्या सकलित चरित्राची हकीकत. ती लोकापुढें माडिली असता, सर्व लोकाना समानस्मृतित्वामुळें ऐक्याची व बधुप्रेमाची भावना होते. ती उत्कटत्वाने व्हावी, एतदर्थ प्रस्तुत खड प्रसिद्ध करण्याचें ग्रथकाराच्या समेलनाने ठरविलें.

४ ह्या खडातील अर्धी अधिक पत्रें इदूरचे श्री. माधवराव किबे व रा. आठल्ये ह्या दोन सद्गृहस्थानीं पाच सहा वर्षापूर्वीं प्रसिद्ध करण्याचें मनात आणिलें होतें. परतु व्यवसायबाहुल्यामुळें पत्राच्या नकला करण्यापलीकडे त्याच्या हातून प्रसिद्धीचें काम येटेना. सबब, मूळ पत्रे व नकला घेऊन व त्यात आणीक बऱ्याच पत्राची भर घालून, प्रस्तुत खड बनवला आहे. पैकीं पाच पन्नास पत्रें रा. आठल्ये यानीं स्वतः मिळविलेलीं आहेत.

५ येथें पानिपतच्या प्रसगापासून दुसऱ्या बाजीरावाच्या अखेरीच्या पर्यंतच्या काळातील पत्रें घेतलीं आहेत. पाच दहा पत्रें तदनतरची आहेत. त्याचा उद्देश, सरदार घराण्याचा ऱ्हास उत्तरोत्तर होऊन तो कोणत्या थरास पोहोंचला, तें स्पष्ट करण्याचा आहे. अर्धीं अधिक पत्रें वाई येथील रा. रा. नानासाहेब वैद्य याच्या दप्तरातील असून, बाकीचीं इतरत्र किरकोळ मिळविलेलीं आहेत.

६ माट वप्र्च्या यखरांतल्या तारखा, प्रसंग व तपशील प्रस्तुत सडारतील मित्यांशीं, प्रसंगांशीं व तपशिलाशीं ताडून पाहिला असता स्थलोस्थलीं चुकीचा व विपरीत दिसेल, हें महाराष्ट्रांतील लोकास तरी सांगण्याचें आतां कारण उरलें नाहीं रा खरे, रा पारसनीस व मी ह्यांनीं ही वाम आजपर्यंत इतक्या वेळा सांगितली आहे व स्वजनानीं इतक्या वेळा ऐकिली आहे कीं तिचा पुनरुद्धार करणें म्हणजे केवळ कंटाळवाणें होणार आहे माट डफ्‌ला ह्या देशांत आतां कोणी प्रमाण मानीत नाहींत इंग्लिश लोक मात्र त्याला अद्याप प्रमाण म्हणून समजतात परंतु, तो निव्वळ अज्ञानाचा प्रकार होय निदान ह्या एका बाबींत तरी इंग्रजाच्या आपण पुढें आहोंत, ही समाधानाची गोष्ट आहे

७ तारखा, प्रसंग व तपशील ह्यासंबंधानें मांट डफ्‌नें ज्या चुका केल्या व जे विपरीत ग्रह उत्पन्न केले, त्याहून निराळ्या तऱ्हेच्या विपरीत ग्रहांचा नीमोड करण्याचा काळ आतां आला आहे हे विपरीत ग्रह जाणूनबुजून केले ले असोत किंवा अज्ञानत केलेले असोत, त्यांमुळें पुष्कळ जाणतेसरवते लोक देखील वारंवार फसतात, मग अज्ञाण लोक फसले तर त्यांत कांहीं नवल नाहीं अशा एक दोन दुष्ट ग्रहाचा स्पष्टीकरणार्थ येथें उल्लेख करतों रजपूत व जाट लोकांतील कांहीं किंवा सर्व कुळ्या अहिंदु जे शक व तुरुष्क लोक ते हिंदु बनून त्याऱ्यापासून झाल्या, असा विपरीत सिद्धांत गेलीं पन्नासपाऊणशें वर्षें बहुतेक सर्व इंग्रज व युरोपियन लोक ठोकून देत इंग्रज व युरोपियन लोक पहिले चोकसपणानें सपास विवेचन करणारे तेव्हां, त्याचे विपरीत दिसणारेही सिद्धांत प्रमाणवत् मानून, आपल्या इकडील कित्येक विद्वन्मन्य हमे तसे घरळावयाला लागले हे विद्वन्मन्य आपल्या साध्याभोळ्या परंतु कुलधर्मनिष्ठ स्वजनांना असा उलट सवाल करूं लागले कीं, 'म्हणे हो! पूर्वीं अहिंदु जे शक लोक ते हिंदु बनून जातिवंत रजपूत म्हणजे क्षत्रिय समजले जात व त्यांचें पुरोहितस्य सौवळ्यांतले सोवळे जे कोणी ब्राह्मण असत ते करीत, अशी सशास्त्र वस्तुस्थिति आहे, तेव्हां गुद्धजाति त्वाच्या गप्पा कशाला मारतां?' विद्वन्मन्यांचे हे उच्छिष्ट व निरर्गल प्रलाप धर्मनिष्ठांना कवडीमोल भासत, हें सांगावयाला नकोच परंतु, ते कवडीमोल आहेत अशी खात्री ह्या विद्वन्मन्य लोकाची कधीं व्हावी? कोण्या युरोपियन शास्त्र्यानें तसें सांगितल्याशिवाय त्यांच्या मूर्ख मतांचा कवडीमोलपणा त्यांना कधीं पटावयाचाच नाहीं हें जाणून एका इंग्रज मानववंशशास्त्र्यानें रजपूतवंशासंबंधानें शास्त्रविचारान्तीं आतां काय मत झालेलें आहे तें देतों तो म्हणतो —

Of the Scythian people themselves all traces seem to have vanished and the student who inquires what

पाय देऊन उपजीविका करणाऱ्या लोकांना अत्यंत अपरिहार्य आहे बाकी धर्मनिष्ठ जे आहेत त्याना शाकयशसत्याची व लवधिरस्काराची अथा दोन्हीही उपपत्त्या एकाच किंमतीच्या वाटतात रजपूत यानी हिंदु आहेत, क्षत्रिय आहेत व आर्य आहेत, हा सिद्धान्त, किंतीही पोषक किंवा मारक अशा पाच फळ उपपत्त्या निघाल्या तथापि, धर्मनिष्ठांना त्रिकालाबाधित वाटत राहील, यांत संशय नाही

८ आतां दुसऱ्या एका कवडीमोल बुद्ध मताचा उल्लेख करतों तो वर ध्याख्या सारखा जुना नाहीं; अगदीं अलीकडचा फोराकरकरीत आहे हा काळपर्यंत रजपूत Scythians आहेत, अशी कडी पिकवून, अनेक अर्थ यट लोकांना यानें माकडचेष्टा करावयास लावल्या आतां रजपुतांवरची संक्रांत उठून मराठ्यांवर ती पर्स्पृ पडत आहे, नव्हे साक्षात् बसलीच आहे आतां असें मत निघालें आहे कीं, महाराष्ट्रांतील मराठे लोक यानें शाक म्हणजे Scythian आहेत सर रिझ्ले म्हणतात —

Is it not conceivable that the Scythians, who first occupied the great grazing country of the Western Punjab and then, pressed upon by later invaders and finding their progress eastwards blocked by the Indo Aryans turned towards the south mingled with the Dravidian population, and became the ancestors of the Marathas? The physical type of the people of this region accords well with this theory, while the arguments derived from language and religion do not seem to conflict with it. For, after entering India, the *Scythians readily adopted an Aryan language, written* in the Kharosthi character, and accepted Buddhism as their religion Their Prakrit speech would have developed into Marathi, while their Buddhistic doctrines would have been absorbed in that fusion of magic and metaphysics which has resulted in popular Hinduism On this view the wide raging forays of the Marathas, their guerilla methods of warfare, their unscrupulous dealings with friend and foe, their genius for intrigue and their consequent failure to build up an enduring dominion, might well be regarded as inherited from *their Scythian ancestors*

Chap VI, Ethnology and Caste pp 307-308
by H S Risley Imperial Gazetteer of India, Vol I

मराठ्यांना शाक ऊर्फ Scythians ठरविल्यावर रिस्ले पुढे ह्मणतात:—

The highest class of Marathas is supposed to consist of ninety-six families, who profess to be of Rajput descent and to represent the Kshattriyas of the traditional system. They wear the sacred thread, marry their daughters before puberty, and forbid widows to marry again. But their claim to kinship with the Rajputs is effectually refuted by the anthropometric data now published &c.

येणेंप्रमाणे, महाराष्ट्रातील मराठे आर्य नाहींत, असा रिझ्लेचा नवीन शोध आहे. महाराष्ट्रांतील ब्राह्मण आर्य नाहींत, असे बरळण्यापर्यंत अद्याप मजल पोहोंचली नाहीं. परतु, तोही प्रसंग पुढें मागे आल्याशिवाय रहाणार नाहीं. असो. सध्या ब्राह्मणाशीं आपल्याला कर्तव्य नाहीं. फक्त मराठ्यांच्या वंशाचा विचार करावयाचा आहे. सर रिस्ले याना आमचा असा सवाल आहे कीं, रजपूत Scythians नाहींत, हे ठरविण्याला जीं प्रमाणे त्यानीं नमूद केलीं आहेत, तींच प्रमाणें मराठे Scythians नाहींत, हे ठरविण्याला समर्पक आहेत. Scythians उर्फ शक काठेवाड, गुजराथ व जुन्नर ह्या स्थलीं केव्हा आले व किती दिवस राहिले, हे इतिहासप्रसिद्ध आहे. ते जुन्नरास राज्य करीत होते, त्या वेळीं व त्याच्या पूर्वी महाराष्ट्रातील समाज चातुर्वर्ण्यघटित होऊन पूर्ण सुयत्र झाला होता. अशा समाजात अहिंदु जे शक ते ( हिंदु ह्मणून ) समावले जाऊन, महाराष्ट्रात ज्याना क्षत्रिय ह्मणतात, त्याच्यात प्रमुखत्वानें मोडले जावे, हें रजपुतस्थानातल्याप्रमाणेंच महाराष्ट्रातही सर्वस्वीं अशक्य आहे. तात्पर्य, महाराष्ट्रातील मराठ्याना शककुलोत्पन्न करून टाकण्यात रिस्ले याचें तर्कशास्त्र सपशेल तोंडघशीं पडलें आहे.

९ अशा नाना प्रकारच्या विपरीत कल्पना इंग्रज व युरोपियन लेखकांनीं वेळोवेळीं प्रपादल्या आहेत. त्याच्या मुळाशीं एक मनोविकृति असते. ती ही. इंग्रज, फ्रेंच, जर्मन, वगैरे पाश्चात्य समाजात शरीरसबध वाटेल त्या धर्मबाह्य व लोकबाह्य समाजाशीं होत असल्यामुळे, त्या समाजांतील लोकाचें बीज व रक्त अत्यत भेसळ झालेले आहे. त्यामुळे होते काय कीं, हिंदुस्थानांतील चातुर्वर्ण्यघटित समाजांतही आपल्यासारखचि रक्ताची व बीजाची खिचडी झाली असली पाहिजे, हें यद्वातद्वा सिद्ध करण्याचा मोह ह्या लोकातील विद्वानाना साहजिक पडतो. परतु त्यानीं हें पक्कें लक्ष्यांत ठेविले पाहिजे कीं, हिंदुस्थानातील जातिबद्ध लोक शरीरसबध करण्याच्या कामात बौद्धधर्म प्रचलित होण्याच्या पूर्वीपासून फार चिकित्सक आहेत. तेव्हा त्याच्या वशासबंधाने बोलतांना फार जपून बोललें पाहिजे. युरोपातील उपमाने हिंदुस्था-

नाला छापण्यात बिलकुल अर्थ नाहीं शक, यवन, किरात, पल्हव, पुष्ट वगैरे अनार्य कुळांशीं आर्यांचा शरीरसंबंध होणें केवळ असंभाव्य आहे उदाहरणार्थ, प्रस्तुतचा मुसलमानाचा—अस्सल व यास्थे—समाज घ्या हा स माज आज कमीत कमी बाराशें वर्षें हिंदुस्थानांत वावरत आहे परंतु, कोणी मुसलमान शरीरसंबंधानें किंवा धर्मांतरानें हिंदु झाला व तो क्षत्रियांत मोडूं लागला, असा एकही दाखला नवसालासुद्धा मिळावयाचा नाहीं तात्पर्य, युरोपियनांचे एतद्विषयक प्रलाप निव्वळ थाप्कळ आहेत

१० शास्त्रिक पद्धतीनें इतिहास लिहावयाचा म्हटला म्हणजे त्या त्या देशांतील लोकांची वंशपरीक्षा करणें अपरिहार्य होतें मराठ्यांच्या इतिहासा संबंधानें विचार करावयाचा म्हटला म्हणजे मराठ्यांचा वंश कोणता, हें ठर विणें अवश्य होतें मराठे शकवंशीय आहेत, असें रिस्ले प्रवादतात तें खोटें व निराधार आहे, असें मी म्हणतों रिस्लेचा प्रत्येक शब्द असत्य व डळमळीत आहे, असें मला वाटतें मराठे कोठून आले, केव्हां आले, कसे आले, एतत्संबंधीं रिस्लेची माहिती कोती, असंबद्ध, निराधार, पोर कट व शास्त्रशून्यतेला साजेल अशी आहे शकांनीं आपली मूळ शाक भाषा टाकून दिली, आर्य प्राकृत भाषा स्वीकारली व तिच्यापासून वर्तमान मराठी झाली, अशा रिस्लेचा विचित्र कोटिक्रम आहे बोलण्याला आधार कशाचाही नाहीं नुसता wild and ignorant conjecture आहे ह्याला सशास्त्र पद्धत म्हणतात ! व हिंदुस्थान सरकार हें भारूड छापण्या करितां पैसे खर्चतें ! लेखकाच्या सशास्त्र पद्धतीचें कौतुक विशेष करावें किंवा हिंदुस्थान सरकारच्या पारखेचें कौतुक विशेष करावें, ह्याचें मला गूढ पडलें आहे !

११ अशी असले विपरीत सिद्धांत युरोपियन लेखकांच्या ग्रंथांत पदो पदीं आढळतात जशी वेळ पडेल व लहर लागेल, त्याप्रमाणें हे सिद्धांत एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत बदलत असतात मोगलांना जिंकून हिंदुस्थान इंग्रजांनीं मिळविलें, असें एक लेखक लिहितो, तर मराठ्यां पासून हिंदुस्थान इंग्रजांनीं हिसकून घेतलें, असें दुसरा लेखक प्रवादतो हिंदुस्थानच्या विचित्र हवेंत शारीर व मानसिक श्रम युरोपांतल्याप्रमाणें होत नाहींत, असें एक शहाणा बरळतो, तर दुसरा होतात म्हणून त्याचा निषेध करतो असे नाना प्रकारचे परस्परविरुद्ध मत युरोपियन लोक आपल्या मुपीक डोक्यांतून, मन मानेल तसे, प्रसवत असतात त्यामुळें हाल आहे काय कीं, ह्या पाश्चात्यांच्या कोणत्याच बोलावर इकडील विचारी लोकांचा विश्वास बसत नाहींसा झालेला आहे अशा स्थितींत एकच मार्ग सुचित भासतो आपलीं मतें यथाशक्ति बनविण्याचा आपणच उद्योग केला पाहिजे दुसऱ्याच्या पुढें धोसरणारा [illegible] ग्रंथ [illegible] नाहीं, हीन

गोष्ट लक्ष्यात घेऊन, मराठ्याचा यथासत्य इतिहास निपजण्याकरितां, मराठ्याच्या इतिहासाचीं अस्सल साधनें प्रसिद्ध करण्याचा प्रस्तुत लेखकानें उपक्रम केला आहे. त्या कामीं प्रस्तुत प्रसंगीं महाराष्ट्र साहित्य परिषदेनें साहाय्य केलें, ही बाब मतैक्याची सूचक आहे.

१२ ह्या दहाव्या खंडात माधवराव बल्लाळ, नारायणराव बल्लाळ, सवाई माधवराव व बाजीराव रघुनाथ ह्या चार पेशव्यांच्या कारकीर्दींतील पत्रव्यवहार आला आहे. पैकीं माधवराव बल्लाळाच्या कारकीर्दींतील ७९ लेख आहेत. त्यातला २१ वा लेखांक शक १६८५ श्रावण शुद्ध ५ चा असून, त्यात दोन्हीं सैन्यें मिळून पाच सहा हजार लोक रणास आले, असे खुद्द माधवराव लिहितो. ह्या राक्षसभुवनाच्या लढाईंत मोगलाचे दहा हजार लोक पडले, असें डफ ह्मणतो व आधार बखरींचा देतो. कोणत्याही बखरीपेक्षां खुद्द माधवरावाच्या पत्रावर जास्त विश्वास ठेवला पाहिजे, हे उघड आहे. अस्सल पत्रापेक्षां बखरीवरच डफनें विशेष निर्वाह केला होता, हें सांगावयाला नकोच. ही तपशीलासंबंधाची बाब झाली. परंतु, निजामाशीं चाललेल्या ह्या मोहिमेंत दुसरीच एक बाब इतिहासदृष्ट्या व राजनीतिदृष्ट्या महत्वाची आहे. ती बाब ही. मोरोबा फडणवीस, गोपाळराव पटवर्धन, सदोबा रोणवी, गमाजी मुतालिक, भवानराव प्रतिनिधी, वगैरे मराठे मुख्यसत्तेला सोडून शत्रुपक्षाला मिळाले, तें राजनीतीच्या दृष्टीने कितपत न्याय्य होते? स्वतंत्र संस्थानातील कोणीही माणूस युद्धप्रसंगीं किंवा शांततेच्या कालीं शत्रूंच्या संस्थानाच्या विरुद्ध कोणत्याहि प्रकारें संस्थानाच्या जाणून उपयोगीं पडल्यास, तो संस्थानद्रोही होऊन देहान्तशिक्षेस पात्र होतो, असा सर्व राष्ट्रांचा नियम आहे. त्या नियमाच्या दृष्टीने पहातां गोपाळराव पटवर्धन वगैरे सरदार संस्थानद्रोही ठरतात. हा नियम त्या कालीं महाराष्ट्रात प्रचलित नव्हता, असेंहि नाहीं. तोतयाचें बंड झाले तेव्हा नाना फडणिसानीं हजारो लोकांचीं त्याच्या त्याच्या अपराधाच्या मानाने शासनें केलेलीं आहेत (पत्रांक ३०७). संस्थानांतील सामान्य माणसें शत्रूच्या सेवेस गेलीं असतां, त्यांचीं घरें दारें जप्त करण्याचीहि वहिवाट त्या कालीं होती (पत्रांक ६६ वगैरे). शिवाजी तर, अशा माणसाना शत्रु समजून शासन करीत असे (म. इ. सा. खंड ८). रघुनाथरावाचे व माधवरावाचें इतकें बिनसलें असता, रघुनाथरावाच्या विरुद्ध माधवराव निजामाला जाऊन कधींहि मिळालेला नाहीं. असा दंडक त्या वेळीं प्रचलित होता. मुख्य सत्ता शिरजोर असतां हा नियम लागू असतो, व कमजोर झाली असता नसतो, असे तर बिलकूलच ह्मणता येत नाहीं. मुख्य सत्ता कोणत्याही कारणानें कमजोर होऊं लागली असता, तिच्याशीं एकनिष्ठेने रहाणें इतकेंच नव्हे, तर तिला शिरजोर करण्याकरितां जिवापाड मेहनत करणें संस्थानातील प्रत्येक माणसाचा स्वभावसिद्ध धर्म आहे.

तो धर्म न पाळला, तर संस्थानाचें स्वातंत्र्य त्या मानानें नष्ट होतें. संस्थानाचें स्वातंत्र्य नष्ट झालें, तसतसें त्या धर्म, नीति, व संस्कृति यांच्या संरक्षणाकरितां स्वतंत्र संस्थान निर्माण झालेलें असतें, त्यांचा नाश होतो. त्या नाशाबरोबर संस्थानांतील प्रत्येक व्यक्तीचेंही स्वातंत्र्य नष्ट होतें. अशी भयंकर आपत्ति संस्थानद्रोहानें येते. तेव्हां, संस्थानद्रोहाला मोठी शिक्षाच योग्य असते. अशी शिक्षा न देणारा संस्थानाधिकारीही संस्थानाच्या नाशास कारण होतो. ह्या दृष्टीनें पहातां, संस्थानहितार्थ माधवराव यांनीं गोपाळराव पटवर्धनादि मंडळींचें यथायोग्य शासन केलें पाहिजे होतें. गोपाळरावादि मंडळी फौजबंद पडल्यामुळें व संस्थानाधिकारी कमजोर पडल्यामुळें, माधवरावाच्या हातून शासन करण्याचा धर्म यथास्थित अमलांत आला नाहीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, देशांतील राजधर्म व प्रजाधर्म ढिला पडला, ह्यापुढें प्रत्येक सरदार दरहमेष संस्थानच्या शत्रूशीं कधीं गुप्तपणें व कधीं उघडपणें मित्रत्व करूं लागला. पानिपतच्या लढाईनंतर संस्थानद्रोहाचें पहिलें उदाहरण म्हटलें म्हणजे हें गोपाळरावादि मंडळींचें होय. ह्याचा कडक बंदोबस्त वाजवीपेक्षां यथास्थित रीतीनें त्याच वेळीं झाला असता, तर सर्व सरदारांना भयंकर धाक बसला असता व मराठ्यांचें स्वतंत्र संस्थान अजरामर झालें असतें. ह्या प्रकरणाचा येथें विशेष उल्लेख करण्याचें कारण असें कीं मराठ्यांचें पुढील सर्व चरित्र ह्या एका संस्थानद्रोहाच्या पातकानें लिप्त होऊन गेलेलें आहे. ह्या संस्थानद्रोहाचा मूळ उगम रघुनाथराव पेशवा होता. त्याचा निकाल यथायोग्य शासनानें माधवरावानें लावून टाकिला असता, म्हणजे द्रोहाचें बीजच नष्ट झालें असतें. शक १६९० च्या ज्येष्ठ शुद्ध १० स धोडपच्या लढाईंत रघुनाथरावदादाचा माधवरावानें नेच मात्र उतरला (पत्रांक ४९), परंतु, संस्थानद्रोहाबद्दल त्याचें करावें तसें शासन न करतां, फक्त नजरकैदच ठेविलें. ह्या ढिलाईच्या आश्रयानें संस्थानांतील सरदारांना संस्थानाच्या विरुद्ध वागण्यास अवसर मिळाला ही कीड नाहींशी केली असती, म्हणजे सरदारांचें पृथक् होण्याचें एकच साधें मूळ राहिलें असतें, व तें कालांतरानें जमीनदोस्त करतां आलें असतें.

११ नारायणराव बल्लाळाच्या कारकीर्दींतील पत्रें थोडीं म्हणजे पांच ४ आहेत. माधवराव नारायणाच्या कारकीर्दींतील पत्रें १०७ आहेत. पैकीं पत्रांक २७४ पर्यंतचीं पत्रें रघुनाथरावदादाच्या संस्थानद्रोहाच्या हकीकतीनें भरलीं आहेत. शक १६८१ पासून शक १७०४ पर्यंत जीं २१ पत्रें गेलीं, त्यांचा इतिहास म्हणजे रघुनाथरावदादाच्या संस्थानद्रोहाचा इतिहास. त्याची समाप्ति पत्रांक २७४ त झाली आहे. रघुनाथरावाच्या द्रोहाचा वानगीक दाखला गायकवाड, पटवर्धन, भोसले, होळकर, शिंदे, कोल्हापूरकर वगैरे

अनेक सरदारांस बनल्या कारणानें पत्रांक २७४ पर्यंतच्या पत्रांत ह्या सरदारांच्याही स्वस्थानद्रोहाची हकीकत आलेली आहे. शक १७०४ पासून शक १७१८ पर्यंतचीं ह्मणजे सवाई माधवरावाच्या मृत्यूपर्यंतचीं जीं पत्रें आहेत, त्यांत, सर्व मराठा सरदारांचें एकीकरण करण्याचा जो नाना फडणिसानें प्रयत्न केला, त्याची हकीकत पहावयास सांपडेल. ह्या एकीकरणाच्या हकीकतीची समाप्ति पत्रांक ४१५ त झाली आहे. तदनंतर रावबाजींच्या कारकीर्दीचीं पत्रें लागतात. त्यांत, बाजीरावाचा कमकुवतपणा, सरदारांचा द्रोह, पेंढाऱ्यांचे दंगे, स्त्रियांची नागवण, व लोकांची दैना, ह्यांचीं वर्णनें वाचावयास मिळतील. शक १६८३ पासून रघुनाथराव व गोपाळराव यांनीं जो स्वस्थानद्रोह सुरू केला व ज्याचें पारिपत्य यथास्थित झालें नाहीं, तो परिपाकास येऊन, सत्ताधीश, सरदार, सामान्य प्रजा, स्त्रिया, व धर्माधिकारी यांस कसा भोंवला, तें शक १७२२, शक १७२३ व शक १७२४ या तीन सालांतील पत्रांवरून तपशीलवार कळेल. स्वतंत्र संस्थान ह्मणजे काय, स्वस्थानद्रोह ह्मणजे काय, स्वसंस्थानाला सोडून शत्रूची सेवा करणें ह्मणजे केवढें पातक आहे, प्रत्येक जाणत्या माणसाला राजकीय भावना किती जाज्वल्य असली पाहिजे, वगैरे गोष्टी ज्या वाचकांना माहीत असतील, ते ह्या तीन सालांतील पत्रांचें बहुत मनन करतील. शक १७२४ नंतरचीं रावबाजीच्या कारकीर्दीतील पत्रें आपापली हकीकत सांगतच आहेत. तेव्हां, त्यासंबंधानें येथें जास्त लिहीत नाहीं.

वि० का० राजवाडे



या पुस्तकाच्या प्रकाशनाचे कामीं ज्या उदार गृहस्थांनीं द्रव्यद्वारें अगर अन्य रूपानें साह्य केलें त्यांचे त्याबद्दल प्रकाशक फार आभारी आहेत

---

सूचना—पृ० २४८ पत्रांक २१२ पासून पृ० २५९ पत्रांक २२ पर्यंतचीं पत्रें चुकून मध्येंच भलत्या जागीं लागलीं आहेत पत्रांक २११ नंतर पत्रांक २२९ हें वाचावें

पत्रांक ३ श्रीलक्ष्मीव्यंकटेश १६८३ फाल्गुन शुा ४

कर्जरोखा शके १६८३ वृषनाम संवत्सरे फाल्गुन शुध पंचमी ते दिवशी खत लिहीतें धनको नाम रा। बापूराव विश्वनाथ यांसी रिणको नाम साबाजी भोसले सुा इसन्ने सितैन मया व अल्फ ऐसाजे आपणास कर्ज घेतले मुद्दल रुपये १५० अक्षरीं नवसें पन्नास यांसी व्याज दर सदे २ दुहोत्रा प्रा देऊन हे रुपये दीडा महिन्यानीं देऊन रा। जासुदांचा देऊन, अगर जासुदाची हुडणावळ देऊन ता। छ ३ माहे शाबान येणे लिहिला सही मोतबसूद

सदरहू रुपये धनी महादजी कृष्ण काणे मुदतीं न दिले तर आपण खुद्द देऊ यजमानांमार्फत देऊन दोन महिन्यांत देऊन




पत्रांक ४

पो छ १९ सफर आश्विन शु० १ श्री १६८४ भाद्रपद व ७

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूराव फोनेर स्वामींचे सेवेसी — पो माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष तुम्ही पत्र यमुनापत्तिकडचे मुक्कामचें पाठविलें तें प्रविष्ट जालें सुजातदौलाकडील वगैरे किरकोळ मजकूर लिहिला तो सविस्तर कळला पेशियाम, तुम्ही प्रस्तुत सुजातदौलाजवळ आहा, हे उत्तमच केलेंत आराम, सरकारांतील ठाणीं गेलीं आहेत तीं हस्तगत करून, रावेरजवाटे वगैरे सरंजामिक याम सादिलवार व गुमस्ता पत्रांचे समवेक उत्तरेहि पाठविलें आहेत सानिज छ २१ माहरम, सुा सलास सितैन मया व अल्फ बहुत काय लिहिणें ? हे विनंति

1765

पत्रांक ५ श्री १६८४ भाद्रपद व ०

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री रघुनाथराव स्वामी गोसावी यांसि — सेवक महादजी शिंदे बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता। भाद्रपद व ० मुा पुणें मुक्काम जाणून विशेष १

कडील मजकूर तर राजश्री रामभटबावा व राजश्री बाबूराव व राजश्री रामचंद्रपत ऐसे पुणियास आले आहेत. श्रीमताची भेट जाहली. अद्यापि जावसाल काही नाही. रा पतसचिव याजकडीलहि प्रकार पूर्ववत्प्रमाणेच आहे. × × × येथील मजकूर तर राजकीः—राजश्री त्रिंबकराव मामा कारभार करीत असेत. श्रीमत राजश्री दादासाहेब नाशकास गेले आहेत. समागमे फौज दोन हजार असे. अविव बेदरीं आहे. अधिकोत्तर लिहावे ऐसे नाहीं. यानंतरीः तुह्माकडून रा पिराजीनाईक निंबाळकर यानी रुपये साहा हजार चैत्रमासीच देविले आणि आपण लिहिले, गडकरी यांची वीस हजार रुपयाची रा नाईक निंबाळकर यार्नी चिठी पाठवून दिल्ही. × ××××. रा निंबाळकर याची......श्रीमताकडे च्यार हजार फौजेनिशी जाहली. आणि बारा लक्ष रुपये घ्यावे ऐसा करार जाहला. प्रस्तुत हाली दोन लक्ष रुपये दिल्हे व लाख रुपयाचा सरंजाम देणार. येणेप्रमाणे करारात आले आहे. रा नाईक निंबाळकर दोन हजार फोजनिशीं येथे आहेत. यानतरी रा रघोजी कराडे याजकडे ऐवज येणे. त्यास, ते प्राती अनतशेट कोलकरहि गेला असे. इ. ई. इ.

---

पत्रांक ६ श्री. १६८४ कार्तिक वद्य ४

राजश्री आपाजी पायगुडे गोसावी यासिः—

आशीर्वाद. सुा सलास सितैन मयावअलफ. तुमचे फौजेचा पैका पावला असता अद्यापि येत नाहीं! तीर्थरूप राजश्री दादासाहेबाचे कूच नगराहून होऊन चारोळ्यास मुा आले. आम्हास त्यास दाहा कोसाची तफावत आहे. या प्रसगीं तुम्ही जवळ असावे. हल्लीं पत्र लिहिले असे. देखत आज्ञापत्र जितके लोक जवळ असतील तितक्यानशीं जलदीने येणे. नालवदी घेऊन लोक गेले असतील, त्यासहि बोलाऊ पाठवणे. तुम्ही पत्रदर्शनीं निघोन हुजूर येणे. एक क्षणाचा दिरग न लावणें. जाणिजे. छ १८ राखर-लेखनसीमा.

पेाा छ १९ राखर, सायकाळ.

---

पत्राक ७

पो छ १७ जिल्हेज, अर्बा श्री. १६८४ माघवद्य ९

राजश्री मोरोजी शिंदे नामजाद तालुके रत्नागिरी गोसावी यासीः— अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य श्रो माधवराब बल्लाळ प्रधान आशीर्वाद. सुा सल्लास सितैन मया व अलफ. विसाजी केशव मुकादम, ताा फुणगुस, यार्णी हुजूर विदित केलें कीः—मौजे डावखोल, ताा मजकूर, येथील खोतीच्या वतनाचा कजिया पेशजीं मांजरेकर सावत याचा व आमचा लागला. त्याचा निवाडा च्यारी दिवाणात होऊन आह्मीं खरे जाहलें. त्या प्रो कागदपत्र

---

१ येथें मूळातील मजकूर अप्रस्तुतत्वार्थ गाळला आहे.

पत्रांक ९ श्री. १६८५ श्रावण वद्य ९

तीर्थस्वरूप राजश्री लक्षुमणपत दादा स्वामी वडिलाचे सेवेसी:—
अपत्ये बाबूराव विश्वनाथ वैद्य चरणावरी मस्तक ठेवून शिरसाष्टाग नमस्कार विनती उपरी येथील क्षेम ता श्रावण वद्य ९ पावेतो मुा वाई समस्त सुखरूप असो. यानतर. तुह्माकडून बहुत दिवस कागदपत्र येऊन वर्तमान कळत नाही. आह्मीं रघोजी पाड्या याजबा पत्रे पाठविली, त्याचे प्रतिउत्तर येत नाही. तर, ऐसे नसावे. सदैव पत्री सतोषवीत असावें. यानतर इकडील वर्तमान तर: तीर्थरूप राजश्री नाना व मातुश्री काकी श्रीगणपतीस सेवेबद्दल आहेत. त्यास काहीं गूण अद्याप नाहीं. सुखरूप आहेत. वरकड मार तर: या प्राते दगा जाला. त्यामुळे कोणाकडील पैसा येत नाही. राजकी वर्तमान तर: श्रीमतासीं व मोगलासीं लढाई राक्षसभुवनापासी जाली. मोगलास बुडविला. मोगल पळोन आवरगाबादेस गेला आहे. त्याजपाशी च्यार हजार फौज आहे. त्याजकडील विठ्ठल सुदर वगैरे मातबर सरदार पांच सात असाम्या पडल्या. श्रीमत पैठणापाशीं आहेत. वरकड इकडील वर्तमान अधिकोत्तर ल्याहावे, ऐसे नाहीं. सालगुदस्त येथून हुड्या केल्या होत्या. यमाजी कारजकर व लक्ष्मण शेट कारंजकर याच्या. त्यास, त्यांनीं रुा येथें थोडेबहुत वारले. त्याचा हिशेब करावा लागतो. त्यास, त्याना कोणे मित्तीस रुा पावलें ते येथे लिहिलें आले नाहीं. तर, ते मित्ती लिहून पाठवणे. तीर्थस्वरूप राजश्री नारोपतकाका याचे विद्यमानचे रुा हजार, रा गगाधर भट चिपळूणकर याचे देणे होते ते, आह्मी येथे व्याजसुद्धा त्यास प्रविष्ठ केले. तुह्मास कळावें म्हणोन लिहिले आहे. त्या प्रांतीं कोणाकडील ऐवज येतो कीं नाही, हें काहीं कळत नाहीं. तें सविस्तर लिहणे. तुमचें घरीं समस्त सुखरूप आहेत. सविस्तर वर्तमान मुखवचने बाबू सागता कळो येईल. मोहरीच्या देवालयाचे काम समाप्त जाहले. शिखरास अस्तरगिरी होत आहे. दोन तीन महिन्यात तयार होईल. राजश्री गमाजी यमाजी याची व नरसिंगराव पागा याची लढाई कराडावर जाहली. गमाजीचा मोड जाहला. दातेगडावर पळून गेला आहे. वरकड पुणेयात छपरें व काही घरे लोक बाधत आहेत. वाईची खडणी लोकानी दिल्ही. परतु आम्हास पैसा देणे पडला नाहीं. तुमच्या घरास खर्चास रुपये शभर देविले आहेत. कळले पा. बहुत काय लिहिणे ! कृपा लोभ असो दिजे. हे विनति. नारो गणेश दामले याचे हुडीचे रुा तेथे कोणे मित्तीस पावले, हे सविस्तर मित्या लिहून पा. हे विनति.

---

पत्रांक १०                श्री                १६८५ श्रावण वद्य ११

पौा श्रावण वद्य १४ मंगळवार सवाप्रहर दिवस

वेदशास्त्रसंपन्न राजश्री बाळकृष्ण दीक्षित स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थी कृष्णराव बल्लाळ सां नमस्कार विनंति उपरी येथील वर्तमान श्रावण वा।११ मुक्काम नरवाडी खुर्द, पौा पैठण, जाणून स्वकीय लेखन केलें पाहिजे विशेष कृपा करून पत्र पा तें पावलें मोंगलाई लढाई होऊन मोंग लांचा पराभव जाहल्याचा संतोष आहला, म्हणून विस्तारें लिहिलें ऐसियास, सर्व आपले व देवब्राह्मणाचे आशीर्वादाचें फळ पुढेंहि जें होणें तेंही आपलेच कृपेनें होइल भेटलों व काठीपिंपळगावाविषयीं लिा पेशीयाशीं प्रस्तुत गाद्दापुरास कोणी कमावीसदार नेमिला नाहीं निंबकपंत तूत मोंगलाचे अमि लास धरावयाकरिता पा होते त्याणीं त्याचें पारपत्य केलें मार्निलेस बरा ऊ गेलें आहे तेहि लौकरीच येतील आणि मानिल्सही पत्र या बापूचें लिहून पाठविलें आहे तें त्यास प्रविष्ट करावें म्हणजे स आपले गांवास उप सर्ग लागों देणार नाहीं श्रीमंतांचेंहि पत्र स्वामीस आहे त्यास श्रीमंताच्या हातच्या वळी आहेत बहुत काय लिहिणें? लोभ असो दिजे हे विनंति

---

पत्रांक ११                श्री                १६८५ श्रावणवद्य १४

राजश्री मोरोबा शिंदे तालुके रत्नागिरी गोसावी यासि —अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य श्रा माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद सुा अर्बा सितैन मया व अलफ मौजे कदवाव, ताा संगमेश्वर, प्रां राजापूर, हा गांव राजश्री नारो पंडित प्रतिनिधि यांचा खासगीचा गांव तेथें मोरो गोविंद कमावीसदार पंडित मारनिलेनीं पाठविला आहे त्यास, किा प्रचीतगडचा उपसर्ग लागतो याजकरितां कमाविसदारमार यास किल्ले भवानगडीं जागा देणें व हरएकविषीं कमाविसदारास व मौजेमारा किल्ले प्रचीतगडकरी यांचा उपसर्ग लागों न देणें जाणिजे छ २७ सफर बहुत काय लिहिणे? लेखनसीमा




---

पत्रांक १२

पो॥ १५ जिल्काद. श्री. १६८५ भाद्रपद वद्य ८

राजश्री मोरोजी शिंदे नामजाद तालुके रत्नागिरी गो॥ यासिः—
अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो॥ माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद. सु॥ अर्बा सितैन मया व अलफ. बा॥ देणे धर्मादाव. वे॥ केशव भट गोखले, वास्तव्य मौजे सोमेश्वर, ता॥ हरचिरी, याजकडून मौजे मजकुरीं श्री सोमेश्वरास नित्य एक एकादशनी करविली. त्याबा॥ दक्षणा साल गु॥ ची रु ७५ पाउणसे एक सालाची तुह्माकडून देविले असे. तरी तालुकेमजकूरपैकीं पावे ते करून, पावलियाचे कबज घेणे. जाणिजे. छ २२ रबिलावल. बहुत काय लिहिणे ? लेखनसीमा.




---

पत्रांक १३ श्री (नकल) १६८५ पौष शुद्ध १

राजश्री सोमाजी काळे गोसावी यासीः—
अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्नो॥ माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद. सु॥ अर्बा सितैन मया व अलफ. विजापूरप्रातीं सरजाम राजश्री नरसिगराव जनार्दन यास दिल्हा आहे. त्याचा बदोबस्त राहणे. त्यास, मशारनिल्हेस ते प्राती रवाना केला असे. तरी तुह्मी त्यास सामील होऊन, ठाणे बसवून देणे जाणिजे. छ २९ जमादिलाखर. बहुत काय लिहिणे ? लेखनसीमा.

---

पत्रांक १४ श्री (नकल) १६८५ पौष शु॥ १

राजश्री रामभाऊ डफळे गोसावी यासीः—
अखडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो॥ माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद. सु॥ अर्बा सितैन मया व अलफ. राजश्री नरसिगराव जनार्दन धायगुडे यांस सरंजाम दिल्हा आहे. त्याचा बदोबस्त होणे याजकरिता मशारनिल्हेची रवानगी केली असे. त्यास, तुह्मीं त्यास सामील होऊन विजापूरप्रातीं त्यास महाल दिल्हे ते ठाणीं बसवून देणे. जाणिजे. छ २९ जमादिलाखर. बहुत काय लिहिणे ? लेखनसीमा.

पत्रांक १५ श्री १६८५ पौष शु॥ १




दस्तक सरकार राजश्री पंत प्रधान मता कमाविसदारान व चौकीदारान व रहदारान व बाजेलोकान व जकाती महालानिहाय सु॥ अर्बा सितैन मया व अलफ राजश्री बाळाजी जनार्दन यांचे बैल सर १५० दीडशें मौजे धामणगाव, पा अकोले, येथून गल्ला बैली खंडी १५ भरोन पुण्यास आणिती ते त्यास आणूं देणें हांसिलाचा तगादा न लावणें जाणिजे छ २९ जमादिलाखर आज्ञाप्रमाण लेखनसीमा बार

---

पत्रांक १६ श्री १६८५ पौष शु॥ १

राजमान्य राजश्री गणेश व अंताजी मल्हार दि॥ रामजी पवार गोसावी यांसी —

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सु॥ अर्बा सितैन मया व अल्फ राजश्री बाळाजी जनार्दन यांनी इमारतीचे रायपळ लाकडांचे गाडे पांटागाहून पुण्यास येत होते ते तुम्ही मौजे वडगांव येथे अटकाविले आहेत, म्हणोन हुजूर विदित जाहलें त्यावरोन लिहिलें असे तरी, तुम्ही मशारनिल्हेचे गाडे लाकडाचे अटकाविले आहेत त व आणिकही पांटागाहीं लांकडें आहेती आहेत तीं दस्तकाप्रमाणें पुण्यास आणितील त्यांस आड न दिजे अटकाव न करणें जाणिजे छ २९ जमादिलाखर आज्ञा प्रमाण लेखनसीमा

आणि राजश्री धोंड जोशी यांसीं भाषण केले. त्यांनी आह्मांस लिहिले. त्यांत मजकूर त्यांनी सुचविला की, तीर्थरूप राजश्री भाऊचे पत्र पाठविणे की, ऐवज देणे. ह्मणोन, त्यावरून, तीर्थरुपाचे पत्र पाठविलें आहे. पावेल. ऐवजाचा मजकुर तरी. श्रीत देविला असतां तरी उतरून घेतो. हा मजकूर राजश्री जोशी यानीं आपणांसी केला. आपण उत्तर केलें की, येते समयीं बरोबर आणिला. बरे! उत्तम! हाली मशारनिल्हेचे आपले भाषण जाहाले आहे, त्याप्रमाणे ऐवज पुणियांत उतरून द्यावा, सोने व रुपे याचे दागीने आणिले असतील ते दागीने यादी बरहुकूम द्यावे, नख्त;ऐवज पुणीयात उतरे ते करावें· याजखेरीज चौकडा व आणखीं काहीं मोतेंयाचे दागीने असल्यास, तेही त्यांचेच हवाली करावें. राजकी वर्तमान तरी: हैदरनाइक बिदनूरची झाडी धरून बसला आहे. बाहेर निघत नाहीं. श्रीमत मनोलीस लागले होते. आठ रोज ठाणें माडलें. हस्तगत करून धारवाडास जाणार. तो काहीं यांसी सन्मुख येऊन भाडता दिसत नाही. फौज यांजबराबर वीसपचवीस हजार जमा जाहाली. मागाहून आणखी येत आहे. पुढे होईल ते लिहून पाठवू. बहुत काय लिहिणे? लोभ किजे. हे विनति,

पौ. चैत्र वद्य ६ शनवार शके १६८६

---

पत्रांक १८ श्री १६८५ फाल्गुन वद्य १३

राजश्री सर्वोत्तमपत गोसावी यांसीः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रो माधराव शिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जार्णे. विशेष. तुह्मी पत्र पाठविले ते पावले. राजश्री नारायणजीनाइक सरपाटील, प्रांत साष्टी, यांस रुपये ५००० पांच हजार द्यावे, ह्मणोन छ ५ रजबचे पत्र पाठविले. त्यावरून पुणेकर सावकाराचे कर्ज घेऊन दिल्हे. त्यास, हालीं रा चिंतो माहारुद्र पाठविले आहेत. यासमागमे सदरहू रुो पाठवावे, ह्मणोन लिहिले. ऐशियास, आठपधरा रोजीं नालबदीचे काम चालीस लागले ह्मणजे ऐवजाची तर्तूद करून पाठवून देऊं. वरकड वर्वमान रा चिंतो माहारुद्र सांगतां कळे-

ल था छ २६ रमजान, मुा अर्मा सितंन बहुत काय लिहिणें । हे विनति
मोर्तबसुद

भोजोतिस्वरूप चरणि
तत्पर जयाजीसुत जन
कोजी शिंदे निरंतर

---

पत्राक १९ श्री १६८६ चैत्र शुद्ध ३

राजश्री जानोजी भोंसले सेनासाहेबसुभा गोसावी यांसी —

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो मा
धवराव बल्लाळ प्रधान आशिर्वाद विनती उपरी येथील कुशल जाणून स्व
कीय लिहिले पाहिजे विशेष प्रगणें सारवाड येथील जाहागिर सरंजाम खास
मजकुरीं फौजेचे वेगमीस सरंजाम राजश्री नरसिंगराव जनार्दन यांजकडे दिले
आहे त्यास, त्यांचे ठाणें अद्यापि महालांत बसले नाहीं, म्हणोन मानिल्हेनीं
अवगत केलें त्यानवरून पत्र लिहिलें असे तरी, तुमची फौज ते प्रांतीं आली
असेल त्यास सांगून ठाणें सारवाडास बसतें करावें रा छ २ सवाल बहुत
काय लिहिणें ? लोभ किजे हे विनती

श्री
राजाराम नरपति हर्ष
निधान माधवराव
बल्लाळ मुख्य प्रधान

---

पत्रांक २० श्री. १६८६ चैत्र वद्य १४

राजश्री मोरोजी शिंदे नामजाद ता। रत्नागिरी गोसावी यासीः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो। रघुनाथ बाजीराव आशिर्वाद. सुा आर्बा सितैन मया व अलफ. रा। अताजी नारायण याजकडून पेट बदर ता। हरचिरी येथून आबसोल आणविलं असे. तरी, च्यार बेगारे देऊन, आबसोल पोहोचाऊन देणे. जाणिजे. छ २८ सवाल. बहुत काय लिहिणें ?




*ह्या शिक्याला पाच वर्तुलें आहेत. हा रघुनाथरावदादाचा शिक्का ! विचाराचें सर्वच कांहीं आचरट!

1764

पत्रांक २१ ॥ श्री ॥ १६८६ श्रावण शुद्ध ३

वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशिव-दिक्षित स्वामीचे सेवेसी:—

विद्यार्थी माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. शहरास जावयाकरिता निजामअल्लीखान गंगा राक्षसभुवनानजीक उतरू लागले. काहीं फौज व बाहिरखुणगे पलीकडे गेले. नावपिना व सरदार व विठ्ठलदास दाहापंधरा हजार फौजेनिशीं इकडे होते. त्यांचे पारिपत्यास जाऊन, छ २९ मोहरमीं गाठ घातली. मातबर लढाई झाली. विठ्ठलदास व विनायक दास, गोपाळसिंग खदारकर वगैरे ठार जाले. मुरादखान व रघुपतराव पिंगळे, मालोजि घोरपडे, बाबूराव जगी वगैरे पाडाव जाले. त्यास, माणूस पांचसास हजार रणास आले. श्रीकृपेनें मोठी फत्ते जाली. तोफा, हत्ती सापडले. निजाम अल्लीखान पडतीरास होते. ते मध्यें रात्रीं कूच करून, तोफा व डेरे टाकून, पळोन गेले. संतोषाचें वर्तमान तुह्मास कळावें, याजकरिता लिहिलें असे. रा॥ छ ३ सफर. * बहुत काय लिहिणें १ हे विनंती.

* येथून अक्षर खाशाचें.

पत्रांक २२ श्री १६८६ कार्तिक शुा ५

अखंडितलक्ष्मीअलंकृतराजमान्य राजश्री
रामचंद्र यशवंत गोसावी यांसी —

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा खमस सितैन मया व अ लफ. राजश्री दमाजी गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर यांजवर राजश्री रामचंद्र महादेव परांजपे व मार्तंड नाईक सासके साहुकार यांस राजश्री मल्हारजी होळकर याचे ऐवजीं दोन लाख रुपयाची वरात रदकर्जाची पेशजी दिल्ही आहे त्यापैा कृष्णाजी नाइक लड्डू यांजवळ एक लाख रुपयांच्या मात्र वराता कमाविसदारावर दिल्यात बाकी लाख रुपये राहिले ते देत नाहींत सरकारात इजाफ्याचा ऐवज पावला आहे, म्हणोन नाइकमारनिलें यांणीं सांगितलें त्याजवरून, इा सन सलास सा सन अर्बा दुसाला गाइकवाडाकडील ऐवजाचे वसूलबाकीचा हिशेब अलाहिदा पाठविला आहे त्या हिशेबीं रुा ८७७६।– आठ हजार सातसें सवा शाहात्तर रुा आणा मात्र फाजील आहे त्यास, सालचे सालांत मुदतीप्रमाणें ऐवज यावा तो न आला त्यांचे व्याजहि होणें आहे व सालमजकूरचा ऐवजहि येणें आहे असें असोन, होळकराचे ऐवजास दिक्कत द्यावा, यास कारण काय ? हा ऐवज सालगुदस्तांच यावा, तो न दिला होळकराकडील कारकून गंगाधर यशवंत याने पुत्र व राऊजी महादेव ऐसे तीर्थरूप राजश्री दादासाहेब यांजवळ आहेत त्यास, दोन लाख रुपयांचा निगम झाल्याशिवाय निरोप होत नाहीं सरकारांत ऐवजाची निकड याजकरितां नाइक मारनिलेपासून ऐवज घेऊन वरात दिल्ही, त्यास ऐवज जरूर पावला पाहिजे याजकरितां हें पत्र तुम्हास सादर केलें असे तरी पत्रदर्शनीं लाख रुपयांच्या पुण्याच्या हुंड्या नाइकमारनिलेस देऊन, पावल्याचें कबज घेऊन, हुजूर पाठवणें दिरंग न लागे हुजूर मजकूर न दर्शे जाणिजे छ १ जमादिलावल *

---

पत्रांक २३ श्री १६८६ कार्तिक वद्य ६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री रामचंद्र यशवंत स्वामी गोसावी यांसी—

पो। माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें विशेष राजश्री दमाजी गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर यांजकडे सरकारचा ऐवज येणें त्याचे वसुलास हुजून

---

* [illegible] पत्र दमाजी गायकवाडास [illegible] [illegible] [illegible] आहे

राजश्री बाळाजी अनंत कारकून यास पेशजी पाठविले होते. त्याजबराबर गायकवाडाकडील ऐवजाचे वसूलबाकीचा झाडा पाठविला तो सरकारात दाखल जाहाला. त्यात सवा लाख रुपयाच्या हुंड्या राजश्री आबाजी नाईक कापरस व कृष्णाजी नाईक लाड्डू याचे गुजारतीने सरकारात हुजूर भरणा जाला. ह्मणोन झाड्यात वसुल घातले आहेत. त्यापैकीं परभारें वरातदारास ऐवज पावला. वराता व कबजे येणे आहेत, रुा ५९२२५. बाकी ऐवज राहिला रुपये ६५७७५, पासष्ट हजार सातशे पचाहत्तर रुपये राहिले. हा ऐवज तुह्माकडे खुद निसबत राहिला. त्यास, सरकारात ऐवजाची निकड, हे पुर्ते तुह्मास ठावकें असोन, गायकवाडापासोन ऐवज घेतला असता, सरकारात भरणा केला नाहीं, हे अपूर्व आहे ! असो ! हाली हे पत्र तुह्मास सादर केले असे. तरी सदरहू पासष्ट हजार सातशें पचाहत्तर रुपये ज्या मिसीने घेतले असतील, त्या मित्तीपासून व्याजमुद्दा ऐवजाच्या हुंड्या साहुकारी पुण्याच्या पत्रदर्शनीं राजश्री रामचद्र माहादेव पराजपे व मार्तंड नाईक तासके यास देऊन, पावल्याचे कबज घेऊन, हुजूर पाठवणे. फिरोन बोभाट येऊ न देणें. जाणिजे. छ ४ जमादिलावल, सुा खमस सितैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे ? हे विनती.

---

पत्रांक २४ श्री १६८६ माघ वद्य १३ सह १४

वेदमूर्ती शास्त्रसपन्न राजश्री दीक्षितबाबा स्वामी महाराजाचे सेवेसी—

चरणरज खडोजी अरगडे, मुा लष्कर तुगभद्रा, नजीक हरहरेश्वर, साष्टांग दडवत विनति उपरी येथील कुशल ताा माघ वाा १४ चतुर्दशी सोमवार पावेतो तुमचे आशिर्वादे करून सुखरूप असो. यानतर तुह्मापासून स्वार जाले. त्यास, तुह्मी माणूस बराबर दिल्हे होते ते फलटणपर्यंत आले. तेथून न पुसता माघारा गेला. तुह्मीं बाबूजीनाईकास व कृष्णराव बल्लाळ यास पत्रें दिल्हीं होतीं. त्यास, बाबूजी नाईक बारामतीस गेले. त्याजपाशीं बारामतीस मीहि पत्रें घेऊन गेलो. त्यास पत्र प्रविष्ट केले. त्यानीं उत्तर दिल्हे कीं, तुह्मीं पुढें चला, मीहि मागाऊन येतो. त्याजवरून, लष्करात आलो. कृष्णा रावजीसही पत्र प्रविष्ट केले. व श्रीमत साहेबासही पत्र प्रविष्ट केले. श्रीमतानीं चिटणिसांस ताकीद केली कीं, दीक्षिताच्या नावाच्या सनदा करून देणें. त्याजवरून सनदा करून आणिल्या. तारीख, विनति, करावी इतकाच गुता होता. तों मोरोबा फडणवीस बोलिले कीं, महाराज ! दिक्षितांत दोहीं चुलत्या पुतण्याचें पटत नाहीं. त्यास, देणें तर विचारून द्यावे. बाबादीक्षिताचें ताळुकियात गांव यावा, ऐसाहि अर्थ नाहीं. याजवरून, तारखा व विनति पत्रावर जाहली नाहीं ! आबाजी माहादेव यानींहि साहित्य केले. परतु सखारामबापू

बाबा चिटणीस यांणीं लिहिले. तेथे सदाशीवपत वैजनापुरकर कार्यामुळे आले होते. त्याणीं पत्र पाहून आह्मांस ह्मणाले कीं, हे उत्तर काय कामाचे आहे? मग, त्यानी रामाजीबावास लक्ष्मणपताचा स्तुतिवाद सविस्तर केला, तो पत्री लिहिता विस्तार आहे. त्याजवरून रामाजीबावानी एकान्ती सविस्तर वर्तमान श्री राजश्री रावसाहेबांस विदित केलें. त्याजवरून आज्ञा जाली कीं, पहिले प्रमाणे सनद करून देणे. हे परवानगी फडणिसाकडे पोचविली. परतु गुरुजी-बावांनी न मानिता टाळा दिल्हा! उपरात रा सदाशिवपत वैजनाथपुरकर व आपण रामाजीबावास सागून, दुसरी परवानगी मोरोबा फडणीस याजला पावती केली. निदान गुरुजींनीं रा मोरोबादादास सागून रा नारो बाबाजी सुभेदार याचे नावे सनद देवविली. ते सनद तयार जाली. आपण घेऊन येत होतो. तो त्यास रा सदाशिवपंत पाळदे यानी बोलावून वर्तमान पुसले. जालें वर्तमान यास विदित केले. ते ह्मणालेत कीं, मजलाहि याविषयीं पत्र आले आहे, च्यार रोज राहता नव्या सनदा भेडाळियाच्या व नळकियाच्या करून देतो. याजकरिता गुता जाला आहे. राजश्री बाबूजी नाईकहि आले आहेत. हैदरनाईकाचा जाबसाल लागला आहे. यामुळे गुता दिसतो. सविस्तर वर्तमान सदाशिवपत वैजनाथपुरकर यांनीं लिहिले आहे. विदित होईल. आपले आशीर्वादेकरून बोलबाला आहे. श्रुत होय हे विनती.

---

पत्रांक २६ श्री. १६८७ आषाढ वद्य २

अखडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन धायगुडे गोसावी यासीः—

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुा सित सितैन मया व अलफ. खासा स्वारी श्रावण वद्य पक्षी बाहेर निघणार. तर तुह्मीं आपले पथकाचे लोकांची तयारी ऐव्हापासून करून, भाद्रपद शुद्धात हुजूर येणे. विलंब न लावणे. जाणिजे. छ १५ मोहरम. बहुत काय लिहिणे ?

---

पत्रांक २७ श्री. १६८७ आषाढ वद्य ५

अखंडितलक्ष्मीअलकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन गोसावी यांसीः—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार सुा सित सितैन मया व अलफ. खासा स्वारी श्रावण वद्यांत बाहेर निघणार, तर तुह्मीं आपली एव्हां पासून तयारी करून भाद्रपद शुद्धांत येणे, जाणिजे, छ १८ मोहरम बहुत काय लिहिणें ?

---

पत्रांक २८ श्री १६८७ आषाढ वद्य ३०

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन गोसावी यांसी —

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा सित सितैन मया व अलफ सुमचे सरंजामात महाल —

१ प्रां गुंजोटी
१ प्रां सारवाड
१ प्रां घाट-नांदूर.

———

३

तीन महाल सरंजामात आहेत परंतु अमल बसला नाहीं नबाब निजाम अलीखान यांजकडील अमिलानीं महाल दाबिले आहेत, यांजकरितां नबाबास लिहिलें होतें त्यावरून त्यांनीं सदरहू तीन महालचे अमिलांस तीन पत्रें व जमीदारास तीन पत्रें, एकूण सहा पत्रें, पाठविलीं आहेत कीं, अमल सुरळीत देणें तीं तुम्हाकडे पाठविलीं आहेत सनदा महालीं रवाना करून, ठाणीं आपले हवालीं करून घेऊन, महालचा बंदोबस्त करणें सनदा पावल्याचा जाब पाठवून देणें जाणिजे छ २८ मोहरम बहुत काय लिहिणें !

---

पत्रांक २९ श्री १६८७ भाद्रपद वद्य ०

राजश्री रादेराव जाधव यांसी —

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवा माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद सुा सितैन मया व मया व अलफ परगणे देगांव राजश्री सदाशिव दिक्षित व पुत्र नारायण दिक्षित ठकार आधीच गुदस्ता सन हरिदेशीनजीक घेऊन श्रमानें यांची चाकरी केली ३००० तीन हजार नक्त रुपये देविले असतां ती तुम्हांकडे पो गाडापूर मनोरे महाल मेर्थ व वारसांचा देणेत आलमनजरच्या दोन ला मां सदरहू एक चावडीस ह । रुपये करून दर्शनि

याचें कबज घेणें. सदरहू ऐवज माघ-मासीं पावता करणें. जाणिजे छ २१ रबिलावल. बहुत काय लिहिणे ?







---

पत्रांक ३०




श्री. १६८७ आश्विन शुा ६

राजश्री हवालदार व कारकून किले वंदन गोसावी यासी

अखंडित-लक्ष्मी-आलंकृत राजमान्य स्नो माधवराव बल्लाळ प्रधान आसीर्वाद व नमस्कार. सुा सीतैन मया व अलफ. वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशिव दिक्षित टकार यांनीं विदित केलें कीं किल्ले मजकुरीं सभासदीची असामी आपल्याकडे च्यारशें रुपयाची चाळीस वर्षे चालली. अलीकडे. दोनशें रुपये करार करून दिल्हे. त्याप्रमाणे चालत असता, वर्षासन रुपये १२ बारा किल्याकडोन पावत असोन, किल्ला राजश्री बाबूराव सदाशिव याजकडे जालियापासून सदरहू असामीचे रुपये व वर्षासन पावत नाहीं. ह्मणून ऐशास दरसाल दोनशे रुा पावत असतां हालीं न पावयास कारण काये ? तरी, याजउपरी सदरहू दोनसे रुपये सालाबाद पावत आलिया

ग्रो पालखीत जाणें व चाळीस मर्ये बारा रुपये मपासन पावत आल्यावमो जीव पावयीत जाणें जाणिजे छ ४ रासर आज्ञाप्रमाण




---

पत्रांक ११ श्री १६८७ कार्तिक वद १

रोसा राजश्री येशवतराय दामोदर हवालदार तो सॉदळ सा कमावीस दार व मौजे कल्या ता मार मुा शीत सिवेन मया व अलफ भिका जीराम कुळकर्णी मौजे मार यानीं माहाली येऊन विनंति केली कीं, मौजे मारचें कुळकर्ण आपणाकडे चालत आहे त्यास, सोवीचा गांव रेाा पानेगांव सोवीचे शिरस्तेप्रमाणें गुसाला कुळकर्ण मुा शिरोळी सदी अज शेत निकास एक कुडव व वजनी बिग्रस दर मणें अज विफास एक शेरप्रमाणें पावत आलें असतां गुदस्तां सन समसांव मौजे मारेचे का दार यानीं आरमाराकडेस मुमा जाऊन गेरवांका समजाऊन ऐन जिनस दूर करून नक्त मुशाहिरा घेणें हपोन सनद आणिली, त्याजवरून भि काजीराम हुजूर जाऊन आपली पूर्व हकीकत सांगितल्यावरून पानेगांव सोवीचे शिरस्त्याप्रमाणें शिरोळी दर सदीस एक कुडव व वजनी जिनसास एक शेरप्रमाणें ऐन जिनस मुशाहिरा देत जाणें अशी मुमा सनद सादर माहासी त्याजवरून [ व ] मुभाची माहासी जाहाल्यावरून हे रोसा सा दर केला असे तरी ऑमरगाव मोर्तीने आहेत त्यास शिरस्त्याप्रमाणें मार निस्बेचा मुा ऐन जिनस देवणें कजिया असल्यास माहाली मेणें जाणिजे छ ११ माहे जामद मोतव सुद यार

---

पत्रांक १२

श्री ( अक्षर समोशिव नक्त )

१६८७ कार्तिक वद ६

( शिक्का थोरले माधवराव साहेबाचा )

दादी पयाद व पागा निा राजश्री शिवाजी कृष्ण मुा शीत शिवेन मया व असर हराम नि वर्षांस —

किता पा वगैरे.
१ पो आलद.
१ पो गुजोटी.
१ पो शाहापूर.
१ पो माचनूर.
१ पो मौजे पुलज पो माह्योल.
१ पो आलमेल.
==
६

निंबाळकराकडील रांजणगांव वगैरे देशचेमोबदले याचे सुटतील ते दरोबस्त सरकारचा अमल मारनिल्हेकडे करार करून द्यावा. येणेंप्रमाणे निंबाळकराचा करार जालियावर सनदा देणे.

पांच परगणे, एक गाव, येणे प्रो मारनिल्हेकडे फौजेचे बेगमीस करार करून देऊन सनदा देणे. पो सागोलें द्यावयाचा करार केला आहे. त्यास, राजश्री दादासाहेबांची भेट जालियावर तिकडून सोडून मारनिल्हेकडे देविला जाईल. येणेप्रमाणें करारा कदाचित् न सुटल्यास, त्याचे मोबदला याच प्रो. दुसरा माहाल नेमून देविला जाईल. येणेप्रो करार.

त्यानीं क्षेप निक्षेप पावावे. येणे प्रो करार.

विठल कृष्ण यास पालखी सालमारीं देऊन तैनात पालखीस बारमाही १००० एक हजार रा नेमला ऐवज याशिवाय हरएक ऐवजीं पावते करावें. येणेंप्रो करार.

पा बीड येथील दिगरजाहागिरीचे गाव रामचद्र गणेश यांचा ऐवज व दुमाले वजा करून, बाकी दरोबस्त सरकाच्या अमलाची सनद देणे. पो शाहापुरची सनद सालमजकुरीं दिल्ही परंतु रा गोपाळराव गोविंद याची भेट जाहलीयावर त्याची सोय करून परगणा तुह्मांकडे सोडून देविला जाईल. तूर्त तुह्मी अमलास पो मजकूरीं खलेल करूं नये. येणेप्रो करार. बिनी रखवालीचा ऐवज आकारेल तो सालमजकुरी पथकाकडे पंधरा हजार द्यावे. बाकी सरकारांत जमा करावे. येणेप्रो करार.

निंबाळकराकडील गाव न सुटले तरी त्याचे मोबदला दुसरे परगणे नेमून द्यावे येणेप्रो स्वदेशीं नेमून द्यावे. येणें प्रो करार.

छ १५ जमादिलावल, सीत, कार्तिकमास, सनदा लिहिणे.
असल दप्तरीं असे. छ २५ जोवल.

पत्रांक १३ श्रीरामचंद्र १६८७ कार्तिक वद ७

राजश्री कृष्णाजी नाइक कापडकरी साहुकार वगैरे निा पत्तन पाल गोसावी यांसी —

अखंडित लक्ष्मीअलंकृतराजमान्य सेना दमाजी गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादुर. सुहुरसन सित सितैन मया व अलफ तुमच्या जकात दार यांजवर सादर स मरातबपैकीं निमे ऐवजपौष अखेर येणें बाकी राहिला ऐवज निम्मे तो फाल्गुन अखेर येणें कराराशिवाय जासती उपद्रव मेहेरबान मजकूरास न देणें खर्चवेच जो ज्याल तो मरातबपैकीं मजरा असे जाणिजे. छ २० माहे जमादिलावल मोर्तबसुद




---

पत्रांक १४ श्री १६८८

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री सखारामपंत पाटकर स्वामीचे सेवेसीं —

पो रापो केशव भट क्षा नमस्कार विनंति उपरी येथील कुशल लेखन करीत असलें पाहिजे विशेष बहुत दिवसपावेतो पत्र पेठऊन वर्तमान कळ नाहीं तरी सदैव पत्र पाठऊन परामर्ष करीत असावा (इकडील वर्त ) मान तरी राजश्री अंताजीपंत जादा हिंदुस्थानांत श्रीमंत दादाबरोबर गुजर पाहेत हमेशा पत्रें येत असतात मी लष्करांतून आलों ते समयी मजला भेटले होते त्यांस पत्र पाठविणें तरी आम्हांकडे पाठवीत जावें पोरोप्रांतीच राजश्री तेथील दागीने गुजराती चंदनाविषीं लिहिलें आहे ते चंदन देतील तो पेठऊन आम्हांकडे पाठऊन द्यावा पैका पडेल तो तुम्ही देऊन आम्हांस लिहून पाठ पावे. रुपया पाटला देऊ १०१०१०

---

पत्रांक ३५. श्री. १६८८ वैशाख वद्य ७

तीर्थस्वरूप राजश्री गणेशभट दादा वडिलांचे सेवेशीं:—

अपत्यें दामोदराने चरणांवर मस्तक ठेऊन सा नमस्कार विनति येथील क्षेम ता. वैशाख वा। ७ मदवार, मुक्काम पुणें, सुखरूप असों. विशेष. आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन सविस्तर वर्तमान कळो येत नाहीं. तरी ऐसें न करावें. सदैव पत्र पाठवून सांभाळ करीत जावें. यानंतरीं येथून हुंडी साडे तेरा रुपयांची मुंजावर केली आहे. त्यास मुजाकडून साडे तेरा रुपये घेऊन वो वाळोपाध्ये हर्डीकर खिणगिणी यांस पावते करावे. पूर्वी माणसाबरोबर पत्र पाठविले तें पावलें. शरीरास समाधान नाही ह्मणोन माणसानें सांगितलें. त्यास, औषधीउपाय करून शरीरास आरोग्य होय तें करावें. इकडील वर्तमान तरी, श्रीमंत राजश्री दादा हिंदुस्तानात नर्मदा उतरोन गेले. बळवंतराव थोरले श्रीमंतांसमागमें पुण्यास आले. श्रीमंत राजश्री तात्या वडील माणसें सर्व सुखरूप आहेत. कळावें ह्मणोन लिहिलें आहे. येजमानाविशीं देवास प्रार्थना करीत जावी. बहुत काय लिहिणे ? लोभ करावा, हे विनति.

---

पत्रांक ३६. श्री १६८८ आषाढ शुद्ध ९

पौ आषाढ वा। १ शके १६८८ व्ययनाम सवत्सरे.

श्रीमत राजश्री बाबूराव साहेबांचे सेवेसीं:—

सवक बयाजी बागडे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन आज्ञा करीत असावें. विशेष. तुमचे रु॥ आह्मांकडे आहेत. त्यांपैकीं रु॥ विसाजीपंत गोळवलकर याजवर चिठी रु॥ ७०० अक्षरीं सातशें, गंजी कोट–आरकाट, यांची चिठी राजश्री रामाजी गोविंद वल्हेकर यांणीं दिली आहे. सदर्हु चिठीचे रु॥ घेऊन पावलियाचें उत्तर पाठऊन दिल्हें पाहिजे. मिति शके १६८८ व्ययनाम सवत्सरे आषाढ शु॥ ९. सदर्हु ऐवज आपण येथें अंताजीपतनाना याजजवळ देत होता. एक महिना जाहाला. परंतु ते न घेत. याजकरिता तुह्माकडे ऐवज पाठविला असे. तुमची बाकी राहिली तेहि पंधरा दिवसा घेऊन येतों. बहुत काय लिहिणें ? कृपा करीत असावें. हे विनंति.

---

पत्रांक ३७ श्री. १६८८ आषाढ वा। ३

राजश्री आनंदराव धुळप गोसावी यांसी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ माधव बल्लाळ प्रधान अशिर्वाद. सुरसन सबासितैन मया व अलफ. विठ्ठलराम कुळकर्णी मौजे केळवली ता

सौंदळ यांणीं विदित केलें कीं, मौजे मजकूरची खोती कृष्णप्रभु देसाई, या मजकूर याजकडे आहे त्याणीं गांवचीं मुलें आज्ञावर पावलीं त्यामुळें आप ला नाश बहुत जाहाला येथें आनंदराव धुळप यांणीं त्याचें व आमचें वर्त मान मनास आणून, गांवकरी याचे गुमास्तीनें मुलें आपणावरी देसाइ यांनीं घावलीं हें सर्व जाहाले ! त्याप्रमाणें मुलें वाय (यथा) विशीं देसाइ यांणीं कवचा दिल्हा परंतु मुदतीस वारलीं नाहीं ! आणि बाळाजी कृष्ण माईणकर यास देसाई यांणीं खोती सांगितली त्याजवर मागती पदधळे पाळानें, मुलें देसाइ याचे घर्ढे पडलीं ऐसें निवडलें ! त्याप्रमाणें वारिलों म्हणून बाळाजी कृष्ण माइणकर यानें कबूल केलें परंतु वारिलीं नाहीं ! आम्हांस मुलें उपद्रव करितात ! त्यास येविशींची आज्ञा करावी म्हणोन, त्याजवरून, तुम्हांस पत्र सादर केलें असे तरी कृष्ण–प्रभु देसाई, बाळाजी कृष्ण यास व त्याचे क आचे कागद तुम्हांपाशीं असतील ते हुजूर पाठविणें हरदु वादियाचें वर्तमान मनास आणून ज्याकडे अपराध लागल त्याचें पारिपत्य केलें जाइल जाणिजे छ १६ सफर. बहुत काय लिहिणें !

---

पत्रांक ३८ श्री १६८८ श्रावण शुद्ध ५

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बापूराय कोनेर गोसावी यांसी —

पो माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जा णोन स्वकीय कुशल लिहित जाणें विशेष पत्र पाठविलें तें प्रविष्ठ जाहालें यन्हाटातून येतां स्वामीनें दर्शन करून वगैरे यावें त्यास मोगलांचें सैन्य मध्यें दोवें यास्तव अनुकूल न पडलें–याचा अर्थ लिहिला तो सविस्तर क- ळला घरीं गेला, उत्तम केलें ! तूर्त कांहीं नवीन प्रकार नाहीं पुढें जग प्रकार दृष्टीस पडेल तदनुरूप तुम्हांस लिहिलें जाइल जाणिजे छ १ रबि लावल मुा सबा सितैन मया व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंति

---

पत्रांक ३९ श्री शंकर १६८८ भाद्रपद

आशीर्वाद उपरी आपणाशी करार केल्याप्रमाणें स्वांत समाधान ठेवावें काळजी नसावी, आपणांस विश्वास नसे असो ! अतःपर तन्ही चावलनामा जाहालें असेल साक्षीदारांवर मोहरें करून देवविलें दोन मही रवाना करणें •

---

• हे पत्र गुद रघुनाथराव दादा यांच्या हातचे आहे

---

पत्रांक ४०. श्री १६८८ भाद्रपद शुद्ध ५

सेवेसी गोविंद शिवराम व चिंतो अनंत कृतानेक सां नमस्कार विज्ञापना. स्वामीची. आज्ञा घेऊन निघालो तो मंगळवारी संध्याकाळीं श्रीमंतांजवळ आलो. सर्व वर्तमान निवेदन केलें. त्यास, गुरुवारी भेटावयाचा मुहूर्त पाहिला होता तो निवेदन केला. त्यास, येथील मर्जी कीं बुधवारीं संध्याकाळींच भेट जाहली पाहिजे. येथील पंच्यांगीं गुरुवारी दिनक्षय आहे. रेवती नक्षत्र श्रीमंतांचें घात नक्षत्र आहे. यास्तव बुधवारींच भेटावें हाच निश्चय केला पाहिजे. संध्याकाळपर्यंत सुमारें सत्वर यावें. फौज बराबरील सारीच आणावी, अशी येथील मर्जी आहे. जर फौज मागे ठेविली, तरी फौजेची वाट न पाहतां बुधवारीं संध्याकाळींच यावे. हत्ती अबारिया आणाव्या. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

पत्रांक ४१. श्री . १६८८ भाद्रपद शुद्ध ५

सेवेसी गोविंद शिवराम सां नमस्कार विज्ञापना. आज्ञा घेऊन आलों. श्रीमंतांचे दर्शन जाहले. बोलणें बहुत जाहलें. गुरुवारचा मुहूर्त वाईट आहे. दादासाहेबाचे घातनक्षत्र आहे. यास्तव बुधवारींच भेटी व्हाव्या, हा निश्चय ठरला. गंगा उतरून शें दोनशें राउतांनिशीं येणार. वरकड कांहीं गुंता नाहीं. बेवसवास यावे. हे विज्ञापना.

---

पत्रांक ४२. श्री १६८८ भाद्रपद शुद्ध ६

शिक्का नक्कल.

ई मा अनाम देशमुख व देशपांडे, प्रो पडदूर, सरकार जालनापूर, यांसीः— माधवराव बल्लाळ प्रधान. सुा सबा सितैन मया व अलफ. प्रो मजकूर येथील देहे,

| | | |
|---|---|---|
| १ मौजे सुगाणे | १ मौजे तरवडे | १ मौजे वरफळ |
| १ मौजे लिखितदरी | १ मौजे वैजोडें | १ मौजे लिगसे |
| १ मौजे पाकणी शरामत | १ मौजे टाकळी | १ मौजे शिराळे |
| १ मौजे गेवराई | १ मौजे डोलार. | १ मौजे कर्जखेडे |
| १ मौजे गुळखेडे | १ मौजे सृष्टी | १ मौजे देवळें |
| १ मौजे कोटाची सळई | १ मौजे खडेले | १ मौजे कोळोलदेवरुख |
| १ मौजे वडसी | १ मौजे खांडरी | १ मौजे मंगरुळ |
| १ मौजे आगलगांव | १ मौजे म्हसले | १ मौजे चाकी |
| १ मौजे रायपूर | १ मौजे पाडोरे | १ मौजे केदारवाडी |
| १ मौजे बाबई | १ मौजे थरीठाणे | १ मौजे टाणे |
| १ मौजे देरनाबाद | १ पिपळखेडे | |

येकूण १२ गांव मुकासा व बाबती व सरदेशमुखी व इनामगाव व जमिनी सेरीज करून महागिरीचा अंमल नरसिंगराव जनार्दन धायगुडे याजकडे फौजेचे सरंजामास सालमजकूरपासून करार करून दिला असे तरी सदरहू १२ गांवचा महागिरीचा अंमल मशारनिल्हेयांसी रुजू होऊन सुरळीत देणे जाणिजे रा छ ५ रबिलाखर आज्ञा प्रमाण




---

पत्रांक ४३ श्री १६८८ भाद्रपद शुद्ध ७

चिरंजीव राजश्री राव यांसी रघुनाथ बाजीराव आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें विशेष श्री गोकर्ण महाबळेश्वर व श्री स्वामी कार्तिक यांचे पुजानैवेद्यास वगैरे त्यांस पांच हजार होनाचे गांव द्यावे ऐसा हैदर नाईक याणी पेशजी करार केला होता परंतु त्यांनी करारप्रमाणें गांव दिले नाहीत पांच हजार रुपयाचें मात्र गांव, इकडून रा रघुनाथ धामजी कारकून पाठविले आहेत, त्याचे स्वाधीन केले, म्हणोन कळोन आले येशियास, आपण हैदर नाईकास पत्रें पाठवून करारप्रमाणें पांच हजार होनाचे गांव कारकुनाचे स्वाधीन करीत तें करावें येविशीं ताकीदपत्रें लागतील तीं येथे रा व्यंकटशास्त्री यांस द्यावीं रा छ ६ रबिलाखर. बहुत काय लिहिणें ? हे आशीर्वाद

---

पत्रांक ४४ श्री १६८८ आश्विन शुद्ध ७

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन गोसावी यांसी —

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा सबा सीतैन मया व अलफ तुमचें प्रयोजन असे तरी देखत पत्र निजामदौलाचा दुरा येथें फिरंग एक घडीचा न लावतां सत्वर येणें जाणिजे छ ५ जमादिलाखर बहुत काय लिहिणें लेखन सीमा

---

पत्रांक ४५. श्री १६८९ माघ शुद्ध १३

नकल.

राजश्री गोविंदराव कृष्ण, कामदार पा शाहाजापूर, गोसावी यांसी:—
अखंडित लक्ष्मी राजमान्य स्नो महादजी शिंदे दडवत. सुा समान सितैन मया व अलफ. तुह्माकडून पेस्तर सालचे ऐवजी खरेदी कापड गुा अबाजी नाईक काब्रस व रामचद्र नाईक पराजपे, साहुकार पुणेकर, रदकर्ज रुो ७५००० पाऊण लाख रुपये देविले असेत. तरी पा मजकूरचे ऐवजीं रसदेच्या भरण्यावा ऐवज श्रावण मासी पावता करून कबज घेणे. दुसऱ्या वराता तुह्मावर जालियास हा ऐवज अगोदर देऊन मग दुसरी वराताचा ऐवज देणे. जाणिजे. छ १० माहे रमजान. बहुत काय लिहिणे? हे विनति. सदरहू ऐवज वायद्याप्रमाणे पुण्यास पावता करू. हे विनति.

सदरहू वरात तुको शामजी याजबा पाठविली असे.

---

पत्रांक ४६. श्री १६९० चैत्र शुद्ध ११

( नकल बमोजिब अस्सल. )

अज सरकार राजश्री गगाधर यशवंत, दिम्त राजश्री तुकोजी होळकर सुभेदार, ता तुळाजी पाटील मोकदम मौजे हस्त पोखरी, परगणे आंबड सुा समान सितैन मया व अलफ. राजश्री सटवाजी गायकवाड व वासुदेव सभाजी यांच्या अमलात सन ११७३ मध्ये ज्याह्यानखान्यात व मोसम कलाल वगैरे का मजकूर याची चोरी झाली. त्याचा ऐवज नगदी—यात तहकीक करून सटवाजी गायकवाड यांचे विद्यमाने सरकारात घेतला. तुह्मांकडे कलाल मजकूर याचा कज्या राहिला नाही. तुह्मीं मौजे मजकुरी आपली खातर जमा राखून, मौजे मजकूरचे कीर्द आबादी करून, सुखरूप राहणे. कलाल मजकूर कोणेविशीं कथळा करील तर त्यास सरकारातून ताकीद केली जाईल. जाणिजे. छ. ९ जिल्काद.

---

पत्रांक ४७.

पो जेष्ठ वद्य ५ शनीवार. श्रीशकर १६९० ज्येष्ठ वद्य २

वेदशास्त्रसंपन्न राजश्री बाळकृष्ण दीक्षित स्वामीचे सेवेसी:—
विद्यार्थी कृष्णराव बल्लाळ कृतानेक सा विनति उपरी येथील कुशल ता जेष्ठ वद्य २ पावेतो आपले कृपेकरून सुखरूप असो. विशेष. कृपा करून पत्र पा तें पावले. रा सदाशीव रामचद्र याची बातनी व राजाराम पत याचें वर्तमान कळले. व श्रीमंतांस आपण पत्र लिहिलें होते त्याचे उत्तर घेऊन पा आहे. आपण लिहिले की, आह्मांस विचार काय लिा तो लिहावा.

त्यास आपण उभय पक्षीं मान्य कोणी कडूनही उपसर्ग लागणार नाहीं स्वस्थ असावें आज श्रीमंताचा मुकाम घाटावर आहे उद्यांक कूच करून घांटाखालीं चोफरी इतक्यें पाणी पाहून मुकाम होइल लौकरीन गंगेवर टोकें तीन कोस पूर्वेस टाकून मुकाम होणार आहे तेव्हां आपणासहि विदित होइल बहुत काय लिहिणें ? लोभ असों दिजे हे विनंति

---

पत्रांक ४८

पो जेष्ठ वद्य ७ मंगळवार श्रीशंकर १६९० ज्येष्ठ वद्य ५

वेदशास्त्रसंपन्न राजश्री बाळकृष्ण दिक्षित स्वामींचे सेवेसी —

विद्यार्थी कृष्णराव मल्हार कृतानेक सां नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष कृपा करून पत्र पा तें पावलें गंगातीरीं मुकाम किती होणार, हें ल्याहावें म्हणोन लिा त्यास, अधाप नृत्य मुकामाचा निश्चय ठरला नाहीं परंतु बहुतकरून नृत्यच होइल मुकाम व्हावयाचें कारण नाहीं आपणास कळावें म्हणोन लिा आहे श्रीमंत राजश्री दादासाहेब चांदवडाहून कूच जाहल्याचें वर्तमान आलें नाहीं आज सायंकाळ पो येइल श्रीमंताचें कूच पुणतांबियाचे रोखें होइल युद्ध-प्रसंग समय आहे, ऐसें दिसोन येतें पहावें ईश्वर इच्छा प्रमाण ! बहुत काय लिहिणें ? लोभ असों दिजे हे विनंति

---

पत्रांक ४९

पो ज्येष्ठ वद्य ३० मंगळवार श्री १६९० ज्येष्ठ वद्य १२

वेदशास्त्रसंपन्न राजश्री कृष्णराव दिक्षित स्वामींचे सेवेसी —

विद्यार्थी बाळकृष्ण मल्हार सा। नमस्कार विनंति उपरी येथील वर्तमान ता। छ २६ मोहरम मु॥ घाटा [illegible] असो विशेष छ २४ मोहरम श्रीमंतांची फौज मुकाम मजकुरी तयार होऊन उभी होती तों राजश्री गा[illegible]ढराव गोविंद याची फौज पुढें आली होती गर्दी पठाण फौज मारीत प-ळोन गेली श्रीमंताचे हत्ती अरब व गर्दी [illegible] रामचंद्र यांचे हत्ती [illegible] व अफाटुतराव [illegible] याचा हत्ती एक वगैरे [illegible] निशान, [illegible] हत्ती व तमाम [illegible] पाडाव [illegible] दोन [illegible], [illegible] पांचशें घोडीं, [illegible], [illegible] श्रीमंत दादासाहेब [illegible] मारीत गेले [illegible] [illegible] होऊन [illegible] [illegible] लिहिणार आहेत [illegible] छ २६ [illegible] [illegible] आहेत [illegible] [illegible] [illegible] बहुत काय लिहिणें ? लोभ असों दिजे हे विनंति

---

पत्रांक ५०.

पौ आषाढ शु॥ ६ सोमवार. श्रीशंकर      १६९० आषाढ शु॥ ५

वेदशास्त्रसंपन्न राजश्री बाळकृष्ण दीक्षित स्वामीचे सेवेसी:—

विद्यार्थी कृष्णराव बल्लाळ सा॥ नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ता॥ छ ३ सफर मु॥ माउबे येथें आपले कृपेकरून सुखरूप असो. विशेष. कृपा करून पत्र पाठविलें ते पावलें. एकंदर वर्तमान. श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांच्या व श्रीमंत राजश्री दादासाहेबांच्या भेटी जाहल्या. मजल दर मजल पुणियास जात आहेत. दादासाहेबांनीं त्र्यंबक व घोडप वगैरे किल्ले होते त्यांच्या चिठ्या दिल्या. किल्ले हस्तगत करावयाकरितां रा॥ रामचंद्र गणेश व रा॥ विसाजी कृष्ण उभयतां दोन हजार फौज घेऊन गदनेलवर्नी नादूर येथें राहिले आहेत. किल्ले हस्तगत होऊन लवकरच पुणियास येतील. श्रीमंतांस पत्र पा॥ होतें. त्याचें उत्तर पाठविलें आहे. ऐवज पोहोंचेल. बहुत काय लिहिणें? लोभ असों दिजे. हे विनंति.

---

पत्रांक ५१.      श्रीलक्ष्मीकांत.   १६९० श्रावण शुद्ध ७

राजश्री माधवराव पंडित प्रधान गोसावी यांसी:—

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो॥ जानोजी भोंसले सेनासाहेब–सुभा दंडवत विनंति येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असलें पाहिजे. विशेष. गोसावी यांनीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहला. राणोजी कराडे याचा करार राजश्री दादासाहेब यांसी केला आहे कीं, पूर्ववत् प्रो॥ त्याचा सरजाम देऊन, मारनिलेस पदरीं बाळगून, पहिल्याप्रो॥ सेवा घ्यावी ह्मणोन. त्यास हालीं मारनिलेस फक्त काहीं न देता दिल्हा ह्मणोन विदित जाहलें. त्याजवरून हे पत्र लिहिलें आहे. तरी कराराप्रमाणें त्याचा सरजाम देऊन त्याची रसीद केशो शामजी व खिजमतगार पाठविले आहेत, त्याज समागमें पाठवावी, ह्मणोन लिहिलें. ऐसियास, कराडे मजकूरास सोडिलें ते समयीं त्याणें करार केला कीं, आपण नरनाळा खालीं करून देतों, गोंडवानचा सरजाम किल्ले जातीचा नलगे, वराडांत सरजाम आहे त्यापैकीं जो कृपा करून देतील तो घेऊन एकनिष्ठेनें चाकरी करून टाखऊन उर्जित करून घेईन. याप्रमाणें करार करून, शपथेचें पत्र लिहून सरकारचे ऐवजाचे भरण्याबद्दल निरोप घेऊन, त्याजनंतर महिनाभर पर्यंत सेवेसीं येतां, बेईमानी कदापि करणार नाहीं, ऐसें लिहित आला. त्याज अलिकडे तो सर्व प्रकार टाकून मनस्वीपणाची वर्तणूक मांडली आहे. वराडांत रोखे करावे, स्वाऱ्या कराव्या, सरदार मारावे, मुलूख खराब करावा, हा विचार मांडला आहे. यास्तव त्यासच

निश्चुन आज्ञा होऊन यथास्थित रीतीनें वर्ते आणि येथे येऊन करारप्रमाणे चाले असें जालिया येथूनहि अवर होणार नाहीं एतद्विषई अथ सवसतचे ठाई विस्तारें ल्याहावेसें नाहीं छ ६ माहे रबिलाखर सुशाम्रति विशेष काय लिहिणे ? कृपालोभ असू दिला पाहिजे हे विनंति मोर्तबसुद

~श्री~
शाहुराज पदांभोज भ्र
मरायितचेतस । बिंबा
रमजस्य मुद्रेयं रायवस्य
विराजते

---

पत्रांक ५२ (शिक्का) श्री (नकल) १६१० भाद्रपद वद्य ७

राजमान्य राजश्री बाबुराय नरसी, उपनाम भेर, गोत्र गौतम, सूत्र आश्वलायन, वास्तव्य कसबा वायघन, प्रांत वाई, यांसी भगवतराय त्र्यंबक प्रतिनिधि नमस्कार सु॥ तिसा सितैन मया व अलफ दिल्हे इनामपत्र ऐसीजे— तुम्ही हुजुर पुण्याचे मुकामी येऊन विनति केली जे — आपण राज्यांत एक निष्ठेनें सेवा केली आहे याजकरितां कैलासवासी यमाजी पंत यांनी आपणावर कृपाळु होऊन मौजे कणुर, समत हवेली, प्रां॥ वाई, हा गांव मुकासे होता, तो दूर करून जिदेफट्टन कुलबाब, कुलकानू इनाम करून देऊन इनामपत्रें करून दिलीं आहेत, त्या प्रा॥ चालत आहे त्यास, ती पत्रें मनास आणून, आपणांस पत्रें भोगवटीयास करून देऊन, पुत्रपौत्री इनाम चालविला पाहिजे म्हणून, त्यावरून, ती पत्रें मनास आणून, तुम्हांपाशीं आवश्यक जाणून, तुम्हांवर कृपाळु होऊन हाली मौजे मजकूर हा गांव [illegible] करून पूर्वील प्रा॥ कुलबाब कुलकानू हाली पट्टी व पुढें पट्टी दर हाली इनाम तिजाई गैरा हक्कदार करून दिलाहे इनाम दिल्हा असे तरी तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभऊन सुखरूप राहणें [illegible] छ २० रमादिलाखर बहुत काय लिहिणें मोर्तबसुद

---

पत्रांक ५३

पो छ १ साबान. श्री (नक्कल.) १६९० आश्विन शुद्ध ११

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री महिपतराव विश्वनाथ गोसावी यासी:—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा तिसा सितैन मया व अलफ. राजश्री विसाजी कृष्ण हे मौजे तिखणी प्रा राजापूर येथे देवालय व घर बांधितात. त्यास, मौजे भाबेड व मौजे हरदखले व मौजे आरगाव वगैरे प्रा मजकुरी येथील रानातून लांकडे सागवानी तुळया व खाब व आटववांसे व गजया वगैरे मिळोन सुमारे ४३८५ च्यार हजार तीनसे पच्याऐसीं लाकडें तोडून मौजे मजकुरीं आणितील. त्यास आणूं देणें. कोणेविशीं अडथळा न करणें. जाणिजे. छ १० जाखर. आज्ञा प्रमाण.

---

पत्राक ५४. श्री (नक्कल.) १६९० मार्गशीर्ष वद्य ५

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री महिपतराव विश्वनाथ गोसावी यासीं:—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा तिसा सितैन मया व अलफ. बाजीरुद्र पेशजी सनसमान खमसेनात कडप्याचे लढाईत सरकारकामास आले. सबब तीर्थरुप कैलासवासी नानासाहेब याणी तीनसे रुपयाचा गाव इनाम द्यावयाचा करार केला. परंतु गावची नेमणूक होऊन आली नाहीं. याजकरिता तीर्थरुप याणीं तीनसें रुपयाचे तनख्याचा इनाम द्यावयाचा यादीवर करार केला होता तो पाहून त्यांचे बंधु राजश्री आपाजी रुद्र व बाळाजी रुद्र यासी मौजे आघलगाव ता बेलहे प्रा जुन्नर येथील जाहागीर व फौजदारी तुह्माकडून दूर करून दोन्ही अमल दरोबस्त इनाम करार करून देऊन भोगवटीयास पत्रें करून दिल्हीं आहेत. त्याप्रों हरदू अमल याजकडे इनाम सुरळीत चालविणें. जाणिजे. छ १८ शाबान. बहुत काय लिहिणे?

---

पत्रांक ५५. श्री १६९० पौष शुा १

वेदमूर्ति राजश्री गणेशभट हरडीकर स्वामींचे सेवेसी:—

विद्यार्थी विठल कृष्ण सा नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ताा पौष शुद्ध १ जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. सरकारची सनद सायली लांकडाची राजश्री महादजी रघुनाथ सुभेदार यांस पेशजीं घेऊन वे-

दमूर्ति महादेव पाध्ये नाटेकर यांजबरोबर पाठविलीच आहे व सुभेदारांनीं सरसुभांच्या सनदेचा आक्षेप केला म्हणून लिहिलें होतें त्याबरोबर राजश्री विसाजीपंत सर सुभेदार यांचें पत्र घेऊन पाठविलें आहे या उपरी लांकडें तोडून देवालयाचें व घराचें काम सत्वर सिद्धीस न्यावें लांकडें तोडावयास तो तुम्हीं राजश्री शंकराजी केशव यांस पाठविलें आहे लांकडें तोडली अ सतील सरसुभांची सनद विजयदुर्गास पाठऊन, तेथील पत्र आणून, याउपरी लांकडें जलदीनें आणवणें आणि घराचें काम निकडीनें करून, देवळाचें काम सांगितलें आहे त्याप्रमाणें त्वरेनें करून घेणें घराचें काम फार न वाढवणें आटोपतें करून वैशाख मासाकारणें शाकारून टाकणें कौलें करून अगोदर ठेवणें जें साहित्य लागेल तें अजिपासून लगटानें काम करून घेणें रिकामा पैसाच कराल तरी पैसा मिळणार नाहीं लांकडें सनदेप्रों आणावयाचीं आहेत जितकीं लागतीलशीं असतील तितकीं लागलींच आणून ठेवणें लांकडें पैका मचून आणाल आणि राहतील तीं व्यर्थ जातील ऐसें न करणें अथवा पाहिजेत तीं पुरीं न आणलीं आणि मग तीं आणावयास गेलें तेव्हां त्यांणीं अटपळा केला मागती सुभानें किल्याचें अथवा सरकारचें पत्र मागू लागले तरी पुनः वारवार खटपट होणार नाहीं यास्तव, वृत्तनार्थ तप शीलवार लि॥ आहे पाहिजेत तीं आणून काम शेवटास नेणें पैशाचा पुरें काम न ठेवणें ऐवजाविषयीं लि॥ त्यास तूर्त ऐवजाची वोढी आहे गुसांसहील ऐवज खर्च करणें मग पाठऊं ग्या यावगा न करणें श्रीमर्दांगी व भोसल्यांसीं विघाड जाला आहे यास्तव वराडप्रांते श्रीमंत फौज सुद्धां गेले फळाचें बहुत काय लिहिणें? लोभ असो दिजे हे विनंति राजश्री शंकराजी पंतास नमस्कार. सांगितल्या प्रों करावें वाढऊं नये हे विनंति

---

पत्रांक ५६ श्री (नकल) १६९० पौष शुद्ध १०

रा बापूराव नरसी, उपनाम भेर, गोत्र गौतम, सूत्र आश्वलायन, ऋग्वेद शाखा, प्रांत वाई, गोसावी यांसी —

सेवक माधवराव बलाळ प्रधान नमस्कार सुहूर ( सिना ) तिसैन मया व अल्लफ शके १६९० सर्वधारी नाम संवत्सरे तुम्हीं सुहूर करावे पुणे येथील मुक्कामी येऊन विनंती केली कीं —राजश्री [illegible] सिधी यांणीं आपणास मौजे वणूर गांव दबोली प्रां [illegible] सरकार दर्शनें आपले कदीम अमल, तेथील हक्कदार व इनामदार [illegible] सुरू मार कुल्कानू दरोबस्त इनाम [illegible] इनाम [illegible] करून देऊन [illegible] करून दिल्ही आहेत त्याचीं [illegible] इनाम [illegible] आहे त्यास, [illegible] राऊन, [illegible] चालत आले ही पाहून, [illegible]

करून दिल्हीं पाहिजेत. ह्मणून, त्याजवरून तुह्मी स्वामींचे राज्यांतील पुरातन सेवक; यास्तव तुमचे चालवणे आवश्यक जाणून, तुह्मावरी कृपाळु होऊन, मौजे मार येथील रा भगवतराव पंडित याणी स्वराज्यतर्फेचा आपले वडील अमल, देखील इनाम, तिजाई देखील खेरीज हक्कदार व इनामदार करून दरोबस्त कुलबाब, कलकानू, इनाम देऊन पत्रे करून दिली आहेत ती पाहून त्याजप्रो सरकारातून करार करून दिल्हा असे. तरी, सदरहु लिहिल्याप्रमाणे मौजे माचा अंमल आपले दुमाला करून घेऊन, तुह्मी व तुमचे पुत्रपौत्रादि वशपरपरेने इनाम अनभऊन, सुखरूप राहणे. जाणिजे. छ ८ रमजान. आज्ञा प्रमाण. ( मोर्तब व शिक्का असे. )

---

पत्रांक ५७ श्री १६९० मांघ शुा ४

वेदमूर्ति राजश्री गणेशभट हारडीकर व राजश्री शंकराजी केशव स्वामींचे सेवेसी:—

पो विठ्ठल कृष्ण सां नमस्कार विनति. उपरी येथील कुशल ता माघ शुा ४ भृगुवार जाणून स्वकीय लिहित असावे. विशेष. इकडील वर्तमान तरीः—श्रीमत फौजेसुद्धा नागपुरानजीक आहेत. श्रीमताच्या फौजेस व भोसल्यास साठसत्तर कोसाची तफावत आहे. अद्याप काहीं तहरह नाहीं. पुढे काय होते पहावे. घरचे कामास लाकडे तोडावयाविशी रा विसाजीपत लेले याची सनद घेऊन मागे पाठविली ती पावलीच असेल. लाकडे घराच्या बेगमीचीच तोडावी. देवालयाचे कामापैकीं शिल्लक राहिलीं असेल ती खर्च करून जी लागतील तितकींच तोडून खर्च करणें. लाकडे राहिल्याने उपयोग पडणार नाहीं. याकरिता लिा आहे. घराचें काम आटेपल्यावर चागले. बळकट, मजुबूत भिंती चांगल्या घालून आटोपशीर करावे. पैका विशेष खर्च न करणे. रिकामा कारभार न वाढवणें. चैत्र मासात घर तयार करून शकराजी केशव यास पुण्यास पाठवून देणें. येथून शिवराम महादेव यासी निरोप द्यावा लागतो. याकरिता घराचे काम आटोपून घेऊन शकरोबास पाठविणे. वरकड इकडील सविस्तर वर्तमान वेदमूर्ती पद्माकर पाध्ये सागता कळो येईल. आजिताा काम कोठवर आलें ते लिहिले पाहिजे. श्री सिद्धेश्वर व श्री मुगादेवीचे काम सागितल्याप्रमाणे तयार केलें असेल. राहिले असेल ते सागितल्याप्रमाणे तयार करणे काम जलदीने करावे. फार दिवस न लावणे. बहुत काय लिहिणे ? कृपा किजे. हे विनंति आडिवरेकर त्रिवर्ग भटजी याचे घरीं नमस्कार सांगणे.

---

करून दिल्हीं पाहिजेत. ह्मणूंन, त्याजवरून तुह्मी स्वामीचे राज्यांतील पुरातन सेवक; यास्तव तुमचे चालवणें आवश्यक जाणून, तुह्मांवरी कृपाळु होऊन, मौजे माार येथील राा भगवतराव पंडित याणी स्वराज्यतर्फेचा आपले वडील अमल, देखील इनाम, तिजाई देखील खेरीज हक्कदार व इनामदार करून दरोबस्त कुलबाब, कलकानू, इनाम देऊन पत्रे करून दिली आहेत ती पाहून त्याजप्राो सरकारातून करार करून दिल्हा असे. तरी, सदरहु लिहिल्याप्रमाणे मौजे माचा अंमल आपले दुमाला करून घेऊन, तुह्मी व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरपरेने इनाम अनभऊन, सुखरूप राहणे. जाणिजे. छ ८ रमजान. आज्ञा प्रमाण. ( मोर्तब व शिक्का असे. )

---

पत्रांक ५७ श्री १६९० मांघ शुा ४

वेदमूर्ति राजश्री गणेशभट हारडीकर व राजश्री शंकराजी केशव स्वामीचे सेवेसी:—

पोा विठ्ठल कृष्ण सांा नमस्कार विनंति. उपरी येथील कुशल ताा माघ शुा ४ भृगुवार जाणून स्वकीय लिहित असावे. विशेष. इकडील वर्तमान तरी:—श्रीमत फौजेसुद्धा नागपुरानजीक आहेत. श्रीमताच्या फौजेस व भोसल्यास साठसत्तर कोसाची तफावत आहे. अद्याप कांहीं तहरह नाहीं. पुढे काय होते पहावे. घरचे कामास लाकडे तोडावयाविशीं राा विसाजीपंत लेले याची सनद घेऊन मागे पाठविली ती पावलीच असेल. लाकडे घराच्या बेगमीचीच तोडावी. देवालयाचे कामापैकीं शिल्लक राहिलीं असेल ती खर्च करून जी लागतील तितकीच तोडून खर्च करणें. लाकडे राहिल्याने उपयोग पडणार नाहीं. याकरिता लिा आहे. घराचें काम आटोपल्यावर चांगले. बळकट, मजबूत भिंती चांगल्या घालून आटोपशीर करावे. पैका विशेष खर्च न करणें. रिकामा कारभार न वाढवणें. चैत्र मासात घर तयार करून शंकराजी केशव यास पुण्यास पाठवून देणें. येथून शिवराम महादेव यासी निरोप द्यावा लागतो. याकरिता घराचे काम आटोपून घेऊन शंकरोबास पाठविणे. वरकड इकडील सविस्तर वर्तमान वेदमूर्ती पद्माकर पाध्ये सांगता कळों येईल. आजिताा काम कोठवर आलें ते लिहिलें पाहिजे. श्री सिद्धेश्वर व श्री मुगादेवीचें काम सांगितल्याप्रमाणें तयार केले असेल. राहिलें असेल ते सांगितल्याप्रमाणे तयार करणें काम जलदीने करावे. फार दिवस न लावणे. बहुत काय लिहिणे ? कृपा किजे. हे विनंति आडिवरेकर त्रिवर्ग भटजी यांचे घरीं नमस्कार सांगणे.

---

पत्रांक ८९ श्री १६९५ फाल्गुन वद्य ५

राजश्री नानाजी कृष्ण व राजश्री बापूराव विश्वनाथ गोसावी यांसी —

*असंक्षितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो साबाजी भोसले सेनासाहेब* सुभा दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें विशेष इकडील वर्तमान परस्पेवर लेखन होतच आहे नांदेडच्या मुक्कामीं राजश्री कृष्णराव आम्हाजवळ पोंचल्यावर तैसेंच दरकूच येत आहों ताम्रांकडील राजकारण पहिलेंच आहे त्याजकडील शानराव गिरधर आला होता त्यास रवाने केला ज्याचितजग यासीं आणावयाबद्दल राजश्री दिवाकर पुरुषोत्तम पा आणि दर मजल आलों नबाबाकडून पत्रें आलीं कीं, आपण कलबुर्गियाचे सुमारें येत असों त्याजवरून, छ १६ जिल्हेजीं राजश्री भवानी शिवराम नबाबाकडे पा रा मामाच्या तर्फेनें रा शिवाजी विठ्ठल याजकडील चिमणाजीपंत त्या समागमें दिल्हे काल छ १८ जिल्हेजीं बुधवार फाग वद्य पचमी प्रहर रात्रीस रुकनद्दौला व शर्फुद्दौला व धीरबाहदर या च्या भेटी व्हाल्या दोन कोस ते अलीकडे आले आम्हीं व राजश्री मामा इकडून दोन कोस गेलों भेटी होऊन आपापले गोटास आलों नबाब निजाम उद्दौला यांच्या भेटी उदईक होऊन, पुढील चालीचा प्रकार होणें आहे राजश्री रघुनाथराव दादा यांजकडून मिठुणखान मवाती व राजाराम गोविंद ऐसे नबाबाकडे आले आहेत त्यांसहि नबाब उदईक विदा करणार. दादा माघारे फिरले इतकें मात्र वर्तमान आहे ठिकाणवर कोठें आले, मवकूर काय, हा प्रकार नाहीं याजमीस माणसें गेलीं आहेत आलियावर लेहूं दादांचीं पत्रें आलिकडे आम्हांस दोन तीन आलीं कीं, तुमचे मतलब होऊन येतील, तुम्हीं रा त्रियंबक विश्वनाथ यांसीं भेटला हें उत्तम केलें, तरी अती सत्वर येणें त्यास, आम्हीं साफ उत्तर दिल्हें त्याचा मसोदाही आहे सारांश, अतःपर लामण होऊ नये येविशीं राजश्री वाल्यांनीं लिहिलें आहे, त्याजवरून कळेल येथें तो रा अगत्य पाहिजे व आमच्या लोकाचा गव गया मिटोन आदा होणें दोन चार लाख रा कोणत्याहि प्रकारें जरूर आहे *आम्हीं कायायाचामनें सर्व प्रकारें तुम्हांजवळ आहों तुम्ही मुरवीयांस प्रांजल* सांगोंन निश्चा केलीच आहे तत्रापि, साहित्यप्रकार अमलात याया हें जा हलें पाहिजे रा छ १९ माहे जिल्हेज बहुत काय लिहिणें ? हे विनती मोर्तबसुद

पत्रांक ९०

पो छ २६ जिल्हेज. श्री. १६९५ फाल्गुन वद्य ५

राजश्री हरीपंत गोसावी यांसीः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो साबाजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत. विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. छ १६ जिल्हेजची पत्रें पाठविली आहेत त्याजवरून कळले असेल. राजश्री भवानी शिवराम व राजश्री त्रिंबकरावमामाकडून राजश्री शिवराम विठल याजकडील चिमणाजीपंत मोगलाकडे पाठविले होते. छ १७ जिल्हेजी आमचा व तात्राच्या सैन्याचा चौ कोसाचा तफावत राहिला. मौजे कवठे पा कलबुर्गे येथे आले. राजश्री रघुनाथरावदादा याजकडून भिकणखान मेवाती व राजाराम गोविंद कोणी मोगलाकडे आले होते. त्यास, छ १८ जिल्हेजी फाग वद्य पंचमी सौम्यवारी प्रहर रात्रीस रुकनद्दौला व शर्फुद्दौला व वीरबाहादर दोन कोस अलिकडे आले. आम्ही व मामा दोन कोस पुढे गेलो. भेटी जाहल्या. नबाव निजामुद्दौला याच्या भेटी होऊन चाल ठहरावी हा प्रकार मात्र आहे. याउपरी व्हावी ते त्वराच व्हावी. लावण होऊ नये. सर्व तुमच्या ध्यानात आहे. राजश्री कृष्णराव नारायण याच्या पत्रावरून कळेल. अतःपर कर्तव्य कामास दिवस लागो नयेत. रा १९... माहे जिल्हेज. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनति. मोर्तबसूद.

श्री
शाहुराजपदाभोजभ्रमरायितचेतसः । बिंबात्मजस्य मुद्रैषा राघवस्य विराजते.

---

पत्राक ९१.

पौ छ २६ जिल्हेज. श्री १६९५ फाल्गुन वद्य ५

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री हरीपंत तात्या स्वामीचे सेवेसीः—

सेवक भवानी शिवराम सा नमस्कार. विनति उपरी येथील कुशल ता छ १९ माहे जिल्हेज गुरुवार मुकाम मोजे इंदरगांव, पा गुंजोटी, जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असावे. विशेष. दोन तीन पत्रे आपणाकडून

आलीं पाहीन आल्हाद जाहला उत्तरें पाठविलीं ते पौंहचून सविस्तर कळ लेंच असेल प्रस्तुत वर्तमान कीं सकेतप्रमाणें लांब लाब सोळा सतरा कोसांच्या मजली करीत, मजल दरमजल छ १७ रोजीं गुंजोटीवर मुा केला इवकियांत मदारुल्मम्हाम याचीं पत्रें एकामागें एक कीं, तुम्हीं सत्वर येणें त्याजवरून राजश्री मामा याच्या तर्फेनें राजश्री बापू शिवदेव याजकडील चिमणाजीपंत आम्ही दोन प्रहर रात्रीस लष्कर दाखल जाहलों दुसरे रोजीं मदारुल्महाम यांचे पुत्र डाबरजंग डेरीयास आले भेटी जाहल्या तदोत्तर आपणहि गेलों भेटी होऊन कित्येक मजकूर बोलण्यात आले त्याजकडील लक्ष आपणाकडे आहे श्रीमंत दादासाहेब याजकडून राजारामपंत नामें एक गृहस्थ व मिरूमखान ऐसे आले आहेत मजकूर कीं, आपणास साह्य व्हावें, एक दोन किल्ले व दाहा कोसाची जाहागीर देतों त्यास अमान्य करून, लक्ष आपणाकडे ठेविलें आहे याउपरी होईल वर्तमान तें लिहित असों छ १८ रोजीं सेनासाहेबसुभा व राजश्री मामा याचे भेटी जाहल्या आज छ मजकुरीं मदगानअलीच्या मुकामतीस आम्हास मदारउलमहाम नेणार. राजश्री मामाच्याहि भेटी होतील तदोत्तर घडेल तें वर्तमान लिहिलें जाईल, सारांश, याजकडील लक्ष एकनिष्ठपणें आपणाकडे आहे दुसरियाकडे कि मपिहि नाहीं कळावें म्हणोन लिहिलें आहे बहुत काय लिहिणें ? कृपालोभ करावा हे विनंती

---

पत्रांक ९२

पौ छ २६ जिल्हेज श्री १६९५ फाल्गुन वद्य ८

श्रीमंत राजश्री बापू स्वामींचे सेवेसीं:—

सेवक भवानी शिवराम सा नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता छ १९ माहे जिल्हेज गुरुवासर मुकाम मौजे इदरगांव गुंजोटी म्हणोन कुश ल लेखन करीत असिलें पाहिजे विशेष आज्ञाकडील एक दोन पत्रें सेना साहेब सुभा व सेवकाचे नांवे आलीं तीं पाहचून संतोषप्राप्ती जाहली उत्तरें पाठविलीं तें पाहोन वर्तमान ध्यानास आलेंच असेल प्रस्तुत इकडील वर्त मान तरी आपले लिहिल्याप्रमाणें लांब लांब सोळा सतरा कोसांच्या म जली करीत मजल दर मजल छ १७ रोज भौम्य-वासरीं गुंजोटीवर मुकाम केला तों पत्रामागें पत्रें दोन तीन मदारुलमहाम याची आलींत कीं, तुम्हीं सत्वर येणें त्याजवरोन तेच दिवशीं राजश्री मामा यांच्या तर्फेनें राजश्री नि वाजी विठ्ठल याजकडील चिमणाजीपंत व आम्ही स्वार होऊन दोन प्रहर रात्रीस लष्कर दाखल जाहलों दुसरे रोजीं मदारुलमहाम यांचे पुत्र डाबरजंग डेऱ्यास आले भेटी जाहल्या तदोत्तर आपण नवाबाच्या भेटीस गेलों भेटी

होऊन कित्तेक भाषण जाहले. याजकडील लक्ष आपलेशिवाय दुसरेकडे नाही. छ १८ रोजी सेनासाहेबसुभा व राजश्री मामा याच्याही भेटी बारा घटिका रात्रीस जाहाल्या. छ मजकूर आज आहास बदगानअल्लीच्या मुलाजमतीस मदारुलमहाम नेणार. सेनासाहेबसुभा व राजश्री मामा याचेहि भेटी घडतील. तदोत्तर; होईल वर्तमान सेवेसी लिहित असो. श्रीमत दादासाहेब याजकडोन राजारामपत नामे व भिकणखान आले. एक दोन किल्ले व दाहा वीस लक्षाची जहागीर देतो, साह्य व्हावे. त्यास याणी अमान्य केले, व लक्ष आपल्याकडे ठेविले आहे. दुसरीकडे नाहीच नाही. बहुत काय लिहिणे ? कृपालोभ असो द्यावा. हे विनती.

---

पत्राक ९३.

पौ छ. २६ जिल्हेज श्रीशकर. १६९५ फाल्गुन वद्य ५.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री हरीपत तात्या स्वामीचे सेवेसीं—

पो कृष्णराव नारायण कृतानेक सा।। नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन केले पाहिजे. विशेष. राजश्री त्रिंबकराव मामा व राजश्री साबाजी भोसले सेनासाहेबसुभा याच्या व रुकनतद्दौले याच्या भेटी बुधवारी रात्रौ जाहाल्या. बोलणे ममतेचे जाहले. आज उद्या नबाब बदगानअल्ली याच्या भेटी होतील. येविशीं राजश्री सेनासाहेबसुभा यानीं लिहिले आहे, व तीर्थरूप राजश्री नाना व राजश्री बापूरावजी सविस्तर सागतील. त्यावरून कळेल. निरतर पत्री कुशलार्थ लिहून सतोषवीत असावे. बहुत काय लिहिणे ? लोभाची वृद्धी करीत जावी. हे विनती.

सेवेसीं लक्ष्मण बल्लाळ जोशी सा।। नमस्कार. विनती लिा परिसोन सदैव परामृश करीत जावे. हे विनती.

---

पत्रांक ९४.

पौ. छ. २६ जिल्हेज. श्री. १६९५ फाल्गुन वद्य ५.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बापू स्वामीचे सेवेसी'—

पो कृष्णराव नारायण जोशी कृतानेक साष्टाग नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करित असिले पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान तरी राजश्री त्रिंबकराव मामा राजश्री साबाजी भो सेनासाहेबसुभा याच्या व रुकनुद्दौले याच्या भेटीं बुधवारीं रात्रौ जाहाल्या भाषण ममतापुरस्कर जाहले. आज उद्या नबाब बदगानअल्ली याच्या भेटी होतील. सविस्तर वृत्त राजश्री सेनासाहेबसुभा यानी लिहिले आहे. व तीर्थरूप राजश्री नाना व राजश्री बापूरावजी निवेदन करितील. तिकडून पत्रे

परत्वेवर येत असावीं बहुत काय लिहिणें! लोभ करावा हे विनती सेवेसीं विनती सेवक लक्ष्मण मल्हाळ साष्टांग नमस्कार विज्ञापना जाहलें वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे नबाबाच्या भेटी झाल्यानंतर सविस्तर लिहून पाठऊं सेवेसीं श्रुत होय

---

पत्रांक ९५ श्री १६९५ फाल्गुन वद्य ५

आशिर्वाद उपरी मुख्याकडून आज चार दिवसांत चार अनुसंधानें नौबाचे हातून याजकडे आलीं त्यांतील अर्थ जे, प्रथम सेनासाहेबल हें पद देतों, तुमच्या सरंजामाइतका सरंजाम देतों, आणि दोन किल्ले मातबर देतों, व दर्म्यानें मातबर माणूस देतों, आणि तुह्मी यांचें हें अनुसंधान योजिता व शिष्य येथें आहेत त्याचे विद्यमानेंच यांणीं त्याणीं एक होऊन यावें, ऐसें प्रथम आलें यांणीं साफ उत्तर दिलें त्यावर दुसरें सूत्र आलें कीं, तुमचें पद तुह्मास देतों, आणखी दोन किल्ले व जहागीर देतों तेहि यानीं अमान्य केलें त्याजवर, तिसरें सूत्र आलें कीं, जें जाहलें तें समर्थ, तुमचे मुद्दई आह्माजवळ आहेत, यामुळें तुह्मांस विश्वास पडत नाहीं, तरी त्यास ठाणाकठी बसवून पाहिजे तरी तुह्माकडे पाठवितों त्यानंतर चवथें सूत्र आलें कीं, आपण एकले तुमच्या डेऱ्यात येऊन बसतों, तुमच्या वडीलपणास उत्तम दिसेल तें करावें तुह्मी ह्मणाल कीं, राज्य एकीकडे व आह्मी एकीकडे कैसें बनल, तरी तुह्मांस सोबती आपसी करून देतों, मुद्दईयाचे स्वायद तुह्मी व्हावें ह्मणजे चिंता नाहीं यांणीं नावें पुसिलीं त्यांणीं आपले सरदार मातबर यांचीं नांवें घेतात पृष नकार—नामक सकार—नामक येथें आहेत हे व मुद्दई याची चमू यांचीं नांवें घेतलीं तेव्हां त्यासहि संशय प्राप्त जाहला परंतु परस्परें विक्षेप वाढावें या अर्थी नांवें घेतात किंवा कसें, हेंहि समजत नाहीं यांणीं उत्तर केलें कीं, तुह्मी गोष्टी सांगता त्या आमच्या निदर्शनास कशा येतील, व तुह्मी त्याचे अभिमान धरिलें त्याच्या गोष्टी तुह्मीच ऐशा सांगता तेव्हां पुढें परिणाम कैसा ! ऐसीं याजकडे अनुसंधानें येतात यांचा आमचा प्रकार दुसरा नाहीं, यामुळें आम्हास कळवितात त्यास, याप्रो सम्रभाकडेच असतील, एसें वाटतें राजश्री मामांनीहि बोलण्यांत आणिलें कीं, श्रीमंतांचीं सूत्रें येतात यामुळें कोणी कच्चपक्के होतील कीं हे काय कळत नाहीं, सूत्र आह्माकडेच नित्य सूत्रें येतात, एसींच सर्वांकडे येत असतील यांनीं उत्तर केलें कीं, ज्यांच्या संशयांत मातरा असेल त्यानें कळवावें, एक बाप असल त्याजकडून तरी दुसरी गोष्ट घडणार नाहीं, एसें वाटतें तेव्हां मामा उगेच राहिले त्यास, त्याचा खबीरदार दुसरा नाहीं, परंतु फौजेस पोंगस नाहीं यामुळें सब मनुष्य मात्र शाबुदें आहे व मामानें आपण स्थ

विक्षेपास कारण होते. मामा यासींच रुक्ष भाषण करितात, ऐसे नाहीं. त्यास सल्लागार दकारपूर्वक. त्यास कोणेहि प्रकारे हितशत्रुत्व करणे प्राप्त. मामास मात्र आप्त वाटतात. अविंधाहि फार अजुर्दा आहे. पदोपदीं भाषणांत नाशितात. व सर्व अध्यकता आपणाकडे असावी वरकडाकडे कोणाचें लक्ष नसावें, एतदविषयीं प्रेत्नही केले आणि करितात. अविंधानें तर सुबकपणा ठराविला. त्याचे मानस कीं, राजश्री बापूनीं व नानानी फौजेत यावे तरच ठीक पडेल, एरवीं ठीक पडणार नाहीं. येविसी त्याची व जिवाजी रघुनाथ याची पत्रेहि गेली असतील. परतु उघड लिहिलें न लिहिले हे न कळले. साराश, मसलत थोर. या दिवसात सर्वांचे मनोधारण रक्षून दाबहि राखावा तरच उत्तम. नाहीं तरी कल खाईल. मग सुधरणार नाहीं. पिघी अविंधाने लुटली. ब्राह्मण व मराठे याचे कबिले तेथें होते त्याच्या अबरू गेल्या. यामुळें मराठे अजुर्दा फार आहेत. अविंधाकडून सहजात जाहलें. जाणोन न जाहले. परतु वाईट फारच जाहले. त्यामुळे मराठे यास विक्षेप जाहला. जे गनिमाई जबरेत आली, यामुळे या गोष्टी घडल्या.' राजा बाहादर याचे वेळेस ऐसेच विक्षेप वाढले. त्यास, हें नसावे. हे पत्र वाचून फाडून टाकावे. यातील भावार्थ मात्र यजमानास समजावा. हरवख्त सूचना असावी हे आशिर्वाद.

आज श्रीमताकडून कराराची यादी व पत्र यांस आले. त्यांत लिहिले आहे कीं, जानोजी भोंसले याच्या तहाप्रो तुमचे तुह्माकडे करार आहे. मुधोजी भोसले, जानोजी भों यांचे समई चद्रपूर मात्र घेऊन ताबेदारी करीत होते, त्याप्रों करतील. याप्रो पत्र व यादी आलीं. टोपीवाले याचीच पाठविली. नामनिर्देस उच्चार न करावा. परंतु वर्तमान असे आहे. यास नकल दाखविली. ती त्यानीं आपणाजवळ घेतली आहे. परतु यास पुर्तेपणीं समजले आहे एक दोन गृहस्थहि यास बोध करीत होते. परतु याणी ते गोष्ट अमान्य केली जे, आपणास हे गोष्ट उचित नाही, प्राणहि जाऊ, परंतु विपरीत गोष्ट घडणार नाहीं, आमचे वृत्तीस क्षणक्षणा पालट न करावा. ऐसे उत्तर साफ केले. परतु ऐसे फद आहेत ! यात सावधता असावी. उभयतानीं यावे. हे मोठी सला आहे. हे आशिर्वाद.

---

पत्राक ९६

पौ छ २६ जिल्हेज श्री. १६९५ फाल्गून वद्य ६

आशिर्वाद उपरी येथील क्षेम ता फाल्गुन वद्य ६ भृगुवासर पावेतो मुा नजीक गुजोटी वर्तमान यथास्थित असे. विशेष. रुकनतद्दोले याची भेट बुधवारीं रात्रौ राजश्री मामासाहेब व सेनासाहेबसुभा याची जाहली. भाषण ममतापुरस्कर जाहले. आज उद्या निजामअल्ली याची भेट होईल. उपरांत

चालीचा प्रकार ठरोन कूच होईल रा भवानी शिवराम व चिमणाजीपंत दिा राजश्री शिवाची विठल हे नवाबाच्या लष्करातच आहेत ' देवाजीपंत चौधे यांस आणावयास गेले ते लवकरच येतील श्रीमंत राजश्री दादासाहेब कोणे ठिकाणी आले हे तपसील वातमी नाहीं ' त्यांजकडून रामारामपंत व मिकणखान आले आहेत त्यांनीं नवाब निजामअली यास जहागिर वीस लक्षाची व दोन किल्ले देतों, म्हणोन पत्र लिहिलें आहे परंतु लक्ष मिळालें नाहीं मामाच्या बोलण्यात आलें आहे कीं, त्यास निरोप द्यावा, ठेऊं देतों, म्हणून मदारुलमहाल यांनीं करार केला आहे आजउद्या निजामअली याच्या भेटी होतील उपरांत मसलतीचा विचार ठराऊन इतकियांत वातमीहि पक्के पणाची येईल मग रोख कोणीकडे होणें तो देतील ऐसें आहे भवानीपंतां च्या व रुकनदौलांच्या बोलण्यांत त्यांणीं दर्शविलें कीं, तुम्हांविशीं राजश्री बापूस व राजश्री नानांस आम्हीं लिहिलें होतें त्याचीं उत्तरें आलीं तीं दास विलीं यांनींहि दर्शविलें कीं, आम्हींहि आपला लोकच असावा, म्हणोन लिहिलें होतें त्याचींहि उत्तरें आलीं आहेत त्यास पत्रें पाहों म्हटल्यास असावीं याज करितां पुरवणी पत्रें लिहून दिलीं आहेत त्याच्या नकला पाहत आहें पेंच पडावयाचा नाहीं परंतु इतला असावी याजकरितां लिहिलें आहे श्रीमंत राजश्री दादासाहेब यांचीं पत्रें सेनासाहेब यास आलीं होतीं त्यांचीं उत्तरें राजश्री मामांचे सल्लेनें लिहून दिलीं त्यांत अर्थ जे आजपर्यंत लोभयुक्त पत्रें यावीं म्हणोन प्रतिष्ठा होती याजकरितां उपासीतपासी मामासमागमें चार मास क्रमिले निरुपाय जाणोन चारी घरें मोकळीं ये गोष्टीस अनुसरलों त्यास हालींहि पत्रें आलीं त्यास गुप्त लिहिलें, आम्हीं मराठे, उमीं—काय म्हणो, त्यास प्रगट ल्याहावें, म्हणजे समजण्यात येईल ऐसें लिहून दिल्हें आहे सेनासाहेबसुभा याचे विचारें कीं, मातुश्री बाईसाहेबांस भेटून श्रीमंत राजश्री बापू व श्रीमंत राजश्री नानानीं फौजेत यावें, म्हणजे उत्तम, कोणे गोष्टीचा पेंच पडणार नाहीं, सर्व सरदार आरोत राहतील, कामकाज जीव धाडऊन करतील, व कोणेहिविशीं पुढें पेंच पडणार नाहीं बाईसाहेबांचें येणें नघडे, तरी तेथें एकाजणानें राहिलें पाहिजे, त्यास राजश्री बापूनीं तेथें रहावें आणि राजश्री नानांनीं फौजेंत यावें, म्हणजे बदोबस्त नीट होऊन कामकाज उत्तम प्रकारें होईल, पुढें पेंच पडणार नाहीं, दिवस हेच आहेत आणि पाहतां सल्लाहि हेंच आहे, उभयतातून एकजण आले, एकजण तेथें राहिले, तरी आपण अगर आपले नाना यावून एकजणानें तेथें रहावें, एकाजणानें समा गमें यावें ऐसें याचे मानस आहे आणि ऐसेंच घडलेंही पाहिजे श्रीमंत राजश्री नानाचें पत्र देखील आश्वास नाहीं विसरण पडलें कीं नाहीं! राजश्री मामांनीं बोलणें अगर लचास याव देणें तें आमचे विद्यमानें घावें, ऐसें ते यून याव परस्परें पत्रें आल्यास उपयोगीं आहे, परस्परें काम आहल्यास

आह्मी श्रम केले, त्याचे फल काय? तरी पुर्तेपणी समजोन लिहविले पाहिजे. बहुत काय लिहिणे? हे आशिर्वाद.

राजश्री रावजी स्वामीस तात्याचे सां। नमस्कार. लि॥ परिसोन लोभ किजे हे विनंति.

---

पत्रांक ९७

पौ छ २ मोहरम. श्री. १६९५ फाल्गुन वद्य ११

राजश्री नानाजी कृष्ण जोशी व बाबूराव विश्वनाथ वैद्य गोसावी यांसी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो सावाजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. छ १७ जिल्हेजी रुकनद्दौला व शर्फुद्दौला याच्या भेटी जाहल्याचे वर्तमान लिा आहे. जावितजग यासी आणावयाबद्दल राजश्री दिवाकर पुरुषोत्तम यास पाा होते. तेही काल छ २२ जिल्हेजी दाखल जाहले. या उपरी काहीं गुता नाही. नेमलेल्या कामासच जावें. आणखी प्रकार नाही. वरकड राजश्री कृष्णराव व लक्ष्मणपत यांणीं लिहिलें आहे, त्याजवरोन कळो येईल. दोन चार पत्रीं राजश्री सखारामपत व राजश्री बाळाजीपत याच्या पत्रीं मजकूर कीं, स्वार पो खर्चास पाठऊ. त्यास, राजश्री त्रिंबकराव मामा याची मर्जी आह्मास दरकार. या मसलतीस मुख्य उपयोग. तिढण नसावी. त्यांणीं पत्र लिहून मागितले. ते आह्मी दिले. त्याजवरोन कळलें असेल. त्यास, पोटाचा गवगवा लोकास मोठा आहे. कामाची मुनासद बारीक आणि पैसा नाहीं. मामाकडेसच ऐवज आला नाही. हा मजकूर एक व प्रसगीं एक असावे. ऐसें दोन मजकूर आहे. येविषयींचा सिद्धात तेथे उभयताचे विचारे काय तरतूद हे कळावें. रवाना छ २४ माहे जिल्हेज. आह्माकडील सर्व अभिमान राजश्री बापूनीं व नानानीं धरिला तेथे अधिक लिहिणे ऐसें नाहीं. तुह्मी जवळ असा. बहुत काय लिहिणें ? हे विनती. मोर्तबसूद.

—श्री—
श्रीशाहूराजपदाभोजभ्र-
मरायितचेतसः । विश्वा-
त्मजस्य मुद्रैषा राघवस्य
विराजते.

---

पत्रांक ९८

पो छ २ माहे मोहरम श्री १५ फाल्गुन वद्य ११

आशीर्वाद उपरी येथील क्षेम ता। छ २४ जिल्हेज भौमवार पावेतों लष्करात सुखरूप असो विशेष इकडील वर्तमान तरी रुकनुद्दौलाच्या भेटीचा मार पेशजी लिहिलाच आहे मदवासरीं मदगानअलीच्या भेटी जाहल्या भेटीचे समई मामांनीं सेनासाहबसुभा याजकडील सरदार व लोक भेटीस न आणावे म्हणोन सांगितलें आणि आपले सरदार व लोक भेटीस बहुत नेले असो ते भेटी झाल्यानतर सेनासाहेबसुभा यांस टाकून सल्लत मामानीं करणें उत्तम नाहीं पाहिल्यापासोन ऐसें जाहलें नाहीं ऐसें असोन, तेथें मामानीं उपक्रम केला तेव्हा यानीं म्हटलें कीं, आम्हांस निरोप देणें, आम्ही डेरेयास जातों, तुम्ही सल्लत करावें ऐसें म्हणोन नबाबाचा निरोप घेऊन आले यास तर वाईट वाटलें व नबाबास व रुकनदौला याचीहि ते गोष्ट मानली नाहीं यांनीं, मसलतावर नजर, या करितां मर्जी राखितात 'परंतु, समयीं मामा मानभग या रीतीनें करतात आपण लिहिलें कीं, मर्जी सामाळावी त्यास, मर्जी सामाळण्यास कसूर करीत नाहींव परंतु, समयीं ऐसें परस्थळीं करितात हें उचित कीं काम ! तेहि हे मोकीत नाहीं परंतु विरुद्ध दिसतें यास काय करावें! खर्चाचा प्रकार तरी आपण लिहिलें कीं, मामाकडे लाख रुपये पाठविले आहेत, ते देतील न देतील तरी तेथें राहून पाठवणें, भरती करून पाठवू म्हणोन लिहिलें त्यास, मामास नित्य उठोन खर्चास मागतात दोन चार रुपयाचे निर्ले देतात त्याचे पावभेतीन रा। घटतात तेहि एकदा देत नाहींत हजार दोन हजार ऐसे देतात त्याणें त्यांचें कांहीं होत नाहीं यांस जर करतां पांचलक्ष रा। तूर्त मिळतात, तरी दोन महिने निघूर राहून मसलतीवर कायम राहतील दोन गोष्टी अडचणीच्या समाळत नाहीं रुमकार लढाई मात्र या दिवसांत पोटाची रद नवाबी व पद नवाबी त्यास पोटास नाहीं, व दर्याबाई मामानीं पगलेस मारली यामुळें बखेडे होतात यास, कोठपर्यंत सांभाळावें ! मामा तरी परिछिन्न घातावर. त्यास श्रीम देवजीपत युक्तीप्रयुक्तीनें पेंच पडेत यांची कमी पडावी, राजश्री बापूची व नानांची मर्जी याजवर कडवी म्हामी, हें ध्यान आहे! हे तर आपल्याकडून बहुतप्रकारें सांभाळितात मानअपमान ध्यानांत न आणितां, मामाचे मर्जीप्रमाणें वर्तणूक करून, समयीं काम करून दाखवावें, आणि आपले मनोरथ सिद्धीस जावे त्यास, या गोष्टीस मुख्यत्वें करून द्रव्य अनुकूलता पाहिजे लोकांस पोटास मिळालें म्हणजे मग हे कांहीं भीत नाहींत त्यास श्रीमंत राजश्री नानास विनंती करावी कीं, हे सरदारी आपली, पदरी पडिल्यांचें उणें तें आपणास पूर्ण करावें लागेल याजकरितां सरकारांतून अगर इरकेंकरून यांस पाच लक्ष रा। कर्ज मेळवून द्यावे आणि यांची

पोटाची सख्या करावी. मसलत सिद्दिस गेल्यावर कर्जाच्या ऐवजास मुलूख परगणे लाऊन देतात. सा व्याज सुद्धा आदी देतील. आज सनदा करून देतात. परंतु हा समय आहे. लढाईचे काम. या दिवसात पोटास न मिळे तेव्हा लोक चाकरी बेउजूर कैसी करितील ! आणि त्यास, बेमुरवत, अर्ध-रात्री प्रसंग पडल्या जीव देता अंत कोण लागाने ? याजकरिता कोणेहि प्रकारे पाच लक्षांची तरतूद जाहली पाहिजे. दर्यावर्दीस खर्चास मागा देतात. त्याच्या लष्करात व मामाच्या अविभाच्या लष्करात पोटाचे धरणे नाही. आणि याचे लष्करात पोटाचे सकटा ! या अर्थी बहुत संकटात आहेत. हे संकट श्रीमंत राजश्री नाना दूर करतील तर होईल. आपल्याच्याने होत नाही. याजकरिता सविस्तर ल्याहावयाची आज्ञा जाहली. त्यास त्याचा अर्थ ध्यानात आणून पुर्तेपणी विनंती करून मागणाची बेगमी करून देऊन लिहून पाठवावे. मागाहून एक दो रोजा राऊत व गणोबास ऐवजाकरिता पाठवितो. बातमीचे वर्तमान सविस्तर राजश्री भावानी शिवराम यांनी लि॥ आहे. कळेल. बहुत काय लिहिणे? लोभ कीजे हे आशिर्वाद.

---

पत्रांक ९९ श्री. १६९५ फाल्गुन वद्य १२

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नरसिंगराव स्वामीचे सेवेसी:—

पोष्य सखाराम भगवंत सा॥ नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावे. विशेष. राजश्री त्रिंबकराव मामाच्या व नबाबा-च्या भेटी गुजोटीच्या मुक्कामी जाहल्या. तेथून फौज सुद्धा दर मजल त्याच रोखे येत आहेत. त्यास, तुह्मी राजश्री मामाकडे पथकसुद्धा जाऊन पोहच-णे. बहुत काय लिहिणे ? लोभ असो दीजे. हे विनंती.

---

पत्रांक १०० श्री. १६९५ फाल्गुन वद्य १२

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन गोसावी यांसी प्रति मातुश्री गंगाबाई आशिर्वाद. सु॥ अर्बा सबैन मया व अल्लफ. राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ याच्या व नबाबाच्या भेटी गुजोटीच्या मुकामी जाल्या. दर मजल फौजसुद्धा त्याच रोखें येत आहेत. त्यास, तुह्मीं पथक-सुद्धा त्रिंबकराव याजकडे जाऊन पोहचणे. जाणिजे. छ २५ जिल्हेज. बहुत काय लिहिणे ? लेखनसीमा.

---

पत्रांक १०१

पौा छ २ मोहरम श्री १६९६ चैत्रशुद्ध ३

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बापूरायजी स्वामींचे सेवेसी – सेवक कृष्णराव नारायण जोसी कृतानेक साष्टांग नमस्कार विनती उपरी येथिल कुशल जाणून स्वकीय लिहित असावें विशेष इकडील वर्तमान तरी अलाहिदा पत्रीं लिा त्यावरून कळों येईल सारांश, यांची सर्वांची बेगमी उत्तम रीतीची करून दिल्ही पौा त्याशिवाय आजपावेतों श्रम केले ते व्यर्थ होतात तरी चित्तावर धरून अगत्य कार्य केलें पाहिजे येथें नानांनीं किंवा बापूनीं यावें त्यासेरीज केवळ या मामाचेंच सबब असलिया उत्तम नाहीं मेविशींचे सविस्तर अर्थ पुर्ते मनन करून, काय विचार करणें तो करावा आम्हांस सुचलें तें आम्हीं लिहिलें आहे कळावें बहुत काय लिहिणें ? लोभ करीत असावा हे विनंती

राजश्री भवानी शिवराम यांनीं] दोन पुरवण्या* वर्तमानाच्या वगैरे बद सात, लिा आहेत ते अक्षरशाहा वाचून पाहून करणें तें करावें हे विनंती

---

पत्रांक १०२ श्री १६९६ चैत्र शुद्ध ३

विशेष इकडिल वर्तमान वारंवार दिनचर्येचें वारवार लिहित गेलों, त्या जवरून कळलेंच असेल दरपत्रीं मजकूर कीं, पंढरपुराच्या सुमारें लौकर यावें त्यास, गंगातिरींहून लांब मजलींनीं दूर मजल बारा गांव चढोन आलों त्यास मसलत लहान नव्हे तोरा असावा तो प्रकार नाहीं जर या कामास रा नाना अगर रा बापू असते तरी तोरा होय ते प्रसंगीं नाहींत रा मामाचा कायदा उभई नव्हे विश्वास कोणास पडतो, कोणास पडत नाहीं भोंसले यांच्या घराचा प्रकार विज्वर. या प्रकरणीं मोंगल तरी असावा मोंगलांकडील राजकारण येथें आम्हाकडलि ममता पुर्तेपणीं पाहिलीच आहे आणि तिकडेहि स्वचीत मित्राचा मित्र म्हणजे आपला मित्र सहजेंच होतो या प्रकारें सोयरेपण होतें पत्रीं तोरा अनुसंधान लागलेंच होतें त्या अर्थी स्थापितजग, चौथे मासी आणावे या अर्थी सदाशिवपासोन रा दिवाकरपंत त्यास आणावयासी पाा आणि मोंगलांकडील ज्ञानराव गिरधर मोंगलाकडे पाठविला त्यास मोंगलास पत्रें जातांच दरमजल कलबुर्गेयाच्या सुमारें दर कूच पाच सात मजलींनीं आला आपण व ते एक वाटियारीं निमें काम जाहलें ऐसें जाणून या अर्थी तुळजापुरापासान सदरहू कलबुर्गीयाचा पेंल धरिला रा मामाच्या बाणेकारीनें काम जाहलें पाहिजे याजकरितां त्याज कडील चिमणाजीपंत निा रा शिवाजी विठ्ठल बापू ह समागमें घेऊन

---

* पुढील दोन सावलचक पत्रें ह्या पुरवण्या होत

झालेच असेलच सेनाधुरधर रावी एक दिवस पादचाली होऊन, या यामन राऊजिचे घरीं गेले महुत ममता युक्त भासनें केलीं सुलासा, सरलपन दास सून, कराया हें मानस ! ते दिवशीं रायानीं समाधानपूर्वक गोष्टी चालून विदा केला आर्ती नित्यानित्ये त्या छंदीं पडळ चित्त मेळवून येईल काळवोली या आहे चित्त मेळवियास हरएक संधी पाहून भाव करील मेवीसी तिक होन रायास सूचना व्हावी कीं, त्यासी मासन देखील न करीत ऐसें घडावें सुचलें आणि कळलें इतकें आपनास आलीं त्याहावेंच दर्याबाइचा मुखो जीचा विचार त्यास, त्यास अतर नाहीं परंतु या प्रसगीं आली तेव्हां निवळ मुखोजी मी याचा गिल्लाही करिता येत नाहीं तिनें दोन मसलती ठहरावि त्या हरएक मामार्चे अर्थ व ममतापूर्वक निसाक्स सरळपन दासवून करावें ये गोष्ट कोठेंही दिसों नये XXX गर्क्षीत, गरिबी मासनें, मरयादयुक्त करून कृपेस पात्र व्हावें, आनी जालेच आहेत त्याचे पोटीं अर्थलाभ आपा या नाना या यासीं विधि फिरपनें पूर्ववत स्थळें आहेत तेथें ठेवून, आपण आतीनें मुलास नमूद करून करावें, येविषीं वचेन प्रमाण मामाचें घेतलें मळकटपणें घ्यावें दुसरी चाल आपासासीं सुखधान पर्कपनें केलें आन सपतक्रिया त्याची आली कीं, वाहिलासी आमरयादा आता करीत नाहीं, विचास येईल तैसें करावें, वायेदार राहीन या दादा—सास सकट पडलें हें आपले अभिमानी, हे इमानी माहे, तुमचे पर्द्री पडसील त्यासी, तेथें हरयुक्त करून ममता वाढवून विश्वास, दासवून अविश्वास काहीं घडलिया महुत उपयोगी दादा या ही समाधान पावतील पुढेंहि दिवसादिवस आपली ब्रीद होईल ऐसेंही भाव आहे संकल्पित लिहिलें आहे परतु याचे पोटीं महत् अर्थ आहे कळल्यास अपनाव सूचना असावी मामास विनती केल्यानें पचें पडत नाहीं कारण कीं आमचें त्याचें सत्रुत्व मोजितात आमचे भान सत्रुत्वावर किंवा मसलतीवर हें ध्यानास आनावें आमचा साहकारी राय मसलतींत अनुसरून मारिलें भाव केला कृपेस पात्र त्याअर्थी काहीं देऊन पदाधिकारी चिरंजीवास केलें परभू शाहाना किती ! त्याचा हिसाब काय ! परंतु घातक मसलतींत याकप या अर्थी कांहीं देऊन आम्ही आपली कार्यसिद्धी केली ऐसी वार्ता पाठविली आली रायासी एकनिष्ट प्रानही गेला तरी दुसरी गोष्ट होऊच नमे मुत्सेच अंगिकारिला नाहीं तर दादासाहेबासीं अनुसरिता कृपा करितें अस्तु ! ऐसें असता श्रीनें आमच्या पक्षे उमा केला त्यापर्क्षी याचा उत्कर्षें पाहावा, हें महूच नये यासीं पुढें काय करसव्यें ! भारी सेवूपासून सूट घेन, या सखावर द्रीष्टी यजमानाची होऊन, सींव काहीं अभिमान अंगिकारिला सर्वांनीं कृपा पूर्ववत करून, मागती पदयुक्त तें लिहितात मामा प्रियकर मानितात आ प्रांस मसलतीवर सांगतात अस्तु ! ही विचांत आली विलमर आनीत नाहीं एक निष्ठवा घडावी हा दहे रायाचे कामावर लागलिया उपयोग चांगला

श्रीने लक्षिल्यास सर्वांच्या ममतेत आहोच. दुसरीयाचा सचार किती ! आमचे पद सेत्रुत्वाने नेलियास त्याचे कैसे घढल ? आमचे भाव या रितीचे. तेथें आमचे कामावर काय द्रीस्टी ! याजकरिता सर्व आगेजून मसलतीवर असो. एक या काळीं हालत नाहीत किंवा ते आपले जागीं मोजतात कीं, आह्मीं आहोंच. असो. आह्मी वर्तमान सागितल्या मग खरे कैसे वाटेल ? या अर्थी ऐकिलें तितका इतल्ला आपनास असावाच, ह्मणोन लिहिलेच लिहितो. त्रास न मानावा. हे विनती.

पो छ २ मोहरम.

---

पत्राक १०३ श्री. १६९६ चैत्र शुा २.

विनती उपरी. इकडील वर्तमान व रा मामाची मर्जीचा प्रकार एकदा पत्री लिहिला आहे. आह्मी लेहूच नये. परतु तुह्मास कसा कळावा ? आणि प्रसगीं कामास उणे तरी पडलियास घात. ह्मणोन लिा आहे. प्रविष्ट जाहाला असेल. तुह्मी मुरबियासी दाखविला असेल. त्याच्या चित्तात सकल्पविकल्प काय येतील, हे मात्र आह्मास साशकता. त्यास, हे प्रकार असोत. तुह्मीं प्रसंगीं आहा. तुम्हास वाकफ आहेच कीं, आम्हास गती दुसरी नाहीं. व सूक्तअसूक्त कोणी अर्थ आपले मुरब्बीयासीं निवेदावे, आणि आपली वेधना दूर होणें, मनोरथ पूर्ण करणे, हे जागा आमची एक, दुसरी नाहीं, हेच निश्चय प्राजल आहेत. तेथे चिंता काय ? त्यात आमच्या अर्थाच्या दोन गोष्टी. एक गोष्ट ऐसीजे, आमचे पदरीं रुपया नाही. आणि पोटावाचून तरी अर्थ सरेना. चार लोक एकचित्त जूट राहिना. यासी द्रव्य पाहिजे. दुसरी गोष्ट. हे मसलत जाहालिवर अलकारयुक्त आम्हीं निर्वेधपणें लौकिक बरा करून सौख्यानें भाकर खावी. लक्ष निजध्यास आपले मुरब्बियाजकडे ठेवावें, देव स्मरोन राहावें, दूवा देत जावी, अहिर्निशीं परस्परें स्मरण राहावें. जर आम्हास काटा मोडला तरीं वेधना मुरबियासीं राहावी. " देवा " ! " देवा " ! मात्र म्हणणे हा प्रकार आम्हाकडे. ऐशा प्रकारे दोन गोष्टी. त्यात मसोदा रा मामानीं लेहून देऊन आमचे पत्र लेहून घेऊन पाठविले. त्याजवरून अर्थ सारे कळले असतील. या निमित्य आम्हीं तपशीलवार नालिगी सारखें वर्तमान लिा. साराश हे दोन्ही मतलब आमचे गळित करून दिल्हे. त्यास, या अलिकडे क्षणक्षणा क्षुल्लक गोष्टी काय त्याहाव्या ? याची पैरवी काय केलीत हे कळावे. राा तात्यासमागमें याद पाठविलीत, त्यात हेच दोनी मुद्दे आहेत. मग चिंता काय ? ऐसेच उत्तर अन्वय आपल्या चित्तात येईल. त्यास, लाख रुा मुद्दा लेहून घेतला. तेव्हा मजुरी मात्र

जाइली मेहनत सारा दिवस करावी आणि सायकाळीं आपली मजुरी घ्यावी। हा कांहीं प्रकार आम्हास बरा दिसत नाहीं लोभ करून करोडों या देशील ते आम्हांस थोडें परतु हे गोष्ट कांहींच नाहीं आमचा काळ चालिला पा याजनिमित्त पाच चार लाख या आम्हांस कर्ज सरकारातून अगर कोणी सावकार करून द्यावा आणि हे दुर्बलता आमची दूर करून सबळ करावें हा मजकूर एक मात्र होऊन मनोरथ पूर्ण व्हावे त्या अर्थास आमचे अर्थ, बंदोबस्त, सौख्य, साऱ्या गोष्टी आहेत हा पूर्ण भरवसा आह्मांस आहे या अर्थी येथें तोरा कोणी यावा येविशीं लावण होऊ नये हे दोन्ही अर्थ चि त्तांत येऊन जें करणें तें करावें एक कामांत लाख कामें होणार. कित्येक जन सौख्य पावून आशिर्वाद देतील तें काम जलदी देवानें करावें आणि खुसी साधन राखावें निव्वळ मुद्दा घालून लाख रुपये दरमहा घ्यावा अथवा का र्यावर दृष्टी घालनें ती न घालून अधिक करून घ्यावेत हें मानस किमपि नाहीं त्या विचारें आमचें बरेंच होणें, आनी आपना वेगळें वतनेंच नाहीं, त्याअर्थी हा करार करून घेऊन पुढें एकनिष्टपनास लागल कीं रायाच्या पक्षीं एकनिष्ठताहि केली कीं लाख रुपये दरमहा करून घेतील हा दुरारोप हरगीज नसाया याच्या पोटीं कल्पनेस येईल कीं, पाय पसराया विषा क रिताव तर हे भाव चित्तास आमुच न येत जेथें जीवच समर्पिला तेथें दौ लत काय चीज ! हे मनोभाव निस्छेयास गुतलेत ++ हें खरें नाहीं ही निष्ठा पुर्तेपनें आपनास आहे म्हणये, आनिक रीतीचे भाव आह्मांविषी निघतील त्याची खातरजमा आपनच करतील दरमहा न घेतील काळ तरी कैसा चालल ! याविशीं चिंतेत राहील तर न राहावें आखर दरमहा देनेंच निस्छ यात नेमिलें तेव्हा घालच आलमते। जेथें ऊनें पडलें त्याविशीं सखाराव खु ष्मासच घालनें प्राप्त होईल याअर्थी सासातां लाखांचें कार्य एक वेळच घर. कोन्हास सागून करून देवावें परभारें कर्ज घेतलें ऐसें मामासही दिसेल आ मासही सब्द परिनामीं लागनार नाहीं बरेंच देनें त्या पोटीं हा ऐवज राहील ऐसें घडनार नाहीं आह्मीं सारोघानें कल्पनेस आलें तें वारवार आपनास लिहितों याचें कारन कीं, या दौलतींत सेनासाहेयांजवळ घडिल्पन आपलें माझी गोष्टी सर कायावाचामनें मी आपनास तात्याप्रमानें मानितों ऐसें लिहिलें याने हि ( म ) नन करावें श्रीकृपें हें मी स्थापित आपला वास्थली आहे तेव्हा निमलच निमल कांहीं येक वर्तमान आपनास लिहीन त्यास, वस यास तर नाहींच मसलतीच्या पोटीं जे जाहिरात सांगणें तेन मुरब्बियांस सागतील मामाचे व आमचे मुरबी याची ऐकताच असल त्याणीं, हर गोष्टीचा सब्द आम्हांकडे लागू नये पत्रें आमचीं आपनाजवळ ते पर्यंत आहेत अस्ताव्यस्त राहतील याजकरतां पाठवून यावीं, किंवा फाडिव जावीं येथून राजश्री सदोबा दादास व गनोबास श्रीमंतांनीं आपनाकडेस

पाठविलें आहे. हे सर्व निवेदन करतील. त्याप्रमाणें घडऊन त्यांसीं लवकर त्रिदा करावें. बहुत काय लिहिणे ? हे विनती.

---

पत्रांक १०४

पैा छ २ मोहरम श्री. १६९६ चैत्र शुद्ध ३

वडिलाचे सेवेसीं साष्टांग नमस्कार विनंती.

राजश्री मोरोबादादास पत्र ल्याहावयाविसीं यजमानाही दोन च्यार वेळां आक्षेप केला. त्यासी, त्याजकडून पत्र आलें नाहीं, आणि तेथेहि नव्हते, यामुळे न लिहिलीं. आता वडिलाची आज्ञा येईल त्याप्रमा घडेल. पेच न पडे, ऐसें असावे. पत्राचे उत्तर त्वरेने द्यावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्रांक १०५

पैा छ २ मोहरम श्री. १६९६ चैत्रशुद्ध ३

विनती उपरी. राजश्री मोरोबादादा यांस पत्रे यानीं ल्याहावी किवा न ल्याहावे हें कळावें याजकरिता पेशजी आपणांस लिहिले होते. तेहि वृतबंधास गेले होते. त्यास, हल्लीं आलेच असतील. त्यास पत्रे ल्याहावीं किवा न ल्याहावीं हे लिहिले पाहिजे. यजमानाची मर्जी त्यांस पत्रे ल्याहावी. परतु ते नव्हते याजकरिता लिहिलीं नाहींत. त्यास, आले न आले, हे कळलें नाहीं. तर ल्याहावें हे विनती.

---

पत्रांक १०६ श्री. १६९६ चैत्र शुद्ध ५.

आशीर्वाद, उपरी, येथील क्षेम ता चैत्र शुध पचमी मुा नजीक सागोले लष्करात सुखरूप असो. विशेष. आपण राणू खोपडा याजबराबर पत्रे पाठविलीं तीं सुरक्षित पावली. सविस्तर कळलें. व अलिकडे जासुदबरोबर पत्रे पाठविली तींही पावली. वर्तमान कळले. राजश्री हरीपत तात्या फाल्गुन वद्य चतुर्दशीस लष्करात आले. भेटी जाहाल्या. सविस्तर वृत्त येथिल त्यास निवेदन केले. त्यानीही आपल्या नजरेने पाहिलें, व राजश्री मामानीही कित्तेक सागितले तोहि भावार्थ कळला. तात्याची मर्जी बोलण्यात बरीच आहे. यास खर्चाची निकड. रोज धरणीपारणीं. कूचास अडथळा. समई कूच होऊ न द्यावें. ऐसे कित्तेक प्रकार पोटाचे रडीमुळे. तो अर्थ तात्यास आह्मी उभयतानीं व राजश्री भवानी शिवराम याणी साध्यात निवेदन केला. व मामानी आजपर्यंत सत्तर हजारावर दिल्हे, तेहि सागितले. पुढे खर्चाचा वदोबस्त करून द्यावा, ऐसे बोलिलो. त्यानी उत्तर केले की, रा-

जभी मामाशीं बोलत्यों आणि देखितों त्यांचें मामांचें भाषण देवाजीपंताचे विद्यमानें होणें तें जाहालें तेव्हां निश्चयास आलें कीं, फाल्गुन मासपैकीं तीस हजार रुपये बाकी राहिली ते व चैत्र मासाचे ऐवजीं पचवीस हजार एकूण पंचावन हजार द्यावे, तितकेयांत यांनीं आपला बंदोबस्त करून चालावें ऐसें भवानी शिवराम यास म्हणों लागले तेव्हां यांनीं उत्तर केलें कीं, सर्व अर्थ आपणास उमजले आहेत, मसलतीचे दिवसांत आम्हीं अडीन पोटास मा गतों ऐसा अर्थ नाहीं, आमच्या लष्करांत कोणी सावकार नाहीं, पतपावेल राहिला नाहीं, मुलुखाचा पैसा यावा ऐसाहि आमचा प्रांत राहिला नाहीं, लाचारीस्तव आपणास विनती करीतों, आम्हांस कर्ज द्यावें, एक मासाची पोटाची बेगमी पुरतेंच द्यावें, अधिकोत्तर न द्यावें, एक मास आम्हांस निर्वेद लोकांपासून करावें, प्रसंगोपात आम्हीं उपयोगीं कैसे पडतों हें पाहावें तेव्हां तात्यांनीं रदबदल केली त्यास, आणखी वीस हजार रुपये द्यावे, एकूण पाऊण लक्ष द्यावें, ऐसें जाहालें मामानीं रुष्ट भाषणेंहि केलीं उपाय काय? त्यास, पाऊण लक्षानें याचा परिणाम कैसा लागतो? यास निदानीं दोन तरी कुलाकुल पाहिजेत तात्या आले हे बंदोबस्त करतील याअर्थी काल लोकाचा गवगवा भारी जाहाला मामाचें कूच जाहालें यांचें कूच न होइ ऐसा पड़ों न देव लोकांस पदर पसरून मिनत केली कांहीं समजविले, कांहीं समजणें राहिलें तों मामास व तात्यास वर्तमान कळलें कीं, लोक अडले आहेत तेव्हां तात्या आले त्यानींहि लोकांस प्यार गोष्टी सांगित ल्या द्वितीय प्रहर जाहाला तेव्हां कूच करावें ऐसें जाहालें। त्यास मामा चा मुकाम सांगोलेंयापलीकडे दोन तीन कोस अविधाचा मुकाम दोन तीन कोस अलीकडे मामांजवळ जावें परंतु दिवस थोडका राहिला पोंह चणें कैसें होतें? तेव्हां तात्याजवळ करार केला कीं, आज कूच करून अ विधाजवळ राहतों, उदईक लांब मजल करून तुम्हांजवळ येतों ऐसा नि श्चय करून, तात्या आपल्या मुकामास गेले तात्याच्या बोलण्याचा अर्थ पाहतां मामांची मर्जी राखावी से देतील तेंच घ्यावें त्याणें तर त्यांचा अर्थ सरत नाहीं यजमानांनीं तात्यांस म्हटलें जे, आम्हाजवळ कांहीं जवा हीर आहे व चार पांच हत्ती नामी आहेत, हे गाहाण ठेऊन तूर्त दोन लक्ष या आम्हास द्यावे, म्हणजे एक महिन्याचा बंदोबस्त होतो, एका महिनेयांत मसलतहि सिद्धीस जाते, चिंता नाहीं त्याचें उत्तर तात्यांनीं केलें कीं, हें बो लणें ऐकोन संकोच वाटतो परंतु देतों, न देतों, हें बोलले नाहींत नि दानीं यांचा मनोदय होता कीं, या महिन्याचे लाख रुपये व बाकी मागील तीस हजार, एकूण एक लक्ष तीस हजारांनीं पाऊण महिनेयाचा तरी बंदो बस्त होईल तोहि प्रकार दिसत नाहीं। त्यास, लोक फुटयात ऐसा प्रकार नाहीं, व लढाईस कमी करतील ऐसेंहि नाहीं परंतु पोटाची रड

यामुळे हटकून काम घेणे, हुकमत करणे हे कमी पडेल. आपणास दोन चार वेळा लिहिले कीं, लाख रा महिना द्यावा ऐसा करार जाहाला आहे, तो देतीलच, परतु आणखी काहीं कर्जवाम देतील कीं न देतील, काय मर्जी आहे ? त्याचा अर्थ किमपि लिहिलाच नाही ! त्यास, मर्जी मनास आणून लिहून पाठवावे. सरकारच्या पत्राचा मार लिहिला. त्यास, याचें मानस जे, आह्मी कार्यावर पड होऊन मसलत सिद्धीस नेली तर सर्व गोष्टी आमच्या नीटच आहेत, सेनासाहेब सुभा हें पद आमचे कोण नेतो, चाकरी करून दाखविणें हेच मनोमानसी आहे, दुसरा अर्थ नाहीं. अविंधाकडील मजकूर तरीः याचे ठाई ममता फार आहे. तोहि मसलतीवर कायम आहे. ज्याबित-जग यास हरोल केलें आहे. दोन तीन कोस पुढें चालतो. आपण मागें चालतो. लाब मजली करितो. त्याचा मनोदय कीं, ज्याबीतजग मामाचेहि पुढें हरोळीस असावा, त्याचे मागे ही फौज असावी. त्याचे मागे मामांनी व त्याचे मागे आपण असावे. परतु, मामा एक मजल लाब करितात. एक मुक्काम करितात. त्यामुळें त्याच्या चालण्याची सोय बनत नाहीं. परंतु, लढाईचे समई कवातीनें चालावें, हा भाव त्याचा आहे. मामाची मर्जी पाऊणलक्ष खेरीज न द्यावें, ऐसी पाहिली. तेव्हा, कांही बोलिलो नाहीं. तात्यास मात्र पुसिलें की, याणें ठीक पडत नाही, पुरधरास काहीं चिठ्या करून देऊन समजावास पाडितों. त्यानीं उत्तर केलें कीं, पंचवीसपर्यंत करा, आह्मींही लिहून पाठवितों. त्यास, घाटगे याची वगैरे पंचवीसपर्यंत चिठ्या होतील. सूचना असावी. बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे हे आशिर्वाद.

---

पत्रांक १०७ श्री. १६९६ चैत्रशुद्ध ५

अपत्ये तात्याने दोनीकर जोडून सां नमस्कार विज्ञापना ता चैत्र शुद्ध पचमी मुा नजीक सागोलें क्षेम असों• विशेष. वडिलीं राणोजी खोपडे व जासूद व कासीद याजबरोबर तीन पत्रें पाठविलीं तीं पावली. लिहिले वर्तमान कळलें. इकडील वर्तमान तरीः सर्व यथास्थित आहे. राजश्री हरीपंततात्याची भेट जाहाली. सविस्तर त्यास सागितले; व त्यांनींही दृष्टीनें येथील अडचणीचा प्रकार पाहिलाच आहे. पुढे काहीं बंदोबस्त करून देतात कीं नाहीं, ते पाहावें. सविस्तर राजश्री लक्ष्मणपंत याच्या पत्रावरून कळेल. श्रीमत दादासाहेब फौजसुद्धा सत्पऋषीच्या रोखें जात आहेत. आईनापुरावर होते. त्यास हेही आडवे जातच आहेत, एक दो रोजा गाठही पडेल. सातारेयाकडील वर्तमान कळावे याजकरितां जासूद जोडी पाठविली आहे. राजश्री नानासाहेब यासीं एक पालखी बसावयास पाहिजे. त्यास, दाडी उत्तम, फार चागली, परिक्षेनें घेऊन, पालखी पडदेसुद्धा तयार, ग्वासेयास बसावयास तयार करून

लिहून पाठवावें येथें आम्हांजवळ मोत्यांची पावडी आहे, ती ठीक नाहीं, याजकरिता एक पावडी, मोत्यें तेथें आहेत, दोदु नाइक याची, ते पालखी देऊन पाठवावे येथें पांवडी आहे ही पाठऊन देऊ राजश्री चिमणाजीपंत ठेले यांजपासून पांचशें रुा घेतले आहेत, व राजश्री दिनकरपंत राजवाडकर याजपासून हजार रुा घेतले आहेत, एकूण दीड हजार रुा घेऊन सरकारांत फिरकोळ खर्चास दिले आहेत व राजश्री सदाशीव सोनदेव याजपासून ह जार रुा घेऊन सरकारचे मुदयक दिले आहेत एकूण अडीच हजारांच्या चिठ्या केल्या आहेत चिठ्याप्रमाणें रुा पावते करून उत्तरें घेऊन पाठवा वीं राजश्री सदोबादादा यांजबद्दल हजार रुा घेऊन जमा करावे साता रियास गजीकोट प्रतीचे रुा त्याचे कागद व जिन्नस पा आहेत, त्याप्रों पों चते करून जाबसाल पा द्यावा तुरकी घोडा किंवा घोडी राजश्री नानास पा द्यावी म्हणून आज्ञा त्यास, तुरकी घोडे, सौदागर आले आहेत, त्या जपाशीं आहेत ते घेतले म्हणजे पाठवून देवितों घोडी गरीब, चालणार, खूप-सूरत पा द्यावी ऐसी, तूर्त याजजवळ राहिली नाहीं कोठें घेऊन तेहि पाठवून देवितों तेथून याजकारणें काहीं पोद्यास एकादा किंवा काहीं पैसे पाठवुन द्यावें येणेंकरून ममता विशेषही वाटेल तूर्त गणोयास पा नाहीं त्या फौजेचा मोकावला समीप राहिला ऐवज राजश्री मामा दे तील तोच घेऊ आणखी कोठें कर्ज-वाम मिळाल्यास पाहतच आहेत अ डचण मोठी! उपाय नाहीं! आणखीही येथून वीस पंचवीसपर्यंत चिठ्या करितों लाख रुा यास द्यावयाचा करार त्याशिवाय ऐवज जास्त होईल तो त्यांजकडे कर्ज सरकारचें जाहालें यास कर्ज, काहीं ऐवज पाहिजे ये विशीं पेशजीं दोन चार पत्रें लिहिलीं असता उत्तर आलें नाहीं यांसी लाख रुा अधिक ऐवज देऊंच नये कशी मर्जी आहे तो शोध घ्यावा विना कर्ज काहीं मिळाल्यासेरीज चरितार्थ होवच नाहीं पुढें कर्जाचे ऐवजास एक दोन महाल लावून देतील वसूल करून ऐवज घ्यावा पत्राचें उत्तर सत्वर पा द्यावें त्याप्रमाणें करू. नवाब व रुकनुद्दौला यांनीं पत्रें राजश्री बापूस व राजश्री नानास लिा आहेत तेही लाखोटे पाठविले आहेत त्यास पावते करावे तेथून पत्रें उभयतांचीं व श्रीमंत बाइचीं यरचेवर येत जावीं विशेष वारंवार काय लिहू ? हटीस येतें तें लिहितों बहुत काय लिहिणें ? हे विज्ञापना पाणक्या ब्राह्मण चांगला, पगतीस जेवी असा टेऊन पा द्यावा हे विज्ञापना

सेवेशी गणेश नारायण सा नमस्कार विनंती

5 5661

---

पत्राक १०८

पौा छा ७ मोहरम . श्री. १६९६ चैत्र शुद्ध ८

सेवेसी सदाशिव सोनदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनती. साकल्य राजश्री तात्या व दादानी लिावरून कळो येईल. लक्ष दुसरे नाहींच. श्रीसत्तेनें गाठ थोडियाच दिवसात पडावी ऐसे आहे. तिडण म्हणावयासीं यासीं भक्षावयाची. वरकड काया—वाग—मनसा आपले लक्षीं आहेत. कळावे. सदैव पत्रद्वारा सेवकाचा* साभाळास विस्मरण नसावें. राजश्री तात्यानीं हजार रुा येथे सरकारात आह्माकडून घेऊन दिल्हे. त्याची चिष्ठी तेथें आपणाकडे दिली आहे. हा ऐवज चिरंजीव राजश्री सदाशिव विश्वनाथ याजपाशी द्यावे म्हणजे प्रविष्ट होईल. लोभ करावा हे विनती.

---

पत्राक १०९

पौ छ ११ मोहरम श्री. १६९६ चैत्र शुद्ध ८

आशिर्वाद उपरी येथील क्षेम ताा चैत्र शुध ८ रविवार मुाा नजीक ह्मसवड वर्तमान यथास्थित असे. विशेप. आपण पत्रे शुध प्रतीपदेचीं पाठविलीं ती आजच पावली. लिहिलें वर्तमान कळलें व सरकारचे पत्राची नकल पाठविली ती पावली. इकडील वर्तमान तरी: नबाबसुद्धा च्यारी फौजा मुाा मारीं आज आल्या. नबाबाचा मुकाम मौजे दिघी, पाा अडफली, येथें जाहला. त्यास, तो गांव मातबर. माने याची पाटिलकी. तेथे चौ फौजेचे रखवालीस राऊत होते. त्यास, तो गाव मोगलाचें फौजेनें लुटला. नाश बहुत जाहला. मराठे व ब्राह्मण बाइकाची अब्रू घेतली. याजकरिता नागोजी यादव वगैरे सरदार मामाकडे गेले होते. त्यानीं सांगितलें कीं, देशात हा प्रकार जाहलियावर पुढे गत काय, त्यास विचारें करोन सागोन पुन्हा कोणे गावीं उपद्रव न होय तें करावें. त्यावरून मामानीं, अविंधाकडील वकील मामाच्या लष्करात ज्ञानराव होते त्यास बोलाऊन आणून, मनमाने तैशीं भाषणे केलीं. त्यास लष्करातून काढोन दिल्हे. हे गोष्ट उचित न केली ! त्यावरून नबाब अजुर्दा आहेत. आधीच त्याचे याचे चित्त मिळत नव्हतें. त्यात दिवसें दिवस विक्षेप पडत जालिले. मामानीं आज कूच करून पुढे गेले. राजश्री साबाजी बावा यास काल चिठी आली कीं, तुह्मीं मुकाम करणे. आज चिठी आली कीं "दोन प्रहरा उपरात कूच करणे." त्यास, कूच कैसें होतें ? नबाबाने आज कूच करून येथे यावे ऐसा करार होता. त्यास, कूच करून आले. आमचे पुढे तीन कोसावर आहेत. दर्याबाई फौजसुद्धा अविंधाचे डावे बाजूस कालपासून राहतात. मामानीं यास काल बोलाऊन नेलें होते. त्यास, भाशन

---

*'च्या' बद्दल चा. 'चा' चा सस्कृत उच्चार केला आहे.

ममतापूर्वक नोकेनेच केलें समय आहे, हा समय तुम्ही पुढें असावें यांनीं उत्तर केलें कीं, आम्हास आज्ञा कराल त्याप्रमाणें करूं, आम्ही चुकणार नाहीं, परंतु फौजेस पोटास पाहिजे यामुळें गवगवा होतो, चाकरीचे दिवस आहेत, या दिवसांत आम्हीं चाकरी करून दाखऊं तेव्हां मामांनीं समाधान केलें कीं, फाल्गुनपैकीं सवालक्ष देतों, व या महिनेया पैकीं सवालक्ष देऊं एकूण आडीचलक्ष दों महिनेयाचे होतात त्यांत तुम्हास पावलें तें वजा करून बाकी राहिलें तें दोन च्यार वेळ करून देतों, ऐसा करार केला आहे आज पर्यंत एकलक्ष दाहापंधरा हजारपर्यंत पावले आहेत बाकी एकलक्ष तीस चाळीस राहिले ते एक वेळ देतील तरी त्याचा गवगवा महिना पंधरा दिवस राहतां निर्वेध होतो तें होईल तेव्हां होऊ सारांश, मामांचें मापण रुक्ष, यामुळें पेंच पडतात कामाचे दिवस या दिवसांत राजश्री बापूनीं व राजश्री नानानीं फौजेत असावें ते असलियानें सर्वांवर दाब बसोन, मु ख्त्याचा नाश न होता, मसलत सिद्धीस निर्वेधपणें जाईल उभयता येत नाहीं तर विक्षेप वाढवील, ऐसें दिसतें श्रीमंत राजश्री दादासाहेब यांजक डून सर्वांकडे अनुसंधानें येतात त्यास, या दिवसांत कोणाची अबुर्दगी नसावी याजकरितां उभयतांनीं यावें राजश्री हरीपंततात्या येथें आले होते त्यांस सातारेयास मामांनीं रवाना केलें ते गेले ते जरी असते तरी उपमन होतें कित्येक फळ संभाळिते तेहि नाहींत श्रीमंताचा मुकाम कुरंडवाडावर आहे यास त्यांस पंचवीस कोसांची तफावत आहे गांठ सत्वरच पडावी ऐसें आहे बहुत काय लिहिणें ? लोभ किजे, हे आशिर्वाद

---

पत्रांक ११०

पौ छ ११ मोहरम श्री 1774 १६९६ चैत्र शुद्ध ९,

आपत्यें तात्यांनीं दोन्ही कर जोडून चरणावर मस्तक ठेवून सां नमस्कार विनंती येथील क्षेम ता चैत्र शुद्ध नवमी रविवार मुा नजीक मालवड व डिलाचे आसिर्वादेंकरून सुखरूप असों विशेष शुद्ध प्रतिपदेचीं पत्रें आलीं तीं काळ मदवारीं पावलीं अक्षरशा अवलोकनीं साकल्य लेखनाभिप्राय कळों आला मातुश्रीच्या पत्राची नकल पाठविली उत्तम आहे असल ठेऊन घेतलें पूर्वी यादी व पुरवणीपत्रें दस्ताऐवजी आहेत ती जतन असावी या पत्रात उभयतांचे लेख आहेत, यास्तव ठेविलीं त्यास, त्यांचीं भापणें पक्केपणाचीं दस्तऐवजी तेव्हां पत्राचे अगाध नाहीं यजमानाची अ स्ता शब्दगौरवी दस्ताक्षर अलंकृतावच पेशवाइ, तें पत्र पाठविल्याच फा रच संतोष आहे वारंवार पुसताव नकल दाखविल्यानें एक प्रकार भासतें ऐसें आहे मरकट कित्येक प्रकार सुधारिले ते यथार्थच मर्यगोपात

.माणें घडवीत असो. पोतदारांची सरंजामाची बंदोबस्त येईल. हत्ती–विषयीं .ाज्ञा. त्यासी, येथें मोठे खासे तीन आहेत. वरकड तैसेच आणीक आणविले आहेत. आल्यानतर चागला पाहोन घेतों. पदे येथें नाहींत. दारव्यास आहेत. रहवळ तुर्कीविषयीं लिा त्यासीं एकदोन रोर्जा मागाहून पाठवितात. एकच पाठविल्याने विपर्यास दिसेल. यास्तव दोन पाठविणार. याशिवाय आपला सत्वरच पोहोचेल. त्याच्या खर्चाचा प्रकार वारंवार लिहित गेलें. त्याचा भार आभार सर्व राा हरीपत तात्याकडेच घालून लिा, त्याजकडील साधन रक्षावें, राा मामाकडील तिडन पडों देणार नाहीं. त्यासीं यजमानाचें त्याचे पूर्ण सधान होतेंच. हालीं पत्रापत्रीं वळख पुर्ती पुरली. , कित्येक ममतेचीं भाषणे परस्परें जाहलीं. तीं आमचें विद्यमानेंच घडलीं. मामासही त्यांणीं याजविर्सी तेथील लक्ष उमजविलें. तात्याचें पूर्वी सत्तरपर्यंत ऐवज यास दिला होता. हे आल्यानतर पाऊण दिल्हा. यास तों दरमहा साडेतीन पर्यंत लागतात. रोज धरणीं, कटकटी, रुसवे मारनिल्हेनींही येऊन पाहिलें. आणिकही कांहीं कर्जदाखल तजवीज करून महिन्याची समजूती करावी, ऐसें होतें. तों त्यास मामानीं दोन हजार फौज समागमें देऊन सातान्यासीं रवाना केलें. त्याच दिवशीं मामा, व दकार नामक, घवसे याच्या गोटास जाऊन त्यासीं भाषण केलें जें, लक्ष तें आह्माकडे असावे, नवाबाच्या आमच्या विचारें होईल तें करावे. त्याणें उत्तर केले कीं, सारी नजर मसलतीवर, त्यात दर्याबाईची फौज आपली करून ठेविली, तें उपयोगास येणार नाहीं. त्याची सल्ला काय ? याणीं उत्तर केलें उभयतांचे समाधान करून द्यावें, वडीलपण तिचें रक्षावें, मुलाचें लेंकुरपण चालवावें, दोन्ही फौजा एकदम कामावर सादर असाव्या. याप्राा घाट घालून डेऱ्यास आले. दुसरे दिवशीं धंवसे सेनासाहेब सुभे याच्या डेऱ्यात कूच समयीं आलीं. दकार नामक तिराईत ऐसे आले. भाषणात त्याप्राा आणिलें. याणीं मान्य केलें, मामाच्या व नबाबाच्या विचारास आले तें आह्मांस मान्यच आहे. जातीनीं शपथ वाहिली, मी दुसऱ्याची सेवा करणार नाहीं. सारांश, हें सौष्ठाई आपसात करून योशीतेस सांगावें. याणीं हातीं धरून जाऊन आणावी. ऐसें बोलोन गेले. परवा शुक्रवारीं कूच जाहलें. तों बाई यवनाचे पिछाडीस फौजसह राहिली. आता तुळस आपले दरम्यान मामा. त्या गोष्टीची वार्ता नाहीं. वृद्ध व दकार नामक जिवाजी रघुनाथ यासीं भाषण केले जें, तुह्मीं आमचे, ऐसीयासी यवनास सागावे, एक लक्ष आमशींच असावें, तिकडील लक्षासीं गरज नाहीं, त्याणीं दातृत्व मान्य केले असेल त्याची सवाई दिढी आह्मास मान्य, भोंसले याजकडीलही पक्ष न करावा, कृतकार्य सिद्धीस गेलियानतर जसें विचारास येईल तैसें करू. जिवाजी पतानीं उत्तर केले कीं, आह्मीं आपलेच, परतु या जाबसालांत आजच पेंच पडतो. त्याचें प्रत्योत्तर सांगितलें,

होईल वैसें करीतच आहों दिवसें दिवस मसलत जवळ येत चालली मा-माचा विचार उमज्यात येत नाहीं यवनाचें लक्ष तेथें परिछिन्न दिसतें मा-मासीं चित्त शुद्धता नाहीं येविसीं यवनाचीं पत्रें तेथें गेलींच आहेत ध्या नांत येईल श्रीमंत दादासाहेबाकडून सधान जालें होतें सेनाखासकीली विसा लक्षांची जहागीर द्यावी, आपले लक्षीं असावें पाणी ठिकाण लागों न दिल्हें त्यावर प्रस्तुत हस्ताक्षरीं पुर्जा फोणा प्रहस्याजवळ आला पद, जागा किल्ला देतों तेंही उपेक्षिलें आणिकही सूत्र आहेच सेवट एकले तुम्हाजवळ येऊ, निखालसपणाचें उत्तर यावें, आपलीकडील खातरजमा जशी पाहिजे तैसी देतों, मुखोक्तीच कैदहि म्हणाल तर करितों, एक मार्ग व चन गुतलें म्हणोन असें केलें होतें, पद किल्ले जागा म्हणाल तें देतों ऐसे जाबसाल आहेत याचा खचीर कायम इस्तकबील वाहाळ आहे लक्ष मा तुश्री आणि उभयता पार्थीच आहे यवनही तेथील सधानावरून आणि यांणीं सिल सिला ठेविल्यावरून त्याचेच लक्षीं त्यांचे मसलतीवर दृढतर दिसतो मामाचे मर्जीस मात्र बेभार. कोणीही प्रकार कूच-मुकाम सला मसलत येक विचारें असावीं भद्राच तरी आपलेंच करणें जरूर, ऐसें आहे दयाया ईची दिवाणगिरी व फडणनिसी आपलीकडे करून घेतली यावेक कामकाज करिताव मल्हारपत वगैरे पाच चार असामी त्याचे होते त्यावर आरोप आणून आपले गोटांत आणून ठेयणें, ऐसेंहि आहे घडेल तें सरें. सिवर्फे जाहलें वर्तमान तें लिहिलें असे हल्लीं येथून चिठ्या रा। जोत्याजी घाटगे रा। ७॥ हजार व रा। चिमणाजी घाटगे रा। पाच हजार एकूण साडेबारा हजार रुपयांच्या चिठ्या केल्या आहेत किंवा रा। बाळाजी गणेश याचा* चिठी रा। पाच हजार साडे अठराशाच्या चिठ्या गेल्या आहेत ऐवज दि कत न पडतां घाया सरकट वर्तमान मागाहून लिहून पाठवितों कळावें बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना

सेवेसी सदाशिव सोनदेव कृतानेक सा नमस्कार विनति लि। परिसोन कृपालोभ करावा भेट होईल तो सुदीन हे विनंति

---

पत्रांक १११

पै। छ ११ मोहरम श्री (नकल) १६९६ चैत्र शुद्ध ८

यादी करार सरकार राजश्री सायाजी भोसले सेनासाहेबसुभा सु॥ अबा व चैन मया व अलफ राजश्री बापूराव विश्वनाथ वैद्य तुम्हीं पुरातन पदरचे कैलासवासी तीर्थरूप बाबासाहेब यांणीं तुमचें व वडिलाचें चालविलें अलि कडे तुमचा सरंजाम चालत नव्हता त्यास, हाल्लीं तुम्हीं दौलतीचे उपयोगी

---

* 'ध्या' बद्दल 'चा'

पडलां. तुमचे चालवणें आवश्यक. याजकरतां तुह्मांस वतन रुपये १५०००
पंधरा हजार करार केले असे. तरी, याचा सरजाम तुमचा पेशजी आहे तो
अगर त्याचे मुबदला आणखी लाऊन देऊ. व पा रामटेक येथील देशपांडे-
पण वतनी तुमचे आहे, ते तुमचे तुह्माकडे चालेल. छ, ७ मोहरम. सदरहूप्रो
करार करून द्यावयाविशी आज्ञा देणें.

---

पत्रांक ११२ श्री. १६९६ चैत्र शुद्ध ९

अपत्ये तात्याने दोनी कर जोडून सा नमस्कार. विज्ञापना. राजश्री सेना-
साहेबसुभा यानी आह्मास साल गुा चे ऐवजी खर्चाबद्दल तेथून रुा पाच
हजार साडेआठशाची चिठी देविली आहे. त्यावरून राजश्री बाळाजी गणेश
याचे नावाची चिठी पा आहे. तर, सदरहू ऐवज घ्यावा. एकूण ऐवज सारा
आठावीस हजार साडे आठशाच्या चिठ्या जाहल्या. येणेप्रमाणे ऐवज दि-
लाच असेल. व हालीहि लिहिल्याप्रमाणे द्यावा. हा अर्ज कर्ज दाखल द्यावा-
सें असल्यास लिा पाठवावें. त्याचे नावचे खत लिा पा द्यावें. कदाचित्
कर्ज नच द्यावेसे असले, तरी ऐवज पुढे सफरचे ऐवज घ्यावयास येईल.
साराश, चिठ्या माघाऱ्या न फिरत तो अर्थ करावा. राजश्री बाबूरावजीची
यादी कराराची तैनात रुपये पधरा हजार रुपयाची करून घेतली आहे. देणे
मात्र व्हायचे आहे. आज करून घेतो. वकिलियाचे तर्फेची त्या दरबारी
करार जाहली आहे. पूर्वीचा दाखला नाहीं. साप्रत उपयोगीं पडिले सा,
ह्मणून यादी करून घेतली आहे. सदरहू ऐवजाचा सरजाम लाऊन घ्यावा.
याप्रमाणे करार आहे. कळावे. यादीची नकलही पाठविली आहे. कळावे.
बहुत काय लिहिणे? पोद्दारीचे भापणात आले आहे. ऐवज आपणाकडे
घेऊन चिठ्या आपणावर करून घेणें ठीक नाहीं. याजवरी पोद्दारी ऐवज
मात्र कराराप्रो घेतों. बहुत काय लिहिणे? हे विज्ञापना.

---

पत्रांक ११३
पौ छ ११ मोहरम. श्री. १६९६ चैत्र शुा १२

आशिर्वाद उपरी याचे फौजेत पोटाचा गवगवा तीन लक्षपर्यंत दरमहा
लागतात त्यास, लक्ष रुाने काय होते? हालीं मामानी सव्वालक्ष द्यावयाचा
करार केला आहे. त्यास निदानी दोन तरी पाहिजेत. त्याविषयी दोन तीन
वेळ लिहिले होते त्याचे उत्तर आले कीं, दरमहा नेमावे, तेव्हा पन्नास हजार
देऊ ह्मणतात ह्मणोन लिहिले. त्यास मसलत भारी. कराराप्रो विभागणी
होईल, ह्मटल्यास कैसे होते? प्रसगोपात्त खर्च केल्यास कैसे होईल? आपण
दरमाहा नेमावें ऐसा लाभ आपणास कोणता? आपण चाकरी करावी ते

करित असतों दरमहा नेमावें म्हणतात तेव्हां अपूर्व आहे एखादी सरदारी त्यांचे लक्षीं असतां आणि ते जबरदस्त अधीन दरमाहानें मागतात, हें काय आहे ! त्यांनींच याची, हें त्यास उचित दोन लक्ष रुपये दिल्यानें कांहीं बुडतात ऐसें नाहीं आणि दिल्यासेरीज याचें नीट पडणार नाहीं याजकरितां एक दोन वेळ मर्जीनुरूप म्हणोन पहावें न देतील तरी उपाय काय ! हर कैसें तरी चालेल परंतु वाईट दिसेल याजकरिता घरचेयर लिहिलें उत्तर निश्चित पाठवावें बहुत काय लिहिणें ! लोभ किजे हे आशिर्वाद करावयाची याची सरंजामाची पाठविली आहे त्यावरून कळेल हे आशिर्वाद

राजश्री नाना स्वामीस साष्टांग नमस्कार विनंती राजश्री तात्यांनीं लिहिलें आहे त्यावरून कळेल हे विनंती मामाच्या मापर्णेकरून नबाव अमुर्दा व हेहि अमुर्दा ! हें ठीक नाहीं आनण म्हणतील कीं, मामा राज्यांत शहाणे त्यास हें खरें परंतु सचेचें शहाणपण आहे ! प्रसंगोपात विचारणा दिसत नाहीं हे दिवस जबरेचे नाहींत समाधानानेंच करून सर्व गोष्टी नीट पडतील त्यास, ही गोष्ट येथें नाहीं कळावें, हे विनंती

---

पत्रांक ११४ श्रीशंकर १६९६ चैत्र शुद्ध ११

तीर्थरूप राजश्री नानाजोशी व बापूराव वैद्य स्वामींचे सेवेसीं:—

अपत्यें कृष्णराव नारायण जोशी धा। नमस्कार, विनंती उपरी राजश्री साबाजी भोंसले सेनासाहेबसुभा यांनीं अजम खादीखान पन्ही सौदागर यास रु॥ ३००० तीन हजार देविले आहेत त्यास, खान मारनिल्हे यांनीं सदरहू तीन हजार रुपये नवनीतखान पन्ही सौदागर यांस देविले आहेत तरी चिठी पावल्या रोजीं जा॥ आ॥ उत्तरीं ठावठिकाणा चौकस करून पावलियाचें कबज घेउन सदरहू तीन हजार रु॥ द्यावे मिती शके १६९६ जयनाम संवत्सर चैत्र शुध १२ बहुत काय लिहिणें ! हे विनंती

---

पत्रांक ११५

पौ चैत्र या २ मंगळवार. श्री १६९६ चैत्र शुद्ध १५

राजश्री नानाशी कृष्ण जोशी व बापूराव वैद्य गोसावी यांसी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेो साबाजी भोंसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें विशेष राजश्री रघुनाथराव दादा मागें पंढरपुरच्या सुमारें चालिले म्हणोन त्रिंबकराव मामा खडे होऊन त्याजमागें गेले पथराची सर्प मुसलमान लो कांचा गुंता याबदल एक दिवस आधी मागें राहिलों छ ११ मोहरम शनिवारीं येणूनाद गोपाळपुरावर दादांचा मुकाम होता कारेगांवीं सेना धुरंधराची फौज होती मामा तेथें गेले दादा तोफखाना व फौजमुद्दा

कासेगांवास आले. इकडून उतावळी जाहली. सारांश, जुंझाचा प्रसंग न बनला. मामा जखमी पाडाऊ गेले. आह्मी वीस कोस मजल करून माणेवर नाझरे याखाली दोन कोस मुकाम केला. तो सध्याकाळी हे वर्तमान व फौज व राजश्री हरीपत तात्या आले. एक मामा मात्र निशाण हत्ती वगैरे समेत गेले. बरकड वामनराव व रास्ते, नारोशंकर याचे पथक व शिवराम विठल अवघ्र फौज आह्मजवळ आली. नबावही सा चौ घटकानी येथे येत आहेत. दादानीं आज मुकाम करावा. बरकट देव सर्व घडवील. राजश्री बापू व नाना यासी आपण खातरजमा करून सागावे. आह्मीही त्यास लिहिले आहे. व रा॥ हरीपत तात्या व तात्या याणी लि॥ आहे. त्याजवरून कळेल. चिता न करावी. मामा कांहीं घेऊन गेले नाहीत. रा॥ छ १४ मोहरम. बहुत काय लिहिणे ? हे विनती. मोर्तबसूद.

—श्री—
श्रीशाहूराजपदांभोजभ्रमरायितचेतसः । विश्वात्मजस्य मुद्रैषा राघवस्य विराजते॥

---

पत्रांक ११६.

पौ चैत्र वद्य २ मगळवार. श्री. १६९६ चैत्र शुद्ध १४

आशीर्वाद उपरी येथील क्षेम ता॥ चैत्र शुद्ध १४ रविवासर मुकाम नजीक नाझरें वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील सविस्तर वृत्त राजश्री हरीपत तात्याच्या पत्रावरून कळेल. श्रीमत राजश्री सेनासाहेबसुभा काल वीस कोस मजल करून आले. कारण जे मामाची गाठ पडावी. त्यास, मामानी उतावळी केली. यामुळे यश त्यास आलें. नबावाकडे दोन तीन साडणीस्वार रात्रौ पाठविले. त्यानीं अकरा कोसाचे कूच करून ये फौजे शेजारीं येऊन आज उतरतील. सर्व सरदार एकत्र होऊन उदईक त्यांचे तोंडावर जातील. सर्व गोष्टी मनोदयानुरूपच घडतील. चिंता नाहीं. नबाबाची व आपले यजमानाची कायमता आहे. चिता नाहीं. राजश्री हरीपत तात्या व सरदार सर्व येथे आले. बहुत काय लिहिणें? लोभ असों दिजे. हे आशीर्वाद.

---

१०

पत्रांक ११७

पौ चैत्र षा २ मगळवार श्री १६९६ चैत्रशुद्ध १४

अपत्ये तात्यानें चरणावर मस्तक ठेवून सा नमस्कार विज्ञापना ताा चैत्र शुध १४ रवियासर मुक्काम नजीक नासरें वर्तमान यथास्थित असे विशेष श्रीमंतांची व राा मामाची गाठ काल मदवारीं दोन प्रहरा पडली होणारप्रमाणें उतावळीनें हा प्रकार जाहला सविस्तर वृत्त रामभी हरीपंत तात्यांनीं लिहिलें आहे त्यावरोन कळेल श्रीमंत रामभी साबाजी भोसले, सेनासाहेबसुभा, मदवारीं वीस कोस नासरेयानजीक माणेवर सध्याकाळच्या साहा घटका दिव सास आले मामानीं माणेच्या व मिंवरेच्या सगमीं मुकाम करावा तो न केला यावकरितां येथें मुकाम केला तों सूर्यास्तीं लढाई होऊन फौजा निघाल्याचें वर्तमान आलें तेव्हां मुस्तकीम होऊन राहिले रात्रौ मामाकडील सुणगे वगैरे आले ते आपणाजवळ उतरविले आज तात्या व सर्व सरदार येथें आले फौजेमवळ फौजेचा मुक्काम जाहला नवाबाकडे रात्रौ दोन तीन पत्रें पाठविलीं त्यांनीं अकरा कोशांचें कूच केलें चौ घटकांनीं एथें येतील उपरान्त सर्व एकत्र होऊन उदईक श्रीमंताच्या डेऱ्यावर जातील मामानीं उतावळी केली इतक्यानें त्यास यश आलें कांहीं लढाई चांगली जाहलीच नाहीं ईश्वरीकृपेनें चिंता नाहीं सर्व गोष्टी मनोषयानुरूपच घडतील बहुत काय लिहिणें ? लोभ असों दिजे हे विज्ञापना

---

पत्रांक ११८ श्री १६९६ चैत्र वद्य ६

आशीर्वाद उपरी येथील क्षेम ता चैत्र याा ६ मदवासर मुक्काम मोहोल क्षेम असों विशेष आपण पत्रें शुद्ध एकादशीचीं व पौर्णिमेचीं पाठविलीं तीं काल परवां पावलीं लिहिलें वर्तमान कळलें मुकारनामक व मातुश्रीच्या सू त्राचा प्रकार लिहिला तो कळला येथें सूत्रें पाटणकर वगैरे यांचे विद्यमानें आहेत म्हणून बातमी आली आहे त्याचा शोध करून वरचेवर बंदोबस्त करीत जावा म्हणोन लिहिलें त्यास सूत्रें बहुत नानाप्रकारें येतात परंतु यांची कायम मिजाज आहे आणि पुर्तेपणीं समजलें आहे कीं, क्षणभंगुर कारभार, व आम्हीही वरचेवर सावध करीतच आहों तेणेंकरून सूत्रें लागत नाहीं व समजलेंही आहे कीं जर करितां,अविलंबीली मसलत सिद्धीस जात नाहीं, तरी परिणाम लागत नाहीं प्राण वांचणें होणें कठीण अपकीर्तीस पात्र यामकरितां कोणेंही प्रकारें मसलत सिद्धीस जावी हाच मनोमानसीं भाव आहे दुसरा अर्थ किमपि नाहीं याचा कारकून तिकडे गेला म्हणून आइकितों, म्हणून लिहिलें त्यास, यांमकडून कोणी तिकडे गेला नाहीं व सूत्रें येतात त्यांसही साफ उत्तर देतात लाऊन ठेवीत नाहींत इकडील बंदोबस्त आ हेच गुता नाहीं रामभी मामानीं उतावळी करून यश त्यास दिलें ईश्वराच

करणे! उपाय नाही! एक दिवस गांठ घातली नसती तर दुसरे दिवशीं हे पोचले असते. मग गांठ घातल्यास चिंता नव्हती. व दुसरे, निजामअली याचा जांवई बसालतजग याचा लेक आदवानी करून नबाबाकडे येत असतां मोहलेवर आला. श्रीमतास बातमी लागली. त्याजवर धावले. हे वर्तमान नबाबास कळलें. लाब मजल केली. जाऊन आटोपावें तों त्याच्याने दम धरवला नाहीं. एक दिवस झुंजला. निदानीं हस्तगत जाहला. हेंहि काम वाईट जाहले. त्याजवर गुरुवारीं जाबीतजग, धौसे, राजश्री हरीपत तात्याचे डेरेयास आले होते. सरदार इकडील सर्व एकत्र होऊन निश्चय ठरविला जे, मामा गेले ह्मणोन काहीं गेले नाहीं. अविलंबिली मसलत सिद्धीस न्यावीच न्यावी. एतद्विषयी इमानप्रमाणपूर्वक भाषणे परस्परें होऊन मुकाम मजकुरी आले. आज कूच होऊन पुढे जात आहेत. श्रीमतानीं काल कूच करून मोड्याहून पुढे गेले. यांस त्यांस 'वीसा कोसाची तफावत आहे. गाठ लवकरच पडावी, ऐसे आहे. बहुत काय लिहिणे? लोभ कीजे हे आशिर्वाद.

---

पत्रांक ११९

पौ चैत्र वद्य ११ गुरुवार श्री १६९६ चैत्र वद्य ६

आशिर्वाद. उपरी. राजश्री भवानराव प्रतिनिधी चतुर्थीचे दिवशीं रात्रौ श्रीमताच्या लष्करातून निघोन इकडे यावयाचे उद्देशे आले. त्याचेमागे राजश्री सखाराम हरी धावले होते. परतु त्याची याची गाठ पडली नाहीं. सखाराम हरी माघारे गेले. प्रतिनिधी अद्यापि या लष्करात पोहोचले नाहीं. त्याचा ब्राह्मण व खिजमतगार काल रात्रीं लष्करात आले. तेही आज येतील. राजश्री मामा तिकडे गेल्यावर तात्या वगैरे सर्व सरदार नाझरेयाचे मुकामीं एकत्र जाहले. उपरातीक पत्रें तात्याचीं व येथील देऊन प्रातःकाळीं साडणीस्वार आपणाकडे रवाना केला. त्याचें उत्तर अद्यापि आले नाहीं. साडणीस्वार पोहचला न पोंहचला हे कळत नाही. मामाचे वर्तमान तेथे कळल्यानतर पुढें मसलत काय जाहली, हे सविस्तर ल्याहावी. येथील प्रकार तरीः मामा गेले ह्मणून कोणी आव टाकिला नाहीं. मुस्तकीम आहे. चिंता न करावी. या उपरी गाठ पडेल ते दिवशीं काम कैसे होते हें प्रत्यास येईल. भगवतास ऐसे करणें होते. याजकरिता ते दिवशीं सेना–साहेबसुभा समयास नव्हते. जर करता असते तरी मामास उतावळी करू न देते. इतकेंही असोन गाठ पडती, तर निघाले नसते. ईश्वरसत्तेने होणें ते होते. ते दिवशीं वीस कोसाची मजल करून नाझरेयावर आले. रात्रौ मामास मेळवावें. तें सूर्यास्ती मामाचा पळ येऊ लागला तेव्हा तयार होऊन उभे राहिले आणि मामाकडील पळ आला त्यास धीर भरवसा देऊन पाठीसी उतरविलें. ते दिवशी ही फौज तेथें नसती तर मामाकडील पळाचा बहुत नाश

होता ईश्वरें कृपा केली दुसरे दिवशीं मामाकडील फौज जमली अविंधही आला त्या दिवसापासून सर्व सनिधच राहवात एका दों रोजा गाठ पडेल, ऐसें दिसतें मार्गानें जासूद निभावत नाहींत यावकरितां पत्रें लिहिणें तीं नांवें करून न त्याहावीं ' विनती उपरी ' म्हणून त्याहावीं लखोट्यावर मात्र नांव त्याहावें हाणवे ठीक पडल बहुत काय लिहिणें ? लोभ किजे हे आशिर्वाद

राजश्री नाना स्वामीस सा नमस्कार विनंती सविस्तर अर्थ लिहिलाच आहे त्यावरून कळेल तिकडील अर्थ इत्यभूत लिहिला पाहिजे येथील चिंता न करावी मुस्तकीम आहे हे विनती

---

पत्रांक १२० भीर्धकर (नकल) १६९६ चैत्र वद्य ६

वडिलांचे सेवेसीं साष्टांग नमस्कार विनंती येथील क्षेम ता चैत्र वा ६ मद वासर पावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष आपण पत्रें दोन जासुदा बराबर पाठविलीं तीं पावलीं वर्तमान कळलें पाटणकर वगैरे यांचे विद्य मार्वे सूत्रें लागलीं आहेत व तेथून सरकारचा कोणी कारकूनही गेला आहे म्हणोन येथें बातमी आली आहे, त्यास शोधात आसोन जे गोष्टीनें मुस्तकीम राहे तें करावें, म्हणून लिहिलें त्यास, सूत्रें बहुत येतात येथून कारकून कोणी गेला नाहीं सूत्रें येतात परंतु येथें तीं अलक्ष आहेत चिंता न करावी उतावळीनें मामानीं यश त्यास दिल्हें उपाय नाहीं ते दिवशीं सबूरी केली असती तर रात्रौ हे मिळाले असते हे यीस को सांची मजल सडे स्वारीनशीं नासरेयानमीक मामेवर तृतीय प्रहरीं आले जीन हालविले रात्रौ जीन ठेऊन मामाजवळ जावें, हा इत्यर्थ केला तों सूर्यास्तीं पळ मामाकडील आला तेव्हां जीन ठेऊन सवारी करून उभे राहिले पळ आला, त्यास खातरजमा करून पाठीशीं उतरविलें प्रात का ळीं राजश्री हरीपंत तात्या व सर्व सरदार आले तेथेंच मुकाम केला न बाबही लांब मजल करून तेथेंच आले सर्व एकत्र होऊन पुढें चाल व रिली नबाब निजामअली याचा पुतण्या बेत होता, त्याजवर श्रीमंत धांव ले त्यास धरून नेलें, हेंहि वाईटच जाहालें परंतु मिजाज कायम आहे काल कूच करून येथें आले आज कूच करून पुढें जात आहेत श्रीमंतां चा मुकाम काल नसीमचा होता यिमां कोसांची तफावत आहे एयकरच गाठ पडते ईश्वरसत्तेनें परिणामही उत्तमच होईल सब सरदारांनी मिजाज हा काळपावेतों कायम आहे पुढें ईश्वर बरेंच करील चिंता न करावी व हुत काय लिहिणें ? तीर्थस्वरूप भाऊकडून साडणीस्वार दान वेळ आला वर्तमान लिहिणें म्हणून आज्ञा होती त्यावरून दोन वेळ पत्रें लिहून संक लित वर्तमान लिहून पाठविलें आहे कळावें हे विनंती

वडिलाचे सेवेसी आपत्यें गणेश नारायण सा। नमस्कार. विज्ञापना. आज्ञेशिवाय किमपि गैरवर्तणूक व्हावयाची नाहीं. हे विज्ञापना.

---

पत्रांक १२१ श्री. (नकल) १६९६ चैत्र वद्य ६

उभयताचे सेवेसीं. बाळाजी गणेश कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना येथील कुशल चैत्र वद्य ६ जाणून स्वकीय लेखन आज्ञा केली पाहिजे. इकडील सविस्तर श्रीमत राजश्री तात्यासाहेबाचे पत्रावरून सविस्तर श्रवण होईल. मुख्यांचा एकदा साबित आहे. बिलग पडणार नाहीं. खातरजमा असो द्यावी. मेहनतेस अंतर करीत नाहीं. चाकरी मगदुराप्रमाणें करीत आहों. पसत करणार आपण आहेत. इलजाम येणार नाहीं. सर्व यथास्थित आहे. हरघडी कृपापत्रीं साभाळ करावा. हे विज्ञापना. राजश्री सदाशिव हरी मकार नामकाचे तर्फेनें आले आहेत. बोलण्यात आले कीं, बाईस व नानासाहेबास एक करावें. कित्तेक मायेममतेच्या गोष्टी बोलता, याचे बोलणें होऊन, राजश्री हरिपत तात्यास समजल्याउपरी जे होईल ते सेवेसीं लिहून पाठवितों. हे विज्ञापना.

---

पत्रांक १२२

पौ चैत्र वद्य ११ गुरुवार. श्री. १६९६ चैत्र वद्य ६

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाबूरावजी स्वामींचे सेवेसीः---

पोष्य कृष्णराव नारायण सां नमस्कार विनती उपरी येथील कुशल ता। चैत्र वद्य षष्ठी जाणोन मुा। लष्कर नजीक मोहळ जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष आपणाकडून शुद्ध एकादसी व पौर्णिमेचीं पत्रें आलीं तीं पावोन सविस्तर मजकूर कळला. इकडील मजकूर तर तपसीलवार तीर्थरूपाचे पत्रावरून व राजश्री लक्ष्मणपत याणीं लिायावरून लिहून कळेल. एका दोहों दिवसानीं सड्या फौजा होणार. मागाहून तपसिलवार लिहून पाठवू. त्या सैन्यांतून राजश्री सदाशिव हरी आले आहेत. कांहीं सूत्रही आतून आहे. कसें काय आहे, पुर्तेपणीं कळलें ह्मणजे लिहून पाठवू. कसेंही सूत्र आलें तरी इकडील मिजाज कायम आहे. चिंता नाहीं. राजश्री हरीपंत तात्याकडे आह्मी व राजश्री दादा जात असतो. बहुत ममता उत्तम प्रकारें करितात. तात्याचें साधन बरें राखिलें आहे. चिंता न करावी. पत्रे वरचेवर पा। असावीं. घोड्याविशीं लिा। त्यास, एक घोडा तुरकी, फारच चांगला, गुदस्ता यानीं अडीच हजार रुपयास घेतला होता, तो तयार आहे. परंतु एकच घोडा पाठविल्यास राजश्री बापूसही पा। पाहिजे. दुसरा तूर्त पाठविण्यास सोय पडत नाहीं. याजकरिता न पाठविलें. तूर्त विकतही घेईन ह्मटल्यास मिळत नाहीं. व ऐवजही नक्त द्यावयास नाहीं. याजकरितां पाठवायास

आझपावेतों अनमान जाहला यजमानाचें मानस कीं, पाठवणें तेव्हां दोन पाग त्यास कुशन्याची तरी तूर्त होय पवत नाहीं याजकरितां येथून राऊत कोणी येईल असल्यास त्याजबरोबर एकच पाग म्हणून लिा तरी एकच पाग देतों घोडा आहे हा फार चांगला आहे हा राजश्री नानांचे मर्जीजोगाच आहे येमनीपेक्षां अधिक चालणारा आहे पाहिल्यानतर कळेल याा मल्हा[र] पानशे येथें येणार म्हणून वर्तमान ऐकितों त्याजबरोबर राऊत येऊन माघारे जातील त्याजबरोबर पत्र देतों बहुत काय लिहिणें? लोभ करावा हे विनती

---

पत्रांक १२३

पौ अधिक वैशाख शुा ५ शुक्रवार. श्री १६९६ चैत्र वद्य ८

राजश्री नानाची कृष्ण व राजश्री बापूराव विश्वनाथ गोसावी यासी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो बाबाजी भोंसले सेनासाहेब सुभा दडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें विशेष छावणीस्वारायराबर छ १७ मोहरमचें पत्र पाठविलें तें छ २० मोहरमीं पावलें लेखनार्थ कळला राजश्री बखारामपत बापू व राजश्री बाळाजीपंत नाना याचीं पत्रें पाठविलीं ते पावलीं ऐशीयासी, राजश्री रघुनाथरावदादा यांणीं मामास हस्तगत करून सीनेच्या पाण्यानें लांब मजली करून जात आहेत काल त्याचा आमचा सोळा कोसांचा तफावत होता भारी कारखाना परांडेयांत ठेवावयाबद्दल आमचा मुक्काम नबाबांनीं करविला याउपरी नबाबानीं जरीदे दाहा बारा कोसाच्या मजला करून मागें यावें आणि आम्हीं व राजश्री हरीपंत व राजश्री वामनराव व रास्ते वगैरे सरदार जाऊन गांठ घालावी अटकून पाडावें, तोफा टाकून झुंजास आले तरी झुंजावें, ऐसा निश्चय ठरविला आहे राजश्री भवानराव प्रतिनिधी काल येऊन दाखल जाहाले हें सविस्तर वर्तमान राजश्री हरीपंत व राजश्री कृष्णराव यांणीं लिा आहे त्याजवरून कळेल राजश्री बापू व नाना यांसीं लिा आहे तिकडून नदी किसेकविशीं साधन प्रकार पडावा राजश्री मोरोपंतदादा यांसीं इकडून पत्र बहुत दिवस जात नव्हतें, आणि त्याजकडूनही पत्र येत नाहीं, येथिचींचा मजकूर तुम्हास लिहिला होता त्याचें उत्तर आलें त्यास, हल्लीं पत्र लिा आहे प्रविष्ट करून उत्तर पाठवावें वरकड तुम्हास त्यादाखें ऐसें नाहीं वरचेवर पत्रें येत जावीं राा छ २२ माहे मोहरम कित्येक तेथील ममतेचा वगैरे मजकूर राजश्री तात्याचे पत्रीं लिा त्यांणीं उमजाविलें पुढीं उभयता प्रसंगीं आहां तेंगें आम्हींच असों इकडील सदाय किमपिनसावा लक्ष दुसरें होणारच नाहीं तेथील हे निशा आपली येऊन, त्यांची करावी बहुत काय लिहिणें हे विनंती मोर्तबसुद

---

पत्रांक १२४

पौ. अधिक वैशाख शुद्ध ५ शुक्रवार. श्री. १६९६ चैत्र वद्य ८

अपत्ये तात्याने दोनी कर जोडून सा नमस्कार विनंती. राजश्री त्रिंबकराव मामा यास जखमा लागल्या होत्या. फुटून चैत्र वा ७ सप्तमीस देवआज्ञा जाहाली. मोठे वाईट जाहाले. राजश्री सेनासाहेब सुभा यानीं राजश्री बापूस व नानास पत्रे पाठविलीं आहेत. राजश्री दादास पत्र लिहिण्याविषयी विनंती लिहिली होती. त्यावरून आज्ञा झाली कीं, पत्रे लिहिणें. चिंता नाहीं. त्यावरून त्यासही पत्र यजमानानीं लिा आहे. द्यावे. राजश्री बापूनीं रा दिनकरपतास पत्र तेथून लिहिले होतें. त्यावरून त्यास बहुत उत्कर्ष वाटला आहे. याचा प्रकार काय आहे हा शोध घ्यावा. मातुश्री दर्याबाई यासही पत्रें तेथून आली आहेत, ह्मणून वर्तमान आइकिलें. त्यावरून सेवेसी लिहिले आहे. कळावे. येथे राजश्री हरीपंततात्यानी दर्याबाईचे प्रकार तीन चार शकला काहाडल्या होत्या कीं, एक प्रकार कीं, कोणेही प्रकारे राजश्री नानास व बाईस एक करून द्यावें; दुसरे, बाईनी फौज आपली आह्मी सागूं तिकडे तैनात करून द्यावी आणि आपण तीनशें चारशें राऊतांनिशीं आपले गोटात येऊन रहावें, तिसरा प्रकार बाईनीं तिनशें स्वारानिशी आपण पुरंधरास जावे, फौज येथे ठेवावी, अगर फोडून फाडून सांगो त्याप्रमाणें तैनातीस द्यावी. त्यास या तिहीं गोष्टींतून एकही प्रकार त्याजकडून घडत नाहीं. एक होणें, तेव्हा टिका चिरजीवाचे नावें असावा ह्मणतात. लोक तैनातीस देऊन आह्मीं तिनशें स्वारानिशी कैसें राहावें? लोक तैनातीस कैसे जातील? ऐसे ह्मणतात. पुरधरास जाणें उचित. परतु तीनशें स्वारानिशी जाणें कैसें घडेल? घाटगे, निंबाळकर, घोरपडे, मान्ये, जाधव वगैरे हे आमचे मानपुरुप. हे तर समागमे घेतले पाहिजेत. दोन अडीच तीन हजार निदानीं समागमें येतील. ते घेऊन जा ह्मणाल तरी जातों. वऱ्हाडचीं पथकें आहेत. तीं येथें ठेवितो. ऐसें उत्तर जाहालें. त्यास, तीनीं उत्तरें कठीणच. पुरधरास तीन हजारानिशीं रवाना करणे सला नाहीं. व जातील हा भरंवसा नाही. मार्गातून गच्छ केल्यास काय करावे? समागमें आपली फौज द्यावी तरी निवडक फौज तीन हजारास, यांची साहा हजार असेल तेव्हा उपयोगी. नाहीं तर ठीक नाहीं. ऐसें आहे. त्यास अद्यापि निश्चय बाईचा होत नाहीं. यामुळें आपले फौजे( तील ) लोकाची खातरजमा पुरवत नाहीं. फितुरी फौज समागमे घेऊन लढाईस जाणे उत्तम नाही ऐसे सर्वी सर्वत्र ह्मणतात. राजश्री तात्याही कोणे प्रकारे दर्याबाईचा बंदोबस्त करून, सडे होऊन, पाठलाग करणार. त्या सैन्यातील वर्तमान तर राा नरसिंगराव धायगुडे आपले च्यारशें राऊतानिशी नगरास येऊन दाखल जाहाले. रा कुशाबा पानशे, दरोगे तोफखान्याचे, आज येथें येऊन दाखल जाहाले. पाऊणशें राऊत समागमें आहेत.

दाखल माहीत व माळा माहीत पागेसुद्धां त्या सैन्यासून निघाले म्हणून व र्तमान आहे येथें येऊन दाखल होतील तेव्हां खरें. श्रीमंतांकडे दोन पथकें भर्वी येऊन सामील जाहाली एक ताकपीर, दोन हजार फौज गायकवा डाकडील व लांबहाते शिंद्याकडील दीड हजार फौज एकूण तीन साडे तीन ( हजार ) फौज नवी सामील जाहाली म्हणून वर्तमान आईकिलें राजश्री भवानराव प्रतिनिधी यांची रुकनुदौला याची भेट जाहाली उद यिक बदेगानअलीचीही भेट होणार आहे प्रतिनिधीजवळ तीनशें रा ऊत आहेत कळावें सरकार वर्तमान वरचेवर होईल तें मागाहून लिहि पाठवीन सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक १२५.

पौ छ २३ मोहरम, चैत्र श्री १६९६ चैत्र वद्य ८

राजमान्य राजश्री मोरो शामराव दिा

चिरंजीव राजश्री महिपतराव त्रिंबक यांसीं —

प्रति मातुश्री गंगाबाई आशिर्वाद सुा अर्बा सबैन मया व अलफ तु मचें प्रयोजन असे तरी पत्रदर्शनी हुजूर पुणियास जलद येणें दिरंग न ला वीणें जाणिजे छ २२ मोहरम आज्ञा प्रमाण

---

पत्रांक १२६ श्री १६९६

यादी पथक दिा राजश्री माधवराव निळकंठ पुरंदरे. सुा अर्बा सबैन मया व अफल

कर्जपट्टीचा ऐवज रुा १४०००० याचा तपशील

७०००० पौष असेर

७०००० जेष्ठ असेरी

---

१४००००

एक लक्ष चाळीस हजार सदर्हू प्रमाणें घावे

कर्ज सरदारीवर फार जालें मा जकरितां सालमजकुरीं मावर्ष राऊत ठेवावयास सांगितलें त्यास कर्ज वारे तोंपावेतों थाराशा फौजेनशीं चाकरी करावी पुढें दोन हजार फौजेनिशी चाकरी करावी

मागील पांच सालां महालात आ फती आली व कर्नाटकांत दोन ह जार फौजेची चाकरी जाली सदर्हू श्रावणी तीन वर्षे जाली माहागाई फार. सबब साडा लक्ष देणें जालें त्यास साल्मजकुरापासून मनास आ णावयास चिरंजीव माहिपतराव त्र्यंबक यास सांगितलें त्यास तुम्हीं कच्चाप का माहालचा व पथकाचा हिशेब मागील पाहावा यामुळें माहालकरी यासकडे वगैरे ज्यांकडे ऐवज निघेल तो पत्रनीसांत घ्यावा सरदारीचा मुख्त्यार तुम्हावर. जें उपयोगी तें तुम्हीं करावें

पत्रांक १२७

पो चैत्र वा १२ शुक्रवार श्री. १६९६ चैत्र वद्य ९

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नाना व तथा राजश्री बाबूरावजी स्वामीचे सेवेसी.---

पोष्य हरी बल्लाळ साष्टांग नमस्कार विनती उपरी येथील कुशल ता। छ २३ मोहरम मु॥ नजीक पराडा जाणून स्वकीय कुशल लिहित जावे. विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें ते पावले. लिहिला मजकूर सविस्तर कळला. उभयतांनीं राजश्री साबाजी भोसले सेनासाहेबसुभा यास पत्रे पाठविलीं, ती त्याणीं मला दाखविली. आह्मी सर्व मडळी एकरूप असो. कोणेविशीं गुता पडू देत नाहीं. ईश्वर उत्तमच करील. इकडील सविस्तर राजश्री तात्याचे लिहिल्यावरून कळेल. श्रीमत वीस कोस पुढे आहेत. आह्मी मोगलाकारितां गुतलों. याउपरी सडे होऊन पाठलाग करितो. त्याणीं पळावयाची शकल काढली आहे. आह्मी पाठीस लागलो असता कोठें जातात ! तात्या सुखरूप आहेत. चिंता न करावी. बहुत काय लिहिणें ? लोभ असो दिजे. हे विनती.

---

पत्रांक १२८

पौ चैत्र वा ११ गुरुवार श्री. १६९६ चैत्र वद्य

सेवेसी विनंती ऐसीजे. पालखी तयार करविली आहे, तयार जाहालीं, पाठवितों ह्मणून लि॥ त्यास, सरजामसुद्धा आपली पावडी येईल त्याबरोबर पा. येथे दुसरी करीत नाही. बेदाणा, मनोका, एक रुपयाच्या जासुदा समागमे पा. एक घोडा सिद्धच आहे, परतु दुसरा मेळवून पाठवणे, ऐसें यांचे मानस. त्यास, दुसरा चागला मिळत नाहीं. कारवानी आले होते. त्यात पाहिले; परतु आमचेच पसतीस न ये. तेव्हा उपयोगी कैसा पडावा? यजमान तों पेचामुळें सकोच्यात पडताल. त्याशीं एकच पाठवावा. ऐसेंच वडिलाच्या विचारें जाहाले तरी लिहावें. तिकडील स्वार कोणी येतील त्यास सागावें. त्यां समागमे पाठवितील. गुता नाहीं. हे विज्ञापना.

---

पत्राक १२९.

पौ अधिक वैशाख शु॥ १० गुरुवार. श्री १६९६ चैत्र वद्य १४.

राजश्री नानाजी कृष्ण जोशी व बाबूराव विश्वनाथ वैद्य गोसावी यांसीः—

अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्ने॥ साबाजी भोंसले सेनासाहेबसुभा दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. हरीभक्तपरायण राजश्री मार्तड बाबा, वास्तव्य श्री जेजूरी, हे आह्मास

पुण्यमान आहेत सांप्रत गडबडीच्या प्रसंगाकरिता मुलेंमाणसें सुरयळी असावीं म्हणोन यांचा मानस त्यास विस्तर प्रसंगच स्वकार् जाहलियास किल्ले पुरंधर समीप आहे आपण राजश्री सखारामपंत बापू व राजश्री बा ळाजीपंत नाना यांसी सांगोन, निरोपप्रमाणें किल्ले मजकुरीं एक घर यांच्या मुलांमाणसांस देऊन सांभाळ करणावा व पा करडेरांजणगांव यांच्या प्रयातांस आहे तेथील फडणिशीची असामी यांचे ज्यामात्र आनंदराव भैरा ळ यासी करून देणावी स्वदेशीं चरितार्थ होईल येविशीं आम्ही राजश्री नानांस पत्र लिहिलें आहे प्रसंगीं येविशीं त्यांस सांगोन सदरहू कामें करून देविली पाहिजेत यावाचें अवश्यक आम्हांस आहे त्याप्रमाणें तुम्हीं अगत्य याद धरून उभयताकरवीं ममता करणावी येविशीं अनमान सहसा न करा वा रा छ २७ माहे मोहरम बहुत काय लिहिणें ? हे विनंती मोर्तब सुद

---

पत्रांक ११०　　　　　श्रीराममजयती　　१६९६ अधिक वैशाख शुद्ध १

वडिलांचे सेवेसीं साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील क्षेम तागायत वैशाख शुा १ पर्यंत मुा लष्कर येथें श्रीमंत मातुश्री बाईसाहेब असो यानंतर व डिलांकडून सांप्रत आशीर्वादपत्रें येऊन वर्तमान कळत नव्हतें त्यास हालीं मा नाजी काळमे यांसमागमें आशीर्वादपत्रें वा तीं पावलीं पावोन लिहिला मजकूर सर्व ध्यानांत आला कितेक प्रकारें सावधपणें लिहिलें त्याप्रमाणेंच माझी चाली ची रीत आहे चिंता न करावी इकडील वर्तमान तर राजश्री त्रिंबकराव मामांनीं सख्या फौजा करून राजश्री आनंदराव रास्ते व राजश्री वामनराव जी आपले फौजेसुद्धां श्रीमंतांजवळून निघोन पुणगें वागलकोटास टाकून मामाजवळ वडगांव जयरामस्वामीचें या मुकामीं येऊन पोंहचले राजश्री विठल शिवदेव व नारो शंकर वगैरे पथकें मिळोन पंधरा-पंधरा हजार फौज व *श्रीमंत राजश्री नानासाहेब यांची फौज व नवाबाकडील जाबितजंग व श्रीमंत* सेनासाहेबांची चार पांच हजार फौज, याप्रमाणें एकत्र होऊन, सडे होऊन, श्रीमंतांवर पाठीमागें गेले श्रीमंतांनीं मिरजेहून कूच केलें ते विसा कोसांच्या मजली करून श्रीपंढरीवर गेले मामांनीं पाठीवर जाऊन कासेगांवास मुका मास वीस बावीस कोस चालून आले घोशा व श्रीमंत नानासाहेब मागेंच होते तों मामास चिठी आपलेकडील यजमानाची आली कीं, आज तुम्हीं माघारे सरून राहणें याप्रमाणें जालें तों मामांनीं विचार केला कीं, फौजेंत फितूर आहे, या वेळेस लाग करावा म्हणोन अंदेशा न करिता तयार होऊन पुढें जातें तों श्रीमंत लाखा सात आठ अयान्या वीसपंचवीस हजार फौजेनें तोफखाना पुढें घालून, गारदी वगैरे घासून आले तों दोन तरफच्या तोफां च्या डाख्या इकडून मामांनीं उजवे बाजूस रास्ते, विठल शिवदेव व डावे

आर्क देऊ नये आम्हांकडे पाठवावे त्यां समागमें आमची पालखी पु
र्वियांत आहे ती पाठवावी वरकडीखेरीज सामान असेल ऐशीयास, पाठ
विली पाहिजे शरीर अशक्त म्हणून चिंता न करावी प्रहर दिवस मेहनती
चे पडले आहेत श्रीमंत मातुश्रीची ममता उत्तम प्रकारें आहे मर्जीनुरूप
सागवीळ चाकरी तें करून मर्जी सर्वांशीं इग्लें राखून असों राजश्री श्याम
नरावसीची व राजश्री तात्याची भेट एका दों दिवशीं होत असते श्रीम
तांचे फौजेंतून लोक पथके कोणी कोणी आले राजश्री भवानराव प्रतिनिधी
व मल्हार पानशे व नरसिंगराव घायगुडे मिळोन काल आले तेथील फौजेचा
भर सुटला आहे पोटास एक पैसा नाहीं पुढें घडेल तें पहावें राजश्री रा
माजीपंत कोंकणांतून आले नाहींत त्यास बोलावू पाठवावें परी थोडी समर
नसली तर कवडीस पाठवून काढवून आणावी भिकूस पाठविला म्हणजे
काढऊन आणील तर पाठविली पाहिजे शिग्याबर खोगीर ठेविलें म्हणून
कळलें उत्तम केलें ! दसरा पावेतों वर बसूं नये मग मर्जीस येईल तें
करणें पुरण दूध मिळत नाहीं, तर आबाळन ( न ) होईल तें करावें
बाळंभट केळकर यांचे सा एकों म्येपन आम्हीं देणें होतें ते वधिलीं दिले
असतील नसले दिले तर द्यावे आपल्यावर मातुश्रीची ममता आहे या
पत्रामार्गें आपल्या येण्याविषयीं पत्रें येतील त्याप्रों मानवाचें करावें चिरंजीव
बाळाजी दिनकर याचें लग्न करावें आळसावर बातालियावर ठीक नाहीं
मूळ तर चांगली आहे वार्ते समई विनती केली होती तेणेंप्रमाणें भीड
पाहून करावें रानोजी शिंदे व लिंबाजी शिंदे आपआपले ठिकाणीं पागासु
दां सुखरूप आहेत वरकड वर्तमान मागाहून लिहून पाठवितों बहुत काय
लिहिणें ? हे विज्ञापना इ०

राजश्री धोंडोपंत दामले स्वामीस सा नमस्कार विनती उपरी लिा पा
त्रुर्वी पत्र पाठविलें तें पावलें लोभ करावा हे विनंती रा यशवंतराव यांस
नमस्कार लोभ करावा हे विनती थोो नारायणभटजी काका सां नमस्कार
विनती उपरी लिा पा पत्र पाठवावयास अनुकूलता न जाली ! असो प
रंतु उचित असेल तेंच करावें आम्हाविषयीं चिंता न करावी म्हणोन तीा
मातुश्रीबाईस सांगावें हे विनती इ०

---

पत्रांक १३१ श्री १६९६ वैशाख अधिक शुा ३

सेवेसी नारो आपाजी सां नमस्कार विज्ञापना आजी गुरुवारी प्रातःकाळीं
राजश्री कृष्णराव बल्लाळ घरास आले मध्यरात्रीं राजश्री भवानराव प्रति
निधी आले सदे सांप लांब मजली करून आले तेथें त्यांचे राऊत दादा

जवळ होते ते व पालख्या दोन पुढें कोरेगाव पावेतों गेले होते. विदित जालें पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्रांक १३२

पौ अधिक शुद्ध.                    श्री.            १६९६ अधिक वैशाख शुद्ध १

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री बाबूरावजी वैद्य यासीः—

प्रति लक्ष्मण बल्लाळ आशिर्वाद उपरी येथील क्षेम ता। अधिक शुद्ध १ मु॥ लष्कर नजीक किल्ले नगर वर्तमान यथास्थित असे. विशेष. हरिभक्तपरायण राजश्री मार्तंडबावा वास्तव्य जेजुरी हे राजश्री सेनासाहेब सुभा याचे गुरु आहेत. त्यास प्रस्तुत गडबड आहे. याचे मुलामनुष्याचें संरक्षण जाहालें पाहिजे. याकरिता राजश्री नानासाहेब यांनीं राजश्री नाना फडणीस यास व तुह्मास पत्र लिहिले आहे कीं, किल्ले पुरंधर येथें घराची सोय करून देऊन साभाळ करावा. त्यास, हे आपणाकडे येतील. तरी, याची भेट करून देऊन, यास स्थळ देऊन, संरक्षण होय तें करावें. व करडेराजणगांव येथील फडणीसी याचे जामातास करून द्यावी. येविशीं यजमानानीं लिहिलें आहे. त्यास, आपण साहित्य करून, सनद फडणीसीची करून देवावी. हे थोर तपस्वी आहेत. जेजूरलिंगही यास प्रत्यक्ष आहे. यानीं राजश्री नाना फडणीस याच्या कल्याणाविशीं व संतानाविशीं सांगितले आहे. त्यास, तुमची भेट जाहल्यास पुसावें ह्मणजे सांगतील. त्याप्रो त्यांच्या कानावर घालून, त्यासी यासी गाठ घालावी. ह्मणजे यथास्थित होईल. हे निस्प्रह आहेत. कांहीं आशा धरून सांगतात, ऐसे नाहीं. आणि जें सांगतील त्याप्रो घडेल, यांत अंतर नाहीं. आज्ञावरही कृपा करितात. आपली भेट जाहालियावर आपल्याहि प्रत्ययास येईल बहुत काय लिहिणें? लोभ किजे, हे आसिर्वाद.

राजश्री नाना स्वामीस सा। नमस्कार. विनती. लि॥ प्रो अगत्य साहित्य करावें. हे विनती.

---

पत्रांक १३३

पौ अधिक वा। ४ शुक्रवार            श्री.            १६९६ अधिक वैशाख शुद्ध ८

आशिर्वाद उपरी येथील क्षेम ता। अधिक शु॥ ८ इदुवासर मु॥ चिखलठाण वर्तमान यथास्थित असे. विशेष. बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी ऐसें नसावे. सदैव आपणाकडील कुशलार्थ लिहीत जाणें. विशेष. राजश्री नानाचें पत्र अमावास्येचें आलें होतें. त्यांत लिहिलें होतें कीं, रावजी प्रतापगडास गेले, मातुश्रीस समाधान वाटत नाहीं, त्यावरून चिंता

लागली आहे, त्यास, आरोग्य जाहलीयाचें वर्तमान लिहिलें पाहिजे राजश्री वर्तमान तरी श्रीमंत फर्दापूरच्या घाटास गेले आज घाट उतरले असतील मन्हाणपुरच्या रोखें जावात नयाबाकरितां दोन मुकाम हे फौजेचे येथें जाहाले आज कूच जाहालें मजलदरमजल त्यांचे पाठीवर जात आहेत यास त्यास चाळीस कोसांची तफावत पडली आहे पुढें काय होईल तें पहावें प्रस्तुत मसलत लांबणीवर पडली, ऐसें दिसतें ब्राम्हण मंडळी तर नित्य उठोन तिकडून येतच आहे परंतु, मराठे मंडळींत अद्यापि कोणी येत नाहीं मराठे फुटल्याविना ठीक पडता दिसत नाहीं सेनासाहेबसुभा यांचें वर्तमान तरी नित्य उठोन घरणींपारणींच आहेत सवा लक्ष देतात, त्याणें त्यांचे कांहीं होत नाहीं ऐसा प्रकार पडला आहे राजश्री हरिपंत तात्या काल येथें आले होते बोलणें चालणें जाहालें परंतु, तात्पर्यार्थ, जिमे प्रां देऊं, अधिक मिळत नाहीं यांस तरी विचक्यानें होत नाहीं तात्यांचे कूच होऊन मजलीस जातात यांचे कूच होणें कठीण पडतें तेव्हां तिकडून तिकडून करून कूच करितात कधीं मध्यरात्रीस कधीं प्रहर रात्रीस मुकामास जातात! याप्रमाणें प्रकार पडला आहे परिणाम ईश्वर लावील, तरच लागू एरव्हीं ठीक दिसत नाहीं विस्तारें काय लिहावें! लोभ किजे हे आशिर्वाद

राजश्री नाना स्वामीस सां नमस्कार विनंती उपरी आपली रवानगी होणार, सत्वरच येतों म्हणोन लिहिलें, त्यावरून संतोष जाहाला आपलें येणें होईल तरी उत्तम आहे यादव वगैरे मराठे यांचे विचारें बातीनें कारभार करावा, ऐसें आहे त्यामुळें हीं तिढणीं पडतात पुढें काय होईल तें पहावें हे विनंती

---

पत्रांक १३४

पौ अधिक वा ४ शुक्रवार श्री १६९६ अधिक वैशाख शुद्ध ८

अपत्यें तात्यानें चरणांवर मस्तक ठेऊन सां नमस्कार विनंती येथील क्षेम ता अधिक शुा ८ इंदुवासर मुकाम चिखलठाण, नजीक औरंगाबाद, वर्तमान यथास्थित असे विशेष श्रीमंत मन्हाणपुरच्या रोखें फर्दापुरच्या घांटास गेले आज घांट उतरील हे मुकाम मजकुरीं शुक्रवारीं आले अविंधाचे शहरास येणें महुता दिवशीं जाहालें याजकरितां दोन मुकाम जाहाले आज कूच जाहालें मजलदरमजल त्यांचे पाठीवर जात आहेत त्यांस यांस चाळीस कोसांची तफावत पडली आहे! पुढें कैसें होतें तें पहावें बहुत काय लिहिणें! लोभ करावा हे विनंती

---

पत्रांक १३५ श्री. १६९६ अधिक वैशाख शुद्ध ८

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नरसिंगराव स्वामीचे सेवेसीः—

पोष्य सखाराम भगवंत कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर सविस्तर कळला. श्रीमंताकडील लोकांचा मजकूर लिहिला तो कळला. सरंजामी वगैरे यांचे घरीं निकड करावी ह्मणोन लिहिलें. त्यास निकडच झाली आहे. याउपर बोभाट लवकरीच होतील. रा छ ७ सफर. बहुत काय लिहिणे? लोभ असो दिजे हे विनंती.

---

पत्रांक १३६

पो. अधिक शुद्ध १४. श्रीशंकर. १६९६ अधिक वैशाख शुद्ध १०

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री सखारामपंत बापू स्वामींचे शेवेसी:—

पो आपाजीराम कृतानेक सां नमस्कार विनंती येथील कुशल ता अधिक शुा १० गुरुवासर मुा काा जामखेड पाा आबेड येथे सुखरूप जाणून स्वानंद कुशल लेखन करीत असले पाहिजे. विशेष आपणाकडून पत्र आले तें कोा मारी काल दोन प्रहरा प्रविष्ट झाले. पेशजी पत्री आम्हीं राजराजकी वर्तमान लिहिलें. येथील खर्चवेंचाचा मजकूर लिहिला होता. त्याचा तपशीलवार जाब न पाठविला. इकडिल वर्तमान तरः श्रीमंत राजश्री दादासाहेब टोक्यास आले होते ते पेशजीं लिहिले होतें. तेथून मजलदरमजल पिंपरी परगणा एकतुणी पासून तीन कोसावर आले दोन मुकाम जाले. आह्मीं शुा प्रतिपदेस ठाणे सोडून जामखेड येथें आलों. पाटील, कुळकर्णी, रयत साडेतीन गावचे येथे आले. काहीं आपलाले सोईनें गेले. गाव दरोबस्त कसब्यासुद्धा पायमल्लींत आले. लोक घाबरेपणें सडेमात्र पळोन आले. घरेंदारें अगदी तसनसीत आलीं. श्रीमंताचे सैन्याचा दगा चार दिवस जाला. आसपासचे गाव कित्येक जाळले. माणसे मारलीं. तो दगा कोठपर्यंत ल्याहावा? त्याजउपर मोंगलाई फौज व भोंसले व स्वसैन्य हा आकांत! त्याच मजलीनें आलीं. त्यांचा दगा अद्याप आहेच. तात्पर्य, गाव अगदीं पायमल्लीत आले. पेस्तर सालची तरतूद होऊन लावणी होणे सकट आहे. वाकळूजचीं गुरेंढोरें व बैल देखील गेले. कसब्याचीही बैलढोरें गेलीं; व हे गावची तसनस बहुत जाह्ली. घरे, गाव अगदीं परागंदा जाले. ईश्वरें मोठे संकटांत घातलें आहे. आह्मी घोड्याचे चंदीकरिता सात आठ पल्ले हरभरे व पाचसात पल्ले बाजरी व पाच हजार सरस घेतला होता. तो सरंजाम अगदीं गेला. दीडाशा रुपयांची नुकसानी जाली. आता पुढे घोड्यांचे दाण्यावैरणीची व आमचे खर्चाची तर्तुद होणे कठीण जालें आहे. या दग्यात कोणी कर्जवामही देत नाहीं. ऐसा योग प्राप्त जालाआहे.

अरिष्टही निवारलें नाहीं पुढें योगक्षेम कसा करावा? आतां या साला‌त वसूल घ्यावयास जागा नाहीं पुढें सड्डीस जागा नाहीं याचें काय करावें हे आज्ञा, स्याहाची त्याप्रमाणें वर्तणूक करूं ठाणें टाकून घोडीं पिडीं घेऊन या प्रांताळ तर घेऊन येतों अथवा कसें करावें हें विस्तारपूर्वक स्याहावें आम्ही तर मोठे सकटांत आहोंत जीव रक्षावयाचें कठीण पडलें आहे भगवत् इच्छेस उपाय नाहीं तुम्हांकडील पत्र येतें तेथें मजकूर उगडून लिहीत नाहीं त्यास, तप शिलवार उगडून ल्याहावें कीं, तुमचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करावयास येईल तुम्हीं मोघम लिहिल्यास, आम्हीं काय समजावें? साल मागीं परगण्यास वसूल नाहीं परंतु सालापेक्षा महाल मा अधिक पडला व पुढेंही पाहिजे होण्याचा ऐवजहि सर्चाचे भरण्यास गेला चार तट्टे वगळीं पाहिजेत व चार माणसें समई पाहिजेत ऐसा योग घडला आहे श्रीनें काय योजना केली असेल ते नकळे पर्त्री कोठवर रक्ष ल्याहावा ? राजकार्य बहुत कठीण आहे आतां पाटील व लोक ममतेंत घेऊन गांवावर वस्तीस न्यावी तर अरिष्ट निवारलें नाहीं कोण्हे समयीं परतून येईल हें सध्य नाहीं मोंगल अद्यापि शहरींच आहे चोर, राउत नित्य लूट लबाडी करितात रा हरिपंत फडके यांचें निच मतीचें सैन्य व सामाजी भोंसले यांचें सैन्य चौक्याची घांटी उतरून फुलमरी परगण्यांत गेले आहेत मोंगल व दर्याबाई भोसली हीं दोन पथकें शहरावर आहेत श्रीमंत फर्दापूरघाटें उतरून खानदेशांत गेले, ऐसें आहे पुढें काय होईल हें नकळे घोडीं पिडीं जगून तुम्हाजवळ येणेंचें सकट पडलें आहे येथें आहेत यांचाहि भरवसा येत नाहीं ऐसें जालें आहे पुढें काय करावें ! वर्तमान कोणास स्याहावें ! हें ठिकाण राहिलें नाहीं जिवावर गोष्ट आली आहे भगवत पार पाडून तुमची भेट घडयील तेव्हा खरें. अस्तु आपला उपाय नाहीं घोडीं घेऊन तुम्हांकडे यावें, ऐसें आहे येथें राहिल्यास खर्च चालला पाहिजे याची आज्ञा काय ते लिहिणें त्याप्रों वर्तणूक करावयास येईल ठाणें मोकळें सोडून यावें कीं बंदोबस्त करून यावें, हें लिहिणें पुढें गांवचा बंदोबस्त व पेस्तर सालची वर्तूद कोणते अर्थी कसी करावी, हें उगडून ल्याहावें या पत्राचें उत्तर ये तोंपर्यंत ठाण्यात अथवा आसपास आहोंत उत्तर आल्यावर मग जे आज्ञा होईल त्याप्रों करूं. या मांडीं कांहीं बाकी राहिली नाहीं अगोदर पर्जन्याची आपत्ती, त्याजवर फौजांचें उपसर्ग आले यामुळें अगदीं काम बुडालें ईश्वर इच्छेस उपाय नाहीं विस्तारें ल्याहाय यास कांहीं सुचत नाहीं बहुत काय लिहिणें ! लोभ करावा हे विनंती

सेवेसी निलकंठ पिलदेव सां नमस्कार. लिा धारें निवेदनांत येईल ईश्वरें मोठे घोरांत घातलें आहे निर्वाह होणें सकट आहे असो उपाय नाहीं आपणाकडील सविस्तर ल्याहावें लोभ करावा हे विनंती

पत्रांक १३७. श्रीगणेशायनमः १६९६ अधिक वैशाख शुद्ध ८

स्वस्ति श्रीमत्संवत् १८३१ श्रीमच्छकः १६९६ जयनाम्नि संवत्सरे उत्तरायणेर्के वसंतर्तौ मासोत्तमे प्रथम वैशाख शुद्ध ७ इंदुवासरे २६।४२ अदितिभे ३२।२० धृतौ योगे ५५।५८ वणिजकरणे तत्र मेषार्के गताशाः ७ भोग्याशाः २३ तत्र श्री सूर्योदयादिष्टकालः १७।३० तत्र समये कुलीरलग्नोदये श्रीमता सवाईमाधवरायसंज्ञकाना प्रभुवर्याणा जन्मकुंडलीयम्




पत्रांक १३८.

पौ अधिक वा। ४ शुक्रवार श्री. १६९६ अधिक वैशाख शुद्ध १३

आशिर्वाद उपरी येथील क्षेम ता। अधिक शुद्ध १३ रविवासर मु॥ नजीक सिंखेड वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण पत्रें खडूबरोबर नवमीचीं पाठविलीं ती काल मदवारीं पावलीं. लिहिलें वर्तमान कळलें. श्रीमत राजश्री सेनासाहेब सुभा यास व भवानी शिवराम यास पत्रें पाठविलीं तीं त्यास दिल्हीं. उत्तरें पाठविली आहेत. पावतील. श्रीमत्त मातुश्री गंगाबाई यास पुत्ररत्न जाहाले, ह्मणोन लिहिलें. त्यास, तुमच्या पत्रापूर्वी तीन दिवस तोफखाने याचा साडणीस्वार पत्रे घेऊन आला. त्यावरून संतोषाचे वर्तमान आईकोन, निजामुद्दौले व सेनासाहेबसुभा व हरीपंत तात्या व सर्व सरदार आबालवृद्ध यास संतोष जाहाला! तो पत्रीं लिहिता येत नाहीं! सरबत्ती व नौबतखाना सुरू करून शर्करा पृथक् पृथक् वाटल्या! ईश्वरें अमृतवृष्टी करून वंशावळी प्रस्फुलित केली! तशांत, भगवंतास प्रजेचें पालण आणि धर्मसंस्थापना कर्तव्य आहेच आहे हा निःसंदेह जाहाला! पुढे सर्वांचे मनोरथ सिद्धीस जातील, हे उमेद कुलवाद जाहाली! इकडील वर्तमान तरीः शहरपर्यंत मजलदरमजल नबाबसुद्धा आले. नबाबाचा मुकाम शहरासमीप जाहाला. वरकड फौजा चिखलठाणावर राहिल्या. दुसरे दिवशीं मुकाम नबाबामुळे सर्वांचे जाहाले. तिसरे दिवशीं राजश्री तात्यानीं कूच करून फुलबारीवर गेले. सेनासाहेबसुभा यांचा मुकाम गवगव्यामुळें जाहाला. नबाबानीं शहरीं सावकारापासून पट्टी करून घ्यावयाकरिता मुकाम केले. तात्यानीं फुलबारीवर मुकाम केला. सेनासाहेबसुभा कूच करून तात्यापाशीं आले.

नेयायही सिग्ने दिवशीं आले काल कूच सव मौजेचें तेथून जाहालें आ अही कूच जाहालें मजलदरमजल योजिल्या कार्यास जात आहेत परंतु भीमत फार छावले गाठ कर्मी पडले तें पहावें राजश्री आपाजीराम पाट णकर व मणगोजी नाईक व राजश्री नाईक निंबाळकर मध्यस्तीस श्रीमंता कडून आले तों उत्साहाचें वर्तमान आलें तेव्हां त्यांचें बोलणें निमे जाहालें बहुधा सरपग मध्यस्तीचा प्रकार, ऐसेंच दिसतें समागमेंच आ हेत परकड वर्तमान अभिकोत्तर स्याहावें ऐसें नाहीं यारखें जाहास्यावर पेशवाईचीं वर्षें होतील उपरांत फौजेत यावयाचा मजकूर श्रीमत राजश्री बापू व नाना यांचा होईल उभयतां आल्यास आपलें येणें होईल उभ यतांचें येणें न झाल्यास एकटे बापूच आले तरी त्यांसी येयील बंदोबस्त करून बोलोन घ्यावें कामकाज होणें यथास्थित ममता करून दिल्यास पुढें नीट पडेल याजकरितां सूचना लिहिली आहे राजश्री हरीपंत तात्या कृ- पाच करितात प्रस्तुत यांचे फौजेत रोजमरेयाचा गवगवा आहे सवालक्ष देतात परंतु यांचें कांहीं होत नाहीं ऐसें आहे बहुत काय लिहिणें ? लोभ किजे राजश्री नानाचें पत्र नगरचें आलें सत्वरच येतील हे आ शिर्वाद सरकारचीं पत्रें सेनासाहेबसुभा यांस नाहींत हें काय तें स्याहावें हे आशिर्वाद

---

पत्रांक ११९

पौ अधिक वा ४ शुक्रवार श्री १६९६ अधिक वैशाख शुद्ध १३

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री माधुरावजी दादा स्वामीचे सेवेसीं —

पोष्य भवानी शिवराम कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल अधिक शुद्धत्रयोदशी रविवार मुा नजीक सिलेह जाणून स्वकीय कुशल लिहित असावें विशेष आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनाभिप्राय यजमानसाहेबांच्या पत्रासह कळला श्रीमत मातुश्री गंगाबाइ यांसी सप्तमी इंदुवासरीं पुत्ररत्न जाहलें, म्हणोन लिा त्यास विद्यानगरीं एक वेळ सुवर्ण- वृष्टी जाहली ! असांवर वारवार देव करितो हाच उल्हास आहे ! ! परंतु गुरुवारीं राजश्री तात्यास सदरहु वर्तमानाचें पत्र आलें त्याजवरून श्रीमत राजश्री नानासाहेबीं व नबाबांनीं व तात्यांनीं पृथक पृथक् नौबतखाने सुरू केले तोफ, यंत्रें, सरयस्या फेस्या अंबारिया व नौबता गजस्कंधीं टाकून शर्करा वांटिल्या नृत्यादि समारम, गजर उछाह जाहाले संतोष अपरपार जाहला ! त्याचा तपशील काय लिहावा ? कुलदीपक देवानें दाविला! आमचे साहेबांस आन द अन्योन्य जाहला ! देव त्यांस आयुष्य यथेष्ट करील ! सर्वांग जोवन

आहे. आह्मांस आधार बळकट जाहाला. आपण सर्व जाणतात. राजश्री नाना अद्याप आले नाहींत. उदयिक येणार. त्याचे भेटीनंतर कळेल. येथूनही सविस्तर लेहूं. दरमजल नेमिल्या कामास जात असों. कळावें. श्रीमत राजश्री बापू व नाना यासी पत्रे लिहित होतों. परतु राजश्री नानाजोशी येणार. त्याची भेट होऊन त्या हाती या अर्थी न लिहिलीं. आमचा साष्टाग नमस्कार सागावा. सर्व प्रकारे या स्थळी स्थापित आहों. आपण आमचा समाचार वारंवार घेत जावा. पदरचे असों. बहुत काय लिहिणें ? हे विनती.

---

पत्रांक १४०

पौ अधिक वद्य ४ शुक्रवार. श्री. १६९६ अधिक वैशाख शुद्ध १३

राजश्री बाबूराव विश्वनाथ वैद्य गोसावी यासीः—

अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्नेो साब्राजी भोंसले सेनासाहेबसुभा दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावे. विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनाभिप्राय कळला. मातुश्री गंगाबाई अधिक वैशाख शुद्ध ७ सप्तमी इदुवारीं प्रसूत जाहाली. पुत्ररत्न जाहालें, ह्मणोन लिहिलें. त्यास गुरुवारीं प्रातःकाळीं हें सतोषाचें वर्तमान राजश्री हरी बल्लाळ याजकडे आलें. श्रवण होताच आनंद श्रुष्ट* भरून उरवरीत जाहाला. त्याचा तपशील काय लिहावा ? उछाव आज दोन तीन दिवस; नौबती, सरबत्ती, यत्राचा गजर, व शर्करा लष्करात वाटिल्या. नबाब निजामुद्दौले आदिकरून समारभ जाहाला. जगदात्मा कृपावत होऊन कुलदीप उदय केला. त्यास आयुष्यवृद्धी करो! सर्वांस आधार देवानें केला. जगन्निवास पुढें उत्तम उत्तमच करील! येथून दरकूच कार्योद्देशास जात असों. राजश्री नानाजी कृष्ण अद्याप पावले नाहींत. उदयीक येणार. भेटीनंतर कळेल. रा छ १२ माहे सफर. बहुत काय लिहिणें? हे विनंती.

श्री

शाहुराजपदांभोजभ्र-
मरायितचेतसः । विंबा-
त्मजस्य मुद्रैषा राघवस्य
विराजते. ॥

---

* सृष्टि व्यापून उरला.

पत्रांक १४१ श्री १६९६ अधिक वैशाख शुद्ध १३

आशिर्वाद उपरी खडू खिजमतगार यास इनाम पचवीस रुा सरकारातून दिल्हे त्यास, वाटेनें गडबड याजकरिता येथें आज्ञापार्थी दिल्हे आहेत त्यास, यास रुा २५ पचवसि सुखीं तेथें द्यावे मिती अधिक शुद्ध १३, जय नाम सवत्सरे. हे आशिर्वाद

---

पत्रांक १४२

पौ अधिक वा ४ शुक्रवार श्रीशकर. १६९६ अधिक वैशाख शुद्ध १३

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बापूरायजी स्वामींचे सेवेसीं –

पो कृष्णराव नारायण सा नमस्कार विनती उपरी येथील कुशल वा छ १२ सफर जाणून स्वकीय कुशल लिहित असावें विशेष आपण पत्र तीर्थरूपांस पाठविलें तें पावोन लिखितार्थ कळों आला श्रीमत मातुश्री गगाबाईस पुत्र जाहाला, म्हणून लिा त्यावरून सतोष जाहाला ! त्याचा विस्तार कोठवर ल्याहावा ? अगाधिवार्थे प्रजेचें पाळण करणार उभे केले ! आतां योजिलें कार्य थोडेच दिवसांत घडोन येईल ! वरकड सविस्तर राजश्री लक्ष्मणपतदादा यांनीं लिा आहे, त्यावरून कळों येईल तीर्थरूप राजश्री नानासाहेब अद्यापि येथें येऊन पावले नाहींत एक दोन रोजीं येतील टोंक्यास आलियाची वातमी आली होती सत्वरच येतील राजश्री बापूंचा व नानांचा कागद राजश्री सेनाखाहेबसुभा यांस आला नाहीं पुत्र जाहालियाचें वर्तमान राजश्री हरीपंत तात्यांनीं सागून पा होतें व आपलें पत्रही आलें त्यावरून त्यासही फारच सतोष जाहाला हालीं उभयतांचीं पत्रें यजमानास पा द्यावीं वरकड रा दादानीं लिा आहे, त्यावरून कळेल बहुत काय लिहिणें ? लोभ करीत जावा हे विनती

स्वामीचे सेवेसीं पोष्य बाळाजी गणेश कृतानेक साष्टाग नमस्कार विनंती लिा वरून सविस्तर कळों येईल आपलीं पत्रें येतात परंतु मांझें स्मरण पत्रीं होत नाहीं सेवकास उमेद तों मोठी होती परंतु पत्रींच विसर ! तेथें वरकड गोष्टी कशा घडतील ? मर्जीस आलियासीं कृपापत्रीं सांभाळ करीत जावा मुख्याख विस्तार लिहिणें लागत नाहीं बहुत काय लिहिणें ? कृपेची वृद्धी करावी हे विनंती

सेवेसीं गणेश नारायण सां नमस्कार विनती लिा परिसोन सेवकांचें विस्मरण नसावें हे विनती

---

पत्रांक १४३

पौ अधिक वद्य ४ शुक्रवार. श्री. १६९६ अधिक वैशाख शुद्ध १३

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाबूराव स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य जिवाजी माहादेव काणे कृतानेक साष्टांग नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणे. विशेष. आपणाकडील पत्रें बहुत लोकास येतात. परतु आमचें स्मरण होऊन पत्र येत नाहीं. याजवरून अपूर्व वाटले. तुमचा आमचा स्नेह तैसा नाहीं जे विस्मरण पडावें. परतु कालमहिमा आणि कारभारसबध याजमुळें विस्मरण जाहालें असेल! तरी ऐसे न करिता हरिघडी कृपापत्रीं सतोषवीत जावें. आमचें वर्तमान तागाईत छ १२ माहे सफर पावेतों सैन्यात सुखरूप असों. स्मरण करून पत्र पाठवीत जावे. येथे लक्षुमणपत आहेत, त्यांशी बहुत स्नेह आहे. सर्व प्रकार तुह्माकडील ल्याहावा. बहुत काय लिहिणें? हे विनती.

---

पत्राक १४४.

पौ अधिक वद्य ४ शुक्रवार श्री. १६९६ अधिक वैशाख शुद्ध अखेर.

यवतेश्वरी.

श्रीमत राजश्री बाबूरावजी स्वामींचे सेवेसीं.—

पो महादाजी कृष्ण गोडबोले वास्तव्य जकातवाडी कृतानेक नमस्कार विनती येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष. वेदशास्त्रसपन्न राजश्री रघुनाथबावा श्रीं होते. तेथें अन्नशातीमुळें दोन अडीच सहस्त्र ब्रह्मस्व जालें. याजमुळें तेथून निघोन वाईसही आले. तेथेंही काहीं दिवस होते. परतु ब्रह्मस्वपरिहार जाहला नाही. मग पुणियांत सतरा अठरा महिने तुळशीबागेत आहेत. त्यास, हा दिवस उछाहाचा आहे. तरी श्रीमत राजश्री नाना फडणीस यास निवेदन करून ब्रह्मस्वपरिहाराचें यश आपण घ्यावे. बावाची स्नानसध्या उपोषणादिक आचरण कोणते प्रकारचें आहे तें सर्व आपणांस विदितच आहे. तेथें विस्तार का ल्याहावा? बहुत काय लिहिणें? लोभ असो दिला पाहिजे. हे विनंती.

---

पत्रांक १४५. श्रीशकर. १६९६ ज्येष्ठ प्रारंभ.

यादी. ऐवज पोत्यापैकीं सरकारांतून घेतले. नांवें साबाजी भोंसले सेनासाहेबसुभा यांस खर्चाबा. सुा अर्बा सबैन मया व अलफ माहे जिल्हेज उर्फ फाल्गुन.

जमा रुा

५००० मिा वद्य नवमी रविवार प्रत चमसवी गुा अवधूत राव गोसावी दिा बापूराव
२५०० मिा चैत्र शुा १ रविवार पुण्यास नारो आपाजीवर.
५०० मिा चैत्र शुा १ रविवार.
२५०० मिा चैत्र शुा १५ रविवार.
५८५० मिा चैत्र शुा १५ रविवार चिठी पुण्यास नारो आपाजीवर.
१२५०० मिा चैत्र वद्य ४ गुरुवार.
२००० मिा वैशाख वद्य १ बुधवार. हस्तें चिठी पुण्यास नारो आपाजीवर.
५५०० मिा वैशाख शुद्ध १० चिठ्या २ ब्रम्हाणपुराहून आल्या
  २००० याळाजी कृष्ण आठवले यांची
  २५०० नांवें याळाजी कृष्ण याळवविके यांचेवा

५५००

खर्च रुा

५००० देणें माधवराव घोरपडे दिा सेनासाहेबसुभा यांनीं चिठी केली लष्करांतून चिरंजीव सात्यानें मिा वद्य ९ रविवार. त्याच तर्फेचे गृहस्थ रगो रुद्र घोरपडे
३५०० मिा चैत्र शुा १ रविवार.
  २५०० देणें जोगोजी यादव शुा १
  १००० देणें सदो

३५००

५०० देणें गोविंदजी नाईक मासूद मिा शुा १
१२५०० देणें निंबाजी नाईक माईणकर मिा वद्य ४ चैत्र गुा भवानीसींग पुर्व्यां दिा नाईक मार.
२००० आदम शादीरखान पनी सौदागर यांनीं नयनीत खानपनी यास देविले ते दिल्हे मिा वैशाख वद्य ११
५५०० वैशाख शुा १० चिठ्या दोन देणें याळाजी कृष्ण
  ३००० देणें बापूराव यांचे खासगींत खर्चांवा
  २५०० याळंत पिदा मार्चे सामान

५५००

पत्रांक १४६ श्री १६९६ भाद्रपद

यादी. सरकारचे जाबसाल राजश्री साबाजी भोंसले सेनासाहेबसुभा यांज-पासून करार करून घ्यावयाचे. सुा खमस सबैन मया व अलफ.

सरकारचे नजरेचा ऐवज रुा
७५०००१ ऐन सरकार
१००००० राजश्री सखाराम भगवंत
१००००० राजश्री बाळाजी जनार्दन
५०००० हरी बल्लाळ.

---

१०००००१

दहालक्ष एक रुपया करार केला असे. सालमजकुरी फौजेचा पेंच भारी. याजकरिता पेस्तर सालापासून दरसाल दोन लक्ष रुा मार्गशीर्ष शुा १ पुण्यास पोता करीत जावे. पाच वर्षांत झाडा करून द्यावा. येणेप्रों करार.

बालापूर व वासीमचे कापड दर-साल सरकारात द्यावे, ऐसा करार पेशजीं जाहला आहे. त्यापासोन रा-हिलें असेल तें सालमजकुर दसरि-यास पुण्यास पावतें करावे. पुढें दर-साल देत जावे. येणेप्रमाणें करार.

नबाब निजामअलीखांबाहादर या-जकडील माहालात तुह्माकडील घास-दाण्याचा उपद्रव फार लागतो. याचा बदोबस्त करून दिल्हा पाहिजे. त्यास तुह्मीं आपला मातबर माणूस आह्मां समागमें द्यावा. नबाबाकडील कार-भारी येतील. सरकारातून मामूल पाहून तह करून देऊं त्याप्रों ऐ-वज घ्यावा. जाजती उपद्रव देऊ नये. येणेंप्रो.

पेशजी थेऊरचे मुक्कामीं ऐवजाचा करार आहे. त्यापैकीं वसूल पडोन बाकी ऐवज राहिला असेल तो झा-डोन दसरियास पुण्यास पावता क-रावा येणेप्रों.

सरकारचे महाल गगथडी वगैरे कुल आहेत. त्यास सालमजकूरपा-सोन घासदाणा घेऊ नये, उपद्रव लाऊं नये—येणेप्रों.

पाा बालापुराकडे सरकारचा बाकी ऐवज येणें. त्याचें पत्र तुमचें सरकारात आहे. त्याप्रो ऐवज सा-लमजकूर दसरियास पुण्यांत पावता करावा येणेंप्रों.

सरकारच्या लक्षाशिवाय दुसरें लक्ष शपतपूर्वक धरूं नये. प्रयोजन लागल्यास आपणास बलाऊ पा. त्या समई फौजसुद्धां येत जावें. येणेंप्रो.

बगाल्याचें कापड दरसाल सर-कारांत येत जावे. येणेप्रों.

सदरहू आठ कलमें करार करून दिल्हीं असेत यांप्रों निभाऊन देऊ येणेंप्रों करार.

---

पत्रांक १४७ श्री (नकल) १६९६ श्रावण वद्य १०

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन धायगुडे यांसीं –

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सुा खमस सबैन मया व अलफ तुम्हांकडील सरंजामाचे माहालांतून राजश्री मुधोजी भोंसले व हैदर नाईक व गोविंदराव गायकवाड यांजकडे वगैरे फितुरी नागा शिलेदार वगैरे चाकरीस गेले असतील त्यांची गांवगन्नावर चौकशी करून, घरें व वतनें ठिकाणीं लाऊन, जप्त करणें व त्यांचे माणसांकडून त्यांस कागद लिहून ते घरीं लवकर येत तें करणें व आपली शिलेदार तुमचे तालुक्यांत राहत असतील त्यांणीं फितुरी सरदाराकडे चाकरीस जाऊं नये येविशीं त्यांस गांवचे पाटील कुळकर्णी जामीन घेणें म्हणोन तुम्हीं आपले कमावीसदार यास माहालोमाहालीं पत्रें लिहून बंदोबस्त करणें जाणिजे छ २३ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें ? लेखनसीमा

---

पत्रांक १४८ श्री (नकल) १६९६ भाद्रपद शुद्ध २

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन गोसावी यांसीं –

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सुा खमस सबैन मया व अलफ सरकारची फौजेची स्वारी जलदीनें करून निघोन भाद्रपद शुद्धांत हुजूर येऊन दाखल होणें, म्हणोन पेशजीं पत्रें सादर जालींच आहेत त्याप्रमाणें तुम्हीं सिद्धता करून निघालाच असाल त्यास, तुम्हीं कधीं निघालां तें लिहून पाठवणें आणि दरमजल माहादेवाचे सुमारें येऊन मुक्काम करून राहणें जाणिजे छ १ रजब बहुत काय लिहिणें ? लेखनसीमा

---

पत्रांक १४९ श्री १६९६ भाद्रपद वद्य ६

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नारोपंत नाना स्वामींचे सेवेसीं –

पोष्य बाळाजी जनार्दन सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता छ १९ रजब पावेतों यथास्थित असे विशेष तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें राजश्री दीपाजीराव येरुणकर यांनीं आम्हांस पुणे लोकांचें बोलणें ऐकून, मजकूर लिहिला त्याजवरून आपल्यास यविषीं

चा मजकूर काल लिहून पाठविलाच आहे. तरी, तुह्मीं येविशींचा मजकूर ध्यानात आणून वदोवस्त करावा, ह्मणोन लिहिले. त्यांनी लिहिल्यावरूनच लिहिले आहे. दुसरा प्रकार कांहींच नाही. नामजाद लोकाचा भरणा किल्यावर बराच आहे. आपण जाऊन बंदोबस्त केला. उत्तम आहे. आपल्या लिहिल्यावरून खातरजमा जाली. नाहींतर दिपाजीरायाचे लिहिल्यावरून संशयात पडलो होतो. गुता उरकला. येविशीं दीपाजीरायास लिहितो. बहुत काय लिहिणे? लोभ असा दिजे. हे विनती.

---

पत्रांक १५० श्री १६९६ भाद्रपद वद्य ८

राजश्री दिपाजीराव येरूणकर हवालदार किल्ले पुरधर यासीः—

अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य श्री बाळाजी जनार्दन आशीर्वाद विनति उपरी येथील कुशल ता छ २१ रजब पर्यंत जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष. तुह्मी जुने लोक खासगींतले कामकाज आइकत नाहींत, आणि मनास येईल तशीं भाषणें बोलतात, येविशींचा मजकूर लिहिला तो सविस्तर कळला. येविशीचा मजकूर बदोबस्त करावयाविशीं राजश्री नारोपत नाना यांस लिहिलें होतें. त्याजवरून तें किल्ले मजकुरीं येऊन तुमचा व त्याचा बदोबस्त केलाच आहे. हजिरी रोजचे रोज यथास्थित होत नाहीं. यास्तव दोहो दरवाजास दोघे कारकून ठेऊन आल्या गेल्याचा झाडा तुमचे व खानगी पेहरनगीनें होत जाईल. त्याप्रमाणे सध्याकाळीं रोजचे रोज कळत जाईल. याप्रो केल्यास लोकांचा बदोबस्त सहजच होईल. तरी, राजश्री नारोपंत नाना बंदोबस्त करून देतील, त्याप्रमाणें वर्तणुकेंत आणावें. तेथील कदीम लोकापेक्षा हुजूर नामजादी लोकाचा भरणा फार आहे. मग चिंता काय? बहुत काय लिहिणें? हे विनती.

---

पत्रांक १५१ श्री (नकल) १६९६ भाद्रपद वद्य ९

राजश्रियाविराजित राजमान्य राजेश्री नारोपत नाना स्वामींचे सेवेशी

पो बाळाजी जनार्दन सा नमस्कार विनती उपरी येथील कुशल ता छ २२ माहे रजब पावेतों यथास्थित आहे. विशेष पत्र पाठविलें तें पावलें. किल्ले पुरधर येथील बदोबस्ताचा मजकूर लिहिला तो सविस्तर कळला. रा दिपाजीराव येरूणकर याचे पत्र पाठविले ते येऊन पावले. * तुह्मीं तेथें जाऊन बदोबस्त केलात, उत्तम गोष्ट झाली. गुंता उरकला. तुमचे तर्फेनें यदा हरएक कामाबद्दल कोण प्रस्तुत आहे? महिपतराव तों अद्याप आले नाहींत. लष्करात गेलियावर सदैव पत्र पाठवित जावें. बहुत काय लिहिणे? लोभ असो द्यावा. हे विनती.

---

* येथपासून खाशाचें अक्षर.

पत्रांक १५२ श्री १६९६ भाद्रपद वद्य ९

तीर्थस्वरूप राजश्री कृष्णरावजी वडिलांचे सेवेसी —

अपत्यें बाळाजी जनार्दन सां नमस्कार विनती येथील क्षेम ता छ २२ रमजान जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे विशेष वेदशास्त्र संपन्न राजश्री सदाशिव दीक्षित ठकार आश्रित विा हुजूरात यांचे उभयता चिरंजीवांची तैनात साम्राची सालांत देवावी, म्हणोन पेशजी आपणास सर कारांतून पत्र असता, सालगुदस्त सन अर्बासबैनचे तैनातेचा ऐवज अद्यापी यांस पावला नाहीं ऐशास याचा साल गुदस्ता ऐवज राहिला असेल तो दे वावा व पुढें सालाचे सालांत यांचा ऐवज देत जावा याजकडील दरमहा च्या चिठ्या साल गुाच्या पानसुपारी वगैरे व कापड मास राहिले असतील त्या देवाव्या लोभ* करावा हे विनंति

---

पत्रांक १५३ श्री ( नक्कल ) १६९६ भाद्रपद वद्य १४

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नरसिंगराव बाबा स्वामींचे सेवेसी:—

पोष्य हरी बल्लाळ सां नमस्कार विनंति उपरी येथील कुशल तागायत छ २७ रजब जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे विशेष । आपण वराड जाऊन फिरोन पुरदरास आलां म्हणोन ऐकिलें त्यास फौजेची तयारी केलीच असेल आपणास येथें स्वकर पाठवावें म्हणोन श्रीमंत उभयतांस पत्र लिहिलें आहे तरी आपण पत्र पावताच निघोन येथें यावें इकडील वर्तमान श्रीमंतांस लिहितों, त्यावरून कळत असेल श्रीमंत तापीतीरीं आ हेत उत्तरावयाची तजवीज होत आहे सारें कर्म दगाबाजीचें आहे शुद्धी येथें अवघा दिवसांत असावें, यास्तव सारीं कामें एकीकडे ठेऊन सत्वर यावें फौज जमा जाहाली नसली तर मागाहून चिरंजीव घेऊन येतील आपण स- त्वकर यावें बहुत काय लिहिणें ! कृपालोभ असों दिजे हे विनंति

---

पत्रांक १५४ श्री १६९६ माघ

सेवेसीं नारो आपाजी सां नमस्कार विज्ञापना

मुधोजी भो यांजकडील देशाधीपतांचें पत्र आलें,त्याचा मजकूर समजला नबाबाचा दोस्त मनसबा खराच ! परंतु प्रात काळास ठीक नव्हेसा वाटतो नबाब गुतले तरी आपणच गुंतले असें आहे चहूंकडे चार मनसबे यावले हा आपली एक होतो तेव्हां खर्चाचा ताण चहूंकडील व फौजेच्या खर्चा चा पेंच व साटीची मसलत, व कर्नाटकांत फौज आपली गेली पाहिजे, व

---

* मेषून हस्ताक्षर नानाफडणिसाचें

पुरंदरीं फौज पाहिजे; पुणियांत पांचशे राऊत पाहिजेत. चहूंकडून खर्चाची मोडणी! वरातांची वगैरे पाहता फारच आहे. त्याहून आणखी वाढते. याजकरिता मर्जीस आलें तरी देवाजीपताच्या पत्राच्या नकला करून नवाबाकडेच पाठवाव्या आणि त्यासच त्याहावे. आपण पोक्त मनसवा ह्मणतात याप्रो करावयाचा ठीकच आहे. परतु थोरला मनसवा श्रीमंताकडे. सारी फौज तिकडे गुतली व आपण हिकडे गुतले, तेव्हां हैदर नाईकानें फार लबाडी केली. त्याचें पारिपत्य जालें पाहिजे व स्वदेशीं फौज असली पाहिजे. आपणाकडेही फौज आलीच पाहिजे. तूर्त मर्जीस येईल तरी आपण त्यास आणऊन, मुधोजी भोंसले यानीं चाद्यासच राहावें, रघोजी भोंसले याजवळ राहू नये. रघोजी भोंसले व दर्याबाई यानीं नागपुरीं राहून तहाप्रो वर्तावें. असे त्याचे माथा भार ठेऊन केल्यानें प्राप्त काळास ठीक पडलेंसें वाटते. पुढें कांहीं बदमामली दिसल्यास, फिरोन गोष्ट सागावयास काय आहे? करितां येईल. परंतु यासमयीं मसलत न वाढे तो प्रकार राजश्री कृष्णराव यास लेहून दिला तरी बरासा वाटतो. नबाब तिकडे गेले, त्यापक्षीं त्यास हेच गोष्टी बोलणे त्याच्या स्वरूपास योग्य. परतु पुढें मागे पाहता चहूकडून शत्रु उठले, नबाब न गुतेत तरी बरे. मला सुचला मजकूर लिहिला आहे. स्वामी विचार करून करणें तें करतीलच. सेवक लोकीं असलेली गोष्ट विनंति करावी. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. सल्लूख करणें तो नबाबाचेच हातें व्हावा. ह्मणजे गुता पडणार नाहीं. हे विज्ञापना. राजश्री कृष्णराऊ तेथून निघाले आहेत. जवळ आले असिले तरी भेटून त्याची रवानगी व्हावी. ह्मणजे नबाबास वाईट न वाटता कारस्थानीनें मनसवा न वाढे आणि भोंसला आपले पदरीं पडे, असें जाल्यास बरेंच आहे. कांहीं नजरहि होईल. पैका नसल्यास नजरेचे ऐवजीं मुलूख देईल. तूर्त बखेडा मोडेल. स्वामीस उचित वाटेल तें करण्यांत येईल. सुचला अर्थ लिा आहे. हे विज्ञापना.

---

पत्रांक १५५ श्री १६९६ माघ शुद्ध ९

सेवेसीं नारो आनंदराव सां नमस्कार विज्ञापना ता छ ८ जिल्हेज मुा नजीक बडोदें यथास्थित असे. विशेष. स्वामीचें आज्ञापत्र छ १४ जिल्कादचे आलें. त्या पत्रीं आज्ञा कीं " तीर्थस्वरूप तिकडे आले. त्याचे पाठीवर राजश्री हरी बल्लाळ व शिंदे होळकर मातबर फौजेनशीं आले आहेत. त्यास तुह्मी हरीपतास लेहून पाठऊन तिकडून फौज आणून भडोच व सुरतेची वदी करणें. टोपीकरास ताण जरूर देणें. सरकारचा अमल च्यार दिवस न चालल्यास कामास येईल, पुढें सर्व समजोन घेतलें जाईल " ह्मणोन आज्ञा जाहाली. त्यास, श्रीमत राजश्री दादासाहेब बडोद्यास आले. त्यांचे पाठीवर हरिपत येतांच श्रीमत महीपार गेले. आह्मीं रेवा उतरोन फत्तेसिंगराव

गायकवाडसुद्धां हरीपंतांस भेटलों श्रीमंतांचा वराचा मजकूर करारांत आलिया वर सुरतेस जाऊन आम्हींगा बंदोबस्त, करितों सूर्त सुरतेचे बदोबस्तास राजश्री माळाजी खंडेराव पुरंदरे व मळबसराव घोंडदेव व शकराजी लक्ष्मण पुरदरे पाठविले आहेत राजश्री बहिरो रघुनाथ व गणेश हरी निा सरसुभा तापीतीरीं सुरतेनजीक आहेत त्यास बंदीविशीं पत्रें पाठविलीं आहेत त्यां च्यानें बदोबस्त होईल तितका करितील श्रीमत दादासाहेबाकडील आबसा लाचा फडशा होय तोंपर्यंत सिकंदे आवां येत नाहीं व राजश्री हरीपंतहि नि रोप देत नाहींत लवकरच फडशांत येईल सख्खावर घातलें असे मागा हून सविस्तर वर्तमान सेवेसी लेहून पाठऊं सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक १५६ श्री १६९६ माघ—फाल्गुन

सेवेसी नारो आपाजी सां नमस्कार विज्ञापना विसाजी कृष्ण यांस सूर्त महिनावर आणूं नये साले आहेत त्याप्रों असों द्यावे परंतु, त्यास लिहून पत्र असावें कीं, तुह्मी परशीकाजवळ जाऊन धारे फौजेनिशीं राहावें, क ल्ष्या ( कल्याण ) कडून परधिकापावेतों पातळ ठतळ राऊत वलाव्यास पाठवीत जाणें, कल्याणास् एकंदर न राहणें या प्रों परिच्छिन्न त्याहावें हें त्यांच्यानें होत नसल्यास मग दुसरे पत्रीं काय आज्ञा करणें ते करावी कर्नाटकांत पाठविणें जरूर असिल्यास सर्वेहि करावें विसाजी केशव व सर आपाजी हरी व धिवाजी विठल यांस लिहुण पत्रें पाठवावीं चौदावें माणुस आसवें साष्टीच्या बेटांत येथवंतगडसुधां इग्रेजांचें आहे तुह्मांजवळहि मरणा बराच आहे याउपरी हर तरतूद करून इंग्रेजांस पेंच पडे, बेटांत लोक उ तरून ठरेत, अशी तरतूद होत नाहीं, हें ठीक नव्हे हेटघारे लोकांस इंग्रेज काय करितो ? आंतील आंत खायास व पाणी पायच्या माणसांस उपद्र आहे असें असोन कष्ट्या माणसांवाचून होतच नाहीं ह्मणऊन लिहितां ! तरी गनिमी तऱ्हेनेंहि आत राहीन हटल्यास त्यास सहजच पडेल ते तरतूद क रून लेहून पाठवणें ह्मणऊन पत्रें लेहून पाठवावीं

---

पत्रांक १५७ श्री १६९६ फाल्गुन शुद्ध १२

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी—विनंति सेवक बाजी गंगा धर मुा बेलापुर चरणावर मस्तक ठेऊन सां नमस्कार विज्ञापना सागाईत छ १० माहे मोहरम पावेतों स्वामीचे कृपावलोकनें करून सेवकार्थ व सातुके मजकुरचें वर्तमान यथास्थित असे विशेष काल रविवारीं संध्याकाळीं राजश्री रणछोड शेणवी वकील सरकाराचे मुंबईस होते ते येथें आले कारण

श्रीमंत दादासाहेबीं सुरतेहून सनद मुंबईस पाठविली कीं, लक्षुमण गोपाळ यास वकिली सांगितली आहे, त्याजपासोन कामकाज घ्यावें आणि रणछोड शेणवी यास सुरतेस रवाना करणें. हें वर्तमान मारनिल्हेचे इष्टमेस्त्र मोस्टीन यांणीं सांगितलें. त्याजवरोन हे तेथून चंद्रगमनी होऊन होडीस पांच रुा देऊ करोन आले. होडीवाले यानें साष्टीचे खाडींत अलिकडे मौजे वसीता मजकूर याचे नस्तावर चिखलांत उतरोन होडी निघोन गेली. तेथें चौकी सरकारची आहे. त्यांणीं बराबर शिपाई देऊन येथें रवाना केलें. ते प्रहर रात्रीस आवशीचे पावले. त्यांणीं तोंडी मजकूर सांगितला कीं, श्रीमंत दादासाहेब सुरतेस आहेत. इंग्रजानें जागा राहावयास माहामुदी बागांत दिल्हा आहे. श्रीमंत अमृतरावजी बराबर आहेत. नाटकशाळा आठजणी व पचवीस च्याळीस पावेतों खिजमतगार वगैरे आहेत. इंग्रजानें आपले लोक जवळ ठेविले आहेत. सर्व साहित्य त्याजकडूनच होत आहे. मुंबईहून राजश्री सदाशीवपंत सौनी व नारोपंत गेले ते श्रीमंताजवळ आहेत. कारभार प्रस्तुत नारोपंत करितात. सुरतेचे जफ्तीस सरकारचे राऊत हजार बाराशें होते. त्यास दादासाहेबीं दोन वेळ सनदा सादर केले व निदानीं सांगोन पाठविलें कीं, उठोन जाणें, नाहींतर खासा स्वारी होईल! त्याजवरोन बंदीचे लोक पांच कोस माघारे सरले. इंग्रजांची उमेद तीन हजार गाडदी वगैरे लढाईचा सरंजाम घेऊन, रा गोविंदराव गायकवाड व खंडेराव गो याजकडोन पो बडोदें आधीं सर करोन, गोविंदरायास द्यावें, नंतर अमदाबाज घ्यावी. भडोजेस गाइकवाडाची तक्षीम निमें आहे ती इंग्रेजास बक्षीस द्यावी आणि मोबदला गाइकवाडास बडोदे पो ऐवज सरकार तर्फेचा द्यावा. राजश्री हरीपंत तात्याचे फौजेबराबर लढाई घेऊन श्रीमंतास देशीं पुण्यास आणावें. इतके जालियावर इंग्रजास सुरतेची चौथाई बक्षीस द्यावी. सुरत-अठाविशी, वसई, बेलापूर देखील द्यावें. याजप्रो करार मदार उभयपक्षीं होऊन शिक्के देखील झाले. इंग्रजानें बंदर किनाऱ्याचे तालुकदारास व धुळपास दादासाहेबाच्या सनदा आणावयाविशीं गुजरत फतेमारी गेली आहे. सनदा आल्या म्हणजे ज्याच्या नांवच्या येतील तिकडे पाठवाव्या. कोण सनद मानितो, कोण मानीत नाहीं, हे पहावें. प्रस्तुत, दादासाहेब म्हणजे मोठा किमया इंग्रजाचे हातीं सांपडला आहे. दुसरें दैवत नाहीं. ऐसा प्रकार मुंबईस जाला आहे. सुरतेहून फतेमारी मुंबईस दोहोंरोजां येत्ये. दादासाहेबांचे पत्र मुबईस जनरलास आलें कीं पुणेंकर सावकार मुछदी यांचा ऐवज मुबईस आहे तो जप्त करणें, जाऊ न देणें. याप्रो पत्र आलें आहे! इंग्रजास प्रस्तुत स्वर्ग ठेंगणा जाला आहे. वरकड मुबईत आज पांचशें माणूस व साष्टी टापूत आठ नवशें, उरणास दिडशें पर्यंत आहे. आणि हिकडून कोणी त्याजवर जात नाहीं. याजमुळें फार टिका करितात. असा प्रसंग! मुबईस लोकाची भरती नाहीं, ऐसें घडलें नाहीं.

तिथोरी जामदारखान्यामध्यें आज पचवीस हजार रुा पाहिजेत तरी नाहींत धुळपाचें अरमाराची मोठी सलाबत इंग्रेजावर आहे, परतु तोहि अरमार मुंबा येत नाहीं दबोन राहिला आहे याजमुळें इंग्रज फारच हायमरित जाला आहे बंगाली व चिनई व विलायती व बसराई मिळोन दाहा अकरा तरांडीं वाळविरीस नागखाडेयास आहेत घर माल बहुत आहे इजावें यासाठीं खोटी आहे मुंबईस गुराबा व रेवा दोन तरांडीं मुंबईपैकीं आहेत परंतु याचा मरंवसा धरीत नाहीं धुळपाची सलाबत मोठी गालीब आहे। तिसरें तरांडें विलायती येणार आहे तें आलेंयाजवर मग यावे, ऐसा करार जाला आहे प्रस्तुत धुळप तिकडे नाहीं त्या अन्वयें तिकडेच त्या तरांडेयाजवर स स्ती करून गळीं पडला तर मोठें काम होईल इंग्रजांच तितकी दहशत आहे याजकरितां सरकारांतोन धुळपाकडे कोणी शाहाणा माणूस व पत्रें जावोन, त्यास बक्षिस देऊं करोन सुवर्णदुर्ग वगैरे ताळुकेयाचें आरमार एकत्र करून, त्या तरांडेयाजवर यावें अथवा मुंबईस यावें, लूट माफ करावी, या हर हुशेन पत्रा करावें याप्रों आलेयास इंग्रजांचा गर्व परिहार होईल इंग्रेज ह्मणतो कीं, सर्वांचा ऐवज मुंबईस आहे, यामुळें आह्मावर सक्ती कोणी करणार नाहींत याप्रों बोलतात, ह्मणोन रणछोड शेणवी सांगतात याजवरोन विनंति लिा आहे मारनिल्हेचें मानस स्वामीचे भेटीस यावयाचें बहुत आहे आज्ञा होईल त्याप्रों वर्तणूक करितील किसेक मजकूर स्व मुखें विनंति करणार आहेत सरकार उपयोगीं आहेत आज्ञेप्रमाणें वर्ततील भीमराव मुंबईस आणावें हें मानस इंग्रजांचें नाहीं दुसरा मजकूरः सावकारी वर्तमान रा गोविंदराव गो व खंडेराव गो दोन्ही राजश्री हरीपंत तात्यांकडे रुजू जाले हे असल्यास इंग्रजाच्यानें काहीं होत नाहीं फजित पडतो साष्टी ताळुका घेतला पुढेंही मनसबा किसेक करितो हा विचार भेज मो स्टीन याचे व दुसरे दोन कोशलदार यांचे विचारास येत नाहीं, परंतु सर कार काम। आणि साष्टीचें यश आलें याजमुळें उपाय नाहीं, ऐसें ह्मणतात सदरहु विनंति मानिल्हेचे जबानीवरून सेवेसीं लिा आहे रणछोड शेणवी यास हुजूर आणावयाचें असल्यास, राजश्री विसाजी कृष्ण यांस आज्ञापत्र अ सावें ह्मणजे घोडे व वहूं देऊन रवाना करितील सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक १५८ श्री १६९६ फाल्गुन शुद्ध ११

सेवेशी जनार्दन आपाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना पिंगोजी व भवानी वोतुरकर शिंपी वस्ती पेठ पुरंधर हे पुरमराव अटकेस होते, त्यांस पुण्यास पाठविले आहेत, तरी या दोघांचा शिरच्छेद करून लिहून पाठवणें ह्मणोन स्वामींचे पत्रीं आज्ञा त्यास, आज्ञेप्रमाणें पिंगोजी व भवानी शिंपी

यांचा शिरच्छेद केला. रा छ ११ मोहरम सुा खमस सबैन मया व अलफ. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्रांक १५९ श्री. १६९६ फाल्गुन वद्य १०

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री जनार्दनपत दादा स्वामीचे सेवेसी:—

पोष्य हरी बल्लाळ साष्टांग नमस्कार विनती उपरी येथील कुशल ताा छ २३ मोहरम मुा खेड जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. नारोपत नानास कैलासवास जालियाचे वर्तमान ऐकून श्रम जाहले, ते ईश्वर जाणे. एकाएकीच गोष्ट अशी घडली! ईश्वरीसत्तेस इलाज नाहीं! आम्हास तर वडील होते. व राज्यात माणूस एक! अशा व्यक्ती दृष्टीस पडावयाच्या नाहींत. ईश्वरीसत्तेस इलाज नाहीं. हीच गोष्ट खरी. त्यांचे मागे आपण आहेत. लहान मोठ्यांचा परामर्ष करावा. खेद करू नये. होणार गोष्ट ती चुकत नाहीं. आह्मी नानाप्रों आपल्यास मानितों. त्याचा लोभ आमचे ठाई कसा होता, तो तुम्हास ठाऊक आहे. तदन्वये करून आपण लोभ करून समाचार घेत जावा. इकडिल वर्तमान तरः श्रीमत इग्रजांकडील सरजाम घेऊन खबाइतास आले आहेत. उभयता गायकवाड आह्मास येऊन भेटणार. तोहि प्रकार अद्यापि घडला नाहीं! दोन चार रोजात कोणता अर्थ तो निवडेल. लिहून पाठऊ. तिकडील वृत्त लिहित जावें. बहुत काय लिहिणें! लोभ असो दीजे. हे विनंती.

राजश्री सदाशीवपंतदादा स्वामीस सां नमस्कार विनती. उपरी. फार दिवस पत्र येत नाहीं. ही गोष्ट तुह्मापासून दूर असावी. नानाचे वर्तमान ऐकिल्यापासून चैन पडत नाहीं. श्रीसत्तेस इलाज काय? सदैव पत्रीं समाचार येत जावा. लोभ कीजे हे विनती.

राजश्री तात्यांस सा नमस्कार -विनती. उपरी; लिा परिसोन लोभ कीजे हे विनती.

---

पत्रांक १६०. श्री. १६९७ चैत्र वद्य ६

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री आबा स्वामीचे सेवेसीं:—

पो बाळाजी जनार्दन सां नमस्कार विंनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असिलें पाहिजे. विशेष. तुह्मीं छ २७ मोहोरमचीं पत्रे पाठविलीं तीं प्रविष्ट जाहालीं:—

आरमाराकडे गल्ला नेमिला त्या पौ कांहीं पोंचव नाहीं, मामलेदार तपशील सांगतात, ह्मणोन लिहिलें तें कळलें ऐशास, तुमचे लिहिल्या पूर्वीचे सरकारचे खिजमतगार व पत्रें भावाचे मजकुरास पाठविले असेत या उपरी नेमणुकेप्रों गल्ला पोहों चेल कलम १

देवगड ताळुक्यापौ सरदार चौतीस आहेत, त्यापौ निमे ताळुके मजकुरीं ठेवावे, निमे दुसरे ताळुकि यास नेमावे, ह्मणोन लिहिलें तें कळलें

उत्तम आहे करावें कलम १

गंगाधर गोविंद यार्णी गलबत मारळाचें धरून आणिलें ह्मणून लिहिलें तें कळलें कलम १

इंग्रजाचि कागद पेटीस घालून पाठविले ते पोहचले व चित्रें पावलीं कलम १

गोंवेकर फिरंगीयांचें गलबत आणिलें आहे, येविशीं त्याचें पत्र आलें आहे, त्यास तहाचा ठराव कसा जाला आहे, ह्मणोन लिहिलें तें कळलें ऐशियास, तहनाम्याची नकलच अगोदर तुह्मांकडे पाठविली आहे त्यावरून कळेल तेथें लिहिलें असेल त्याप्रों पाहून लेहून पाठवावें कलम १

सर्व ताळुकदारांस व आरमारास तहनाम्याप्रों सांगून मिषानी विश्राम भेटीस येणार ह्मणोन लिहिलें तें कळलें उत्तम आहे सरळपणें येत असल्यास भेट घ्यावी कलम १

बापूराय साळेकर याचा मजकूर तुह्मीं लिहिला तो कळला ऐशियास मारनिले यार्णी किल्ले विजयदुर्ग येथें गंगाधर गोविंद यांजवळ चाकरी एकटेयांनीं करून वेतन नेमणुके प्रों रत्नागिरीं लाऊन घ्यावें अरमाराकडे त्याची नेमणुक नाहीं कलम १

एकूण कलमें सात लिहिल्याप्रों करावें राजश्री हरबाजीराय धुळप आरमारसुद्धां स्वारीस गेले होते, त्यांनी धरून आरमारसुद्धां आले, ह्मणोन लिहिलें तें कळलें ऐशियास, इंगीवरील माल फरोख्त करून आरमाराकडील तोडमोडीस लाऊन, व अडसेरीचे येगमीस गल्ला घेऊन अडसेरीस देऊन, आरमार सुवर्णदुर्गास पाठवावें रा छ २० सफर बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती पो छ २८ सफर.

---

पत्रांक १६१ श्री १६९७ वैशाख शुद ६

राजश्री सखारामपंत बापू गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य सेना पंचेसिंग गायकवाड दंडवत विनंती उपरी यथील कुशल जाणोन स्वकीय कुशल सदैव पत्रीं लेखन करून संतोषवीत असावें विशेष आपणाकडून पत्रें आह्मांस व शाहिस्यायिर्णी पत्रें अमदाबादकर भट्टस व पिमय्यास येत गेलीं तीं त्यांजकडे पावती करीत गेलों शाहिस्याचा प्रकार आजपर्यंत प्रथम दिवस। त्यापैकी आसी कारकिर्दी

ममतेनें पित्रव्यानें मुख्य पुत्र चिरंजीव राजश्री मल्हारराव गायकवाड आह्मां-कडे आणिले. तेव्हां अधिक शुद्ध द्वितीया-तृतीयाचीं युद्धें दोन जाहलीं. त्याज अलिकडे युद्धप्रसंग आजपर्यंत जाला नाहीं. आह्मी वडोदे, खेड, पाटण प्रांताचीं ठाणीं कायम करून, आपले लेख धैर्याविशीं येतात, त्याजवर दिवस काढितों. पुढें दिवस निघावयाचे संकट. हे पूर्वी व हालींचे वर्तमान राजश्री दादासाहेबाकडील वगैरे, सविस्तर राजश्री बाळाजी नाईक भिडे याचे पत्रीं लिहिलें आहे, त्याजवरोन कळों येईल. साराश, मुरव्वीपणाचा सर्वस्वी भरवसा आपला आहे. त्याजवर असू. विशेष ल्याहावेसें नाहीं. आपणाकडील साकल्यार्थ लिहून संतोषवृत्ती करावी. रा छ ४ माहे सवाल. बहुत काय लिहिणे? लोभ असों दिजे. हे विनंती-मोर्तबसूद.




---

पत्रांक १६२ श्री. १६९७ जेष्ठ वद्य १

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री बाबूराव दादाजी गोसावी यासी:

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार. सुा सीत सबैन मया व अलफ. चिकोडीकर देसाई याचा ठराव हुजूर रा आपाजी श्यामजी याचे विद्यमानें होईल. ठाणीं वगैरे राजश्री पांडुरंगराव गोविंद याचे स्वाधीन लवकर करण्याविषयीं तुह्मांस पत्र पेशर्जी गेलें आहे. त्याप्रमाणें हालीं ठाणीं वगैरे मशारनिल्हेचे स्वाधीन हुजरून खिजमतगार पाठविले आहेत याचे गुजारतीनें करून हुजूर लेहून सत्वर पाठविणे. दिरंग लाविल्यास परिच्छिन्न कार्यास येणार नाहीं. ठाण्यांत गोळी वाजविल्यास फौजेचा वगैरे पैका तुह्मापासून सरकारांत भरून घेतला जाईल. हे स्पष्ट समजोन, ठाणीं वगैरे स्वाधीन करणें. जाणिजे. छ २२ रावल. आज्ञाप्रमाण. लेखनसीमा. पौ छ १५ राखर जेष्ठमास, सुा सीतसबैन.

---

पत्रांक १६३ श्री. १६९७ श्रावण वद्य १०

पौ छ २८ जाखर श्रांवण वद्य आमावास्या मंदवार सीत सबैन.

जीघांद बुलद मकान पंडित अजम माधव राउफ्यू दवामश फफतहू —
भामुभाज महब्बत व कामरानी असावाय मुशिरव्व व शादमानी इमवारा घररुए रोजगार मुवाफिक मेहरबान सरफ्फ्इत्फ नली एहसान मन्या मैद्दी फात विवूद इत्ताफत कुशादा व अमदाबाद अजिदील एखलास हानराव्येल उद्दीमि हार्नेवी इस्कोयर प्रमिर्देस गोवर्नदोर अनराल असीरे मुंबई यादज धरे शौक कीमा फीक बरामुतसवीर नेस्त मधाहुदराय शफ्कत पैराय आर्की आं शौकत पन्हाहि मफाविजा ईबलाग फर्मायिला तो अजदस्त आ शौकत पन्हांचे नोकर मिकाजीपत रसीद होऊन लिहिला मजमून आया जाहला आ हिशमत पन्हाहि तस्तीर केले की, अमारत पन्हा अजम सखाराम भगवत याचे नावें रसीद जाहले त्याची नकल आं शौकत पन्हाहि इंग्रजानेयाकडेस पाठविली आहे, आणि आं शौकत पन्हाहि आपले तमाम सरदारासही हुकूम कलमी सादर केली आहे की, इमबाचे अहशामाशीं अग अगर ईमा दरपेश न आणावी तर बेहत्तर असे आ हिशमत पन्हाचें नोकर मारानिले मिकाजी पत यांशीं आहिशामत पन्हांचें नावें इग्रजेनेयास जाहीर केलें की सदरहू आं हिशामत पन्हांची हुकूम आपले सरदारांस सादर जाली आहे ती पंडित अजम रघुनाथ राऊ पेशवे यासीं व त्यांस में समाम मुस्तफिक आहे त्याज शिही तालुक ठेविते की, मधारानिले आ हिशामत पन्हाचें सरदाराहि त्याचे फौजेसीं व त्याचे तमामदरी मुकदमीयात मुवाफिक आहेत यासशींहि जगदर पेश आणू नये व तसदी देऊ नये तर हे यात वाजीय आहे सबब की, मोजुनइलेहि पंडित अजम रघुनाथराऊ पेशवे इग्रजनयाचे इफाजतेंत आहेत अजहाल जैसें आहे तैसे कुलयबा राहील, ऐसाच आं शौकत पन्हाचा इरादा व मतलब आहे, हाणोन अजरुए यकीन आ हिशामत पन्हांचे नोकर मार निले मिकाजीपत यांशीं इग्रजेनेयास जाहीर केलें तर इंग्रजेनेयाचें ममनून खातीरीहि तैसेंच असे यिनायरा इग्रजेनेयाकडील अहशामाचें सरदार मार लाजीम व वाजीय तैसीं हुकूम इग्रजेनेयीं सादर केली आहे व दरख्वास्त करितों की, आं हिशामत पन्हांचे हुकुमाची मुतावियत अमल्लांत येई एही आं शौकत पन्हांही खबरदारी फर्मावावी वेव्हां इग्रजनयांचा हुकूमहि जेथ पावेतों करारदाद अमलात येइतवलग यजने एहसान मुतावियतवीत येइल जिआदा यज्ञुम शौकचे ! मुतदाधाशयम्द आयाम यकामयाद रा छ २२ शोहर अमादिलांनीं हे किचायती

---

पत्रांक १६४ श्री ( नक्कल ) १६९८ अश्विन वद्य ५

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन गोसावी यांसीः—

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार. सुा सबा सबैन मया व अल्फ

कोकणात गावखेडीं भरलीं आहेत. त्यास, तुमचे लष्करीचे लोक उपद्रव लावतील. लुटतील, जाळतील व भातें आणून चारितील, तेव्हा बाकी राहणार नाहीं. सरकारची मोठी नुकसानी होईल. कोकणातील किल्लेकोटाचा खर्च भारी. त्याचे बेगमीचा ऐवज कोकणाचाच. कोकण खराब जाल्याने ऐवज हुजुरून पाठवावा असें होईल. त्यास, ओढीमुळें हुजुरून बेगमी होण्याचा अर्थ समजतच आहे. तेव्हा, किल्याकोटाच्या बेगमीवाचून गळाटा होईल. याजकरिता कोकणांत काडीमात्र उपद्रव लागो न देता, आबाद राखिलें पाहिजे. ऐशियास, तुम्हीं आपले फौजेस वरचेवरी निक्षून ताकीद करून, रयतेस व रयतेच्या घरादारास, शेतांभातांस किमपी तोषीस लागो न देणें. जे हरामखोर तोतियास मिळाले असतील, त्याचें पारपत्य केल्यास, पैका घेतल्यास, चिंता नाहीं. तसें आढळल्यास करणें. बरकड रयत गरीब व कोकण ह्मणजे केवळ सरकारचा खजाना. त्यास उपसर्ग लागलियानें सरकारनुकसान फार आहे. दुसरें. फौज लूट करील, तत्रापि रोजमुरा सोडणार नाहीं. याजकरिता काडीमात्र उपद्रव न लागे असा पक्का बंदोबस्त करणें. रखवाली करवीत जाणें. ऐसें करिता जो ताकीदीस न ऐके, त्याचे पारिपत्य करावयाची मुरवत न धरणें. जाणिजे. छ १७ रमजान बहुत काय लिहिणे ? लेखनसीमा.

---

पत्रांक १६५ श्री. १६९७ कार्तिक शुद्ध १२ नंतर

........................... तीन पत्रें आपलीं वरचेवर आलीं. तेथे राजश्री......सेनासाहेबसुभा यानीं जलदी करून आपले फौजेत यावें. श्रीमंत नेमल्या स्थळास येतात. उभयता सरदार समागमें आहेत. चिंता नाहीं. परंतु श्रीमंताची बुध शास्वत नाहीं. याजकरिता जलदीनें यावें. व राजश्री हरीपंततात्यांचींही पत्रें एका रोजाचे अंतरानें याजप्रकारें येत गेलीं. तेव्हा राजश्री सेनासाहेबसुभा याजकडे दररोज जावें. कारभारी यासीं बोलावें. कारभारी याणीं उत्तर करावें कीं, ऐवज तयार जाहला, करितो, निघतों. ते प्रमाण वाटावें. जेव्हा राजश्री सेनाधुरंधर व महमद इसफ, सात हजार फौज तीन हजार गारदी व तोफा चार घेऊन, अलजपुरींहून निघाले ते नागपुरावर चाल धरून वीस कोस अलीकडे आले. नागपूर पन्नास कोस राहिले त्यानीं जुने फौजेची समजावीस काढून नवी फौज आणीक मेळवून आले. तेव्हा येथे गलबल फारच जाहली. मसलत ठहरली कीं, राजश्री सेनासाहेबसुभा यानीं डेरादाखल व्हावें. पुढे अस्त. मुहूर्तही नाहीं. याकरिता, छ १० रमजानीं डेरेदाखल जाहले. तो डेरे मात्र उभे करून सारवान, फरास, खास चौकीचे गारदी, खिजमतगार यापैकीं दोनसे मनुष्य व पचवीस जासूद आणि खासा त्या माणसात रोजमुरा नाहीं. मारेकरी याचे बजिन्नस कागदच पेशजीं सांपडले,

घरचा फद ! कोणाचा प्रकार कैसा, हे कसें समजावें गावातच मारेकरी अ सल्यास कैसें बोलावें ! खासा, तर, हवेलींतून बाहेर आले आणि दशा, तर, या प्रकारची ! पांच राऊत डेऱ्याजवळ कोणाचे उतरत नाहीं तेव्हां मास ऐसा जाहला कीं, हा फद सर्वांचा एक आहला काम नासेल तेव्हा कारमारी रामभी भवानी काळो व भवानी शिवराम यांजला हें काय, ऐसें पुशिलें त्यानीं सांगितलें कीं, दों वर्षांचा गळाठा, लोकांस पोटास नाहीं, ना गपुरांत वाणी उत्थापत देतात त्यावर लोक आहेत, बाहेर निघाल्यास पैका घेतल्यासेरीज एक समागमें येणार नाहीं, पैका तर दिसेना तेव्हा सरदारी बुडाली हें परिछिन्न वाटलें कारमारी यानीं तों साफ सांगितलें की, ऐसत्र नाहीं, सावकार बुडाले, रयत बुडाली यजमानाजवळ खासगत दौलतीपैकीं वीस लाख रुपयांचें सोनें व रुपें होतें तें कुल कारमारी यांनीं, अलजपुरावर गुदस्तां रामराजेसाचें वर्तमान आलें त्या गर्दींत लोकानीं गवगवा केला, त्या सर्वांत कुल ऐवज भरतीस घातला तेव्हां ओला होऊन घाट चढले पुढें रामभी मामाच्या यांच्या भेटी जाहल्या ते समई मुलखांतहि पैसा घेतला व सरकारांतूनहि खर्चास मिळालें त्यामुळें ते दिवस गेले हाली तों खासापाशीं एक रुपाया नाहीं पुढें उपाय काय ! सेनाधुरधर तों दरमजल अमजेरास तीन कोसाचा तफावत राहिला येथें, तर, तरतूद नाहीं शहरांत गर्दी आहली उमय पक्षेनाश आहला कारमारीयाचे व यजमानाचे आंत आंत पाहिलें तर परस्पर विक्षेप यांचें कारण मनास आणिता, दौलतीचा नाश जाहला आज पावेतों सवा करोड रुपये रोकड व मुलुख बारा हजार फौजेस दों वर्षांत खर्च जाहला व सात लक्षाचें कापड चाळीस हत्ती, दानसें घोडे खासे इतका व सुद्ध लोकांस पावोन, पांच पांचसें माणसांचा एकच गोंधळ ! धरनी ! उपा स ! कारमारी यांनीं एका दिवसा आठ जेवणें धन्यास दोन प्रहर रात्रीस अन्न मिळावें खासे याची ही दशा ! कारखाने थोडीं उपाशीं ! दाम नाहीं हत्ती घारा पंधरा से दोन दोन मुठदी यानीं रतीब घावा उट दाण्याविना तीन चारसें मेले ऐसें वर्तमान मुख्यांनीं सांगितलें तें माईकवलें नाहीं तेव्हां वि नंती केली कीं, हा इतला कैसा दिसा नाहीं ! याचें उत्तर केलें कीं, पठाण दोन हजार व मराठे ऐसे आपले मलईत मेळऊन त्या लोकानीं रामराम येऊं नये, सलाम करू नये, समागमें चालू नये कांहीं विपादानें बोलताव ते कुल मि ळोन धरणें बैसावें उपास पाडावे तेव्हां सुशामत करावी म्हणतील तें आ इकावें, तेव्हां उठावें करारमदार करून घ्यावें लोकाच्या योस्या पान पांच हजार जातींचे मनमानेशा आपल्या यादी खासगत करून घाव्या जिराफा हरामखोर सरदार फदी तितका आपले आंगीं लाऊन येऊन ग्यायद अरयेस असावा पैका त्यास द्यावा तेव्हां उपाय काय ! देणें घणें त्याचे स्वाधीन कांहीं बोलावे, तर दिवस नाहींत कैसेंहि करून परंतु, एक वेळ मसलत

सिद्धीस जाऊ, या अर्थी तेहि सोसिले. परतु, नागपुरी अडीच महिने जाहले मामलत अगर कोणताही इतल्ला खावदास नाहीं. ऐवज कोठील करावा ? आणि कोणास द्यावा ? हा इतल्ला नाही. हिशेब मात्र एक मास जाला ह्म- णजे दतरदारास यादी दाखऊन जमाखर्च ल्याहावा. हे चाल आज दोन वर्षे आहे. मामा व तात्याचे विद्यमाने पाच लाख रुपये व्रराणपूरपर्यंत रोजमरा पावला. त्यापैकी नाना जोशी याचें विद्यमाने पधरा हजार रुपये मात्र ठाऊक ! वरकड दाखला देण्याचा नाहीं. सवा लक्ष रुपये दरमहा येत असता, दाणा घोड्यास नाहीं. उटे मेलीं ! चार रोज तीन रोज मुदवक नाहीं ! नाना जोशी याचे घरी जेवणे. अगर तात्याकडे गेलो, तर तेथे जेवणे. चौ रोजा आड मुदवक व्हावा. हें वर्तमान आईकोन मुस्ताक जाहलों. सवा करोड रुपये बा- रा हजार फौजेस दोन वरसात वसूल असता, हा गजब ! तेव्हा यजमानाचें सर्व आइकून कारभारी यास पुसिले. त्यानीं विजातीय काहीं सागितलें. ते पत्रीं काय ल्याहावें ? यजमानाच्या बोलण्यास दाखला पडत चालला. तेव्हा खातरजमा जाहली. पुढे सेनाधुरधर आमजेरावर आले. लोक डेऱ्याजवळ एक नाही ! खाविद एकला ! याची तजवीज कारभारी उभयतास पुसिली. तरी उभयता एकात एक नाहींत. रा भवानी काळो याजकडे फौजेची सम- जाविसी लोकांची हजिरी हिशेब पाच सात वर्षांचा आला. ते लोक मातबर. बोल्या करून भवानी शिवराम यानीं आपणाकडे आले त्यास पैका द्यावा. भवानी काळो,याजकडे यादव, पाढरे वगैरे यास पैका न द्यावा. तेव्हा कूल सरदाराची झोड. श्रावणमासाच्या दक्षणेसारखी दोन रुपये अधिक तिकडे ब्राह्मणानीं जावे! हे चाल दोन वरसें चालत आली. रा भवानी काळो यास तर्गीर करावे, आपल्या कामात यानीं न बोलावे, हे केलें. घरी बसविले. तेव्हा राजश्री सेनासाहेबसुभा यास बोलणे प्राप्त झाले. कोणचि राहिले नाहीं. पुढे सदेह. न जाणो काय होतें ! एक यादव मात्र याचे पक्षीं राहिले. तेव्हा राजश्री सेनासाहेबसुभा यानीं समथ, एका बाणदाराचे ज- मातदारास कामावर न घालता बिडी घातली इतका समथ, लाऊन आपल्या जिवावर आलें. पोटकरारी करावी. मरावे ? पागोटें टाकिले. मोठा त्रास केला. हें आयकोन धावोन गेलों. समाधान केले तो भवानी शिवराम याचे गार्दी व लोक मिळाले. हें वर्तमान आले तेव्हा मारनिले यास घरास लाऊन दिल्हे. भवानी शिवराम याचे बिनसलें. तेव्हा आह्मी व राजश्री नानाजोशी ऐसे राजश्री दिवाकरपत दादा याच्या घरास गेलों. त्यासीं भाषण केलें.त्यानीं मागाहून कथा सागितली कीं, मी नागपुरीं असता मजला चारसें लोक पाठ- वून गेले. मामाचा व याचा युद्धाचा समय ते वेळेस पोहोचलों. मामाची व याची भेट केली. पुढें मामानीं काहीं खुणेच्या गोष्टी सागितल्या. त्या आधा- रावर मामाजवळ जाऊन राहिलों. सेनासाहेबसुभा रघोजी बावास जाहला

असतां, फटेश्वरीं गंगातिरीं मामानीं गंगेचें उदक गंगेंत बसोन राजश्री साबाजी बावाच्या हातीं घातलें कीं, सेनासाहेबसुभा तुम्हांस दिल्हा, ऐसें इमान देऊन मग मसलतेच्या रीतीनें भवानी शिवराम व शिवाजीपंत फडणीस व दिवाकर पंत यांस सांगितलें कीं, दर्याबाई मुलास घेऊन जात होती ते मोठ्या मेहनतें राा त्रिंबकरावपंत वर्तक व पत्रें पाठऊन आणिली तिणें यादी पाठविली होती ते करार करून दिल्ही तेव्हां ते आली नाहीं तर इदुरावर गेली होती नागपुरास जाती तेव्हां, मागून कुटुंबाकरिता तुम्ही जा ल, याकरिता यादी करार करून दिल्ही आहे परंतु आतां मोठ्या शिक्क्या दरवाजे ठेविले आहेत तूर्त शिक्केकटार पंधरा दिवस मात्र ठेवा साबाजी भोंसले नाना ऐसें चिठींत लिहीन मागू नका सेनासाहेब सुभा रघोजीबावास लिहीन हा सिद्धांत मामानीं व दिवाकरपंतानीं करून, सेनासाहेबसुभा यांस व भवानी शिवराम यांस सांगितलें आणि सांगितलें कीं, तुम्हीं बाईकडे जात जावें, रतिमात्र चूक पडली म्हणजे नबाब व आम्ही मिळाल्यास इजला गा रत करून देईन ! तों बाईकडील पत्रेंहि मामास सापडलीं या शिवराम सि द्धच याजकडे सचार बाईनीं धरिला तो त्यांनीं सांगितला बाईघर चौक्या ! सेवट मूळ आणि बाई समर रावतानूर्वी डेऱ्याजवळ आपल्या असावी, हा करार जाहला बाईस उमजलें कीं, मी यांची आज्ञा न मानिली म्हणजे हे यादींतून निघतात आणि गारत करितात त्यावर राजश्री हरीपंत तात्या आले हें सर्व वर्तमान तात्यांस व रुकुनुद्दौले व जाफितजंग यांस मामांनीं सांगितलें सेवट श्री पंढरीच्या देवाळयांत बाईनीं मामास शपथेनें गोंवावें ऐसी सर्वी घडवून, भाऊबहीण हें नातें लाऊन, देवासमक्ष म्हणूं लागली कीं, यादी ख री ऐसें वचन द्यावें तेव्हां मामांनीं साफ सांगितलें कीं, रघूजीबावा जानोजी बाबाचे पोटचा नाहीं, तुमचा पुत्र नानाचाच खरा ऐसें विषादयुक्त भाषण केलें तेव्हां बाईस निराशा जाहली तेव्हां आपली गत पुसली कीं, माझा वाली कोण ? तेव्हां मामांनीं उत्तर केलें कीं, साबाजीबावा अवज्ञा करील तरी करू देणार नाहीं हें वर्तमान डेऱ्यास येऊन तात्यापाशीं सांगितलें व रुकुनुद्दौले व जाफितजंग याजपाशींहि सांगितलें कीं, देवाजवळ मजला बाईनीं गाठिलें होतें, त्यास साफ सांगितलें, बाई उमजली दंगा करील, जाईल, याजकरि तां मोंगलाजवळ पिछाडीस उतरविली तमाम फौजेच्या हजिऱ्या राजश्री त्रिं बकपंतास व फडणीस सर्वत्र ठेऊन घेतल्या त्याचे कारकून बेहताला फेरें भाइस उमजलें कीं, आतां नानासाहेबासच धरिल्यानें वांचलें तेव्हां सरदार व कारकून राजकारणास लागले त्या दिवसांत आम्हींहि बोध करून टीक करावें ऐसें होतें त्यास, मामा एका दिवसाकरितां उतावळी करून गेले दगा पावले दुसरे रात्रीं सर्व सरदार व नबाब एक करून श्रीमंतास दोन मजली आऊं न यावें, हें जाफितजंग व आपण जिद करीत असतां, आपणावर

तुफाने ? शिक्केकटार मागितली. सेनासाहेबसुभा रघोजीबावास देणार ऐशी पत्रे पुरदरास लटकीं पाठविलीं व तात्यास सांगितलें, मुधोजीबावाचें व श्रीमताचे सूत्र. ऐशी तुफाने घेऊन, केला श्रम त्यास, श्रीहरी व चार मातबर रास्ते आदिकरून यांस ठाऊक आहे. जावितजगास घेऊन आलो. एक मास निर्मलेकडे मजला लागला. मामानी सांगितले कीं, हे मसलत राजश्री बापूची आहे. मीच बापू आहे. भेद नाही. मजविसीं पुरदरास लिहिलेहि असेल. ऐसे श्रम केले असता, मामा जाताच आपले राहुटींत बसलो. पधरा रोज पाहिले तो तुफान करून कैद करितात. तेव्हां राजश्री बापूकडे पत्र पाठविलें. बापूनीं व नानानीं हरीपंतास लिहिलें की, मसलतेतून दिवाकरपतास न टाकणे. आणि मजला पत्र आले त्यांत आज्ञा की, हरीपताकडे जात जाणे. तेहि बोलावितलि. तेव्हा, ती पत्रे प्रतिष्ठेस प्राणास आश्रय जाहला. राजश्री नाना जोशी आले. त्याचे दर्शन जाहले. तें पुर्तें वाकीफ जाहले. आमचे समाधान केले. तो हरीपतावर बाईचे मसलतेचें जड पडलें. पुरंधरचीं पत्रे आलियावर तात्यानीं पदर पसरिला कीं, चूक जाहली. नाहक तुह्मावर आरोप केला. भवानी शिवराम पाया पडले कीं, चूक जाहली. ईश्वर आह्मीं सोडिला. इतकें आता माफ करावे. पुढें चुकणार नाहीं. तेव्हा तात्याकडे जाणे सुरू केलें. बाईचा कारभार. तीस लक्ष रुपये तलब बाईची द्यावी. पुढें बाईस सरजाम द्यावा. या पेचात दौलत गारत. फौज सेनाधुरधर याची हणमतराव घाटगे वगैरे याचें जथ पडणार. तेव्हा या तोडमोडींत राहून, सेवट, बाईचे बुद्धीने बाई लुटली गेली. तीस लाख तलब देणे. याजला ते वाचली. खडेराव दरेकर व आपाजीराव पाटणकर बाईचे मध्यस्तींत असता, बाई चुकता गारत जाहली. सेवट, अबरु वाचली. तात्यानीं तह केला. बाईस एक किल्ला द्यावा. वरकड साबाजीबावास पागा, हत्ती, सिलेखाना द्यावा. हा तह केला. दिवाकरपतानीं बाईकडून सेनासाहेबसुभा यास कराराप्रों मिळावे, ऐसें साधन राखावें, हे तात्यानी करून, भवानी शिवराम याचे कामात तिडण न करावी, जे जाहले तें जाहलें. हे इमानात चुकले, आता याजविसी शपथ मजर्गी करावी, कारभार याने करावा, वडिलपणें आपण सल्लामसलत देत जावी, हे तात्यानीं करून, निरोप दिल्हा. दिवाकरपतानीं आक्षेप केला कीं, पुरधरास जाऊन उभयता बापू व नाना याच्या भेटी मी घेऊन येतों. तेव्हा सेनासाहेबसुभा यानीं आक्षेप फार केला, आणि तात्यानीं समाधान केले. बहुमान केला असता हे पुरंधराकडे पाहतात हे दिसले. याकरिता यासमागमे वराडात आलो. पचवीस दिवस बाईकडे जाणें. बाईचें व नानाचें प्रेम निस्सीम जाहले. एक जागा जेवावें. नानाचें कसे विचारावे. फारच ममता. मागील लुटणे दुःख सर्व विसरले. बाईनी तात्यास पत्र लिहिलें कीं, माझी खातरजमा नानानीं केली. यानीं लिहिलें की, बाई माझी जाहली, आता तूट

जन्मभर पडत नाहीं हें नाना जोशी यांचे प्रत्ययास आणून दिल्हें नानास ने ऊन सर्व दाखविलें याईनें फौजेच्या समजाविशीं जुपर पडली तर पैका द्यावा, किल्ले द्यावे, नाना साहेबाचें सब साहित्य करावें हे पुत्र ती आई, हें पचवीस रोजांत जाहलें हें पाहताच, मागती काय जाहलें, नकळे, बाइकडे मी जाऊ नये, आणि बाईचा क्षोम मन मानें तें बोलों लागली तेव्हां शोध मनास आणितां कारभारी यास हें असह्य जाहलें बाईचें व नानासाहेबाचें एक, आणि जवळ मी, हे मसलतेंत असतां मीं राहणार नाहीं याकरितां यजमानास कळों येत नाहीं, ऐसें दर्शविलें व बाईस अनेक प्रकारें दर्शविलें, जर हे बाईकडून जातील, तर आपण बाईपासून चौरोजांत किल्ले घेईन यजमानानीं नानास पुसिलें त्यानींहि समस्त दिलें हें वर्तमान आपणास कळलें, तेव्हां आम्ही विकवील वस्त्र सोडून उगेच राहिलों ऐसें दिवाकरपतांनीं किचेक प्रकारें कारभारी यांच्या युक्त्या सांगितल्या त्या पत्रीं कोठपर्यंत ल्याहाव्या ! दिवाकरपतांनीं मसलत नाशिली नीट करावी, ते कारभारी यांनीं म्हणावें कीं, हें मीं अगोदरच केलें होतें तेव्हां आपण मत धरिलें, नाना जोशी यांचे घरीं यशावें आपणाकडे नानाचीं पत्रें गेलीं, तर मी नानापाशी आहें, ऐसें आप णास ल्याहावें यांचें कारण कीं विरस न दाखविता बापूची व नानाची भेट घ्यावी मामाचे मसलतींत श्रम फार केले आळा पावता शायानीशावाचें व मामाचें नीट करून दिल्हें भवानी शिवराम यास कारभारांतून काढावें, हें मामास सेनासाहेबसुभा यांनीं सांगितलें मामानींहि मान्य केलें त्याप्रों भवानी शिवराम यास तगीर करावें तेव्हां मींच मामाशीं अट धरिली कीं भवानीपंत मामा पुत्र होय त्यास कारभारांतून काढिल्यास मी करणार नाहीं, व तुम्हां जवळहि राहणार नाहीं ऐसें किचेक प्रकारें मामास विनंती करून राहिलों यांचें कारण कीं एक वेळ पुरधरास जावें, उभयतांची भेट घ्यावी, ते आज्ञा करितील त्याप्रों वर्तणूक करावी, ऐसें कथन दिवाकरपतांनीं बहुतच सांगितलें कोठपर्यंत ल्याहावें? तेव्हां आम्ही व नानानीं बहुता प्रकारें सांगितलें कीं, सेना धुरधर मामलेदास आहे, येथें समजोत कोणतीहि नाहीं या समयीं तुम्ही चित्त घालावें त्यास उत्तर केलें कीं विठलपंतास वराडांत ठेवावें आर्धी तुम्हीच नागपुरास जाऊं नये ऐसें यजमानास बहुता प्रकारें सांगितलें आठ रोज नाना तुम्हांस घेऊन सर्व सरदारांच्या घरास फिरलों सर्वांस सा गोन अळजपुरावर रहावें, हे मसलत केली तुम्हीं पाहिली ते विचारास न आली तेव्हां विठलपंतास ठेवावें ऐसें केलें समई मसलत सांगायी ते आ इकू नये तेव्हां आतां आम्हीं तों भीडरीचें चिंतन करीत बसलों सातारा सो डिल्यापासून कांहीं इवला कामाचा आपणास नाहीं आणि आतां काय ह णता ? त्यास आम्ही येथें आलों त्या दिवसापासून द्रौहीनेंहि पाहिलें हे का- मत्यादि कामांत नाहींत आणि तुम्हीं उभयतास पुरधरास यों ि दिल्हां

त्यात उभयता कारभारी एकत्र आहेत. ऐसे कैसियावरोन लिहिलेत ! व आपलीं पत्रें दिवाकरपतास दोन तीन आली कीं, सेनासाहेबसुभा यास घेऊन सत्वर फौजेत यावें. त्यावरून दिवाकरपत नाना जोशी याशीं ह्मणो लागले कीं, तुह्मी उभयतास काय लिहिले, ते आह्मास ऐसीं पत्रें लिहितात, तेव्हां आह्मी येथे कारभार करितो, आणि त्याने लिहिलेप्रो आमच्याने घडत नाही, हे लिहिणे तुमचे उचित नाहीं, आता मी उभयतास पत्रे लिहून आपली प्रथम जोडी पाठवीन. हे आमचे समक्ष भाषण जाहले. शहरचे लोक व शिपाई व रयत-सावकार, वाड्यांतील बायका, सर्वांचा एकच प्रकार की, दौलत, जर दिवाकरपत कारभार करितात तर, निभत्ये हे पाहोन व समय पाहोन आह्मी फारच निकड केली कीं, आपण, बापू व नानापर्यंत हे जात, ऐसें करावे. तेव्हा भवानीपतासच पुढें करून, सावकाराच्या घरोघर जाऊन, आठ रोज मोठा श्रम तीन तीन प्रहर रात्रपर्यंत आह्मासुद्धां घेऊन वसावें. कामाची व बोलण्याची व जलदीची हातवटी पाहिली. सावकार मामलेदार राजी. पूर्वी कारभार केला. त्यास आपले विद्यमानेच कर्ज कोणाचा एक रुपाया सरकारात बुडो न दिल्हा. हे सर्वांकरवी आह्मासी भाषण करविलें. आणि आमचे दृष्टोत्पत्तीस आणून दिल्हें. आठा रोजात दाहा लाख रुपये ऐवज, काहीं मुछदी व कांहीं सावकार व रयत व कटकची मामलत ऐसा ऐवज, नवीच कल्पना करून ठरविला. आणि आता फौजेस देऊन निघणार. यजमानाचा वेत कीं, कैसेंहि करून यास फसवून कामात आणावें. हें आह्मासी भाषण व दिवाकरपतासही भाषण बहुत नम्रतेने काकळूत करून करितात कीं, तुह्मी चित्तावर घेत नाहीं तर, माझा प्राण वांचत नाहीं. मीं पूर्वीं सर्व प्रकारें चुकलो. ऐसें शभर वेळ यजमानाने म्हटले. परंतु दिवाकरपंताची एकच जिद कीं पुरधरास बापूनानाकडे जाऊ. ते आज्ञा करितील तैसें करीन. तेव्हा आम्ही यजमानाच्या मर्जीकरिता बोलिलो की, उभयताचीं पत्रें येथे आणवितों. आणि पत्रेंही वरचेवर तुह्मांस येत आहेत. परतु याचा वेत कीं, रुबरू जावें. श्रम कोणाचे केले हें सर्व विनती करीन, रुजवात सर्वांची व तात्यांची करीन. यजमान व आह्मी त्रासलों ऐकत नाहींत, पत्रें आलीं तरी रुबरू जाऊन मग करीन. तेव्हां याला बाहेर तरी काढा, हे मात्र केले. आतां ऐवजावर चिठ्या करून निघावें. सेनाधुरधराचा नेट बसता, विठ्ठलपत तात्याजवळ होते, ते बोलाविले. ते व हे मिळून पधरा हजार जमा होतील. महमद इसफ व इस्माइलखान व सेनाधुरंधर याणीं गारद तोफा मोगल जाहाले. हे गनीम याकरिता रुकुनूद्दौले यास पत्रें जावी कीं, वराडास सुभा इस्माईलखानास तगीर करून दुसरा केला असेल तर तो जावा, नसेल तरी खानानें फंदास सोबत देऊ नये, अगर जाबितजंग वराडास पाठवावा. जाबितजंग व हे एक जाहाले ह्मणजे अलजपुरचे खूळ तुटते. जाबितजग वराडात

जरूर जरूर यावा, नाहींतर मोंगल गनीमीची लढाई, नागपूर मजबूत नाहीं, शहर गाळव होइल, किंवा न जाणो कैसें होईल सेनासाहेबसुभा यांचा निश्चय शपथपूर्वक कीं, सेनाधुरधर यासीं लढाई हत्तीवर बसोन घेईन! हें सकट सर्वांस वाटतें हे हत्तीवर बसोन त्याजवर चाणार ते सो मोंगली सामान यात पाटणकर, निंबाळकर वगैरे मोठमोठे सरदार काळची करसात कीं, तोफा गारद येथें नाहीं, आहे त्याचें साहित्य नाहीं हें कसें होईल! याकरितां जाचितजग जरूर पाहिजे व आपणही सेनासाहेबसुभा याच वडिलपणें त्या हाचें कीं, आपणास रक्षून शत्रूस मारावें हेंही जरूर स्याहावें वरकड येथें सवार फद यजमान अगर कोणी याचे एक लक्ष श्रीमंत रावश्री पतप्रधान येथीच दैवत दुसरा अर्थ नाहीं आवांतरी आमचे संकटीं आवातर उत्पन्न जाइला, ऐसें नित्य म्हणत असतात दुसरा अर्थच घडणार नाहीं हे निश्चय पक्की आहे श्रीमंतांनीं रोकड वीस लाख पाठविली घवी याजला भम! पैका नाहीं! हे दिवस परत्र पाहणार नाहींत वस्ताद मसलत समयास आऊन सांगणार. आणि यजमानच एकनिष्ठ हे खातरजमा दियाकरपत कार्यगमनसा बापूनानाचा नामय हे बोलतात करणीहि पाहतों एकदां उभयतांस पहावें हाच मानस आहे, हेहि निश्चा जाहली एक भवानी शिवराम याची य घन्याची चित्त शुद्ध नाहीं हें त्यांसही उमजलें आहे आपलें आचरण आपणांस कळतें आचरणच ऐसें दिसलें कीं, यजमान फार जाल! फार फार अगेस केली नाहींतर एक दिवस निर्मो नये ऐसी चाल पाहिली यांवून न जाणों काय निघतें? सर्वदा लक्ष आश्रय लोकांचा मोंगलाकडून कोठेंहि जोरानें कारभार असावा ऐसें साधन चालू रीत आहे ते एकदा सर्व आपल्याजवळ येतात दरमियान सेनाधुरधर मात्र आले हा गुत आहे हे दरमियान नसते तर, न योलाविसां सास्याकडे जाऊन, तथून शंभर पयाया निसीं पुरघरास जावें, हे येथील मर्जी आहे यात सेनाधुरधर याचा याग पाहावा, कैसा घडतो व लढाई कैसी होती आता युद्धाचाच प्रकार दिसतो हें वीस कोस असता टाळा दतां नये टाळा दिल्हा तर नागपूर शहर गारद होतें किल्ला एक गढी नाहीं आम्हा, मेहलें किंवा निगळ दुसरा आश्रा नाहीं फविले समागमें घ्यावे, सरंजाम टाकावा, ऐसें सकट आहे ज्यामितजंग मात्र असावे, अगर जे आज्ञा येइल तेंच करतील कर्म यतमान लिहिलें आहे कित्येक आतील वाहरील अथ मी भेटा तर सर्व निवेदन करीन सर्व प्रकारें सेनासाहेबसुभा याच लक्ष आपलें आहे आपली आज्ञा तेंच मान्य, ऐसें आहे येविशीची खातरजमा जाहली पत्राचें उत्तर सतर यर्णे बहुत काय लिहिणें? कृपा लोभ करावा, हे विनंति

---

पत्रांक १६६ श्री माहालक्षुमी. १६९७ मार्गशीर्ष शुद्ध २

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शके १०२ मन्मथ नाम सवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध द्वितीया भृगुवासरे क्षत्रियकुलावतस श्रीराजा शिवछत्रपति स्वामी यांणीं वेदशास्त्रसपन्न राजश्री सदासिव—दीक्षित ठकार यासि आज्ञा केली ऐसीजे. तुह्मीं विनतिपत्र पाठविलें ते हुजूर प्रविष्ट जाहले. आपण श्रीचे दर्शनास करवीरास येणार, येविसीं आज्ञापत्र सादर व्हावे, म्हणून विनतिपत्रीं लिहिलें, ते विदित जाले. श्रीचे दर्शनास हर कोण्यास येणेविसीं लडा काये आहे ? तुह्मी येणार, तरी सुखरूप येऊन, श्रीचे दर्शन घेऊन, जाणे. जाणिजे. निदेश समक्षे.

समत मत्री.
बार सुरु सुद
समत सुद बार.

मर्यादेय
विराजते.

---

पत्रांक १६७ श्री मोरेश्वर. १६९७ मार्गशीर्ष वद्य १२

विनती उपरी. मेस्तर हेष्टन याजकडून बगाल्यांतून वकील कर्नेल आपटेन कलकत्ताहून श्रीमताकडे पुरदरास जावया निमित्त आले. दोघे मुख्य आहेत. बरोबर तीन अबाऱ्या, व रिकामे बोझ्याचे वगैरे हत्ती नव, एकूण बारा हत्ती, व फिरगी पाच सातसें पर्यंत, व चार शभर आहेत, व नेहमी बोझीं शभर, व हजीर बेगारीची तीस, व उटें तटे वगैरे खडदूर शेपन्नास आहे. सुरतेकडील इगेरजाचा व श्रीमताचा सलुख करून द्यावा, या अर्थी आला. बरोबर श्रीमताकडील कारकून व जासूद जोड्या व दस्तक आहे. दस्तकावरून आह्मीं नावें लिहून घेतली आणि आपणास लिहिलीं. फिरगी भाषेचीं नावें आहेत. रजबचे दस्तक आहे. ठिकाण सोडून च्यार महिने जाले. आणखी आठ रोजानीं पुरधरास जातलि. वैजापुरीं रविवासरी आले. शहरींहून नबाबाकडून दर्गाकुलीखानाचा भाऊ मेजवानीचीं वस्त्रें व दुशाला दोन व हजार रुपये नक्त घेऊन आला. त्याकरिता सोमवारीं वैजापुरीं मुकाम जाला. आज मगलवारीं बाबूलगांवावरून चितली ता बेलापूर येथे मुकामास गेले. मार्गी कोणास काहीं उपद्रव किमपी देत नाहींत. जे लागेल ते पैसा देऊन घेतात. हे विनंती.

---

पत्रांक १६८ श्री ( नकल ) १६९७ पौष्य वद्य ५

राजश्री यशवतराव शिंदे गोसावी यांसी:—

अखडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो माधवराव नारायण प्रधान आशिर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहीत जाणें. विशेष. ता

मनोळी व चिकोडी वगैरे गांव श्रीमंत महाराज यांजकडून कर्नाटांत राजश्री आपाजी शामराव यांचे विद्यमानें राजश्री रामचंद्र महादेव यांजकडे आहेत त्यास, महाराजांची स्वारी बाहेर फौजेसह निघोन चिकोडी प्रांतीं येऊन, गांव सेर्डी घेऊन पुढें आपणांसी येणार, म्हणोन कळलें त्यावरून, हें पत्र तुम्हांस लिहिलें आहे तरी, करार जाहला असतां, त्यांत अंतर करणें, गांवसेर्डी घेणें ही गोष्ट उत्तम नसे याउपरी महाराजांस विनंति करून गांवसेर्डी घेतली अ सेल तरी माघारी देवून, पुढें उपसर्ग होऊ न देणें नाहीं तरी तैसेंच लि हिणें त्याप्रों केलें जाईल रा छ १९ जिल्काद, मु॥ सीत समैन मया व अलफ बहुत काय लिहिणें ? हे विनंति

---

पत्रांक १६९ श्री अदासें १६९८

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री लक्ष्मणपंत बाबा स्वामीचे सेवेसीः–

पो हरी बल्लाळ व पद्माकर बाबूराव सा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असिलें पाहिजे विशेष राजश्री आबाजी सदो मुदामे साळ्गुा श्रीमंत राजश्री दादासाहेब यांजकडून निरोप घे ऊन आपले घरास जात होते त्यास संवाळ्याचे ओढ्यावर चोरांनीं लुटलें तेव्हां आपण बाहेर होते सवाळेकरांनीं माग काढिला तो मुंडेवेस आला तेथें सान्या रामोशांनीं मिळोन मनसोबा करोन, मुंडजे पुढें चिंचोळीस माग न्याया ते टाकून, सवकी येथें माग न जातां सान्यांनीं एकोपा करून, सड कीचा रामोशी चोर म्हणोन धरिला तो आज सा कैदेंत आहे त्याची चौ कसी पाहातां त्याजकडे मुद्दापत्ता नाहीं तेव्हां सान्या रामोशांनीं दाव्यादंदानें धरिला किंवा कसा धरिला ते जाणत सान्या रामोशांनीं (बि) चारू लागले कीं, हा तुमचा चोर. तेव्हां आबाजी सदो आतुर सारे रामोशी यांणीं आणून विचारिलात त्यास म्हणतात कीं, आम्हीं करू त्यांत तुम्हीं आहा, कीं तुमची चोरी आम्हीं उगऊन देतों त्यावरोन आंबाजी सदो यांणीं हा चोर म्हटलें त्याजवरोन सडकीकर रामोशी आणोन वाड्यांत ठेऊन गेले चौ कशी करितां, पांच सात गांवचे रामोशी बाईस आणून विचारलें कीं, "स डकीकराकडे मुद्दा शाबीत करून देणें, नाहींतर सारे मिळोन चोरीचा फडशा करून देणें तेव्हां मुद्दापत्ता नाहीं, सा सात गांवचे रामोशी यांनीं करार के ला कीं, आबाजी सदो यांचें काय गेलें हें सत्य पुरस्कर सांगावें सारेजण मिळोन हिस्सेरसी करोन, कागद लिहोन देऊन, आठ पंधरा दिवसांचा वा इदा करून गेले, नंतर सवाळेकरास आणिलें त्यांनीं तीस सा ठराऊन गेले परनिरोचें त्यासच दिल्हें आहे वेळेकर व फलटेकर व मुरूकर देही कबूलच आहेत मौजे मदेगांवकरांवर ऐसा केला न्याय, त्याची गैरवाका हा रामा

जपिंत घाटगे यास समजाऊन, त्यांणीं स्वामींचे पत्र आणिले. पुढे रोखे ( पुढे फाटून गेलें आहे. )

---

पत्रांक १७० श्री ( नकल ) १६९८ कार्तिक शुद्ध १४

अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री जगन्नाथ चिमणाजी निा संस्थान धाडवसी गोसावी यासः—

सेवक माधवराव नारायण प्रधान सा नमस्कार सुा सबा सबैन मया व अल्लफ नारोराम कारकून दिा संस्थान मजकूर यांणीं हुजुर विदित केलें कीं:

श्री परमहंस भार्गवरामबावा पासोन आजपर्यंत संस्थानचें लिहिण्याचें काम एकनिष्ठेनें करीत असतां हाल्लीं आपले हातें घेत नाहीं, ह्मणून ऐशियास पूर्वीपासून याजपासून लिहिण्याचें काम घेऊन याचें चालवीत असतां हाल्लीं दिक्कत करावयास प्रयोजन काय? तरी पूर्ववतप्रों कामकाज यापासोन घेत आला त्याप्रों घेणें व चालवीत आला त्याप्रो चालवणे.

आपणाकडे गोसावीबावापासोन पानपत्रावळीकरिता एक मनुष्य चालत होतें त्यास, सरकारचा ब्रेहेडा जाला, तेव्हा माणूस दूर जाहालें. त्या ऐवजीं पचवीस रुा दरसाल करार केले ह्मणोन तर संस्थानचे ऐवजीं शिबंदीखर्च संस्थानचा आहे. त्यामधें कमपेश करून याचे पचवीस रुा माणूस दूर जाल्यापासोन साल दरसाल देत जाणे. कलम १

आपणास कदीम संस्थानाकडे वेतन रुा सवासे चालतात. त्यास, योगक्षेम चालत नाहीं. तारापूर प्रांत वसई येथें आपणांस मजमूची असामी होती ते वद पडली. रा जगन्नाथ चिमणाजी यांणीं रजबदली करून ते असामी आपले चिरंजिवाचे नावें करून घेऊन धर्मार्थ आपणास शंभर रुा देतात. त्यास, असामी आपली आपले नावें चालोन पैका पावे तें करावें. ह्मणोन. तर सनदपैवस्तीपासून असामी नारोराम याचे नावे चालऊन, असामींचें वतन मशारनिलेस देत जाणें. कलम १

एकूण तीन कलमें लिहिल्या प्रों करार करणे. येविशीं ब्रोभाट फिरून येऊ न देणें जाणिजे. छ १२ सवाल आज्ञाप्रमाण. मोर्तब.

---

पत्रांक १७१

पैा छ १५ जिल्काद. श्री १६९८ मार्गशीर्ष वद्य ३

रावसाो मेहेरबान करमफर्माय मखलिसां सखाराम पंडत सलम लाहुताला. बादक शौक मुलाकत मसरत आयात मषहूद खातीर इतिहाद मासरबाद.

येथील खुपी आणून आपली पादमानी हमेषा कलमी करित आलां पाहिजे दर्यावित्ता, बहुतरोज जाहाले आपणाकडील खैर आफियतेचा खबर मालुम होत नाहीं दोस्तीचे जागा ऐसें न व्हावें हमेषा आपली पादमानी कलमी करित यावें हाली नरसिंगराय कारकून या वा चेरथान पारचे पाठविले असे आवरा एखलाष घेतला पाहिजे ज्यादा लिहिणें काय असे ? हे कितावती

---

पत्रांक १७२ श्री १६९८ मार्गशीर्ष अखेर

आशाहामत पन्हांनीं कितावत वसूल उसूल केली ते पोंहोंचोन खुष खुरमी हासल जाहाली व आशाहामतपन्हाकडून सदाकत अतवार नरसिंगराव आले यांणीं मूनयानीं जाहीर केलें, ते मुफस्सल जाहीर जाहालें वपारच्या रसीद बाबी ते पोहचली त्याजवरून गंगाधर राव रास्ते हुजूर येऊन आशाहामतपन्हां कडून मुकदमा जाहीर केला, तो मालूम जाहाला ऐसीयास, ये यावेचा मजकूर नरसिंगराव यास सांगितला आहे हे लिहितील त्याजवरून कळेल हमेषा कितावत पाठवून दिल वावा करणें दोस्ती जागा

---

पत्रांक १७३ श्री १६९८ पौष प्रारंभ

विद्यार्थी बाजी सदाशिव कृतानेक सां नमस्कार विज्ञापना कीं रा नारो रघुनाथ वैद्य पुणेकर सरसुभा दिा निलकंठ महादेव यांचें पत्र आम्हास काल सायंकाळीं तापीतीरचें मोश्वर वद १४ चें आलें मुा टाकरखेडें पाा नंजर बारचे लिा आलें कीं, माऊ लटके आहेले रा हरी दामोदर व निकम व नारोपंत बरवे वगैरे तमाम जमा करून पारपत्यास आलों आणी आपल्या व मायानसीं समागमें आहों सत्वरच पारिपत्य करून येतों म्हणोन लिा आहे आपणास कळावें, म्हणून लिहिलें आहे विदित होय हे विनंति

---

पत्रांक १७४ श्री (नकल) १६९८

शिका

यादी विसाजी कृष्ण यांस जातीस तैनात व पुत्रास पालखीची तैनात व वि ठ्ठल कृष्ण बापु यांस जातीस तैनात व फौजेस सरंजामास माहाल वगैरे आदेस मुा सबा सबैन मया व अलफ

साहांच्या तैनातादेखील पालखी व रोदीस तैनात गावजमिनीमुद्धां

३५१६० तैनाता

२०६१० सुद तैनात

सातगांवची तनखा रा
फुटगांव आकार रा
२६६८९॥। ता कर्वेरांजणगांव पो देहे १७ तनखा रुपये
१२५१४।॥ॅ को येलगांव वगैरे गाव ४ होन नार्पे
६२५७।॰ यासीं दर होनास रुपये
२ प्रों १२५१४॥ॅ रुपये
१६१९॥ मौजे देऊळगांव सिंदी देहे १ आकार
तनखा रुपये
१९११॥ मौजे पारगांव ता पांडेपेडगाव रुपये
३८०९

किता फूटगांव १८०९८॥
१००० मौजे कोटमंगी कामीस कसूर
प्रांा हुकेरी
४९५६९ॅ
मौजे सुर्ते व धाकरगांव पा काठी
९१२५ मौजे पुळुम पो माहाल

---

पत्रांक १७५ श्री (नकल)

छिका १६१८ / ११२९

यादी विसाजी कृष्ण यास खातीस तैनात व पुत्रास पालखीची तैनात व विठल कृष्ण मधु यास खातीस तैनात व फौजेस सरंजामास माहाल वगैरे आहते सुा समा सबैन मया व अलफ

खाशाच्या तैनाता देखील पालखी व सेरीज तैनात गांव जमिनीसुद्धा
३५१६० तैनाता
२०६१० खुद तैनात
१००१० यराहुकूम पेशजी
२०००० आमती हिंदुस्थानचे स्वारीस जाते समयीं

---

१००१०
६०० कापड आग १५०

√

---

२०६१०

१२६० महिपतराव विश्वनाथ जातीची तैनात नाहीं. पालखी व अब्दागिऱ्याची तैनात.

३२९० विठल, कृष्ण बधू यांस तैनात पालखी दिवट्या आब्दागिऱ्यासुद्धा.

---

३५१६०

१०७८ खेरीज तैनात गाव व जमीन

१००० मौजे नऱ्हे ता। कर्यात मावळ.

८८४।।।. ऐन

११५।. जाजती.

---

१०००

६० मौजे भिवू ता। करेपठार जमीन चाहूर.

१८ मौजे घोरपडी ता। हावेली प्रात पुणे जमीन रुके ६४

---

१०७८

---

३६२३८

फौजेस सरजामास वगैरे गाव महाल आहेत

६६०५८।≡ पो सागोले देहे मिळोन २८



रुपये

६६०५८।≡

तपसील

२४६४३८≡।। सरंजामाकडे

४१४१५८≡।। दुमाले

---

६६०५८।≡

१३४४३।।। पो ब्रह्मपुरी उर्फ माचनूर देहे ७ सात

गांवची तनखा रुपये

फुटगाव आकार रुपये

३६६८९।।। ता। कडे राजणगाव पो देहे १७

तनखा रुपये

१२५१४।।।= कसवे वेलगांव वगैरे गांव

४

होण नाणें ६२५७।≡ यासी

दर होनास रुपये २
प्रमाणें १२५१४॥॰ रुपये
३६१९॥ मौजे देकळगाव सिंदी देहे १
आकार तनखा रुपये
१९९१॥ मौजे पारगाव सा पांढे पेडगाव रुपये
३८०९८॥-
किल्ला फुटगाव
३८०९८॥।–
१००० मौजे कोट, मागील्यांत
कसूर प्रांत हुकेरी
४९५६॰– मौजे सुस्ते व धाकर
गाव पा काठी
९९२५ मौजे पुळुज पैकीं माहाल
२३४६७॥ दिगर जहागीर राक्षसभुवन वगैरे
देहे २१



तनखा

२१३७९॥ ऐन
२०८८ सरदेशमुखी

---

२३४६७॥

सा
१२५० निरगुडी निसबत
मोरो गिरमाजी
१२१८ मानापुर निं
छपा गोसावी

---

२४६८
सरजामांत
२०९९९॥
१९३४८॥-
पौ मजा निरगुडी कसया वि
सीळ आलादिदा लिहून रुपय
१२५०
बाकी रुपये ३८०९८॥-

९७९७॥=। पो पारनेर पैकीं
देहे तनखा रुपये
४

१०२२६॥-

प्रांत जुन्नर पो गांव
चा तनखा रुपये
४२॥≈ प्रो कालेवाडी
६३०-।- प्रो रणेवाडी ता। कर्डे
३१४७ ता। बेल्हे पो देहे ५
१०९६। ता। चाकण देहे ३
२८३२८= ता। गाजी भोइरे देहे ४
२४७८।· पो पारगाव ता। आले

---

१०२२६॥-
१२४५२९॥≈॥· पो आलमले देहे ७५
यो। तनखा रुपये
११४३१५८≈॥ ऐन
१०२१४॥ दुमाले

---

१२४५२९॥≈॥

४०६३६॥≈

पो पातशापूर
१२५५८८≈। पो मजकूर देहे ४५
७११ कर्यात नससरी देहे २

---

१३२६९८≈॥

√ दर होनास ३८— प्रमाणें रुपये ४०६३६॥≈
१००० मौजे नऱ्हे ता। कर्यात मावळ तनखा रुपये

---

३५८५०७॥≈॥।

---

पत्रांक १७६ श्री १६९९

यादी निा दिनकरराव रामचंद्र सुा सबा सबैन मया व अलफ

किल्ले सिंहगड येथील जवाहीर खान्यापैकीं रुपयाचीं मोडी काढून लोकास खर्चास दिली आणि किल्ला लढविला कलम १

तीर्थरूप राजश्री शिवाजीपत व धोंडोपत याचीं माणसें उभयतांच्या बेड्या काढून, त्यास व त्यांचीं माणसें आमच्या स्वाधीन करावीं कलम १

आह्मामुळें आमचे सोयरेधायरे व इष्टमित्र यास उपसर्ग लागला असेल. तरी निर उपद्रव करावा व वस्तभाव अपतीस आली असेल ती माघारी देवावी कलम १

खासगत घोडीं व वस्तभाव सुद्धा आबरू सरक्षण करावी कलम १

किल्ल्यावर सोनारापासून टकसाळ घातली, व शिक्का नवा कोरविला, आणि रुा पाडविले त्याचा जाबसाल आह्माकडे व सोनाराकडे माफ करावा कलम १

तीा चुलते व सौ मातुश्री व बधू व मुलेंमाणसें यांजवर चौकी आहे ती उठवावी कलम १

आमचे जेष्ठ बधू कर्नाटकप्रांतीं आहेत त्यांजकडे स्वार आणावयासीं गेले ह्मणोन ऐकिलें त्यास मनाई करावी कलम १

तीर्थस्वरूप राजश्री महिपतराव कृष्ण व तीर्थरूप महाराजसाहेबांचे चाकर

आमचे पदरीं च्यार गृहस्थ मात बर आहेत त्यांस, हरएक वार्ते, निमित्य ठेवून उपद्रव न द्यावा कलम १

वोतयास मिळोन कोंकण प्रांतींचे किल्ले सुटले व प्रांत सराब जाहला त्याचा उपद्रव नसावा कलम १

रत्नागिरी ता तीा राजश्री महिपतराव कृष्ण यांजकडे होता. तो सरकारांत घेतला ते समई चुलते व सौ मातुश्री व बधू यांजवर चौकी बसवून घरची वस्तभाव जप्त केली तीं माघारी देवावी कलम १

रत्नागिरी तालुक्याचा ऐवज तो तमाम खर्च जाहला तो हिशेबामुळें बाजवी निघेल तो मुजरा घ्यावा कलम १

तीा राजश्री परशरामपत, आमचे बधू, यांची स्त्री कोंकणप्रांतीं आहे ती आह्मांजवळ आणवावी कलम १

पुण्यातील वाड्यातील वस्तभाव जप्तींत आली असेल, ती माघारी देवावी कलम १

आह्मां सर्वांस शिवाजीपत सुद्धां प्रायश्चित देऊन शुद्ध करावें कलम १

आपले तीर्थरूपांनी धनी तीा राजश्री महिपतराव कृष्ण यास कार

या उभयतांस मालेमालतोस कोकण-च्या बखेड्यामुळे उपद्रव जाहाला असेल. त्यास दूर होऊन नवीन उपद्रव न होय ते करावे. कलम १.

वसवे पावस येथिल वाड्यात वस्तवानी व नख्ती ऐवज जो सरकारातून जप्त जाहला आहे, तो आमचा आमचे स्वाधीन करावा. कलम १.

भार व मामलती व उदम तीा चें नावे चालत होता. त्यास हल्ली कोकणपट्टीच्या बखेड्यामुळें सर्व सोडून, महिपतराव याचेस्वाधीन करून, त्याचें त्याजकडे चालवावें. कलम १

काा पावस येथे तीा राा महिपतराव कृष्ण याच्या वाड्यास व बागास वगैरे काही उपसर्ग लागला असलियास मोकळी करवावी. कलम १

---

पत्रांक १७७ — १६९९ चैत्र शुद्ध १४

श्री (अस्सल वरहुा नकल.)

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री हरी बल्लाळ स्वामी गोसावी यांसी:—

पोा माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेप. पोा सांगोलें व आलेवले व माल्वनूर व पुळुज वगैरे गाव राजश्री विसाजी कृष्ण यांजकडे सरंजामास आहेत. त्यास, तुह्मी त्याचे गावावर रोखे करूद ऐवज घेतला, व पुढें रोखे होतच आहेत, ह्मणोन हुजूर विदित जालें. ऐशास, याचे माहालास व गावास उपसर्ग न करणे. रोखे केले असतील ते मना करवून, ऐवज घेतला असेल तो माघारा देणें. गावगन्ना राऊत रखवालीस देऊन, त्याचे महालास व गावास उपसर्ग होऊ न देणें. जाणिजे छ १२ रोबल, सुा सबा सबैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे ? हे विनंति.

---

पत्राक १७८. — श्रीसिताकात. — १६९९ श्रावण शुद्ध ६.

राजश्री बाबूराव विश्वनाथ गोसावी यांसी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य सेनाा मुधोजी भोंसले सेनाधुरंधर दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष. तुह्मीं पत्र पाठविले तें प्रविष्ट जाहले. लिहिला मजकूर अवगत जाहला. पूर्वी जाहलेला प्रकार यजमानानीं खासदस्तुरपत्रीं लिहिला आहे, त्याजवरून कळले असेल. फौजेची समजोती होत आहे. चाळीस पन्नास लक्ष रुपयांची तरतूद केली आहे. बाजत ब्रसात हैदरावरी जाणार. शिंदे व होळकर आपलाले स्थळास निरोप घेऊन छावणीस गेले. पुण्यास येणार. उभयताचें ऐक्य फार चागले जाहलें ह्मणोन लिहिलें. त्यास पूर्वी राजश्री बाळाजीपंत नाना

यांचें पत्र स्वदस्तुरें विस्तारयुक्त आलें तें अवलोकनीं सर्व अर्थ इच्छित घडलें हें समजोन जो संतोष जाहला त्याचा अर्थ लिहिणेयांत आलाच आहे सप्र वण्या लिहिण्यावरून तरी कोणवाही गुता राहिला नाहीं मुख्य राजश्री पंत प्रधान दैवशाली आणि राजश्री नाना यांची एकनिष्ठता त्याचींच फळें श्रीनीं दिल्हीं याउपरी सर्व बंदोबस्त यथास्थित होऊन येतील वरकड इकडील कितेक मजकूर पूर्वी लिहिले आहेत सांप्रत राजश्री दियाकर पुरुषोत्तम याचे पत्रावरून कळों येतील रा छ ५ माहे रमव सविस्तर मारनिलेच्या पत्रा वरून कळेल बहुत काय लिहिणें ? हे विनती मोर्तबसुद*

*शिक्का रघोजीचा

---

पत्रांक १७९ | १६९९ भाद्रपद शुद्ध १४

श्री लक्ष्मीकांत
श्रीशाहूराजपदांभोजभ्र
मरायितचेतस । र्घिया
त्मजस्य मुद्रेयं राघवस्य
विराजते॥

आज्ञापत्र सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रघोजी भोंसले सेना साहेबसुभा, ता मोकदम, मौजे घनघाशी, पा तळेगांव दाहा सदर्साची, हाली वस्ती मौजे हिंगणगांव, पा कुन्हा, प्रांत वऱ्हाड सुा समान सबैन मया व अलफ मौजे मजकुरीं पळून जाऊन धनोडी मजकुरावर दावादद करितोस म्हणोन हुजूर विदीत जालें तर, हे गोष्ट कार्या ( स येणार नाहीं ) हलीं देखत आज्ञापत्र आपले गांवास उठून येणें दावादद न करणें याउपर दावादद केला तरी पारपत्य केलें जाईल या कामास मासूद पाठविला असे यासीं मसाला रुा ५ पांच आदा करणें जाणिजे छ १३ माहे शाबान मोर्तबसुद

---

पत्रांक १८० श्री १६९९ आश्विन वद्य ९

अखण्डितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री महिपतराय कृष्ण गोसावी यासी —

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार. सुा समान सबैन मया व अलफ. तुह्मांपासून सरकारांत कर्ज घेतले मुद्दल मित्या.

रुा

३५००० मिती मार्गशीर्ष शुा ३ त्रितिया शके १६९७, मन्मथनाम संवत्सरे, छ १ सवाल, सन सीत सबैन. ऐन मुद्दल बेरीज रुा

१०९०|||. मिति चैत्र शुा ३ त्रितिया शके १६९८, दुर्मुख नाम सवत्सरे, छ १ सफर, सन सीत सबैन. व्याजाबा रुा

३६०९०|||·

एकूण छत्तीस हजार पावणेएक्याण्णव रुा सदरहु मित्यानीं घेतले. त्यांसी व्याज दरमाहे दरसदे रुा १ एकोत्रा शिरस्तेप्रमाणे करार केले असे. तरी जाहले मुदतीचे व्याज व मुद्दल हिशेब करून दिल्हा जाईल. जाणिजे. छ २५ रमजान. बहुत काय लिहिणे ? लेखनसीमा. बार.

---

पत्रांक १८१. श्री. (नकल.) १६९९ कार्तिक शुद्ध १३

राजश्री बाळाजी नाईक भिडे गोसावी यासीः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो फत्तेसिंगराव गायकवाड दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करणें. विशेष. तुह्मापासून कर्ज घेतले येणेंप्रोंः—

३००००० सरकारांत भरणा, मार्गशीर्ष शुद्ध १.
५०००० सखारामपंत बापू, पौष शुद्ध १.
२५००० नानाफडणीस सवादोन लाख पौष शुद्ध १५.

३७५०००

एकूण पावणेचार लक्ष. यास व्याज दरमहा दर सेकडा रुा १| सवा विन सूट देऊ. शके १६९९, हेमलंबी नामसंवत्सरे, कार्तिक शुद्ध १३. बहुत काय लिहिणें. हे विनती. मोर्तब. शिक्का.

---

पत्रांक १८२. श्री. १६९९ कार्तिक

खान अजम याकूतखान दाममोहबतहू

अमारत व आयालत मर्तबात हशमत शौकात मंजील तमलाज मुखलिसां इस्तिनहार दोस्ता बादज षौक मष्हूद जमीमोनीर गर्दानीदः मेखामददरीं वेला आ अमारत पन्हांनीं मुफाविजाईबलाग केला तो उसूल जाहाला व सदालत अतवार रामचद्र हरी दातार यांणीं मोहिबाकडील

किरेक सफाईचे मजमूल जाहाहीर केले ते माल्म झाले सरकार तालुकीयांत येऊन खलकास तोशीस होऊं देत नाहीं व रुजुवातीचा मजमून कलमी केला ( तो ) भायां जाहला श्री अमारतपन्हा सरकार ताल्लुक्यात येऊन रयतीस छबाछब बहुत होते सरकारतर्फेकडील चाकरमानेयाचे कबिले भरून नेले व मार्ते भरून नेलीं, ये बाबेचे बोभाट बहुत येतात लेकिन हुजूर वकील रवाना केला असतां सरकारचाकरमानेयाचे कबिले भरून नेऊन खलकास तसदी देणें व मार्ते भरून नेणें हें साबुत आहे। मोहिबाकडून असें अमलात येत असतां, सरकारतर्फेनें पेषदस्ती होत नाहीं गुदस्तापावेतन वकील हुजूर दरसाल करावे, हें कलमी करीत असता, मोहिबांचे जानीबानें वकीलांचे रवानगीस मुदत लागली इंग्रेजांचे गवनरीचीं फुरसत पाहून सरकारतालु क्यांत लोक रवाना करणें व इंग्रेजाची कुमक करितों ऐसें कलमी करणें सहासेहीस असे बुतर्फा दोस्ती चालावी हें बरज्या लेकिन, रुजुवातीमिसीं मोहिबाकडून बारबार कलमी होतें विनांबरा, येणें देणें काय निघतें हा क लमी जायबास्त असतां, श्री अमारतपन्हाकडील वकील हुजूर आलेयाचे हमराई कागदपत्र मरसूल केले नाहींत जबानीचे वाकफगारीनें मालूम कैसें होतें! येथावे रामचंद्र हरी यास हुकूम केला आहे लेहाजा, कागदपत्र हिशेबाचे हुजूर येऊन, जाहीर होऊन, त्याची खुलस्सी करून दातार मुमा इलेयास हुकूम केला जाईल खलकास मुजाहमत होणें हें मुकादिमेवाची अजतर्फ श्री अमारतपन्हा होत आहे अनि बेहत नुकसान कदाम तर्फेनें अमलांत येईल हें मोहिबास मालूम न होय ऐसें नाहीं रामचद्र हरी यास हुजूर ठेऊन घेतले आहेत यास किरेक मुकदिमेयाचा हुकूम केला आहे मारनिल्हे कलमी करतील ते दर्याफ्त करून दोस्तीची तरकी चाले तें करणें श्रीअमारतपन्हास मुनासीब आहे

---

पत्रांक १८१ श्री (नकल) १६९९ मार्गशीर्ष शुद्ध १२

राजश्री वर्तमान व भावी कमावीसदार पा विसनपूर गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री फत्तेसिंगराव गायकवाड मुा समान सबैन मया व अल्फ वेदमूर्ती राजश्री शिवरामभट बिन निळकंठ भट, उपनाम भंडारी, गोत्र भारद्वाज, सूत्र कात्यायन, शाखा याजवनी, वास्तव्य शहर मुलेर, हे सत्पात्र थोर ब्राह्मण जाणोन, प्रा मजकूरीं सालमजकुरापासोन नूतन धर्मादाय दररोज रुपये । पाव रुपया रोज करार करून दिल्हा असे तरी पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें सदरहू, रोजगा ऐवज आदा करीत जाणें प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणें पत्राची प्रत लिहून घेऊन, असल पत्र वेदमूर्तींजवळ भोगवटेयास देणें रा छ १० जिल्काद बहुत काय लिहिणें! मोर्तब सिक्का

पत्रांक १८४. श्री. १६९९ पौष शुद्ध २.

रा छ ३० जिल्काद, सन समान XXX जजीरेकर हबशी याचे पत्र.

आंमरतपन्हांनीं मुफाविना इखलाग केला तो उसूल होऊन खुरमी हासल जाहाली. कितेक मजमून बयावार कलमीं केले, ते आया जाले. लेकिन ये बाबेचे मजमून मुफसल गणेशराम दातार यास हुकूम करून रा केले असता, दरम्यान त्यास लासूर पैदा होऊन घाटमाथा छ जिल्कादीं फौत जाले. बिनाबरा, दुतर्फा कित्तेक मुकदमेयाचा फैसला होणें, सबब गोष्टियाकडून वाकफगार शाहाणे माणूस रा करावें. समजोन घेऊन जाबसाल करून रा केले जातील. सरकार तर्फेनेंही शाहाणें माणूस रुखसत होतील. बिलफैल, प्रातात दगा होऊन रयतीस उपसर्ग होतो, ये बाबेचे हूजूर बोभाट येतात. हें एखलासीचे जागा मुनासीब नाहीं. ताकीद करून उपसर्ग प्रातात न होय तें........कीजे.

---

पत्राक १८५ श्री. १६९९ पौष शुद्ध १२

जजीरेकराचे पत्राची नकल.

......मान जयराम त्रिंबक सोमण.

मुफाबीजा मरकुम केला तो पोहचून खुषवुदी हासल जाली. लिहिला मजमून मालूम जाहला. ऐशास, गणेशराम दातार हक झाले. पुढे दुतर्फा जाबसाल सुरळीत अमलात यावें, सा आअमारतपन्हाकडून भले माणूस रा करावयाविशीं इखलाग केलें. त्यावरून भले माणूस रा करितों हाणोन कलमीं केलें असता, प्रांतातील दगा होणें तो होतच आहे हें एखलासेंचि जागा दुरुस्त नाहीं. सरकार तर्फेनें निखालसीचा मार दर्याफ्त करून भले माणूस बलाविले आहेत. तरी जलदीनें रा करावें. अकरा माहालची दुतर्फा पाहणी होणें, त्याचा हंगाम हाच आहे. याजकरिता भलेमाणसाची रवानगीस दिरग न लाविता लौकर रा करावें. रयतीस तसदी लागते ये बाबेचा बदोबस्त करवावा. दोस्तीचे जागा असें अमलात नसावें. रा छ २२ जिल्हेज. जादा काय लिहिणे ? हे किताबत.

सन समान पौषमास मुा परधर येथून रा जाले. खान अजम याकूतखान दाम मोहबत हु.

---

पत्रांक १८६ श्री १६९९ पौषवद्य ११

राजश्री माहादजी शिंदे गोसावी यासी:—

छ सकल गुणालकरणअखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्नो माधवराव नारायण प्रधान आशीर्वाद उपरी येथिल कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. राजश्री महिपतराव कृष्ण साठे याजकडे पो हुकेरी व मनोळी

हे तालुके कर्यात त्यास सन सितांत एसाजी शिंदे फौजमुदां पो मजकूरीं घेऊन गांव घेतले त्यांपैकीं कांहीं गांव राजश्री रामचंद्र गणेश यांणीं घेऊन मारनिलेचे हवालीं केले कांहीं गांव ठाणें, संदूर व हासूर वगैरे मेणें राहिलें आहेत त्यास तिकडे सांप्रत तुम्हीं गेलां आहां, याजकरिता तुम्हीं यांजकडील गांव घेऊन मशारनिलेचे हवालीं करणें मारनिलेचे कारकून तुम्हाकडे गेलेच आहेत ते तिकडील माहितगारी तुम्हांस सांगतील त्याप्रमाणें अरस पोंचाऊन ठाणीं घेऊन हवालीं करणें जाणिजे छ २४ जिल्हेज, सुा सबान सबैन म या व अलफ बहुत काय लिहिणें ? हे आशीर्वाद लेखन सीमा

श्री
राजाराम नरपति हर्ष
निधान माधवराव
नारायण मुख्य प्रधान

---

पत्रांक १८७ श्री १६९९ माघ शुद्ध ११

राजश्री महिपतराव सो रत्नागिरी गोसावी यांसीं —

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो माहादजी शिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित आलें पाहिजे विशेष राजश्री आपाजी राम दामुलकर यांची कुणबिण कस एक पळून गेली, ती ता लांजें उमगि लो आहे, म्हणून कळलें त्यावरून, हें पत्र तुम्हास लिहिलें आहे तरी यांची कुणबिण ज्याचे घरीं असेल त्यास ताकीद करून, यांचे माणसांचे स्वाधीन करावी रा छ १० मोहरम बहुत काय लिहिणें ? हे विनंति मोर्तबसुद

श्री
जोतिस्वरूप चरणीं तत्पर
राणोजी सुत माहादजी
शिंदे निरंतर.

---

पत्रांक १८८ , श्री १७०० चैत्र वद्य ३

पौ छ १५ रबिलावल, सन समान सैवन.

रावसाो मेहरबान करमफर्माय मोखलिसा बाळाजीपंडत फडणवीस सलमला हुताला.

बादज पौक मुलाखात मसरत अयात मगहुद खातर रतिहाद मासरबाद, येथील खुषी जाणून आपली शादमानी हमेषा कलमी करीत आला पाहिजे. दर्शी बिला, बहुत रोज जाहाले, आपणाकडील खैर आफियतेचा खबर मालूम होत नाहीं. दोस्तीचे जागा ऐसें न व्हावें. हमेशा आपली शादमानी कलमी करीत यावें. हाली नरसिंगराव कारकून या बा चे थानपारचे पाठविले असे आजरा: एखलास घेतला पाहिजे. जिआदा लिहिणें काय असे ! हे कितावत.

---

पत्रांक १८९ श्री १७०० आषाढ वद्य १०

रावसाहेब आदा मुलाजमें एकबालहू.

जयेर दौलत व एकबाल रफात व अवालि मर्तबा तर्फीस खातम बख्त-दारीं आबेजव्हार आलम परवरी फरोजी पेचराग हिंमत फराजी देली वायम करमत अजयुफी कड बाबत व कामरानी दाई मजदयारे कवताल्याबाद आजि खैर आपेश उद्दलम छुइस एस्कोयर बाद अर्जुए हुजुर मोफसरूर इन-शाफ खातीर मेहेर मजातीर मेरादी नव.........फनामा तिराज सादर केला तो पोंचून हिसियार खुरमी हासल जाली. एकबालपन्हाचे लिहिल्यावरून इयाहामत व एकबालपन्हां गवरनर जनराल कलान कलकत्ते जंगबाहादुर याची खतें पाठविली आहेत. येऊन पावतील. कलकत्तेयाहून खुदाएवद न्यामत हनराबेल कोंपनीची फौज येत आहे. रहदारीस दस्तक द्यावेविशीं गवरनर जनराल यांहीं कलमीं केलेंच आहे. त्यास तर्फ इज्यानेब अर्ज ऐसाजे. मेहेरबानी करून बतरपासून व सरकारचे सरदार जागजागाचे यांसी दस्तक द्यावें. येथून फौजेच्या सरदारास पाठवून देऊ. दस्तक असल्यानें दुतर्फेच्या फौजेसीं मुलाखत जाहाल्यास कोण्हेविशीं रहदारींत हरकत वगैरे नाहीं. बेह-त्तर असे. कलकत्तेचे खलिते पावल्याचा दरजवाब पाठवावें. येथून रवाना केले जातील. रा छ २४ जमादिलाकर. ज्यादा एयामशादमानी जुमाबद.

---

पत्रांक १९०. श्री. १७०० ज्येष्ठ—आषाढ.

सा नमस्कार विनंती उपरी. फरासिसाचे येथें तीन वकील आले आहेत, त्यांचें व आमचें बोलणे जाहालें, ह्मणोन विस्तारें लिहिलें तें सर्व कळों आलें. आणखीहि कित्तेक मजकूर विस्तारे लिहिले ते कळले. तुमच्या लि-हिल्याचे अन्वयें श्रीमंतास विनंती केली. हे विशींचें बोलणें येथें बहुत जा-हालें. तेव्हा खातरजमा जाहाली. उत्तम आहे, हे आज्ञा जाहाली. सशय

इतकाच के, कोणती गोष्ट करणें ते बहुत विचार करून करावी केल्या मर्जीनुरूप फळ आल्यास उत्तम कदाचित् न घडल्यास करण्यास दोष येतो मोठ्या गोष्टीस पेंच जे तुह्मांसीं बोलतात, त्यांची खातरजमा येथें केली परंतु त्याचेच स्वाधीन कोणताहि प्रकार नसिल्यास मग काय होणें हें कळतच आहे याकरितां आम्ही कोणतेहि गोष्ट नमुदात आणणें हें ठीक नाहीं या रितां याचा विचार पुर्ता करून, तेथें आपणांस त्यांशीं जें बोलणें तें बोलावें आणि जो निश्चय करणें तो करावा सर्व अर्थ त्याचे हातीं येविषीं तुमची खातरजमा जाहालियासच करावें नाहींतर ठीक नाहीं थोडे स्वाधीन नसिल्यास घडणार काय करितो ! सर्व अर्थ तुमचे ध्यानातच आहेत करण्याविषीं येथील मर्जीचा सतोष आहे परंतु मात्र असावें थोडे स्वाधीन आहेत यात संदेह नाहीं, हे खातरजमा तुमची जाहलियावर तेथेंच जो निश्चय करणें तो तुह्मींच करावा, येविषीं आलाहिदा तुह्मास चिठी आहे हेच दासवून खातरजमा करावी आणि कार्य करावें गुंता नाहीं चाहिराणा पत्राचा सिलसिला हा प्रकार केव्हां घडेल ! येथील मर्जीनरूप एकदोन प्रचिती येतील तें करून दाखविदील, तेव्हां जे गोष्ट होणें ते स्पष्ट होईल तोंपर्यंत करणें ठीक नाहीं याप्रमाणें आज्ञा जाहाली कळावें तुम्हांकडून याचाविषयीं प्रहस्त आले ते भेटले त्यांसहि हाच मजकूर सांगितला आहे त्यांचें पत्र आलाहिदा गेलें आहे व हातीं आहे, त्यावरून कळेल कार्य जाहलियावर तुमचें पत्र आलें ह्मणजे येथील मर्जीनरूप जे सला तुम्हांस लिहिणें ते लिहू त्या अन्वयें प्रचितीस यावें ह्मणजे सर्व गोष्टी मनोदयानुरूप घडतील मोंसले याचें व इंग्रजाचें सूत्र आहे म्हणून येथें वर्तमान दाट आहे, व बुंदेले याचे लिहिण्यांत आहे, व पलटणें आलीं आहेत, त्या समागमें वेणीरामपंत आहेत, ऐसें असोन तुह्मी कांहींच लिहिलें नाहीं, हें काय ? तस्मात् तुम्हांस कळलेंच नसेल तरी येथिलींचा बारिकाइकानें पक्का शोध करून लेहून पाठविणें याउपर कोणे विषीं घा आळस एकदर नसावा बहुत सावध असावें बारिकाईनें जें वर्तमान आढळेल तें बरचेवर लिहीत जावें दिवस बहुत नाजूक आहेत व संधीचे आहेत फार जपावें येविषीं सहसा सुस्ती नसावी पत्र वाचून फाडून टाकणें फार फार नाजुक आहे याकरितां ही विनती इकडे, मध्यें मोरोबाची वगैरे घालमेल जाली त्या दिवसात तेथील डोळे ठिकाणीं नव्हते सरजाम वगैरे जप्त केला होता त्यास मागती देसात आहेत, ह्मणोन तुह्मीं लिहिलें त्यास, उत्तम आहे बाबा आपण आपले तर्फेनें, त्याचे डोळे ठिकाणीं नव्हते, हें दधाऊ देखील नये याचें कारण नाहीं व येथेंहि त्याप्रमाणेंचा निश्चय आहे तुह्मींहि दधाऊं नये रंगामेजी व खातरजमाच आहे हे विनंती विनंती पर्वतीसाचे वकिलाचें पत्र पों त्यास, जो येथें वकील होता तो गेला पत्र आम्हांजवळच आहे

---

पत्रांक १९१ श्री १७०० श्रावण–भाद्रपद–आश्विन

पुा राजश्री रावजी स्वामीचे सेवेसीः—

विनती उपरी इकडील वर्तमान विशेष लिहिणें तरी एक वेळ आग्रेजाचा मजकूर. त्याचा इतल्ला वरचेवरी आपले पत्रीं लिहिण्यात आलाच आहे. आग्रेजाची पलावरी पत्रें दाट आलीं कीं, आम्हीं दरमजल तुमचे प्रातावरून मुबईस जातों. येथून उत्तरें त्यास वरचेवरी एकदोन रवानग्या तेथील आज्ञा प्रों गेलीं कीं, फरासिसाचे वकीलास विदा केलें, तुमचा व श्रीमंताचा स्नेह जो आहे तोच आहे. आणि दोन चार उत्तरें पाठविलीं कीं, मार्गे विशम आहे. पर्वत आहेत, मार्गांनीं पाणी............हि हरवख्त मिळणार नाहीं. अशीं इकडून पत्रें लिहीत गेलों. कदाचित् कटोर ल्याहावें, तरी कटक प्रातात अपाय करतील, हें जाणोन उत्तरें पाठवित गेलों. परतु त्याचीं पत्रें वरचेवरी हींच येत गेलीं कीं, आम्हीं दरमजल याच मार्गे येतों. त्यास अलीकडे त्यांच्या लष्करात कागीद जोड्या होत्या, व रा। वेणीराम शिवभद्र वकील त्याजवळ आहे. आपणास ठाऊकच आहे. त्यास, त्याणीं पत्र पाठविलें जे कर्णेल लसलीन* आणि साहा पलटणें काल्पीस आलीं आहेत. तेथून कर्णेल गाजर यास तीन पलटणें देऊन, काल्पी अलीकडे जलालपूर आहे, तेथील मजल सागितली. त्याणीं कूच करून, दोनप्रहर रात्रीस फौजबंदी करून, राजश्री बाळाजी गोविंद व बुंदेले याच्या फौजा जवळपास जाणोन, रात्रीस निघाले ते जासुदानीं मार्ग भुलविला. अरण्यात जेथें पाणी नाहीं तेथें पडले. दोन अडीच प्रहर दिवस जाहला. इतकियात कुल लोक तृषेनें व्याकूळ होऊन रानोरान जाले. कर्णेल गाजर सरदार मातबर व तीनशें गाडदी व पन्नास गोरे ऐसे तरी मेले. हें वर्तमान कर्णेल लसलीनास कळताच त्याणीं कूच करून त्याजवळ आला. याची इतकियाची गत करून, तेथेंच मुक्काम व्यत्रवतीवरी केला. प्रथम इकडे येण्याविशीं शकून याप्रमाणें जाहला! पुढें न यावें तरीं बुंदेल्याचे व बाळाजीपताचा गह खाऊन माघारे हलले, ऐसें होईल. याजकरिता छत्रपुरा.........आणि तेथें छावणी केली .........हिंदुस्थानात व बगाल्यात भ्रम राहतो. याअर्थी छत्रपुराजवळ आले. इकडील येण्याची चाल सुस्त आहे. पुढें वर्तमान येईल तैसें लिहिण्यात येईल. आग्रेज निवळ श्रीमत दादासाहेबाचेच पक्षावर नाहींत. काहीं आणिक चालीवर आहेत. शुजायतदौरेचे लो—लेक आपली कंपु तयार करितात. नजफखानाचें सूत्र आहे. हें वकिलीचें लिहिणें नाहीं, वर्तमानें सावकारी पत्रीं आहेत. याहीवर न कळे! विनती.

---

* Cohonel Leslie व Colonel Goddard.

पत्रांक १९२ श्री १७०० भाद्रपद वद्य ६

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री महिपतराव कृष्ण गोसावी यांसीः—

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार. सु॥ तिसा सबैन मया व अल्फ तुम्हांपासून ता॥ रत्नागिरी येथील मामलतसंबंधें रसदेचा ऐवज आगाव सरकारांत सन समस व सन सीत सबैनांत घेतला होता त्यांपैकीं रदकर्ज पावोन बाकी ऐवज राहिला तो व त्याचें व्याज जालें तें सरकारात कर्ज करार करून ठेविला मित्या —

रु॥

८८८७९।-। ऐन मुद्दल वैशाख शु॥ १ शके १७०० विलंबिनाम संवत्सरे

२८७०१॥>॥। व्याजा बा॥ च्यार मास वजा करून पक्की मिती भाद्रपद शु॥१ शके १७०० विलंबीनाम संवत्सरे.

११७१८१

एकूण एक लक्ष सत्राहजार एकशें एक्यायशीं रु॥ सदरहू मित्यांनीं घेतले यासी व्याज दरमाहे दरसदे रु॥ १ एकोत्रा शिरस्तेप्रमाणें करार केलें असे जाले मुदतीनें व्याज व मुद्दल हिशेब करून दिले जाईल जाणिजे छ २० साबान बहुत काय लिहिणें ? श्री लेखनसीमा

पत्रांक १९३ श्री १७८० आश्विन शुद्ध १

राजश्री लक्ष्मणपंत स्वामीचे सेवेसीं —

विनती उपरी छत्रपुरीं मुबईहून दोघे गृहस्थ आले त्यांणीं येथें पत्र पाठविलें कीं, तेथून पाच लक्षांची वरात फौजेच्या खर्चाची दिल्ही आहे तरी एक कारकून छत्रपुरास पाठवून देणें तो वरात पाहील, मग तुम्हांस रु॥ देणें असले तरी देणें नाहींतरी फिरंगीयास सांगू त्यांस यांनीं उत्तर लिहिलें, वरात व पत्रें कैशीं आहेत तीं घेऊन येणें म्हणोन कासीद गेला आहे उत्तर आलें नाहीं नागपुरी भोसल्यास सूत्र आहे त्याचा वकील हमेशां असळ आहे तूर्त चार महिने छावणी करून हा मुलुख कायिल करितात, म्हणोन लिहिलें तें कळलें ऐसीयासी, तिकडे सरदार शिवाजी विठ्ठल वगैरे सरकारचे व शिंदे होळकर याचे आहेत आणि शिंदे होळकरहि लौकरीच त्या मार्गे येणार, असें आहे ईश्वरइच्छेनें शत्रूचें पारपत्य होईल श्रीमंतांचा प्रताप थोर आहे रा॥ २९ साबान हे विनती

पत्रांक १९४ श्री १७०० आश्विन शुद्ध १

राजश्री लक्ष्मणपंत स्वामीचे सेवेसीं —

विनती उपरी तिकडील वर्तमान राजश्री श्रीमंत पुसतात त्यांस, कांहीं लिहित जावें, म्हणून लिहिलें त्यास, इकडील वर्तमान फाल्गुन मासीं रा॥

मोरोबा दादा फडणीस वाफगांवास जाऊन तेथून होळकर फौज सुद्धा व त्यांनींहि पाच हजार पावेतों ठेविली होती. रा॥ बजाबा पुरदरे व चिंतो विठ्ठल ऐसे पुण्यास येऊन येथील शिक्का कट्यार व निशाण घेऊन पुढें सासवडावर मुक्काम केला. मध्यस्त रा॥ सखारामपंत बापू व कृष्णराव बल्लाळ व माधवराव जाधवराय हे ऐसे येऊन, रा॥ नाना फडणीस यानीं व त्यानीं एक विचारें कामकारभार करावा ऐसें ठराविलें. त्याप्रों काहीं चाललें नाहीं. चैत्र व वैशाख दोन महिने तसेच रोखानें गेले. पुढें रा॥ हरीपत तात्या फौजसुधा कर्नाटकातून आले; व शिंदे कोल्हापुराकडे होते, तेहि आले. तेव्हा मसलत ठरून, याचा त्याचा बिघाड पडोन, मोरोबादादा यासीं नगरचे किल्यात ठेविलें. बज्याबा चदन किल्ला येथें ठेविलें. चिंतो विठ्ठल मुंबईस पा॥ होते ते तेथेंच आहेत. होळकर येथें आहेत. शिंद्याच्या लगामानें चालतात. उभयता सरदार येथें आहेत. इग्रजाचें पारपत्य उभयता सरदारानीं करावें, कर्नाटकात सखारामपत बापू व नाना यानीं फौजसुधा जावें, याप्रों मा॥र ठरला. फौजाची तयारी होत आहे. दसरा जालियावर मुहुर्त करून डेऱ्यास दाखल होणार. याप्रों मजकूर आहे. रा॥ आश्विन शुद्ध १ बहुत काय लिहिणें ? हे विनती.

---

पत्रांक १९५ श्री. १७०० आश्विन शुद्ध ६

राजश्री महिपतराव साठे गोसावी यासीः—

अखंडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्नो॥ माहादजी शिंदे दडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें व श्रीविश्वेश्वराचा प्रसाद पितांबर पाठविला तो राजश्री माधवराव गंगाधर याणीं पावता केला. श्रीचा प्रसाद पावोन सतोष जाहले. आपण इकडे येऊन भेटून जावें, ह्मणून लिहिले होतें; परतु, योग न घडला, परभारें जाणें जाहलें. महेश्वराहून पुढें जावयासी निघणें जाहलेंच असेल. स्वस्तिक्षेम पुण्यास पावल्याचें लेहून कळवावें. र ॥ छ४ रमजान. बहुत काय लिहिणें ? हे विनती. मोर्तब सूद.

श्री

जोतिस्वरूप चरणीं
तत्पर राणोजी सुत
माहादजी शिंदे निरं-
तर.

---

पत्रांक १९६ श्री १७०० आश्विन वद्य ४

राजश्री आनंदराव हाडे देशमुख सरकार सुभेर गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो हणमानजी जाधवराव रामराम विनंति येथील कुशल जाणून स्वकीय लिहित गेलें पाहिजे विशेष आपण पत्र पाठविलें तें पावोन सविस्तर वर्तमान विदित जालें तर्थरूप राजश्री जाधांचा मुहुर्त वसईस जावयाचा कर्तीचा आहे तो लेहून पाठवावें, ह्मणोन लिहिलें ऐशीयास, मसईच्या वाऱ्यावरी दहा फरकर्ते चोर व दाहा बारा हजार फिरंगी आला आहे, वसईवरी जावयाची दाटी फार आहे ह्मणोन श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांची पत्रें आलीं कीं, तुह्मी अविलंबें स्वार होऊन जाणें त्यावरून त्या मार्गे जावयाचा मजकूर राहिला उदैक आश्विन वद्य पंचमीस सोमवारीं भोजनोत्तर स्वार होऊन जाणार मुक्काम उदैक आळंदीचा आहे आपणास कळावें ह्मणून लिहिलें असे बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनंति

---

पत्रांक १९७ श्री १७०० मार्गशीर्ष शुद्ध ५

पु॥ राजश्री बाबूराव स्वामीचे सेवेसी —

विनंती उपरी ममईकर इंग्रज तीन चार पलटणें व कांहीं तोफा ऐसे कोकणांत उतरले पैकीं दोन तीन तोफा व कांहीं लोक घाटमाथा आले हें वर्तमान कळतांच राजश्री बापू व आह्मीं हुजूरातपुद्धां, शिंदे होळकर समेत, वानवडीवरून कूच करून तळेगावचे सुमारें त्यांचे रुखावर आलों फौजेची समजाविश कांहीं जाली कांहीं होत आहे हालीं इंग्रज कोंकणांत उतरले घांठावर आले त्याचें पारपत्य करणें कठीण नाहीं सत्वरच ईश्वरइच्छेनें तंबी होईल परंतु इंग्रजांचा विघाड आला हे गोष्ट खुली ! हिंदुस्थानांत पलटणें आलीं तथापि पडदा होता ते म्हणत होते कीं, आम्हांस ममईस जाणें, पंतप्रधान यांशीं विघाड नाहीं कलकत्याहूनहि पत्रें येत गेलीं त्यांतहि हाच भाव कीं, रावपंतप्रधान यांशीं करार व आहदिया जाला तोच मजूर ऐसें पडद्यानें होतें ते त्यांणीं होऊन, उघडी गोष्ट करून, शालुकियांत चाहून आले ! तेव्हां तंबी करणें प्राप्त इंग्रजी चाल प्रामाणिक ऐसें होतें ! तें त्यांणीं लोभामुळें सर्व सोडून मदनगर धरली ही गोष्ट दक्षणेस व दक्षणेंत नवाब, पंत प्रधान व भोंसले, हैदरखान सर्वांस वाईट ! चरकाची गत आणि इंग्रजांची चाल एक ! दौलतकर्ते दूरदेशी आहेत तेच हें समजतील कीं, ही गोष्ट वाईट आहे ज्या राज्यांत टोपीकरांची चाल जाली तेथील गति काय, हें कांहीं लोपलें नाहीं ! याचा विचार राजश्री दियाकरपंतदादा यांणीं काय केला ? इंग्रजी चाल दक्षणेंसीस मोडणें, त्याचा कबजा न होणें, याची तन्हा व सलाह कशी योजिली, हें त्यांस पुसोन, काय मसलत सांगतात, फरिवाद

विदित नाहीं नवाबाकडील पत्रें आलीं होतीं त्यांत त्यांनीं कायम मिजाजी पेंच लिहिलें होतें राजश्री शिवाजीपंत यांचेंहि पत्र आपणास आहे दगाजीपंत यांणीं लिहिलें होतें कीं, नवाब श्रीमंतांकडे अनुकूल, फौजांची तयारी करविली आहे, परंतु सदेहांत आहेत, इंग्रेजाशीं विघाड श्रीमंताचा आहे, आपण निराळे आहों, त्यास कसें होईल, याजकरितां अंतस्त दोन्हीं सूत्रें ठीक, उघड श्रीमंताचा पक्ष ऐसें बोलतात, ऐसें लिहिलें होतें त्यावरून आह्मांस ह्मणों लागले कीं, नवाब आपला ह्मणतां, त्यास आइकिलें कीं! आह्मीं उत्तर केलें कीं, या दिवसांत नवाबानीं फार केली तेव्हां ह्मणों लागले कीं, आह्मीं कांहीं केली नाहीं आह्मीं उत्तर केलें कीं, तुह्मीं केल्याची खुण काय करणें, नवाब परकी, हिंदुमुसलमान हे दोन पक्ष वैरभाव मगरुब निर्मित आहे, या अर्थी त्यानीं फार केली, तुह्मीं केल्याचें आश्चर्य काय, हे दौलत आणि ते दौलत दोन ईंच लक्ष आमचे घरीं नाहीं, त्यानीं करावें तेंच तुह्मीं करावें ऐसें आहे ऐसें किरकोळ भाषण जाहलें तेव्हां तेथें काय उत्तर करितात! इंग्रज गाडरकडून एक आला आहे कलकत्यास जाणार. त्यास यांचें त्याचें बोलणें होऊन आलें यांनीं गाडरास व कलकत्यास व जगाकडे पत्रें या वर्तमानाचीं लिहिलीं आहेत मल्हारीकडील हुंडी पटली कीं नाहीं, ह्मणोन लिहिलें हुंडी पटेल गुंता नाहीं परंतु तुह्मीं तेथें गेल्यावर ऐवज कोणीकडे उतरावा, तें लिहिलें पाहिजे हुंडी पाच सात दिवसांत पटेल गुता नाहीं तुह्मी सत्वर यावें सविस्तर वृत्त त्याहावें बहुत काय लिहिणें! लोभ कीजे हे आशिर्वाद राजश्री शिवाजीपंत यांस फडणिशीचीं वस्त्रें शुद्ध पंचमीस दिल्हीं अद्यापि बंदोबस्त कांहीं नाहीं तिकडे रवाना करणार ते समीत काय होईल तें लिहून पाठऊं हे आशीर्वाद

---

पत्रांक २०० श्रीशंकर १७०० माघ शुद्ध १०

*राजश्रियाविराजितराजमान्य राजश्री बापूराववजी स्वामीचे सेवेसीं —*

पो। शिवाजी माहादेव काणे साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल माघ शुद्ध १० पावेतों मुकाम नागपूर येथें सुखरूप असों विशेष आपण गेलिया तागाईत पत्र पाठऊन समाचार न घेतला! तर मातें विस्मरण व्हावें हें नव्हतें परंतु का जालें हें नकळे! तर ऐसें नसावें सदैव पत्र पाठऊन सांभाळ करीत गेलें पाहिजे यानंतर आपण गेलियावर एकदा दोनदा निरोप जाऊन मागितला परंतु प्रेमाचींच भाषणें केलीं नंतर श्रीमंतांकडे जाऊन, एक प्रहर बहुतां प्रकारें भाषण करून काम यावेंसें ठरऊन आले मग मज ला बोलाऊन नेऊन सांगितलें कीं, श्रीमंतांची मर्जी तुह्मांवर प्रसन्न करून आलों आणि बहुत प्रकारें बोलिले त्याजवर श्री पंचमीस आपण येऊन वस्त्रें फडणिशीचीं दिल्हीं हुजरे लागून दामाजीपंताबरोबर पाठविलें कीं, जे पूर्वी

तुदामत याजकडे काम असेल त्याप्रो द्यावें. त्यात उकरावयाचें नाहीं. मग आह्मांशीं बोलिले कीं, बळवतराव यास पाठवितों, तुह्मींहि जावे, ह्मणजे माझी खातरजमा आहे. कबूल केलें. तो सर्व प्रकार मागील पत्रीं लिहिला आहे, त्याजवरून कळेल. प्रस्तुत तिकडील वर्तमान फार चागले आलें. त्याजपासून येथें लक्षुमणपतदादा यांचा प्रेमा पूर्ववत्प्रमाणे करून द्यावयाचे सधानात आहे. ईश्वर घडवील तें खरें. फार सट्ट तुजावर आहेत. जो सदेह आपणापाशीं आह्मी जाते समई घेतला तो खरा शोध लागला. कळावें. आपण तेथें यांच्या गोष्टी सगेटीच्याच बोलाव्या. त्या येथें तानकोबाने ह्मतें येथें कळाव्या. तो असेल त्या समई श्रीमतांशीं चागलें बोलावे कीं, येथे ऐकून दुःसदेह येत नाहीं. येथें आह्मी प्रतिज्ञा करून दादापाशीं बोलिलों कीं, रावजी आपला प्रकार ईषत् मात्र व्यग बोलणार नाहींत. आमचे त्याचें मात्र न बने. यास कारण, दैव अथवा शनैश्वर आला हें नकळे, असें आपल्या प्रत्ययास रावजींचें बोलणें येईल तैसें घडावें. आह्मास पाटवावयाचा सिद्धात आहे. वद्य पचमीस मुहूर्त आहे. मध्यें बळवतराव यास मुहूर्तच नव्हता. यास्तव निघण्याचा विलब मात जाला. कळावें. श्रीमत राजश्री नाना यास पत्र लिहिलें आहे तें पावेल. आपण तेथें आहेत तेव्हां मीं काय लिहू ? सर्व आपण मागे केलें तैसें करतील. रावजी शेवटचे ऐसें जे जाले त्याचा बयान काय लिहू ? इंग्रजास ऐसी शिकस्ती कोणी दिल्ही नव्हती. शिकस्ती देऊन आपला तोरा जाया न होता आला, हें केवढें जालें ? यास जोडा नाहीं. श्रीमत राजश्री रावसाहेबाचे प्रतापास उपमाच नाहीं. गर्भापासून कृष्णचरित्रासारिखेच जाले ! ध्यानास आणावें. धर्म रक्षावयास ईश्वर साह्य खरा ! हें आता पटलें. कळावें बहुत काय लिहिणें ? कृपा लोभ करीत गेलें पाहिजे. ही विनंति. इ० इ०

---

1778

पत्रांक २०१. श्री. (नकल) १७०० माघ वद्य ३.

करार जाबता शपतपूर्वक राजश्री दादासाहेब याचाः—

राजश्री माधवराव नारायण पत प्रधान यांणीं विद्यमान राजश्री तुकोजी होळकर व माहादजी शिंदे सुा तिसा सबैन मया व अलफ. तुह्मांआह्मांशीं नानाप्रकारे विग्रह राज्यलोभास्तव वाढोन आह्मीं दौलत साधावी यास्तव प्रयत्न बहुत केला. इंग्रजाकडे जाऊन त्यास साह्य करून बरोबर घेऊन इदुरीतळेगावपर्यंत आलों. परस्परें लढाईचा प्रसग घडला. अदेशा पाहता आपण राज्यलोभाविष्ट झाल्यानें इंग्रजाकडे दौलत जाती असें जाणून उभयता सरदाराकडे आलों. सरदारानीं खर्चाची बेगमी करून देतों आणि स्नानसंध्या करून स्वस्थ राहावें असे सागितलें. त्याप्रमाणें मान्य करून खर्चाची बेगमी अलाहिदा नेमणुकेप्रमाणें नक्की बारा लक्षाची जागा लाऊन दिली. ती आपण घेऊन, स्नानसध्या करून, झांशीस राहून, राज्याचा लोभ धरून दौलतीचा

पारखा करणार नाहीं, व दौलतीस धोकों पडे असें आचरण आसां पासून होणार नाहीं नेमणूक करून दिल्ही त्यांत तत्कालक्षेप करून स्वस्थ राहूं तुह्मी पतप्रधान राज्याचे धणी व चिरंजीव बाजीराव रघुनाथ तुमचे कार भारी करून यावे, असें उभयता सरदाराचे व आमचे विचारें ठरून, आह्मीं मान्य जालों तुह्मीं व चिरंजीव बाजीराव यांणीं तीर्थरूप कैलासवासी नानासाहेब व भाऊसाहेब धणी व कारभारी या अन्वयें वर्तत होते त्याप्रमाणें प्रबुद्धपणं आलियावर परस्परें वर्तावें स्वामीसेवकधर्म उभयतांनीं अन्योन्य नि कपटपणें चालवावा धणीपणाची व कारभाराची पुस्तपन्हा तुह्मीं उभय ताची उभयता सरदार करितील आह्मीं या दौलतसंबंधीं कारभाराच्या प्रक रणांत एकदर मन घालणार नाहीं वर्तणुकेच्या कलमबंदीची याद अलाहिदा लिहून दिली आहे त्याप्रमाणें आचरण करू. उभयतां सरदारांचे विद्यमानें परस्परें करार ठरले आहेत, त्याप्रमाणें तुह्मांकडून अमलांत यावें आह्मांक डूनहि अमलांत येईल यांत अतर करूं तर श्रीशवाची व गंगाभागीरथीची शपथ असे जाणिजे छ १५ माहे मोहरम, सुा तिसा समैन मया व अलफ मुकाम हदुरी तळेगांव

---

पत्रांक २०२ श्री १७०१ चैत्र शुद्ध १

हिशेब सुा साहूकार बा रामजी गाहादजी शिंदे यांजकडे ऐवज येणें सुा तिसा समैन मया व अलफ शके १७०१ चैत्र शुा प्रतिपदा रुा

५६४२९।।। बा खत ऐन मुद्दल व व्याज रुा

११०८७ ऐन मुद्दल मिति कार्तिक शुा २ शके १६९२

बा खत

२५३४२।।। व्याज ता शके १७०१ चैत्र शुा १ सुा माहे एकूण कच्चे २७६४६७० दर सदे रुा एक मो रुा २७६४६।।॰ पौ वजा वाटेना रुा २३०३।।।॰ बाकी व्याज रुा

---

५६४२९।।।

१४४०५। पेशजी हिशेब जाला ते समईची कलमें व्याज बा ऐवज रुा

१००० बैकाजी नाईक मनसबदार बाब शिंदे यांणी वाबयासी केले आहेत रुा

१८०० लास रुपयांची वराव शिंदे यांणी रायपूर येथें कार्तिक शुा १ चे मुदतीची दिल्ही मुदतीस ऐवज न पावला तर ऐवज पावेल ते मुदती पावतों व्याज घ्यावयाचा करार आहे

सरदाराची रवानगी होईल तथापि छावणी देशी होऊन, उपरान्त त्याजों येतील—कळावें रा छ ११ रोवल बहुत काय लिहिणें ! लोभ असों दीजे हे विनंती

---

पत्रांक २०४ श्री १७०१ ज्येष्ठ वद्य १

राजश्री फत्तेसिंग गायकवाड समशेरबहादूर गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो रघुनाथ बाजीराव आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित आर्से बहुत दिवस तुम्हांकडील पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी सविस्तर लिहिणें इकडील मजकूर तरी खासा स्वारीबराबर हरी बाबाजी व राजश्री महादजी शिंदे यामकडील सरदार होते त्यांणीं बहुत अमर्यादा केली त्यामुळें त्यांचें पारपत्य करून, खासा स्वारी तिकडे येत आहे त्यासीं तुम्ही शहाणे माणूस, कारस्थानी आहां, यामकरितां तुम्हांकडे येत आहों यासी, येविशीं तुमची सल्लाह कशी काय ते लेहून पाठवणें तिकडे आल्यावरी तुमच्या विचारें जसा मनसबा करणें तसा केला जाईल आणिजे छ १४ समादिलावल इंग्रेज आम्हांस सामील आहेत तें तुम्हांस ठाऊकच आहे त्याचीहि फौज बोलाविली आहे तेहि लौकरच येऊन पोंहचतील बहुत काय लिहिणें !

---

पत्रांक २०५ श्री १७०१ अधिक श्रावण शुद्ध ११

राजश्री पंत प्रधान गोसावी यांसी —

श्रीसकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर दंडवत विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत आर्सिलें पाहिजे विशेष सांप्रत इकडील वर्तमान राजश्री दादासाहेब सुरतेस शहरांत आहेत इंग्रेजांकडील सरंजाम तापीदक्षणतीरीं रयतेचीं घरें मोडून, नवीन इमारत उभी करून लोकांच्या घरांत छावणी केली आहे यामुळें लोक परागंदा होऊन गेले छावणी आबादीस ठिकाण नाहीं माहाल सराय, येथिरास आले रयतेस उपद्रव पुढील मरवसा न पुरे. यामकरितां तमाम माहाल उज्याड जाहाले हालीं राजश्री दादासाहेब यांणीं अमदाबाद, बडोदें व मुंबईकडे राजाराम गोविंद याची रवानगीचा विचार ठरवला शहराबाहेर येऊन राहिले होते ते मवकूब होऊन, गाडुदीखान याची उभारणीचा निश्चय करून, नर्मदा अलीकडील बंदोबस्ताकरितां पाठवावें समागमें, सरंजाम, पलटणें व स्वार व तोफा देऊन पाठविणार, म्हणोन बातमी आली आहे अद्याप तेथेंच आहेत, इकडे येऊन परेशा करणार. ये विशींचा बंदोबस्त ठेविला पाहिजे स्वस्थतेचा अथ

कांहीं दिसोन येत नाहीं. याजकरिता महीपलीकडे खंबायतकराच्या तोंडावर तीन हजार फौज पेशर्जी रवाना केलीच आहे. सुरत प्रांतीं थोडी बहुत फौज आहे. आह्मीहि मासपक्षांत निघावयाचे तरतुदींत आहों. परतु फौजेचा देण्याचा पेंच तीन वर्षांचा जाला. त्याचा गवगवा पडला आहे. याची सोय करून निघावयाचें होईल. सरकारच्या फौजेची रवानगी होऊन लौकर आल्यास उत्तम आहे. वरकड तिकडील बातमी जैसी येत जाईल तैसी मागाहून लिहून पाठऊ. रवाना छ १० माहे रजब. बहुत काय लिहिणें? लोभ करावा. हे विनती. मोर्तब सुद.

श्री राजा शाहु नरपति
चरणीं तत्पर फत्तेसिंग
गायकवाड सेनाखास-
खेल समशेरबहादर:

---

पत्रांक २०६. श्री. १७०१ अधिक श्रावण शुद्ध ११

राजश्री महादजी बाबा शिंदे गोसावी यांसी:—

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर रामराम विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. साप्रत्य इकडील वर्तमान राजश्री दादासाहेब सुरतेस शहरात आहेत. इंग्रजाकडील सरंजाम तापी दक्षण तीरीं आहे. रयतेचीं घरें मोडून, इमारत नवीन उभी करून, लोकाच्या घरात छावणी केली आहे. याजमुळें लोक परागंदा होऊन गेले. लावणी आबादीस ठिकाण नाहीं. माहाल खराब, बेचीराख जाले. रयतेस उपद्रव. पुढील भरवसा न पुरे. तमाम माहाल उज्याड जाले. हालीं राजश्री दादासाहेब यांणीं अमदाबाद, बडोदें व डभईकडे राजाराम गोविंद यांची रवानगीचा विचार ठरविला. शहराबाहीर येऊन राहिले होते, ते तटकून देऊन, गाजुदीखान यांची उभारणी करावयाचा निश्चय करून, नर्मदा अलीकडील बंदोबस्ताकरिता पाठवावें, समागमें सरजाम पलटणें व स्वार व तोफा देऊन पाठविणार, ह्मणोन बातमी आली आहे. अद्याप तेथेंच आहेत. इकडे येऊन बखेडा करणार येविशींचा बंदोबस्त ठेविला पाहिजे. सरकारचा अर्थ कांहीं दिसोन येत नाहीं. याजकरिता महीपलीकडे खंबायतकराचे तोंडावर तीन

हमार फौज पेशजी रवाना केलीच आहे सुरतप्रांतींहि योडीबहुत फौज आहे आहीं मासपर्यंत निभावयाचे तरतुदींत आहों फौजेचा देण्याचा पेंच तीन वर्षांचा आला त्याचा गवगवा पडला आहे त्याची सोय करून निभावयाचें होईल सरकारच्या फौजेची रवानगी होऊन लौकर आल्यास, उत्तम आहे वरकड तिकडील बातमी जैसी येत जाईल, तैसी मागाहून लेहून पाठवु कळावें रवाना छ १० माहे रजब बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे विनंती मोर्तबसुद

---

पत्रांक २०७ श्री १७०१ अधिक श्रावण वद्य १

राजश्री वेंकटपती तिमया नायडू सस्थानक गोंदी गोसावी यासी —

अखंडीतलक्ष्मीअलकृत राजमान्य स्नो माधवराव नारायण प्रधान आशी र्वाद सुा समानीन मया व अलफ राजश्री बाबाजी गोविंद याचें कर्ज सुभा णा गिरमाजी व पांडुरंग गिरमाजी हरकारे यासकडे त्रिंबकराव विश्वनाथ यांचे विद्यमानचे स्वारीचें येणें आहे त्यास, सन अर्बासबैनांत सुभाणा गिरमाजी यास आणिलें तें समई त्यांणीं करार केला कीं महिन्यामधर्ये अर्काटहून हुंडी करून ऐवज पाठवितों. असें असतां अद्याप हुंडी आली नाहीं व मायसाल देखील पाठविला नाहीं, म्हणोन हुजूर विदित जालें ऐशियास, येविशींचें काम रा बनाजी गोविंद कारकून यांस सांगोन पाठविलें आहे तरी, तुम्हीं सुभाणा गिरमाजी व पांडुरग गिरमाजी यांस बरे यत्नेंनें ताकीद करून, मार, निसबेचा याजवी लताप्रमाणें व्याजसुद्धां हिशेब होईल तो ऐवज अर्काटचे सरा फांत भरून, हुंडी करून, पुणियास जलद पाठऊन देणें या कामास दिवसगत न लावणें जाणिजे छ १७ रजब आज्ञाप्रमाण लेखनसीमा

श्री

राजाशाहु नरपती हर्ष

निधान माधवराव नारा

यण मुख्य प्रधान ॥

---

पत्रांक २०८. श्री. १७०१ अधिक श्रावण वद्य ९

राजश्री पतप्रधान गोसावी यांसी:—

श्रीसकलगुणालकरणअखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्ना॰ फत्तेसिगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहाद्दर दडवत विनर्त येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान राजश्री दादासाहेब व इग्रेज याजकडील पेशजी तिकडून बातमी येत गेली त्याप्रमाणे आपणाकडे लेहून पाठविले, त्यावरून ध्यानास आले असेल. सुरत प्राती माहालोमाहाली ठाणी बसऊन कमावीसदार पाठविले होते. डभईस आपाजी आईतोळे याजबरोबर सरजाम देऊन रवाना केले. थोडा बहुत सामान समागमे घेऊन, नर्मदा उतरून, झाडेश्वरी आले, ते माघारे सुरतेकडे गेले. गाजुदीखान याजला अमदाबाद बडोदे महीपार पाठवावें, ऐसे होते. ते मसलत तूर्त राहिली. हाली बातमी आली कीं, इग्रेज याणी अष्ठाविसींतील कमाविसदार बलाऊन घेतले. मसलतीचा मजकूर कळणियात आला नाहीं. काय ठरलियात आला असेल तो खरा. आह्मी बाहिर निघावयाचे तरतुदींत आहों. फौजेच्या देण्याचा पेंच तीं वर्षांचा पडला आहे. लोकानीं गवगवा फार केला आहे. याची समजोती काढोन निघावयाचें होईल. सुरतेकडील बातमी जैसी येईल तैसी लिहून पाठऊ. रवाना छ २३ माहे रजब. बहुत काय लिहिणे? लोभ करावा हे विनती. मोर्तबसुद.




---

पत्रांक २०९. श्री. १७०१ अधिक श्रावण वद्य १०

राजश्री हरीपत तात्या गोसावी यांसी:—

अखडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ना॰ फत्तेसिंगरावें गायकवाड सेनाखासखेल समशेरबाहाद्दर दडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असले पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान राजश्री दादासाहेब व इंग्रज यांजकडील पेसजीं तिकडून बातमी येत गेली. त्याप्रमाणे

आपणाकडे लिहून पाठविलें त्यावरून कळलें असेल सुरत प्रांतीं माहालो माहालीं त्याणीं ठाणीं बसविलीं होतीं बमईस आपाजी आईतोळे याजला सरंजाम देऊन पाठविलें थोडाबहुत सामान समागमें घेऊन नर्मदा नदी उतरून शाडेश्वरीं आले, ते भाषारे उतरून सुरतेकडे गेले गाडुदीखान यासीं अमदाबाद व बडोदें महीपार पाठवावें, ऐसें होतें ते मसलत दूर्वे राहिली सांप्रत, बातमी आली कीं, इंग्रजानीं अठाविसींतील कमावीसदार बोलावून घेतले मसलतीचा मजकूर कळलियांत आला नाहीं, ठरल्यात आला असेल तो सरा आम्हीं बाहिर निघावयाचे तरतुदींत आहों फौजेचा देण्याचा पेंच तीं वर्षांचा पडला आहे लोकानीं गवगवा बहुत केला आहे याची समजोवि काढोन निघावयाचें होईल परकड बातमी सिकडील येईल तैसी लिहून पाठवू छ २४ माहे रजब बहुत काय लिहिणें! लोभ कीजे हे विनंती मोर्तबसुद




---

पत्रांक २१० श्री १७०१ श्रावण शुद्ध ४

राजश्री पंतप्रधान गोसावी यांसी —

श्रीसकळगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर दंडवत विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असिलें पाहिजे विशेष रामभी संताजी ना गेझ येथें आले त्यास दरबारचे वगैरे आपजाल पुसिले येथून दरबारचे भरण्यास ऐवज दरसाल देत गेलों ता सरकारांत न पायतां सरकारचा पेंच तसाच राहिला असेंहि असतां, इतके दिवस चालविलें पुढें आमचे ग पांतील पेंच भारनिल्देचा पहिलेपासून बखेडेखोर कारभार. या अर्थी याचा

बंदोबस्त करणें आला. येविसीचें सविस्तर राजश्री बाळाजी नाईक निवेदन करतील. त्यावरून विदित होईल. रा छ २ माहे शाबान. बहुत काय लिहिणें ? लोभ करावा हे विनती. मोर्तबसुद.




---

पत्रांक २११ श्री. १७०१ श्रावण शुद्ध ४

राजश्री हरीपंत तात्या गोसावी यासी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्रो फतेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहाद्दर दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिले पाहिजे. विशेष. राजश्री अताजी नागेश येथें आले. त्यास, आजपर्यंत सर्व प्रकारे येखतीयार मारनिलेवर ठेऊन चाललों. इकडे आह्मी मसलतसीर, असेहि असता, दरबारची पुरवणी करीत गेले. आजपर्यंत दरबारचा गुता उरकावा, व राजश्री बाळाजी नाईकाचे देण्याची तोड निघावी, याप्रों येथून पुरावा केला. असें असता, दरबारचा व नाईकाचे देण्याचा पेंच तसाच राहिला. याचें येणें येथें न जालें. यामुळे दरबारचा जाब समजल्यांत न आला. गुदस्ता तिकडून आह्माकडे आले. त्यास, आह्मास न भेटता माघारे गेले. ते डुसाणीयास जाऊन बसले. दरबारींहि न गेले. दरबारचा शोध त्याशिवाय मनास आणावा तरी, हे पहिलेपासून बखेडेखोर. आह्मी मसलतसीर. घरातील खुळें नानाप्रकार्चीं. फौजेचा पेंच. चहूकडे बखेडे. त्याअर्थीं काहीच मनास न आणिता चालविलें. पुढे पाहतां कोण्हे एक गोष्टीनें परिणाम दिसोन न आला. यामुळें मारनिलेचा बंदोबस्त करणें प्राप्त जाले. येविसीचे सविस्तर राजश्री बाळाजी नाईक निवेदन करतील. तें ध्यानांत आणून, बंदोबस्त करुन दिल्हा पाहिजे. तात्या ! आमचा तुमचा भाऊपणा. त्यापक्षीं तुह्मीं सांगितलें त्याप्रों तेच लक्ष धरून इतके दिवस काहाडले. पुढें परिणाम सुध दिसों न आला. यास्तव हें करणे प्राप्त

हे अनभव आपल्यास आले असतील सर्व मयसा आपला आहे या छ २ माहे शाबान महुत काय लिा! लोभ कीजे हे विनंती मोर्तबसुद शिका (मार्गे दिल्याप्रमाणें)

---

पत्रांक २१२ श्री १७०१ श्रावण शुद्ध ४

पो मिती श्रावण वद्य २ रविवार.

श्रीमत राजश्री बाळाजी नाईक नाना स्वामीचे सेवेसीं —

सेवक गोविंद गोपाळ कृतानेक सा नमस्कार विनंती येथील कुशल ता छ २ माहे शाबान पावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष आपणाकडे पे शव्जी भास्करपंतास पाठविलें त्या पत्राचीं उत्तरें आपण आषाढ शुद्ध २ पाठविलीं व हालीं शुद्ध ३ आलीं त्यास, पहिलीं पत्रें आशाढ वद्य ११ चीं साहा दिवसांचे वाईयाचीं तीं पावलीं नाहींत द्वितीयेचे पत्राचीं उत्तरें पाठ विलीं तीं पावलींच असतील त्यावरून कळलें असेल राजश्री भवोबा वा यांचा मजकूर तेथून भास्करपताचे पत्रीं लिा कीं, तूर्त जलदी न करावी मुसाप्याकडील बदोबस्त जाल्यावरी उपरात करणें तें करावें आमचें लक्ष त्यांचे ठाई दुसरें नव्हतें परंतु यजमानाचें त्याचें दिवसें दिवस वांकडें पडत चाललें आण आपण पत्रें साहा रोजांचे मुदतीचीं पाठविलीं तीं पत्रें आह्मास न पावलीं व कासिदाचें ठिकाण नाहीं तीं पत्रें त्यांस सांपडलीं कशावरून ह्मणावें! तरी बापूजी नरसी याजपाशीं आपले पत्रांतील मजकूर बोलले ते मध्यारनिलेनीं आजपर्यंत आम्हांशीं बोलले नव्हते तें प्रस्तुत सविस्तर सां गितलें व त्या गृहस्थाची धैर्या एक प्रकारची दिसून आली येथील सद्य याचा प्रकार कांहींच पडल्यांत नव्हता, आपलीं पत्रें आलीं त्याचें ठिकाण नाहीं यांचा प्रकार निघोन जावयाचा यजमानास समजला तेव्हां यजमानानें बदोबस्त केला दुसरें, राजश्री बापूजीपताशीं बोलून त्याचें उत्तर पाठवावें, ह्मणजे सरकारचीं पत्रें पाठवितों, दरबारचा बदोबस्त केला आहे, ह्मणोन लिहिलें त्यास, याचीं उत्तरें पेशजीं आपणास लिहिलें होतें कीं, बापूजीपंत मारानिल्हेचे ममतेंत, यामुळें आम्हीं त्यांशीं बोललों नाहीं उभयपक्षीं परस्परें संशय परंतु पेसजीं आपली चिठी आली, व हालींहि पत्रीं लिा, यामुळें बा पूजीपंताशीं ममतेचें बोलून चिठी दाखविली याजवर त्यानीं आह्मांस सांगि तलें कीं, जें आमचें यजमानाचें लक्ष तेंच आमचें, दुसरा विचार नाहीं ह्म णून यांचें व आमचें बोलणें जालें पेशव्याचा मजकूर स्वागत व सरकारचा जायताब त्यास सरकारचें लक्ष राहून आपली सचोटी राहावी, याअर्थी सर्व प्रकारें येथील घोट सोसून, पेशव्याचा मरणा करीत गेलों याचे अर्थ सर्व ध्यानात असतील व पुढें समजतील दरबारची घोट निघावी व आपले दे ण्याचा मार्ग निघाला पाहिजे त्यास, येथील प्रकार दौलत सर्व प्रकारें

वोढीस आली. शिबंदीचे व शिलेदाराचे नित्य तटे ! अशांतहि दरबारचा व आपले देण्याचा मार्ग काढिला पाहिजे. त्याचे तरतुदींत आहो. परतु निभाऊन घेणें सर्व आपणाकडे आहे. येथील रड लिहितात, असे आपल्या समजल्यांत येईल. त्यास, परभारें समजलें ते खरें. आह्मी काहीं कारभारी नाहीं. दरबारी आपल्याशिवाय दुसरियास जाणत नाहीं. सर्व कारभार आपला व दौलतीचें सरक्षण करणे आपणाकडेसच आहे. आपले आज्ञेशिवाय दुसरा विचार नाहीं. आपली आज्ञा तें प्रमाण. आज्ञा प्रो वर्तणूक घडेल. वरकड सविस्तर राजश्री बापोजी नरसी लिहितील, त्याजवरून कळेल. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

पत्राक २१३. श्री. (नकल) १७०१ श्रावण शुद्ध ४

राजश्री गोदवा स्वामीचे सेवेसीं.–

विनती उपरी. तुह्मी श्रीमत राजश्री नानास व राजश्री बाळाजी नाईक नानास पत्रें पा ते पाहून वर्तमान कळले. लिहिल्याप्रमाणें सरकारचे ऐवजाचा निकाल पडल्यास सारी प्रमाणिकता आहे. नाईक पुष्कळ खातरजमा करितात. परतु, श्रीमताचे प्रत्ययास आले पाहिजे की नको ? येविशीची काळजी धरून सरकारचा निकाल लवकर पडेसें करावें. सविस्तर नाईकाचे लिहिल्यावरून कळेल. वधूविशीं काळजी न करावी. तजविजेने आणऊ. शिलेदाराचा मजकूर कसकसा आहे तो लिहून पाटवावा. रा छ २ साबान. बहुत काय लिहिणें ? लोभ असो दीजे. हे विनती.

रा गिती भाद्रपद शुद्ध* २ रविवार.

---

पत्रांक २१४. श्री. १७०१ श्रावण शुद्ध ६

श्रीमत राजश्री बाळाजी नाईक नाना स्वामीचे सेवेसीं:—

पोष्य बाळाजी महादेव सा नमस्कार विनति. येथील कुशल ता छ ४ साबान मुकाम वडोदे यथास्थित असे विशेष. येथून राजश्री बापूजीपत यानीं आपल्यास पत्र लिा आहे. त्याजवरून सविस्तर समजेल व आह्मीं आपल्या लाखोटियात श्रीमित राजश्री तात्यास पत्रे लिहिलीं आहेत तीं आपण पाहून एकानीं तात्यास द्यावीं. सर्व बदोबस्त येथिल आपल्याकडे आहे. आह्मीं ल्याहावें असे नाहीं. बहुत काय लिहिणे ! कृपालोभ असों दीजे हे विनती.

---

* पत्र छ २ साबान ह्मणजे श्रावण शुद्ध चतुर्थीला लिहून ठेविलें व रवाना भाद्रपद शुद्ध २ ला ह्मणजे पुढे सुमारें महिन्याने केलें, असें दिसतें.

पत्रांक २१५ श्री १७०१ श्रावण शुद्ध ११

राजश्री हरीपत तात्या गोसावी यास —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखास खेल समशेरबहाद्दर दंडवत× विनती येथील कुशल आणून स्वकीये कुशल लिहित असिलें पाहिजे विशेष राजश्री भताजी नागेश येथें आले त्यांस आजपर्यंत सर्वप्रकारें येस्तीयार मारनिल्हेवर ठेऊन चालतों इकडे आम्हीं मसलतधीर असेंही असतां दरबारची पुरवणी करीत गेलों आजपर्यंत दरबारचा गुंता उरकावा व राजश्री बाळाजी नाईक याचे देण्याची सोड निघावी, याप्रमाणें येथून पुरावा केला ऐसें असतां, दरबारचा व नाइकाचे देण्याचा पेंच तसाच राहिला यांचें येणें येयें न जालें यामुळें दरबारचा आबसाल समजस्यांत न आला गुदस्ता तिकडोन आसोकडे आले त्यास, आम्हांस न भेटतां माघारे गेले, तो कुसाणीयास जाऊन बसून राहिले दरबारींहि गेले नाहीं दरबारचा बोध त्यांशिवाय मनास न आणावा, हरी हे पहिलेपासून बसेडे खोर. आम्हीं मसलतधीर घरातील खुळें नानाप्रकारचीं फौजेचे पेंच, पहूकडे बखेडे त्यामयीं कांहींच मनास न आणितां चालविलें पुढें पाहतां, कोण्हे एक गोष्टीनें परिणाम दिसोन न आला यामुळें मारनिल्हेचा बंदोबस्त करणें प्राप्त जाला ये विशींचें सविस्तर राजश्री बाळाजी नाईक निवेदन करितील तें ध्यानांत आणून, बदोबस्त करून दिला पाहिजे सर्व भरवसा आपला आहे रा छ ९ माहे शाबान बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे हे विनंती मोर्तबसुद

शिका मागें दिल्या प्रमाणें

---

पत्रांक २१६ श्री १७०१ श्रावण वद्य ३

राजश्रियायिराजित राजमान्य राजश्री गोंदया स्वामी गोसावी यांसी —

पोष्य बाळाजी नाइक मिंडे कृतानेक नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असावें विशेष तुम्हीं पत्रें लिहिलीं त्या अन्वयावरून शिंदे व होळकर यांनीं गोविंदराव यांचे पेंच वाटणीचे घातले होते ते सरकारामून दूर करविले आणि तुम्हीं लिहिल्याअन्वयें सर कारच्या कारभाराचा ठराव करून घनशाम नारायण व गोपाळराव रामचंद्र व बापू नरसी यांची रवानगी मुदांफडे केली त्यास पांचा महिन्यानें मान्यपत्रें पाठविलीं म्हणून लिहिलें त्यास, हा छमाचा कारभार म्हणऊन सरकारांत मान्यपत्रें पाठविलींत ? कीं सरकारचा कारभार जो केला त्या मुदतीमधीं रुपये न पाठवितां ययान लाऊन लिहिलां ! हें बरें कीं काय ? तुमच्या लि हिल्यावरून या कामांत आम्हीं येऊन ठरावांत आणिलें त्याचें फळ कीं सर

कारांत बसाऊन फजित करितात. आणि तुह्मी बडोद्यामध्ये स्वस्थ बसावें. शिवदीने व रणजाने बयान मानून लिहिता, हें अपूर्व आहे! त्यास हालीं सरकारांतून राघो गोविंद पाठविले आहेत. तर पत्रदर्शनीं ऐवज देऊन याची रवानगी करावी. तुह्मी तों लिहित नाहीं. परंतु बाहेर ऐकतों कीं, तुमचे यजमान तुमचे स्वाधीन नाहींत. ऐसें असतां, आज्ञान कारभार चिटेस लाऊन त्याचा जाणऊन आज्ञान लिहित होतेत ते कशास? आता लिहिलेत, तर हरतजवीज करून सरकारचा कारभार निर्गमास आणतां उत्तम आहे. न आणिल्यास तुमची स्थित राहणार नाहीं. हें स्पष्ट समजऊन वर्तावें. यातच उत्तम आहे. निमित्य आपले जातीवर न घ्यावें.

विनंति उपरी. घनश्याम उभयतां अतोबाकडील दोघे गेंथ घेऊन, आहास भेऊन सरकारचा कारभार चिटेस लाऊन, सरकारचे कागदपत्र घेऊन गेल्यास आज दा महिने होत आले. तर कारभारीयास आपण ताकिद करून आदवज सरकारच्या करारप्रां पाठवावा, तो न आला. ठराव आपले मतें केला कीं आपले आज्ञेनें केला, हें आह्मास कांहींच कळत नाहीं. तर, हालीं राजश्री राघो गोविंद सरकारांतून पाठविले आहेत. तर करारप्रां ऐवज देऊन याची रवानगी करावी. न केल्यास आपले दौलतीस पेंच पडेल, हें पुरतेपणीं चित्तीं आणून वर्तावें.

---

पत्रांक २१७ श्री १७०१ श्रावण वद्य ५

राजश्री हरीपंत तात्या गोसावी यांसीः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर दंडवत विनंति. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान दोन तीन पत्रीं आपणास लिहिलें आहे. त्यावरून ध्यानास आलें असेल. सरकारी वोढगस्त जाली. सरकार ऐवजाची निकड. याचा फडशा व्हावा. अर्थी सर्व प्रकारें वोढ सोसून ऐवजाचा पुरावा करीत गेलों. ऐसें असतां राजश्री अंताजी नागेश यांणीं सरकार व सावकार सचोटी राखिली नाहीं. हें मनास आणावें तरी आह्मी मसलतसीर आणि घरातील नाना प्रकारचे पेंच. प्रसंग चहूंकडून विस्कलित, मारनिले गुदस्ता आह्माकडे यावयासी आले. ते न भेटतां माघारें गेले. ते दुसाणीयास जाऊन राहिले. दरबारींही न गेले. प्रस्तुत आल्यावर मारनिले यास सांगितलें कीं, दौलतीचा व दरबारचा बदोबस्त करणें व मागें कारभार येख्तीयारीनें केला तो समजोन द्यावा. तें पुसल्यास ठिकाण नाहीं. ऐसें पक्कपणें दृष्टीस आल्यावर मारनिले याचा बदोबस्त करणें प्राप्त आला. पुढें पाहतां, सरकार व सावकार व दौलतीचा पेंच भारी. येविसीची पैरवी

होऊन मागील पुढील आमचे अथ आपणास समजलेच पाहिजेत, म्हणोन राजश्री बाळाजी नाईक भिडे याजकडे राजश्री बाळाजी अनंत पा आहेत हे सविस्तर मजकूर नाइकांस निवेदन करतील तें ध्यानास आणून आपल्या जवळ नाईक बोलतील त्याप्रमाणें बंदोबस्त करून द्यावा दौलत पेंचात आली मुलुखांत जीव राहिला नाहीं हमेशा फौजेचा इगाम सर्व आपल्या ध्यानांस आहे त्यास सरकार व सावकार यांचे पेंच उलगडून दौलतीची स्थिति राहे तें करावें रा छ १९ माहे शाबान बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे हे विनती मोर्तबसुद

---

पत्रांक २१८ श्री १७०१ श्रावण वद्य ५

श्रीमंत राजश्री तात्या स्वामीचे सेवेशीं —

सेवक गोविंद गोपाळ साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल ता छ १९ माहे शाबान पावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष श्रीमंत राजश्री सेनाखास खेल समशेरबहादर यांचें व राजश्री अबोबा यांचें परस्परें वैमनस्य जा ल्याविषयींचें सविस्तर पेशजी पत्रीं लिा आहे त्यावरून ध्यानात आलेंच अ सेल अबोबा यांचें व यजमानांचें यथास्थित रीतीनें चालावें वास्तव आज दिवसपर्यंत दोहीं पक्षीं चागलेंच निभावलें प्रस्तुतकाळीं हे येथें आले यज *मान साहेबांनीं त्यास कित्येक प्रकारें सांगितलें आपणही त्यास सांगावयाचे* रीतीनें सांगत गेलों परंतु याचें त्यांचें यथास्थित न राहतां वाकडें पडोन नासलें हें सविस्तर *यजमानांनीं आपणास लिहिलें आहे व राजश्री बाळाजी अनंत यासी* राा बाळाजी नाईक भिडे यांजकडे पाठविले आहेत इकडील अर्थ नाईक आप णांसीं बोलतील ते ध्यानात आणून बंदोबस्त यथास्थित करून द्यावा सर्व प्रकारें भरवसा आपला आहे वरकड इकडील सविस्तर राजश्री बाळाजीपंत आपणास लिहितील त्यावरून ध्यानास येईल आम्हांस सर्व प्रकारें आधार स्वामीचा आहे बहुत काय लिहिणें ? कृपा लोभ करावा हे विनंती

---

पत्रांक २१९ श्री १७०१ श्रावण अखेर

पो मिति भाद्रपद शुा १ मंदवार.

श्रीमंत राजश्री बाळाजीनाइक नाना स्वामीचे सेवेशीं —

*सेवक गोविंद गोपाळ साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे विशेष येथून पत्रें एक दोन वेळां पाठविलीं तीं पावलींच असतील त्यावरून निवेदन जालें असेल दरबारचा बंदोबस्त यथास्थितपणें राखावा इकडील कांहीं चिंता न करावी एवजाची तरतुदींत असों पक्षेपणाचें बोलणें आमचें व राजश्री बापूजी नरसी यांनी*

करून मागाहून सविस्तर लेहून पाठवितों. दरबारचीं पत्रे घेतलीं आहेत, तीं पाठवितों, ह्मणून एक दोन पत्रीं लिहिलीं असता, अद्याप येत नाहींत. तरी तीं पत्रे पाठवावीं. चिरजीव राजश्री नारोबानाना आपणापाशीं आणलेच असतील. तत्राप, आले नसले तरी बहुतशी बोढ न करावी. रा शिंदे याजकडील बदोबस्त करून घ्यावा. वरकड, पेशजीं बापूजी नरसी व बाळाजी महादेव यांनीं आपणास व सरकारात पत्रें लिहिलीं आहेत. त्यावरून सविस्तर अवगत जालें असेल. दोन चार वेळा आपणाकडे पत्रे रवाना केलीं असता, आपल्यास पत्रे पावल्याचे उत्तर येत नाहीं हें काय समजत नाहीं. मार्गांत कांहीं दिकत पडली असेल तर नकळे. आपण येथील बदोबस्त करून घेतला आहे तो पक्केपणेंच असेल. पत्रें पाठवून द्यावीं. मार्गाची सावधतेविशीं ताकीद काशिदास करावी. वरकड येथील सर्व आपणाशिवाय काही दुसरा अर्थ नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति.

---

पत्रांक २२०

पो मिती आश्विन शुा ५ गुरुवार श्री. १७०१ भाद्रपद वद्य ८

श्रीमत राजश्री बाळाजी नाईक नाना स्वामीचे सेवेसीं:—

सेवक गोविंद गोपाळ साष्टांग नमस्कार विनती येथील कुशल ता छ २२ माहे रमजान पर्यंत यथास्थित असे. विशेष. आपण भाद्रपद शुा ९ चीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. लिा सविस्तर कळलें. दरबारी मजकूर लिा व ऐवजाविसीं निकडीनें लिहिलें. त्यास, येथून पर्याय लिहिले तरी आपणांस प्रमाण वाटत नाहीं. अस्तु! ऐवजाची रवानगी केली आहे. पावतील. वरकड योगीराजाचा वगैरे सगय मनात आणून लिा. व आह्माकडील कोण्ही न्यून्य बोलणार ते समजावीत असतील. त्यास, यजमानसाहेबाची निष्ठा श्रीमतांसी दुसरी कोण्हे कालीं होणार नाहीं. हे खातरजमा आपणास असेलच. वरकड आमचा विचार आपल्याशिवाय किमपि होणार नाही. शिंदे याजकडील राजकारण राखावें. त्यास, ते येथें आले आहेत. आपले नजरेस येईल तसे करावें. येविसींचे पेशजीं सविस्तर लिा आहे. त्या अन्वये बदोबस्त करावा. गकारनामक यासी कामात घ्यावें न घ्यावे तें लिहावें ऐसें लिहिलें. त्यास, त्यांचीं पत्रें आह्माकडे आलीं होती. त्यास, आह्मी लिहिले कीं, नाईकाची मर्जीनरूप राहून काम करित जावे. त्यास, आपण त्याची खातरजमा करून घेऊन कामात असों द्यावे. साराश, आपली खातरजमा होत असेल त्याप्रमाणें करावें. तोच आमचा विचार. वरकड रा बाळठाकूर यासी काल येथून रा केले आहेत. लवकरच येऊन पोचतील. त्याजवरून कळेल. बहुत काय लिहिणें कृपालोभ असों दीजे हे विज्ञप्ति.

---

पत्रांक २२१ श्री १७०१ भाद्रपद शुद्ध ५

श्रीमत राजश्री बाळाजीनाईक नाना स्वामीचे सेवेसीं ---

पो॥ बाळाजी महादेव सा नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता॥ भाद्रपद शुा पंचमी मुा बडोदें यथास्थित असे विशेष राजश्री फत्तेसिंगराव गायक वाड सेनाखासखेल समशेरबहादर यांनकडे सरकारचा ऐवज येणें याजक रिता मजला श्रीमत राजश्री नानास्वामी व तात्या या उभयतांनीं आज्ञा करू न घनश्याम नारायण याजबराबर रवाना केलें ते मशारनिल्हे याजसमागमें दु साणियास आलों पुढें बडोदियास यावें तों अठाणी नागेश यांचें पत्र घन वास आलें कीं, तुम्हीं बडोदियास न येणें, माघारें, मार्गात आला असलां तरी जाऊन दुसाणियास राहणें येथून आमचें पत्र यावयाकरिता येईल तेव्हां येणें याप्रमाणें तापीतीरीं पत्र आलियावर मारनिल्हे माघारे निघोन दुसाणियास चालले राजश्री बापूजीपंत मुर्दा आहीं उभयतांनीं विचारिलें कीं, दुसाणियास चलावें, तेथून तुमचे आमचे विचारें ठरेल तसें करूं. त्या जवर दुसाणीं गेलों तेथपावेतों बापूचा आमचा स्नेह सामान्य होता पुढें विचार पडला कीं, धनया गोपाळराव यांस याच यजमानाची आज्ञा, श्री मों यांनीं केलें पुढें तुमची आमची गत काय ? तेव्हां बापूचा आमचा स्नेह, निखालसतेचा परस्परें खातरजमा होऊन आहाला, तो कोणे गोष्टीवर आपण म्हणतील तरी, बापूचे ठायीं आपलें लक्ष लागलें व आपलेंही त्यांचे ठायीं निखालसतेचें असें दिसोन आलें माझा प्रकार म्हणावा तरी श्रीमंत नाना स्वामीस माझी माहितगार निखालस, सेवक असे जातीची फारशी नाहीं परंतु, श्रीमत तात्या स्वामीचे ठाई माझें लक्ष करें, मजकडून कामाचा मोहो पडून तात्याचे पायांशीं दुसरा भाव धरीन व सरकार काम नाधीन, असे जातीची बुध होईल न होइल हें तात्याचें चित्त जाणत असेल सर्व प्रकारें प्राण गेला तर द्यावा, हा हेत धरून तात्यांचे पायांशीं अंतर न करावें, असे जातीची परिक्षा असेल, याजकरितां मजला या कामास पाठविलें हें जाणोन, राजश्री बापूजीपंत आहीं उभयता एकत्र जालों उभयताचे भाव स्वामीसेवेवरी सारिखे जाले तेव्हां स्नेह पडला घन भावीं, अताचाचीं आचरणें बापूस पेशजीं समजलीं हातीं मजला सांप्रत समजलीं याजमुळें उभयतांनीं एक विचार करून दुसाणियापासून सोनगडीं निघालों धनयाचें समाधान राखोन त्याचे विचारें निघालों अंतर्यामींचा भाव स्वामीकार्य करावें, हा होता कारण धनयाची मर्जी राखोन, मदत ठक टानें प्राणास उदक घालोन मागातून निघालों असतां, साभारोभर एक निष्ठ माझा तात्याचे पायांशीं दुसरा भाव नाहीं तेणें प्रों बापूचा तुमचा ठायीं नाहीं म्हणून एकट्न बडोदियास पावलों येथे यऊन प्रथम गोपाळरावपासुद्दां अठोबाची भेट जाली रंग पाहतां या उभयतांस यमनस्य ' तेंव्हां आतां उभ

यतास कोण पुसतो ? त्यात श्रीमत दादासाहेब या प्रांते इग्रजांस येऊन भेटले. याजमुळे आमचे तेज वाढणें कळतच आहे. त्यात कारस्थानीं करून, अतोबाचे ठायीं ममता पेशजीपेक्षा फार दाखऊन उभयताचे वैमनस्य, मागील रंग, अतोबा काय सागतो हा प्रकार समजोन घेऊन तपसीलवार अतोबाची जबानीचा मजकूर साद्या बद लिहून, अमृ ( त ) राम भगवत याजसमागमे लाखोटियावर तुमचे नाव घालोन तुमचे विद्यमाने तेथें उभयता यजमानास विनती प्रविष्ट करावी, असे सागोन रवाना केली. नतर दुसरा प्रकार: माहितगारीचा परिभ्रम नसता विहगममार्गेकडून बातमी घेऊन तपशीलवार पत्रे, बापूर्नी आपल्यास, मी तात्यास, याप्रमाणें लिहून छ २५ रजबी रवाना केलीं तीं पावलीं असतील. त्याजवरून, काही माणूस कारस्तानीचे, असे आपल्यास व श्रीमत तात्यास आमचे सुकृतेकडून चित्ताचे ठायीं वाटलियास, मोठी योग्यता मिळेल, असे भासत असता, मध्येच स्तब्ध जाले. आपल्याकडील पत्राची उत्तरेंच येईनात. तो इकडे फत्तेसिंगराव अतोबाचे फारच विटून फत्तेसिंगराव याणी अतोबास कैद केले. गोविद गोपाळ कारभार करू लागले. माजी आपल्याकडे सूत्र लाविले तेहि चागलेच केलं. आपले आज्ञेशिवाय आमचे समत गोविंद मामास न पडलें असें खरेंच. परतु हजारकोस उभयता गेलों तसे आपली खातरजमा बापूविशी व माझी खातरजमा श्रीमत तात्यास याप्रमाणें माझेंहि लक्ष्य त्याचे पायाजवळ असे. त्याचे पाय जाणत असतील. जें करणें तें कच्चे लिहून आज्ञा आणऊन पुढे कर्तव्य ते करावे. असे असता, आपण गोविद गोपाळ याचे उत्तरावरावर बापूस चिठी लिहिली ती मारनिले यार्नी न देता, आपल्याकडे दुसरे पत्र लिहून पाठविलें. नतर आपली चिठी आटा रोजांनीं दाखविली. चिठी पाहताच बापूर्नी उत्तर केलें कीं, यजमानाची आज्ञा मान्य. तो मजकूर मजलाहि कळला. मींहि उत्तर केलें कीं, तेथें नाईक व तात्या एक जागा, त्याचा परस्परें दुसरा भाव नाहीं, जे नाईक याची आज्ञा तेच तात्याची. याप्रमाणें आपले ठिकाणीं विचार करून गोविंद गोपाळ याचे लक्षात चालू लागलो. ऐवजास मार्ग पुसों लागलों. अतोबाचें लक्ष तेथें श्रीमताचे पायाशीं विपरीत जालें. याजमुळें फळ पावला. तो प्रकार सविस्तर पेशजीं लिा आहे, त्याजवरून समजलाच असेल. ह्मणजे अतोबाचें लक्ष कसें, हेंहि लिहून पाठविले.दुसरे छ २५ रजबीं गुप्त अर्थ लिहिला. त्यांत फत्तेसिंगराव याचें लक्ष कसे, अतोबाचें कृत्रिम कसे जातीचें, पुढे मोठी गोष्ट साप्रत काळींचे प्रसगात हाताखालीं असावी याजकरिता आपलेकडे पक्केपणें लिा आणि गुप्तच राखावी असे सुचविले. तिसरें गोदबा मामाचें सधान व फत्तेसिंग याचें एकविचाराचे आहे. आपल्याशीं अतर होणार नाहीं. हें राखोन आज्ञा मानण्याचा मार्ग पाहिला. आज्ञा लवकर न आली. याजमुळें येथें उभयतास बोध करून, राजश्री बाळाजीपत रानडे याज समागमें तपशील-

थार आपल्यास लिहून, आपले विचारें सरकारऐवजाचा निकाल पडावा, आपल्यांशीं व तात्याशीं यांचा दुसरा भाव नसावा, हे अर्थ कित्येक केले असतां, आपण गोविंद गोपाळ यांचे पत्रांचें उत्तर व वापूस वोलावणें व खावरजमा पडे असें मातीच्या चिठ्या तेथील उभयतां यजमानांच्या घेऊन, परभारें पाठविल्या याजवरून आमचें लक्ष लोभाचें किंवा स्वामीकार्यावर मेहनत करून कारस्तानी केली याचें फळ व बक्षीस जन्माचें आज फावलें, असें आलें परंतु, आमची आपल्याशीं एकनिष्ट चागलीच आहे याममुळें येथें गोविंद गोपाळ यांनीं अकृत्रीम लोभ करावा, असे यांस ईश्वरें बुध दिली याजमुळें आपलीं पत्रें आलीं तीं दासविलीं परंतु आपण इतका विचार न केला कीं, आपली आज्ञा मोडीत असे या वीचे सेवक नाहींत तेव्हां पुन्हां त्याच पत्रांचें उत्तर त्याहातें होतें कीं, आमचें पत्र त्यांस दाखवावें तें न ऐकतां अशोपाचे स्वीं राहि त्यास यांशों करू. तें न जालें याजवरून बहुत चित्ताचे ठाईं आनंद जाला आजपावेतों येखल्यारी येथें लौकिकांत आहे अशी वाटत होती, ते सर्वत्रांस समजली धरकड फारसा विषय नाहीं श्रीमंत तात्यानीं आपली हातचिठी दिली, त्यांत माझें नांव नाहीं तेव्हां पुढें येथें मातबरीची अथवा तेथील तात्यांचे विश्वासाचे आहेत नाहींत याची रीत यांस समजलीच असेल असो आम्ही सेवक सेवा करून असावें परतु यांत आमचें कांहीं भूषण कमी होतें असें नाहीं त्यांचे म्हणविलों त्यांस चांगलें दिसतें करावें आमचें तो मगळसूत्र आहे तेथें विभिचारपण ईश्वर घडू देणार नाहीं आजपावेतों तात्यांचे ठायीं कसे रीतीनें लक्ष, हें पत्रीं काय लिहूं! मोठें राजकारण याळाजी माहादेव यास सांगि तलें तरी चिंता नाहीं, ऐसे जातीची माझी निष्ठा तात्या स्वामींची खावरजमा असतां, अंतोबाच व गायकवाड यांचे कामास पाठविलें हे दोषी यांचे तद वासामुळें आमचे ठाईं तेथें आपल्यास विकृत आली कदाचित म्हणतील तरी बापूचा भरवसा आपल्यास न पडे, असें वाटल्यामुळें गोंदवा मामास परभारें पत्र लिहिलें माझे ठाईं तात्या स्वामींची आली याजमुळें खावरजमेची चिठी गोंदबास पाठविली त्यास माझें नांवच नाहीं! तेव्हां तात्यांचे परम आप्त असें येथें सांगतात, तें उगेच, असें यांस वाटावें इतकाच प्रकार परंती आमची चित्तवृत्ति एकनिष्टेची आहे त्यापक्षीं आम्हांकडून यांकडे पाऊल पडणार नाहीं पडेल ते दिवशीं पुन्हां चरणदर्शनास येणार नाहीं असा जातीची तात्यांचे पायापाशीं माझी प्रतिज्ञा व आपल्यापाशीं बापूंची, यांत अंतर नाहीं बापू व मी उभयतां येथें एकत्रपणें आहों याजमुळें यांसीह येथें समजलेंच असेल हे भाव दर्शनीं सांगावयाचे आतां विस्तार कोठवर ल्याहावा! सारांश, स्वामीसेवेवरी एकनिष्ट असलियास ज्या कामास सेवक पाठवावा त्याची खावरजमा जितकी आपल्यास असेल तितकीच सेवा त्यास सांगावी

सेवा सांगोन त्याची प्रतिष्ठा न राखता, जे काम सांगावें तें काम दुसरे द्वारें विशेष साधलियास त्यास पूर्वसूचना असावी. ह्मणजे त्याचे पाऊल त्याप्रो पडतें. आपले मर्जीनुरूप येथें आमचे पाऊल पडेल. येथें कारस्तानीनें राहिलो याजमुळे आपलीं पत्रे आलीं तीं त्यानीं आह्मास दाखविलीं. जरी आह्मास पेसजी रवाना केले ते समईची आज्ञा होती, त्याप्रमाणे येथे चित्तात आणून अतोबास कैद केलें. ते समई आह्मी येथें आग्रह करितो तरी आज हीं आपलीं पत्रें येतीं ह्मणजे आमचीं घोडी घेऊन आपल्याकडे रवाना करितें. परतु सेवक आपल्या हाताखालील, याजमुळे चार सधाने राखोन आहों. आपण सधान केले त्याजशिवाय दुसरे तरेचे छ २५ रजबीं लिहून पाठविले आहे. ते यातील नव्हे. प्रगट होऊ नये. हेच विनती. पत्र श्रीमत तात्यास एकातीं दाखवावें. यात आळस नसावा. माझी शपथ असे. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

पत्राक २२२. श्री. १७०१ भाद्रपद.

विज्ञापना ऐसीजे. राजश्री फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर याचें बोलणे कीं अताजी नागेश याचें बहुत प्रकारें मनोधारण करीत होतों कीं, तुमचा कारभार तुह्मीं करून शिबदी, सरकार, सावकार याचा फड (शा) करणें. माझा पेशजीपासून इतबार तुमचे जागा. व सर्व तुह्मीं येख्त्यारीनेंच करीत होता त्याप्रों करणें. तें न होय, तेव्हा कैद केलें. त्यापक्षीं हिशेब घेणें प्राप्त. अताजी नागेश याजकडेस सुरत अठ्ठाविसी वगैरे माहालची मामलत. त्याचे हिशेबाचे फडशे होणे. याशिवाय सरकारात ऐवज मशारनिल्हे यानीं किती दिला व आह्माकडून महालचा नख्त रवानगीसुद्धा मारनिले याजकडे काय पावला, याचा झाडा समजला पाहिजें. बाकी निघालियास तिचा फडशा होणें. आणि अतोबा यानीं तो सातपुडियात मवास, कोळी याजपासून पाहाडी किल्ला पचवीस हजार रुो देऊन घेतला आहे. तेथें ऐवज व मुलें माणसें सुा जाऊन पावलियास ठीक नाहीं. याजकरिता सरकारातून बदोबस्त होऊन मजबुदी जाली पाहिजे. व घन:शाम नारायण वगैरे शिंदे याजकडून बखेडे करवितील. याची सूचना होऊन बखेडा न होय असा बदोबस्त जाला पाहिजे. याजकरिता सेवेसी सागितल्यावरून विनती लिहिली आहे. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

पत्राक २२३. श्री. १७०१ भाद्रपद शुद्ध १३

पो मिति भाद्रपद वा १० सोमवार.

श्रीमत राजश्री बाळाजी नाईक नाना स्वामींचे सेवेसीं:—

सेवक गोविंद गोपाळ साष्टाग नमस्कार विनती येथील कुशल जाणून

स्वकीये कुशल लिहित असिलें पाहिजे विशेष आज छ १२ रोजीं सुरतेहून बातमी आली कीं, शहराहून इंग्रजानें कूच करून, कामरेज पाठीशीं देऊन, मुकाम केला मडोचकर व सुरतकर मेस्तर बाटम ऐस बाहेर निघाले आ हेत मुंबईकर जनराल लेहि सरजामसुधा येणार. बगास्याहून पंधरा सोळा हजार माणूस आलें त्याचीं पत्रें नागपूरचे मुकामींहून आलीं त्यावरून हे सर्व बाहेर निघाले श्रीमंत राजश्री दादासाहेब शहरातच आहेत राजश्री बापूजी होळकरांहि कागदीं पत्रीं मिळाले! श्रीमंतांस सामील होणार. नाग पुरींहून लोक यतांत, त्यासमागमें मोंसल्याकडील फौज येत आहे, ऐसी वदंता आहे या राजाराम गोविंद यांची रवानगी महीठत्तरतीरीं होत आहे समागमें दोन पल्टणें दिल्लीं बरकड साहून इंग्रज घाटावर फौजसुद्धां जा णार सोनगडास राहणार. ऐसेंहि बोल्तात लाला मुनशी विसां दिवसांचा करार करून गेले आहेत त्यांचा मार्ग पाहतात तदनुसार करणें तें करी तील परंतु जनचर्चा कीं, नागपुरींहून लोक आले ह्मणजे देशीं जातील याप्रमाणें बातमी आली ते आपणांस लिा आहे सत्यमिथ्या नकळे कूच होऊन बाहेर आले व अमदाबादेकडे फौजेची रवानगी दोन गोष्टी हे प्र माण आहेत येविशीं यजमान साहेबांनीं आपणांस व कारभारी यास लिा आहे, त्यावरून अवगत होईल सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति

---

पत्रांक २२४ श्री १७०१ भाद्रपद वद्य ८

पुा श्रीमंत राजश्री बाळाजी नाईक नाना स्वामीचे सेवेसी —

सां नमस्कार विनती चिरंजीव राजश्री नारोबा नानास शिंदे घेऊन आले नाहींत दरबारचा प्रसंग पडेल तसें करावें कज्यायामुळें घेऊन न आले ह्मणोन लिा त्यास सर्व प्रकारें आपण आहेत उभयतां कारभारी यांचें आ श्वासन आपणांपाशीं चालें आहे त्यापक्षीं आतां दिवसगत लागणार नाहीं जसें कळेल तसें करून आपले जवळ आणावे व फार दिवस जाले आहेत योगीराजाचे रक्षाचा भार लिा त्यास यजमान साहेबांचें लक्ष श्रीमंतांपाशीं कोण्ही काळीं दुसरें व्हावयाचें नाहीं हे खातरजमा आहीं त्याहावी असें नाहीं अनभव आहेतच आमची निष्ठा हे आपल्यापाशीं आहे तेच याचा संशये कोण्ही काळीं न मानावा, आपले चित्तात नाहीं परंतु सूचना लिहिली आहे त्यास, येविशीं कांहींएक चित्तात न आणावें याची खातरजमा असों द्यावी येविशींचें सविस्तर राजश्री बाळ ठाकूर सांगतील त्याजवरून कळेल बहुत काय लिहिणें! कृपालोभ कीजे हे विज्ञप्ति

---

पत्रांक २२५                                श्री.                १७०१ भाद्रपद वद्य ९.

राजश्री बाळाजी नाईक नाना भिडे गोसावी यासी:—

विनती उपरी. राजश्री सखारामपंत बापू याजकडे सत्रा गांव होते. त्यास, हाली राजश्री अण्णाजी अनंत अष्टाविशीत आहेत. त्याणी कारकून पाठऊन बदोबस्त केला आहे. दरबारी कोणी गैरवाका समजावितील, यास्तव सूचनार्थ लिहिले असे. रा छ २३ माहे रमजान. बहुत काय लिहिणे? लोभ कीजे हे विनती. मोर्तबसुद.

पत्रांक २२६.                                श्री.                १७०१ आश्विन.

पुा श्रीमंत राजश्री बाळाजी नाईक नाना स्वामीचे सेवेसीं:—

सां नमस्कार विनती. शिंदे याजकडील पहिले करार मदार ठरला आहे त्याप्रों द्यावे लागेल, ह्मणोन लिा. त्यास, येविसींचे तपशीलवार पेसजी लिहिलें आहे. त्यावरून ध्यानात आले असेल. त्यास आपले युक्तीस येईल त्याप्रों ठराव करून लिहून पाठवावें. घडोन येईल. मारनिलेकडून कारकून येथें आला आहे. त्यासहि आह्मीं समाधान पत्रे लिहून दिल्हीं आहेत. आणकरारमदाराचे आपणावर घालून लिा आहे. त्यास, आपले ध्यानात येईल ते करावे. आपण करतील तें आह्मास मान्य. बहुत काय लिहिणें? कृपालोभ कीजे हे विज्ञप्ति.

पत्रांक २२७.                                श्री.                १७०१ आश्विन शुद्ध १.

पों मिती कार्तिक शुद्ध २ बुधवार.

श्रीमंत राजश्री बाळाजी नाईक नाना स्वामीचे सेवेसी:—सेवक गोविंद गोपाळ सा नमस्कार विनती. येथील कुशल तााइत छ २९ माहे रमजान पावेतो वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण भाद्रपद शुद्ध ९ पत्र पाठविलें ते पावलें. लिा सविस्तर अवगत जाहाले. पत्रीं ऐवजाकरिता निकडीनें लिहिले. व घनःशाम नारायेण शिंदे यान्चे लष्करात गेले आहेत. त्याजवरून उभयता सरदार याचीं पत्रें कारभारी यास आलीं कीं, गायकवाडाकडील गृहस्थ आला आहे. दौलत गोविंदरायास द्यावी, सरकारचे व आपले पैक्याची निशा करून देवितों. ती पत्रे व जिन्नस आपल्यास दाखविलीं. त्यावर आपण खातरजमेचे बोलले आणि मुदत करून पत्रें आह्मास लिा. त्यास येथील प्रकार दररोज काय ल्याहावा? राजश्री बाळाजी अनंत रानडे जाऊन बहुत दिवस जाले. आपणापासीं पोहचून अद्याप उत्तर येत नाहीं. त्यास, मारनिले पावलियावर सविस्तर समजलियात आलें असेल. त्याजवर विशेष प्रजन्य गेला यामुळें चहूकडून (सकट) प्राप्त जाले आहे. पीक गेले.

मुलूखगिरी घ यासमुळें राहिली यांत ईश्वर काय परिणाम लावील तो खरा या दौलतींत कांहीं बाकी राहिली नाहीं बोटभरतेखालीं बहुतच आली आहे यदांचें साल सरकारांतून निभाऊन घेतल्यास कांहीं उमी रा हील नाहींतरीं परिणाम लागणें कठीण आहे परस्परें समजल्यांत येईल तें खरें. बहुत काय लिहिणें? कृपालोभ करावा हे विज्ञप्ति

---

पत्रांक २२८ श्री १७०१ आश्विन शुद्ध १

पुा श्रीमंत राजश्री बाळाजी नाईक नाना स्वामींचे सेवेसी —

धा नमस्कार विनंती आपण श्रावण वद्य त्रितियेचीं पत्रें पाठविलीं तीं पत्रें आह्मांकडे यावीं तीं न येतां राजश्री बापूजीपंतांकडे गेलीं त्यानीं पत्रें फोडून पाहून आह्मांकडे पाठविलीं तीं छ २३ रमजानीं आम्हांस पावलीं फार दिवस पत्रांस लागले, याचें कारण कांहींच समजत नाहीं पत्रांतील मजकूर कीं, यत्न शेवटास गेला, त्यास हें कर्म करावयाची उतावळी किमर्थ केली, सरकारचें काम थोडें बहुत निदर्शनास आणावें, मामाकडील बंदोबस्त व्हावा, आपली आज्ञा यावी, तेव्हां पडावें, हें खुषी करणार नाहीं, परभारें जालें किंवा काय तें समजलियांत आलें नाहीं, म्हणून या पर्यायें लिहिलें त्यास, येविशींचे तपशील पहिलेच लिा आहेत, त्यावरून समजलियांत आलेंच असेल राजश्री रायोपंत पाठविले म्हणोन लिहिलें त्याचें येणें न जालें दुसरें, गोपाळराव यांस परभारें पत्रें दिल्हीं म्हणोन लिा त्यास, त्याचा पर्याय पुरवणी पत्रीं लिा आहे व बाळ ठाकूर सांगतां ध्यानात येईल इकडून अंतर किमपि पडावयाचें नाहीं श्रीमंत राजश्री नानांस व श्रीमंत राजश्री तात्यांस पत्रें पाठवावीं कीं, गोपाळ यास काम न द्यावें त्यास आह्मी कांहींच चिठी पत्रीं दिल्ही नाहीं व मजमानानींही दिल्ही नाहीं तेव्हां, उगेच त्यांस काय म्हणोन ल्याहावें? तथापि, पाहिजे तर पाठऊन घावयास येईल बहुत काय लिहिणें? कृपालोभ कीजे हे विनंती

---

पत्रांक २२९ श्री १७०१ आश्विन शुद्ध ११

पौ छ १० सवाल सन समानीन

पदस सो मेहेरबान करम फर्माय मसलिर्ता हरी पंडत फडके सल मला हुवाला

बादज शौक मुलाकात मसरत आयात मफहूद जमीर हमीदाद पिजिरवाद येथील खुषी जाणून आपली यादमानी हमेशा कलमी करीत आलां पाहिजे दरिविला, आपणाकडील कामांत सद व कोशिश करणना मार नरसिंगराय वकील यानीं लिहिल्यावरून मालूम जाला आपणास आह्मी दोस्त जाणत

असो. हमेषा आपली पादमानी कलमी करीत आला पाहिजे. हालीं चेचेर-थान पारचे पाठाविले आहेत. आजराः एखलास घेतला पाहिजे. जिआदा लिहिणे काय असे?

---

पत्रांक २३०　　　　　　श्री.　　　　　　१७०१ आश्विन शुद्ध.

पुा श्रीमत राजश्री बाळाजी नाईक नाना स्वामीचे सेवेसीः--

सा नमस्कार विनती. राजश्री राजाराम गोविंद योगीराजापाशीं होता. त्याजसमागमे सरजाम देऊन अकळेश्वरास मुकाम आला. हे वर्तमान आ-म्हास कळताच फौजेची तयारी करुन सिद्ध जाहालो राजाराम गोविंद इंग्र-जाचे परवानगीनें नर्मदा उतरून उत्तरतीरास येऊ लागले. त्यास अधिकच लोकाचा गवगवा. आण इकडे आपली फौज. पुर्तेपणे आपला परिणाम लागत नाहीं हे समजोन, रात्रीं वीस पचवीस स्वारानिशीं डबईपलीकडोन हालोलकाकेलेस गेला. तेथहि न राहता पुढे माळव्याकडे गेले. सरजाम ब-राबर होता तो अकळेश्वरीच राहिला. काहीं उठोन माघारा सुरतेस गेला. तर्त इंग्रजाचा सरजाम पोख्त तयार जाहाला आहे. पुढे काय मसलत हे कळत नाहीं. येथून राजश्री लक्ष्मणराव चिटणीस याजकडे पत्रे लिहून बातमी वरचेवर आणवीत असो. तेथे जो निश्चय ठरेल तो वरचेवर लिहित असावे. बहुत काय लिहिणे? कृपालोभ कीजे. हे विनती.

---

पत्रांक २३१　　　　　　श्री.　　　　　　१७०१ आश्विन वद्य २

पौ मिती कार्तिक शुद्ध ८ मगळवार.

श्रीमत राजश्री बाळाजी नाईक नाना स्वामीचे सेवेसीः--

सेवक गोविंद गोपाळ कृतानेक सा नमस्कार विनती. येथील कुशल ता छ १६ माहे सवाल जाणून स्वकीयें कुशल लिहित आसिले पाहिजे. विशेष. आपण पत्र बारागिराबराबर पाठविली तीं पावलीं. सविस्तर अर्थ अवगत जाहाले. इकडील मजकूर तरी सुरतेहून पेशजीं राजाराम गोविंद नर्मदा उतरून इकडे आले होते. त्यास येथून सरजाम रवाना केला. तेव्हा त्यास इकडील ताण बसला आण त्याचे खिंवदीनेही गवगवा केलाच होता. यामुळे सडे सार सोडून रात्रीं पळून माळवियात गेले. हे पेशजीं आपणास लिाच आहे. त्यावर छ ११ सवाली राजश्री चदरराव पवार इंग्रजाचे परवानगीने नर्मदा उतरून अलीकडे आले. त्याजवरी येथून सरजाम पाठविला आहे. त्याची व आपले सरजामाची गाठही पडली आहे. त्याचें पारिपत्य करावें. याचे अगाध नाहीं. परतु मागील पिछा भारी, व सरकारात तह काय ठ-रतो तेही कळले पाहिजे. एकवेळ बिघाड जाहालियावरी पुर्तीच कंबरबंदी

केली पाहिजे यास्तव युक्तीचेच वाटेनें मम दासरून बंदोबस्त करवितों तेणापही सिघडलेंच तरी उपाय काय ? येविशींचे तपसीलें श्रीमंत राजश्री यजमानांनीं आपणांस व सरकारांत लिहा आहे त्यावरून ध्यानांत येइल ऐवजाकरिता घरचेवर लिहिलें त्यास, प्रांतातून अगर कोठून सोये होऊन येणें कळतच आहे कर्जवाम घेऊन काहीं सोये काम्गावी तरी प्रथम राजा राम गोविंद याची गडबड झाली व अलीकडे चंद्रराव पवार याची गडबड यामुळें काहीं एक पडों न आलें प्रस्तुत तरतूद करीत असों तरतूद करून रवानगी करितों आम्हास रात्रंदिवस आपलेकडील लक्ष राहून, खरेपणात पडावें हाच निजध्यास परंतु एक एक नवेंच विघ्न उमें राहतें ! त्यास उपाय काय करावा ? त्यावही तजवीज करून मागाहून पा। आहों प्रजन्य गेला यामुळें प्रांतात हाहाकार होऊन लोक तमाम उठोन मुलूख उजाड जाला व जळचरांचे सूळ यामुळें कोणी सावकार कामास धजत नाहीं येणें करून जें करावयास जावें तें सिद्धीस जात नाहीं आमचे प्रेत्नें एक दिवस अगोदर घडोन येइल तें करून पाठवीत आहों यात अंतर होणार नाहीं सा तरनिशा असों द्यावी व येविशींची निशा राजश्री बाळाजीपंत यांणीं केलीच असेल परकड सविस्तर मारनिल्हे याचे पत्रावरून कळेल बहुत काय लिहिणें ? कृपालोभ कीजे हे विज्ञप्ति

---

पत्रांक २१२ श्री १७०१ आश्विन वद्य २

पु॥ राजश्री बाळाजीनाईकनाना गोसावी यासी —

विनंति उपरी राजश्री रामचंद्र पवार डमई परगण्यात येऊन मुकाम करून राहिले होते परगणा जप्त करावा, पैका मिळऊन पुणें अमदाबादेची जप्ती करावी, ऐसे मोठ्या उमेदीनें आले होते त्यास, येथून फौजा पाठविल्याच होत्या आम्हीही फौजसुधा पाठीवर मुकाम केला आपलेकडील लोक बरचवर रवाना जाहले पारपत्य यथास्थित करावयाचें केलें त्यास, त्याज कडील बोलण लागलें कीं, आपल्यास याद्दादारी दिल्हियास निघोन जाऊ, ऐस बोलू लागले उपरांत यद्दादारी दिल्ही कीं, तूत विघाड न करणें एव बळ विघाड जालीया मग आपल हाती राहणार नाहीं, आणि सरकारचा दाम्द लागल न यद्दहाचा जाबसाल ठरत असता यांणीं विघाड केला या स्तव मारनिल्हेस जाऊ दिल्हें परंतु मोठ्या उमेदीनें माघारे गेले आहेत आम्हांस यहुत खरचेनें पत्रें लिहिलीं आहेत परंतु पुणें होणार तें होइल आ मची निशा श्रीमंतांसी दुसरी नाहीं हुजरांनीं तहाची अगर विघाडानी या तमी राखून दरचेयर आम्हांकडे लिहून पाठवीत जावें यासी आम्हांसी लिख सघध पडला आहे दोहींकडून संकट उपाय नाहीं एवजाविशीं आपण पर

चेवर लिहितात. येथे एखादी तरतूद करावी. त्यास दिवसास एक नवें खूळ उभें राहतें. कोणी सावकार उभा राहत नाहीं. कोणास भरवसाच पडत नाहीं. यात काही सोय पाहून तरतूद घडेल ती मागाहून करून पा. आपण वरवर लिहितात आण आमचे ध्यानात नाहीं, ऐसें नाहीं. परतु उपाय काय करावा ? वरकड सविस्तर मागाहून लिहून पा. रा छ १६ माहे सवाल बहुत काय लिहिणे ? लोभ करावा हे विनति. मोर्तबसुद.

---

पत्रांक २३३ श्री. १७०१ आश्विन वद्य २

पुा राजश्री बाळाजीनाईकनाना गोसावी यासीं.–

विनति उपरी. सचिण सत्रागाव व फुटगाव राजश्री सखारामपंत बापू याचे सरंजामात पेशजी आपलेकडून दिले होते. व गल्हेमरोळी राजश्री नाना कडे कर्जात दिल्ही होती. त्यास, सरकारठाणी तेथें होती. उपरात राजश्री दादासाहेब सुरतप्रांती आलियावरी सरकारचे महाल इग्रजाने जप्त केले होते. ते समयीं हेही महाल जप्तींत आले होते. तेव्हा आपलेकडील कमावीसदारानीं इग्रजास समजाविले कीं, हे महाल आह्माकडील आहेत. सत्रागाव बापूकडे अतस्तात दिले होते. अखेरसालपर्यंत द्यावयाचा करार होता. त्यास, अखेरसाल मागेच होऊन गेलें. आता त्याजकडे महाल द्यावयाचें कारण नाहीं. तरी आमचे महाल सोडून देवावे. त्याजवरून महाल इग्रजानें पक्केपणे बोलून सोडून दिले. उपरात सरकारचा अमल पुन्हा सुरतप्रांतीं बसला. त्यावरी महाल सरकारात द्यावे. त्यास, गल्हे व मरोळी हे दोन्ही महाल नानाकडे. तेथील कमावीसदाराचीं पत्रे व कारकून येथें आले. सविस्तर वर्तमान सागितलें की, महाल नानाकडे द्यावे. त्यावरून राजश्री अण्णाजी अनत यांस पत्रे देऊन नानाकडील ठाणीं बसविलीं. हे वर्तमान इग्रजास कळलियावरी आह्माकडील कमावीसदारास ह्मणो लागले की, तुम्ही आमाण बोलून महाल सोडवून घेतले याचें कारण काय ? आम्ही तुमचे सारेच महाल जप्त करू असे बहुत दोप ठेविले. तेथें समज किती हें ध्यानातच आहे! तेव्हा सकट जाणून पुन्हा आपलेकडोन महाल जप्त केले आहेत. याप्रमाणें मजकूर आहे. यावरी सरकारचीं व नानाचीं पत्रे गब्द लाऊन आलीं. त्याचीं उत्तरें काय द्यावीं, येविसींचे राजश्री हरीपततात्यास राजश्री बाळाजी महादेव यानी लिहिलें आहे. त्यावरून ध्यानात येईल. येविसींचे सविस्तर आपणास लिा आहे, म्हणोन सरकारात लिा आहे. तरी सविस्तर समजावून ध्यानात आणावें. आपलेकडून काहीं एक गुता नाहीं. गोष्ट कुपेचीं पडली आहे. रा छ १६ माहे सवाल. बहुत काय लिहिणें? लोभ कीजे. हे विनति. मोर्तबसुद.

पत्रांक २३४

मुंबईकर इंग्रजास पत्र या छ                                        १७०१ आश्विन

इजहार आंकी मुदत मदीद आ शहामतपन्हांकडील कितावत येऊन दिलखुषी होत नाहीं तर हमेषा मोहबतनामा इयलाग करोन मसरूर करीत जावें दिगर सरकारांतून वकील लाला सेवकराम याजला कलकत्त्यास रवाना केलें व सरकारचे मदारुलमहाम यानीं म्नतुर मरसूल केलें त्याचा दरजबाब कोंसल कलान कलकत्तेकर यांनीं निगारष केला त्या खात्यांतलि फिकरा पारसी व त्याचा तरजमा हिंदवी करून पाठविला आहे त्याजवरोन मुफसल मुषहुद होईल व कोंसल कलान कलकत्तेकर यानीं कलमी केलें आहे कीं, या ममोंभिय खत आंशामतपन्हास व तेथील कोंसलदारांस कलकत्याहून पा मार्ग मुंबईस इरसाल केलें आहे मेकीन कीं हें खत रसीद होऊन मतलब जाहीर झाला असेल त्यास कविले माही दादा साहेबाबायें व चिसली वगैरे राा फत्तेसिंगराव गायकवाड यांचे मुलखाबाबद मजकूर मरकूम केला आहे त्याचा दर जवाब इजानेवास लिहून पाठवावा व चिखली वगैरे मुलुख मधें वसूल बुसाला सरकारचे अमलदारांचे सुपूर्द करावा व ममोंभिय करारनामा तीन लाखाचा मुलुख आशामतपन्हा त्यांस देवितील त्यांचे सुपूर्द सरका रांतून करविलें जाईल दिगर मनाफ करारनामा याव लाखांचि वमुलात पो जंबूसरचा ऐवज देविला आहे त्यास परगणे मजकूरचा ऐवज वसूल करोन आंशाहामतपन्हाकडील लोकांचे पदरीं घालावा म्हणोन सरकारांतून राा महादजी रामचंद्र यांजला पाठविलें आहे मशारनिलेह जाऊन कमकसर एक साल गुजरलें हनोज आशाहामतपन्हांकडील अमलदार पो मजकुरात दा म्नल देत नाहीं तर येयांचे आंशाहामतपन्हांनीं आपलेकडील लोकांस निगा रप करावें कीं, सरकारचा काा, महादजी रामचंद्र पो मजकूरचा वसूल करोन ऐवज पदरीं घालीत जाईल, त्याचीं कमर्में देत जाणें याहून पेषमीं साल गुदस्ता व सालहालचा पो मजकूरचा वसून घेतला असेल त्यानी रसीद देणें, म्हणोन निगारष करावें जो करार ठरला आहे त्यास सरकारां तून तफावत होत नाहीं व आंशाहामतपन्हांकडून तफावत अमलांत न यावा

---

पत्रांक २३५                                श्री                                १७०१ आश्विन वद्य १०

कृष्णराव बल्लाळ यांचे नावें हैदरखानास पत्र छ २१ शव्वाल अस गाय सदरहू-प्रमाणेंच-सुा समानीन, आश्वीन कागद मुद्दीदार

अजम नवाब हैदरअलीखान-बहादूर सलमहुताला साहेब मेहरबान करम फमाय मुखलिसान बाद इखियाक मुलाकात महब्यत समात मुफपुपा जमीर इतिहादत नषीरबाद येथील खेर सला जाणून आपली खेर खुषी कलमी

करून दिलताजगी करीत असिलें पाहिजे. खुदावत-न्यामत रावसाहेब पंडित प्रधान याचा व आमोहिबाचा सलूख पक्का व मजबूत होऊन कराररनामा अह-दर्शतीनर्सी जाला तो सरकारचे मातबर पाहामत व अवालीपन्हा कृष्णराव नारायण व नरसिंगराव वकील मोहिंबाकडील याजबराबर देऊन रवाना केले असेत. मारानिले नुमा-ज्यलद व षिताब आ-मोहिंबाकडे पोंहचतील. बिल-फैल अजरुये अखबार जाहीर जालें की, मोहिंबाकडील फौज आदवानी व मुदगल वगैरे नबाब निजाम-अल्ली-खान-बहादूर याचे तालुक्यात येऊन, हरकत पेप आणून, तमाम प्रात वैराण केले. मकानास मोहसिरा करणार. ऐशास, व लिन्यामत रावसाहेब पंडित-प्रधान याचा व नबाब निजाम अल्ली-खान बहादूर याचा तरीका एकलासचा कदीमापासोन चालत आला. हरबाबे त्यासीं ज्युदागी नाहीं. हाली मोहिबाचाही सल्ख होऊन दोस्तीची मजबूती जाली. तेव्हा तिन्ही दौलती एक व बेहबुदी व मसलत एक जुदाई राहिली नाहीं. इग्रजास तबी पोंचवण्याची मसलत मातबर. सर्वांचे एक-दिलीने मुखालिफाची तबी व्हावी. दरम्यान असे सिगुफे-मुळे मोठे मसलतींत कमती येते. आपआपल्यात पेच येतात. हे सलाह दौलत नाहीं. बिनाबारा आपले फौजेस ताकीद करून वापस आणवावी. नबाब मवसूफ याचे तालु-कियास इग्रज येऊन मकानात आपला कबजा करणार. तेव्हा मोठे मसलतीस पायबद बसेल. सबब अव्वल हा बदोबस्त करावा, हे मोहिबाचे दिलात आले असेल. त्यास, येविसीचे कुलमरात-व नबाब-मवसूफ यास कलमी केलें असोन, त्याचा तेविसींचा बदोबस्त जलदच करतील. इग्रजाचे तबीचे मस-लतीस नबाब-मवसूफ एक-दिल आहेत. शिकाकोल-राजबदरीकडे चालून जाण्यास लवकरच खेमेदाखल होणार. मोहिबानीं आदवानींकडील हगामा जलद मना करवावा. सर्व मसलती व दूरदेशी आपले दिल निषीन आहेतच. मुसफल बयान नरसिगराव पोंचल्यानतर करतील, त्याजवरून मालूम होईल.*

---

पत्राक २३६. श्री.

सदरहू प्रमाणें हरीपत याचे नावें पत्र पाठविले त्याचीं नक्कल.

अजम नबाब हैदरअल्लीखा बाहादूर सलमहुताला साहेब मेहेरबान करम फर्माय मुखालिसान बाद इस्तियाक मुलाकात जाणून वहज्यत समाद मशहूद जमीर इत्तीहाहत नवरिबाद येथील खैर सल्ला जाणून साहेबीं आपली खैर खुषी कलमीं करीत असिले पाहिजे. दिगर, आ मेहेरबाकडून छ मोहरमचें खत आलें ते नेक वख्तीं पोंहचून खुषी व खुरमी जाली. नरसिंगराव वकील व येकलाह दस्तगाह कृष्णराव नारायण व सिंदे याजकडील त्रिंबकराव व राव रास्ते याजकडील गोविंदराव व गणपतराव पोहचून मुफसल मजमून मालूम

---

*ह्या अस्सल पत्राचा साराश काव्येतिहाससग्रहातील ४६७ व्या पत्रात दिला आहे.

आला श्रीमंतांकडील करारनामा व आपलें निभावणीचें खत मशारनिले यानीं दाखविलें त्यात एक दोन कलमाची तकरार होती सबब श्रीमंताकडील पाठवण्याचा करारनामा व निभावणीचे पत्राचे मसविदे मशारनिले याजपाशीं दिल्हे त्याप्रमाणें करारनामा व खतें येऊन पोंचताच साबकाराकडे पैसे पोंचवीत असों आणि इंग्रजाकडील मोहिमेस कूच करून जात असों आज दोन सालापासून चेनापटणकरांचा दोस्ती करण्याचा इरादा एक पालखी व दाहा जवानानसीं येण्यास अर्ज लेकीन, जात मकरी त्यांची चाल खुपकाँत न व्हावी सबब श्रीमंतांसीं सल्ल केला आम्ही चेनापटणाकडे गुतल्यावर इमज साठी जबुसर वगैरे मकाने घेऊन मुहेमापक कबूल करतील त्यास इकडलि मसलत व इतक्यासेरीज सल्ल न करावा म्हणोन आसाहेबीं कलमीं केलें चुनाचे आमेहरयाकडील नरसिंगराव वकील श्रीमंत खुदावत न्यायत याचे हुजूर असतां सलुखाचा सवाल जबाब करू लागले ते वक्तीं सरकारातून करार करण्याचे कलमाची याद लेहून दिल्ही कीं, हे पटनास नवाबय हादूर याजकडे पाठवावी त्यावरून मशारनिले यानीं याद रवाना केली त्यापैकीं आंसाहेबीं जंगल्यास फौज पाठवण्याचे वगैरे एक दोन कलमें याद घालून आपणाकडून दुसरीं याद कबूल करून पाठविली त्या यादीबरहुकूम करारनामा सरकारातून ठरविला एक आदवानी वगैरेस इजा न यावी, इतकें कलम ज्यास्त बरकड आसाहेबीं कबूल केल्या बमोजिब कलमें असतां, हालीं दुसरा मसविदा ठरवून पाठविला, यात व त्यात तफावत मारीच आहे तेव्हां करारशिवाय नवी गोष्ट नाही सरकारचे वचनाची कायमी कधी हें आइदे बहुरात येइल एकवस्ती सफूब व सफाई जाली, त्यावरहुकूम निभावणीं व यावें हे सरकारची सेवा आहे आणि ज्या दौलतींत आहादयांतं व वचनाची मजबुती तेच दौलत कायम व नबानाही तोच जाणावा दौलत आहे तेथें आमदही आहे व सिवाराही आहे लेकीन, करारांत अंतर इकडून येणार नाहीं श्रीमंत खुदावत न्यायत व नवाब बहादुर यांची दोस्ती व पक्का सलूख आहला याचा लौकिक बहुत जाला त्यात हंमफामावर नजर घरणें हें म्यानदानास व उमदेपणास लाजम नाहीं, ऐसें मदारुलमाहाम यांनीं दिलांत आणोन आमेदेरयानीं मसविदे पाठविले त्यावरहुकूम करारनामा व निभावणीचीं खतें पाठविलीं आहेत राव मेहेरबा महादजीराव शिंदे फौजेगद गुजराथ प्रांतीं दरकूच गेले त्याजकडून निभावणीचें खत येणें सबब मसविदा मुजरत त्यांजकडे रवाना केला जलदच येईल याद आंसाहेबांकडे रवाना होइल अवलचे करारास व हालीचे करारास तफावत बहुत आहे सरकारातही पांच सात सालांचा सिवारा आपली दोस्ती व भाइचारा जाला तेव्हां इकडील सिवारीयाची फिकीर आंसाहेबांस आहेच ऐसें मदारुलमाहाम यांनीं दिलांत आणोन तफावतीचे कलमाचा येसल्यार आंसाहेबांवर

दिल्हा. आपण लाजम तेंच करतील. कराराप्रमाणे पैक्याचा भरणा आंसाहेब करतीलच. सरकारात खिसारा, मसलत भारी, सबब आपल्याशीं काहीं बोलण्याविशीं रावमेहेरबान कृष्णराव यास कलमी केलें आहे. त्या बमोजीब अमलात यावे. आजीव्रात चेनापट्टणाकडे जाण्यास दिवसगत न लागावी. अरसा बहुत कमी राहिला. इग्रजाची जात बेइमान. दक्षणचा दाइया ठेऊन न होण्याचे मनसबे बांधितात. व खूब मकरही जाणितात. आसाहेबाकडे पटणास येण्याचे राज्यकारण तसेच कर्नेल गाडर सुरतकर याची पुणियास येण्याची आर्जु. लेकीन, त्याचे चालीचा नक्ष पक्का समजोन साफ जाब मदारुल माहाम याणी दिल्हा. साष्टी जबूसर वगैरे देऊन बजीदी केल्यास सरकारातून इग्रजाचा अर्ज ऐकणे, हे होवायाचें नाहीं. येविशीं खातरजमा असावी. आसाहेबही खूब त्याचे मकरास वाकफ. राज्यकारण न ऐकता कायमीने तवीच अमलात यावी. जें होणे ते तर फैनच्या इतल्यानें व सलाहतदबिरीने व्हावे. एकासी गोड बोलून, एकास जक द्यावी, फोडाफोड करावी, हे हुन्नर टोपीकर बहुत जाणतात. या भुलथापीवर न जावें. बाजे मरातब राव मेहेरबान कृष्णराव यास कलमी केले त्यावरून वाजे होईल. हामेश खत पाठवून दोस्तदार याची खुपी करीत जावी.

---

पत्रांक. २३७

पौ मित्ती कार्तिक शुद्ध १५ मगळवार. श्री. १७०१ आश्विन वद्य १३

राजश्री बाळाजी नाईक नाना गोसावी यासी:—

अखडितलक्ष्मीअलंकृत राज्यमान्ये स्ने॥ फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहाद्दर दडवत विनती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेले पाहिजे. विशेष. इकडील सविस्तर वर्तमान पेशजीं एक दोन पत्रे पाठविलीं, त्याजवरून कळेल. प्रस्तुत सुरतेकडील वगैरे कित्तेक मजकूर राजश्री गोविंद गोपाळ याचे पत्रीं लिहिला आहे, त्याजवरोन ध्यानास येईल. वरकड मागाहून साद्यत लिहून पाठऊ. रा छ २६ माहे सवाल. बहुत काय लिहिणे ? लोभ कीजे. हे विनती. मोर्तबसुद. ( शिक्का मार्गे दिल्याप्रमाणे ).

---

पत्राक. २३८ श्री. १७०१ आश्विन वद्य १४

श्रीमत राजश्री बाळाजीनाईकनाना स्वामीचे सेवेसी:—

सेवक गोविंद गोपाळ सा। नमस्कार विनति येथील कुशल ता। अश्विन वद्य १४ मु॥ लष्कर व्यासेश्वर नजीक जाणून यथास्थित असे. विशेष. बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. आज पधरा रोज. त्यास वरचेवर पत्र पाठऊन परामर्ष करीत जावे. यानतर आपण मल्हारजी फडके याजवरा-

घेर पत्र पाठविलें तें पावलें पत्रीं आज्ञा कीं, त्याचा हिशेब पाहून पुन्हां यांसच पाठऊन देणें तेथील कामाचे हेच उपयोगी ह्मणोन आज्ञा त्याज वरून त्यांचा हिशेबाचा मागील फडशा करून, पुढील बदोबस्त याजकडे सांगोन पा आहे तरी तेथील सर्व बदोबस्त करून द्यावयाचा तो आपण करून द्यावा वरकड इकडील मजकूर पेशवी कारीदा समागमें लिहिला आहे व या श्राळ ठाकूर जाऊन पोंहचलेच असतील त्यांचे जबानीवरून ध्यानास येईल सारांश बदाचें सर्व कठिण आलें आहे यांत ईश्वर अबरू राखील तर व आपली कृपा पूर्ण नाहीं तर कळतच आहे तूर्त येथील प्रसग बहुत विलक्षण यात करतांही न करतांही दोष चहूंकडून सकट असो जे काळीं जें घडावयाचें तें तों ईश्वरसत्तेनें घडतें परतु निमित्य मात्र येतें असो आपणास कोणते समई कोणी भाखायिशीं विकल्पाची गोष्ट भासवील ते मात्र आपण ध्यानात न आणावी आह्मीं येथें ते आपणच आहा ऐसें समजोन, जें काम मसलत लहान मोठी करणें ते करावी येविशींची खातर जमा शेवटपावेतों एकत्र रीतीची असों द्यावी आमची निष्ठा चिचापासून देव आहे यात, अतर कधींच पडावयाचें नाहीं याजवर भीसत्ता! परतु निश्चय तों याप्रमाणें आहे येथील सविस्तर मल्हार फडके भवानीं सांगता कळों येइल बहुत काय लिहिणें ? कृपालोभ करावा हे विज्ञप्ति

---

पत्रांक २३० श्रीसार १७०१ कार्तिक शुद्ध ? नतर

पौ कार्तिक बद्य ४ शनवार रात्रीं

शेवेशी सां नमस्कार विनती उपरी आपली आज्ञा घेऊन स्वार जहालों, ते सोमवारीं दोन प्रहरा लष्करांत सुखरूप पावलों त्या प्रहरथार्ची रात्रीस भेट जाहली राजश्री चिमणाजी पंत येथें नव्हते प्रतिपदेस आले त्यांची आमची भेट होऊन मजकूर ध्यानास आला या मजकुरात कांहीं जीव नाहीं मनस्वी जावयाल तुम्हास पूर्वी लिहिला होता त्या प्रॉ आह आपल्या ब्रह्म्याची व मुत्त्याची भेट जाहली कायाचा खुलासा समजला त्याचा तपसील तेथील पत्रें आलीं होतीं त्याजवरून शिलेदाराचे ह्याला गृहस्थ कले तुम्हीं आणा, व ६ जाणा ऐस लाकिकात जहाला गांवा आरगार, तुम्हीं आपला पैका घेणें, कोणाचें भय न धरणें, एसा खुलासा समजल्यानंतर आ पल्या गृहस्थाकडून शिलेदाराकडे जावयाल लाविला आह त्याजवरून या नकारनामकास उपद्रव बहुत जाहला होता तो शाम करविला आहे शिलेदा राचे मत, आमचा पैका द्यावा त्यास, आम्ही उत्तर केलें कीं मार शिलेदा प्रॉ पैका देऊं ऐसें बोलल्यानतर, त्यांतहि शोम पडत नाहीं त्याण हजार राऊत हुजारा चाकरी आणि पावती चाळीस हजार रुपय! यदाचार हजा

रांच्या चिठ्या सावकारावर आहेत. त्याही वजिन्नस चिठ्या त्याजपाशीं आहेत. चिठ्या पो काही रुपाया पावला आहे. त्याचा कारकून रा नारोपत नादुरकर चिमणाजीपताचे विद्यमानें आम्हास भेटले. येथील प्रकार ऐसा आहे. मुख्याकडील जावसाल तर परिछिन्न शिलेदाराचे नाव घेत नाहीं. तुह्मीं जाणत व शिलेदार जाणत, ऐसें स्पष्ट उत्तर जाह्ले. मुख्याचा जावसाल शोध करता गावचे गाव सुरक्षित चालवावे व मुख्याचा व दरबार खर्च सव्वालक्ष पर्यंत पडतील, आणि गृहस्थाची मुक्तता होईल. परतु शिलेदाराचा जावसाल राहतो. जहालें वर्तमान सेवेसीं लिहिले आहे. शिलेदाराचा जावसाल हिशेब देणे. शाईशिरस्तेप्रों पुढें वर्तणूक करू. आह्मास ज्या गृहस्थाकडे पाठविला त्याचा मनसबा कीं, शिलेदाराची तोड पाडावी. हें खरे. यास कारण मुख्याचा जावसालाचा विश्वास पटत नाहीं. याला कारण वकारनामक थाजकडे अकार नामकाचे ग्रहस्थानीं पक्का जावसाल केला आहे कीं नारोबाची सुटका न होय ऐसें पक्केपणें कित्तक जावसाल त्यानीं पक्के करून घेतले आहेत. या अर्थी मुख्याचा जावसालाचा भरंवसा नाहीं. सविस्तर अर्थ त्यानास आणून उत्तर लिहावें. व रावसाहेब भास्करपतास खर्चाविशीं त्यानी चिठी लिहिली आहे, त्याप्रों त्याची वेगमी करावी. बहुत काय लिहिणे ? कृपा लोभ असो द्यावा. हे विनती.

---

पत्रांक २४० श्रीसांब १७०१ कार्तिक वद्य ५

पौ कार्तिक वद्य ७ मंगळवार च्यार घटका रात्र.

सेवेसी सा। नमस्कार विनती उपरी. आपण पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर सविस्तर कळला. येथिल मजकूर आपल्या गृहस्थाची व मुख्याची भेट जाहली. त्यातील मजकूर पत्रीं लिहिता येत नाहीं. परतु तिकडील पक्ष मुख्यानीं भारी धरिला आहे. नकारनामकाचा मजकूर मुक्ततेचा. त्यात मजकूर कीं, आम्हाकडे जाबसाल नाहीं. शिलेदाराची पैक्याची निशा करून त्याणीं सुखरूप जावें. व शिलेदाराचा मजकूर तर मनस्वी आहे. तीन लक्ष शाईशिरस्तेप्रों त्याणीं बाकी काढिली आहे. त्याही मधे ते मजकूर बोलतात कीं, बक्षीचे हिशेबाने शाईशिरस्तेप्रो देणे निघेल तो ऐवज देणें. त्यातही पाच रुपये कमी दिल्यास घेऊ. त्याचाही मजकूर. आपल्या गृहस्थास दरम्याने घालून जावसाल परभारें केले आहेत. येथल्या मुख्याशीं व तेथील कारभाऱ्याशीं काहीं पेचही आहेत. त्याचे जाबसाल होतील तेसमईही शिलेदाराचा पैका दिल्याविना मुक्तता होत नाहीं. व ते गृहस्थ हातीं लागणे हे गोष्ट तो घडत नाहीं. दोहो चोहों दिवसामध्ये मागती मुख्याशीं गाठ घालून त्याची . ममता आपल्या यजमानावर व याची मुक्तता होय ऐसें करितों.

परंतु पैका बहुत पडेल मागाहून होईल वर्तमान तें लेहून पाठऊ आपल्या गृहस्थांनीं चिठी लिहिली आहे ती अलाहिदा पाठविली आहे ती पावेल वाचून त्याचाही उत्तर त्याहार्ये रवाना मिती कार्तिक वा ५, सायकाळ, चार घटका दिवस बहुत काय लिहिणें ! कृपा लोभ असों द्यावा हे विनंती पत्र पाठवाल तें रा देवराव हिंगणे याचे राहुटीस पाठ ऊन द्यावें जो माणूस पाठवाल त्यासही स्थळ हिंगण्याची राहुटी सां गावी हे विनंती

रा। दादास व दिवाणजीस सा। नमस्कार लिहितार्थ परिसिजे उत्तर सपशलिवार लिहिणें लोभ कीजे हे विनंति

---

पत्रांक २४१ श्री १७०१ आश्विन वद्य अखेर

पु॥ श्रीमंत राजश्री बाळाजी नाईक स्वामीचे सेवेसीं —

विनंती आपण आश्वीन शुद्ध १४ चें पत्र पाठविलें तें पावोन परम स तोष जाहला पत्रीं मजकूर कीं, तुम्ही येजमान बहुत सावध असावें ! इ कडील काळजी न करावी काळूबराबर पत्रें पाठविलीं आहेत तीं समक्ष वाचीं व राजश्री बाळोबानाना बहुत उपयोगीं पडले पाहिजे पावोन यज मानाचे पदरीं यांचें यजमानांनीं चालवावें कैलासवासीयांनीं गांव दिल्हे आहेत ते चालविले पाहिजेत व ऐवज जलदीनें पाठवावा म्हणून तपशिलें लि॥ त्यास, यजमानापाशीं निष्ठेनेंच वागत असों दुसरा विचार नाहीं दरबारची काळजी आम्हीं कशास्तव करावी ! आपण प्रसंगीं त्याअर्थी आ म्ही बेफिकर असों ऐवजाचा मजकूर तरी तरतूद करीत आहों इकडे राजा राम गोविंद यांची गडबड व दुसरी चंद्रराव पवार याची जाहली यामुळें सावकार धीर पुरून काम होत नव्हतें आतां तरतूद लवकरच करित गेलों राजश्री बाळोबानाना बहुत उपयोगी पडले त्यास यातील काय भाव आहे तो समजावियात येत नाहीं तरी सविस्तर लिहिलें पाहिजे म्हणजे समजण्यांत येईल बहुत काय ।लीहणें! कृपालाभ करावा हे विनंति

---

पत्रांक २४२ श्री १७०१ मार्गशीर्ष शुद्ध ३

पै॥ मार्गशीर्ष वद्य १ रविवासर शके १७०१

पु॥ राजश्री बाळाजीपंत नाना स्वामीचे सेवेसी —

।विनंती उपरी तुम्ही केलेलीं कलमें लिहिलीं त्याचीं उत्तरें वर्णे प्रमाणें —

सरकारकामाचे बोलणे चालणे च्यार रुपये उणे अधिक नाईकानीं बोलून करारात आणिले आहे, म्हणून लिहिले. उत्तम आहे. कलम १

राजश्री सभाजीबाबा वाणी व घन:शाम नारायण यांनी प्रयत्न मात्र केला, सरकारात पत्रें गोविंद जोशी याजबराबर पा।, परतु सरकारात जावसाल न जाला, म्हणोन लिहिलें ते कळलें. कलम १.

श्रीमंत राजश्री नानाफडनीस याचे हारण व नाईकाचा खलबत्ता हरीपत जटार याजसमागमें पाठविला आहे तो पावलाच असेल. उत्तर पाठवावें. कलम १

अकारयाजविशीं परभारें काहीं लि।, तरी तुह्मावर घालून ल्याहावें, तरी जें लिहिणें तें तुह्मावरी घालून लेहूं. कलम १.

सतरा गावचा मजकूर व गल्हे मरोळी, त्यास तूर्त गडबड माजली आहे. तूर्त काय समजावें. पुढें निवळ जाहलियावर तुमचे व नाईकाचे विचारें ठरेल तें केलें जाईल. कलम १.

निंबाळकर सोयरे याजकडील लग्नाचा मजकूर लि।. त्यास त्याचींहि पत्रें परभारे येथे आलीं आहेत. तूर्त दगा! काहीं सुचत नाहीं. याचा निश्चय मागाहून करून पाठवितो. त्याप्रा। करावें. कलम १.

नारायणराव गोविंद वगैरे शिलेदार याचा मजकूर लि।. त्यास तुह्मी इकडे यावयाचे सुमार होईल तेव्हा येथून लेहून पाठऊ. त्याप्रा। करावें. कलम १.

हुडीयाच्या पेटा पाठवणे म्हणून लि। त्यास जाबि हुडिया नाहीत... पा। आहेत. पा। असतील. कुशल देवेश्वर याचे हुडीची दिक्कत होती. म्हणून पेठ पाठविली आहे. ऐवज पावेल. चिंता नाहीं. कलम १.

ऐवजाविशीं ताकीद असावी. त्यास, ताकीद तो आहेच. गडबडीस विलाज काय करावा! कलम १.

सुरतआठाविशीं तील खबरदारी असावी. त्यास, तेथील बदोबस्त आहे. त्याविशीं चिंता नाही. कलम १.

बाळ ठाकूर याचे यजमानाचें समक्ष बोलणे जाले आहे. त्यात काहीं अतर नाहीं. पक्केपणच आहे. कलम १

गोपाळराव रामचद्र याचा मजकूर त्यास त्याचे चुलते आम्हापाशीं बहूत आग्रह करून पत्र तुम्हावर घेऊन गेले आहेत कीं, हे तुमचे मिळणींत मिळाले. असें असल्यास लेहून पा। उपरात येथून लिहिणें तें लिहू, म्हणून पत्र दिल्हे आहे. तुमचे युक्तीस पडेल ते करावे. कलम १.

सरकारातून बदोबस्त कागदपत्राचा वगैरे काय करून द्यावा म्हणून लि।. त्यास, सर्व तुमचे ध्यानात आहे. कनिष्टाचा बदोबस्त व गृहस्थाचा यथास्थित रीतीनें व गगातीरीं एक गाव निर्वेध चागला बहुत दिवस चाले असा करून घेणें. बरकड समक्ष सागितलें आहे, व याद दिल्ही आहे, त्याप्रा। करावें. इग्रजाकडे माहाल गेले आहेत त्याचा प्रेत्न करून घ्यावा. कलम १.

नवापूर द्यावें असें वचन राजश्री

विगरखां माहाल हैबेमाचेकडे आपले गेले आहेत त्याचे मोबदला पच महाल वगैरे सरकारांतून देत होते त्यास ऐवज थोडा म्हणून न घेतले त्याचा प्रेत्न करून पाहणें कलम १

राजश्री नानाफडणीस यांचें पत्र आलें होतें त्याची नकल तुह्मास पाहण्यास पाा आहे पत्रांत मजकूर कीं, मसलतीचें काम आहे, तुम्हांकडील मातबर माणूस पाठऊन द्यावा, त्यांसीं बोलू यांप्रमाणें पत्र यजमानाचें नांवें आलें होतें त्याचें उत्तर येथून लेहुन दिल्हें कीं, आह्मांकडील नाईक पहिले पासोन बोलतात तेच बोलतील त्याप्रो लेहून दिल्हें आहे तुम्हास कळावें कलम १

हरी तात्याचें आहे, व यादहि करयाची आहे पुण्यास स्वारी गेलिया वरी सनदा करून द्याव्या असा करार आहे तुम्हास याकरच आहे करायाची याद तुह्मी आवाना तुह्मांजवळ दिल्हीच असेल भसली तरी पाठऊन देऊं करारांत आणावें कलम १

येणें प्रमाणें लिहिलें आहे यात नाइकाचे विचारें येईल तेसें करावें मिति मार्गशीर शुध ३ बहुत काय लिहिणें ? कृपा किजे हे विनंति

---

पत्रांक २४३ श्री १७०१ मार्गशीर्ष शुद्ध १०

श्रीमंत राजश्री बाळाजीनाईकनाना भिडे स्वामीचे सेवेसी —

विनंति उपरी तुह्मीं पत्र मागशीर शुद्ध ४ रविवारचें पा तें मंदवारीं दोन प्रहर रात्रीस पावलें सातवे रोजीं पावलें लिहिला मजकूर कळों आला अटकेंत असतां पत्रें कशीं येतात, ह्मणून लिा चयकशी तो बहुत आहे परंतु हें कलियुग ! लहान माणसास द्रव्य दासीवस्यास न करावयाचें कर्म करितात यजमान व ते एक जाहले ह्मणून लिा त्यास, येथें तों फारीच नाहीं तेथें आपल्यास प्रत्ययास कैसें आलें, त्याचा शोध पुर्तेपणीं करून लिहून पाठयावें परयाँ रीके तो असामींवार स्वामीपाशीं आहेत अशीं दुरुस्याचारानीं काढून मधील मध्यें कर्में आजपर्यंत करीत आले आहेत तेहि त्यांचे नित्यांतील आहेत याजकरितां खरें खोटें कोठून आहे, हें समजलें पाहिजे याजकरितां निगा पत्रीं ठिकाणीं पाहावी यजमान आम्ही बाहेर निघालों तेथें होते तों दयाव होता मागें राहणार नाहीं, वसेल होईल, याजकरितां उभयतां बंधु मागशीर शुद्ध ३ चे दिवशीं अस्कार करून केशवराय देशमुख आले होते त्याजसमागमें सरंजाम देऊन अहमदनगरास रवाना केलें तेथें पोंचलेयाने

आपणास पत्र आलें नाहीं. येईल. समागमें आपलेकडील खिजमतगार, ब्राह्मण, कारकून आरबाच्या बेरखा नेहमी दोन दिल्या आहेत. याशिवाय पोंचवावयाकरिता पागा वगैरे सरजाम दिल्हा आहे. तो अद्याप आला नाहीं. कळावें. येविशींची खातरजमा असो द्यावी. आमचा प्राण गेल्यावर मग जे घडणें ते घडेल. आह्मी तुह्मी एकच भाईबंद, स्नेही, धणी, सर्व आपली जोड केली आहे. वरकड त्याग न करिता करणें प्राप्त जाला आहे. तेव्हा आपलेशिवाय दुसरा विचार नाहीं. यजमानानीं लि॥ आहे, त्याजवरून कळेल. मिती मार्गशीर शुद्ध १० मदवार प्रातःकाळ. हे विज्ञप्ति.

---

पत्रांक २४४ श्री १७०१ मार्गशीर्ष शुद्ध १०

पुरवणी राजश्री बाळाजीनाईकनाना भिडे गोसावी यासीः—

विनंति उपरी. आपण बरखोडेविशीं लिहिलें कीं, थोडक्या कामासाठीं राजश्री हरीपततात्या याचे चित्तात संशय पडतो, याजकरिता मल्हारजी फडके यासी मनाई करून पत्र पाठवावें, त्यांणीं सनद आणिली त्यावरून सर्वांस आश्चर्य वाटतें. ऐशियास, आह्मीं जहागिरीची सनद दिली. परंतु फडके यांणीं समक्ष कबूल करून बोलिला जे, मी नाइकास पत्रें दाखवून त्याचे सांगितलेप्रमाणें तात्याचे मर्जीनुरूप घडून आल्यास बंदोबस्त करून घेऊं. तुह्मास न सांगता परभारा बखेडा केला. असो. त्याजला मावती पत्र सादर असे. मुजाहीम होणार नाहीं. आपण राजश्री तात्या यासीं समाधानाचेंच बोलावें. कळावें छ ९ माहे जिल्हेज. बहुत काय लिहिणें ? लोभ कीजे. हे विनंती मोर्तबसुद.

---

पत्रांक २४५ श्री. (नकल) १७०१ मार्गशीर्ष शुद्ध १०.

राजश्री बाळाजीनाईकनाना भिडे गोसावी यासीं:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री॥ फत्तेसिंग गाइकवाड सेनाखासखेल समशेरबहादर दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित असावें. विशेष. तुह्मी मुजरत अजुरदार समागमें पत्र पाठविलें तें पाऊन सविस्तर लेखनार्थ ध्यानास आला. आगराजाकडील मजकूर विस्तारें लिहिला कीं, केलें काय. ऐशीयासी, येथें त्यातील एकहि प्रकार नाहीं. त्याहिवर तेथें आपणास दरबारीं सांगितलें असेल त्यागोष्टीचा शोध पुरतेपणें मनास आणून कोणाच्या कागदपत्रीं काय, तें साद्यंत ल्याहावें. मारानिलें व त्याचे बंधू असे मार्गशीर्ष शु॥ ३ अलंकारयुक्त राजश्री केशवराव देशमूख समागमें वडनगरास पाठविले आहेत. वरकड तेथें कोणी लबाडी केली असेल, त्याचें ठिकाण लाऊन ल्याहावें. तुमचे विचारासिवाय काहीं नाहीं, येविशींची खातरजमा

माळाठाकूर याणीं केलीच असेल परंतु इतक्या त्याश्या मर्धीच होतात ! त्याचा शोध व शिपायानिशीं पत्रें व स्वदस्तुर चिठी याचा शोध मनास आणून लिा कीं, पुन्हा हें न घडे त्याचें पारपत्यही घडल्या कोणी असें करणार नाहीं मधोचे मर्थे असें घडल्या घरबूडच होणार. त्यापक्षीं हें ठिकाण लाऊन जरूर जरूर लिा माझ्या गळ्याची शपथ असे तर आपण हे गोष्टीची सुस्ती करू नये बहुत काय लिहिणें ? याा छ ९ माहे जिल्हेज हे विनंति

मार्गशीर्ष वद्य ५ सोमवार याा नारायणराव गोविंद यांजबराबर अस्सल

---

पत्रांक २४६

पैा छ १० जिल्हेज श्री १७०१ मार्गशीर्ष शुद्ध ११

रावसो मेहेरवान करमफर्माय मोखलिस माळाची पंडत फडनवीस सलामतुवाळा

नादब पौंक मुलाखत मसरत आयात इचीहाद आसरबाद येथील खुषी जाणून आपली पादमानी हमेषा कलमी करीत आलें पाहिजे दरींविला, परखुरदार सादत व एकबार तशिकरीम साहेब यास सावणूरचा नवाय अबदुल हमीदखान याचे लडकीची निसबत मोरर पाहून नेमदीन छ २५ जिल्कादीं शादीची तारीख मुकरर जाहली आहे हे खुषी आपले असे, याकरितां कलमीं केलें जातें जे आपण येऊन शादीची खुषी नजरेनें पाहून दिलशाद व दोस्तीची तरक्की केली पाहिजे हमेष आपली पादमानीस निगारस करवित यावें जियादा लिहिणें काम असे ?

---

पत्रांक २४७

पौ मिती मार्गशीर्ष वद्य ४ रविवार रात्रौ श्री १७०१ मार्गशीर्ष शुद्ध असेर

राजश्री माळाजीनाइक स्वामीचे सेवेसी —

सेवक गोविंद गोपाळ साष्टांग नमस्कार. येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत असिलें पाहिजे विशेष आपण कार्तिक शुद्ध १ व बुध पंचमीचीं दोन पत्रें पाठविलीं तीं पावलीं लिा सविस्तर अवगत जाहलें त्रिकरीत राजश्री नारोभानाना यांची काळजी न करावी आपल्यावर विश्वास, तेव्हां काळजी कशास करावी, हें तो खरेंच आहे आमचा अभिमान आपणासच आहे तेथें आदीं उपदेशिक काय स्याहावें ? आपण आम्हाविशीं बहुत मेहनत करितात, म्हणोन राजश्री माळाजीपतांनीं तपशिलें लिहिलें त्यात आमचा विचार आपल्यार्थी किमपी दुसरा नाहीं ऐवजाचा भरणा होणें यथील भय पाहतां आपणास काय स्याहावें ! केवळ संकटाचे दिवस प्राप्त जाहले आहेत

चहूंकडून हंगाम एकच माजला आहे. सिबंदीचा पेंच फौज घरीं बसलिया-मुळें खिंदी चढली. जलचर नजीक याचा विश्वास नाहीं. यामुळे घरीं बसून राहणें प्राप्त जाहलें. आता तरी आपली पत्रें व सरकारचीं पत्रें आलीं कीं, तर बिघडला. यामुळें केवळ लोकांचे दोन ठिकाणीं राहिलें नाहीं. मुलूख, प्रजन्य नाहीं यामुळें नागव जाहला. पुनरे हे अरिष्ट उभें राहिलें. पुढें याचा विचार काय करणार? आपण आमचे वचनावर सरकारात वचनीं गुतले. यास पार पाडणार ते समर्थ आहे. आपण काहीं चिंता न करावी. ऐवजाचे तजाविजीत असो. चिरंजीव राजश्री नाना आपणापाशीं आलियाचें वर्तमान जलदीनें लिहिलें पाहिजे. आमचा अभिमान सर्वप्रकारें आपणास आहे. या अर्थी आम्हास काळजी कोणे गोष्टीची नाहीं. येथील सविस्तर वजमानपत्राव-रून कळेल. सारांश, ही दौलत चोटीखालीं बहुत आली आहे. काहीं बाकी राहिली नाहीं. एक एक विघ्न नवेन उभें राहतें. यात ईश्वर लाज राखील ते खरी. सारांश, आम्हास आपले पाशीं खरेपण राहिलें म्हणजे सर्व जालें. वरकड सविस्तर मागाहून लिहून पा. चिरंजीवाचे येणें आपल्यापाशीं जालें न जालें हें कळत नाहीं. तरी सविस्तर लिहावें. न जाल्यास येणें होईल ते करावें. आपल्या विचारास करावयाचें तसें करावे. आह्मी आपल्या आज्ञेशिवाय नाहीं. बहुत काय लिहिणें ? कृपा लोभ किजे. हे विज्ञप्ति.

---

पत्रांक २४८ श्री. १७०१ मार्गशीर्ष वद्य ९

राजश्री फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर गोसावी यासी:—

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री हरी बल्लाळ आशीर्वाद. विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असिले पाहिजे. विशेष. आपणाकडून पत्रें येतात व राजश्री बाळाजीनाईकनाना सांगतात, त्यावरून सविस्तर कळतें. इकडील कित्तेक मजकूर लोकवार्ता ऐकोन चित्त संशयाविष्ट होत असेल. त्यास, श्रीमंत नानाची कायम मिजाज आहे ? जो आपल्याशीं करार आहे त्यात दुसरी गोष्ट होणार नाहीं. येविसीं पुर्तेपणी खातरजमा असावी. आपले दवलतीचें कल्याण व्हावे हेंच इच्छा व तत्प्रत्युक्त साधन तेच करितों. आपण श्रीमंत राजश्री रावसाहेब याचे पायाशीं एकनिष्ठ. तेव्हा, दुसरेसारखी गोष्ट कैसी घडेल ! कोणी कित्तेक बनाऊन सांगतील त्याजवर न जावें. जो येथील खबीर आहे, तो बळकट आहे. चिंता न करावी. येविशीं बाळाजीनाईकनाना लिहितील त्यावरून कळेल. रा छ २२ जिल्हेज. बहुत काय लिहिणें. आह्मी येथे असता आपण कोणेविसीं चिंता न करावी. हे विनती.

पत्रांक २४९
पो मिति पौषशुद्ध १२ श्री १७०१ मार्गशीर्ष वद्य १०

श्रीमत राजश्री बाळाजीनाईकनाना स्वामीचे सेवेसीं —

सेवक गोविंद गोपाळ सां नमस्कार विनति उपरी येथील कुशल ता। छ २३ माहे जिल्हेजपर्यंत वर्तमान येथास्थित जाणोन स्वकीयें कुशल लेखन करीत असावें विशेष सांप्रत आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं त्यास सविस्तर लेहून संतोषवीत जावें इकडील वृत्त पेशजीं लिहिलें आहे त्यावरून कळों आलें असेल सरकार सादर यजमान साहेबाचे पत्रावरूनें विदित होईल सर्व प्रकारें भरवसा आपला आहे चिरंजीव राजश्री नारो गोपाळ याचविसीं आपणास बहुत लिहिलें परंतु सरकारांत च्यार गोष्टी लागून त्याची रवानगी न झाली या कार्याची आपणापासून दिवसगत न लागावी या उपरी सत्वर मार्गस्त करावें विस्तार ल्याहावा ऐसें नाहीं तेथें बहुत उपद्रव भोगिला आहे आपणास कळतच असेल सारांश, सरकारलक्षांत एकनिष्ठपणें असतां तेथें ऐसा विचार नसावा असो आपण श्रम करितां कमी करीत नाहीं तेव्हां आमचे दैवयोग आपण काय करितील ! सरकार इकडील मजकूर तरी बळचर सामान सरंजाम करून तयार आले आहेत मोठ्या व मसलतीतील तो विचार उत्तरदिशेची आहे घांट व मार्ग इकडील व दक्षिणेकडील कों डाईबारी व सेंदव्याचा वगैरे तमाम पाहावयासीं गेले आहेत मारा पेशदार लाऊन नर्मदाचा घाट नीट करावयासीं गेले आहेत गुंता तयारींत काडीमात्र नाहीं आपलेकडील भरवसा धरावा, तर यावेळपावेतों इष्टोत्पत्तीस कांहीं भेद नाहीं! आझांस तों तीन जागा सांभाळणें —एक नर्मदाउत्तरतीर, दुसरें दक्षिणतीर, व महीउत्तरतीर तीन्ही ठिकाणीं त्याचा शेजार एक ठिकाणीं असल्यास चिंता नाहीं सर्व शत्रुपण मार्गी झालें आहे दुसरेकडील येथील भरवसा बाळगावा तरी कळतच आहे ! शहरचा कारभार सावकारी आहे ऐशियासीं विकडून कोंडाईकडून आगमन सुरतप्रांतीं अति सत्वर जाल्यास उत्तम आहे म्हणजे उत्तरतीरकडील काळजी नाहीं जैसें करणें तैसें घडेल हे गोष्टीस दिवसगत लागली तर दोष न ठेवावा मग जैसें घडावयाचें असेल तैसें घडेल सारांश, येथील लक्ष तुह्मांशिवाय नाहीं खातरजमा असों द्यावी परिणाम मात्र शुद्ध व्हावा नाहींतर एकहि साधन नाहीं ऐसें जाहल्यास मग विचार कळतच आहे दुसरें चंदरराव पवार यांचें पारपत्य होऊन पेटलाद व आमोद येथील ठाणीं सरकारचीं बसविलीं आमोदेस सरंजाम आपले कडील आहे कारण, कादार यांचे मतें असावा नाहीं तर कादार यांच्यानें ठिकाण धरून रहावत नाहीं कारण मित्र नजीक शेजार याजकरितां यामों फरून बंदोबस्त केला आहे कादार यांचे विचारें सरंजाम बोलावणें जाहल्यास बोलाऊन घेऊ पवार नर्मदा उतरून अंकलेश्वरीं पोंचले तेथून पुढें जाणार. जातील

जोतसमयी आपलेकडील माहाल व सराइ येथील वोळी धरून नेल्या व गुरे ढोरें घेऊन गेले। माहालाची खराबी बहुत केली. पुढा सुरतेकडे जावे या मनसब्यात त्यास, त्याचे यजमानाचे पत्र आलें की, तेथेच राहावें. सरंजाम तोफा वगैरे पायदळ आगखी रा करणार. ऐसी बातमी आली. तेव्हा आणखी उपद्याप करावयाचा मनसबा आहे. मग जे घडेल ते पाहावे. रा लक्षमणराव चिटनिस यासी रजा दिली. ठाणी काही उठविली. आण आपले कडील जलचर यार्णी पा व पाठवणार. मारनिले तेथे आल्यावर सविस्तर समजण्यात येईल. माराश, तिकडून आगमन लौकर व्हावें. म्हणजे सर्व गोष्टी उत्तम आहे. बहुत काय लिहिणे ? कृपा करावी. हे विज्ञप्ति.

---

पत्रांक २५० श्री १७०१ पौष शुद्ध ३

श्रीमंत राजश्री नाईक स्वामीचे सेवेसी:—

विनती सेवक नारायणराव गोविंद मो जामगाव सा दंडवत विज्ञापना ता पौष शुद्ध त्रितिया इतुवासरे प्रहर रात्र पावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपली आज्ञा घेऊन स्वार जालो, ते शनवारी येथे दाखल जालो. रविवारी श्रीमंत पाटीलबावाची भेट घेतली. त्याचा कित्तेक मार तपशीलवार राजश्री बाळाजीपतनाना बक्षी याचे पत्री लिहिला आहे. त्याजवरून श्रुत होईल. पत्री मार लिा आहे, त्याजप्रमाणे सरकारचे पत्राचा डौल याचे नावाचा तयार करून आर्धा पाठवावा. याचा निग्रह आहे, ऐसें नाहीं. ममतेच्या विचारे सर्व आपले कृपेकरून होऊन येईल. पत्रदर्शनीं विनती लिहिल्याप्रमाणे पत्रे पाठऊन द्यावीं. बहुत काय लिहिणे ? कृपा असो दिजे. हे विनति.

---

पत्रांक २५१ श्री (नकल) १७०१ पौष शुद्ध १३

याद कराराची येणेप्रमाणे ठरली. सुा समानीन मया व अलफ. मो जाहला. वि.—

७१००० तूर्त नक्त द्यावे.

५०००० मुख्यास.

२१००० दरबारचा खर्च.

५००० रावजी-

५००० भाई.

४००० आबा चिटणीस.

२००० रामाजी पाटील.

२००० आपाजी साबाजी.

२००० निळो शामजी
१००० भिऊबादादा

२१०००

७१०००

१५०००० राजश्री असाजी नागेश याजकडून हिशेब घ्यावा त्या ऐवजी
१००००० दरबारचा खर्च
५०००० मुस्त्यास

१५००००

सदरहू याद तुमचे हातीं असावी

३२००० सरंजाम किल्ले पावागड मार्शी लाऊन द्यावा ह्मणोन पहिला करार तलबाना

२५००० मुस्त्यास
४००० रायजीस गाव एक चांगला
३००० भाइस गांव एक चागला

३२०००

याच्या सनदा द्याव्या अथवा सनदा जवळ नसल्यास कराराची याद लिहून देऊन याचे कारकुनाजवळ सनदा यजमानाजवळ गेलियावर द्याव्या

सदरहु तीनही कलमें याजप्रमाणें ठरलीं याची सरतूद लिहिल्याप्रमाणें करून पाठवावी आपण म्हणतील कीं, तूर्त देणें याचा ठराव सांगितल्यापेक्षां अधिक जाला तर येथून गृहस्थ गेले याजमुळें आह्मांकडून बोलण्यास कमी जाहालें तेव्हां मदिसा पार जाहली दोघे मुद्दई सबब येथें त्यांचीं सूत्रें नाना प्रकारचीं लागलीं मग कोणेप्रकारें बंदोबस्त सचिव व्हावा यामुळें ठराव याजप्रों जाहला हिशेबाचे वर्ती ठराव जाहला तो आपले सरकारचे हिताचा आहे सर्जाम ठरला तो पहिले बोलण्यांत आहे त्यास शक, विशेष काय लिहिणे, लोभ असों दिजे हे विनंति मिति पौष शुा १३

पत्रांक २५२ श्री १७०१ पौष वद्य १४

राजश्री फत्तेसिगराव गायकवाड सेनासासखेल समशेरबहादर गोसावी यांसी —

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो महादजी शिंदे रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लिहित असिलें

पाहिजे विशेष. आपणाकडून राजश्री नारायण गोविंद जामगांवचे मुकामीं आले. यांणीं कित्येक आपणाकडील घरोब्याचे अर्थ सांगितले. त्याजवरून कळले. ऐशास पूर्वीपासून आपला आमचा स्नेह चालत आला आहे. त्याचप्रों पुढे चालावा, हेंच आमचे मानस आहे. त्यास, सांप्रत गुजराथप्राते इंग्रज यांणी दगा केला आहे. त्याचें पारिपत्य करणें प्राप्त आहे. येविशीं मुजरत आपणाकडे पत्र पाठविलें आहे. व हालीं मारनिलेस सांगितलें आहे ते आपणास लिहितलि. आह्मीही दरमजल येत असो आम्ही येऊ तोंपर्यंत आपण दम धरून, ठाणीं जतन करून, शत्रूचे पारिपत्यास शेह द्यावा. त्याचा पराश्रम होऊ देऊ नये. आपणास सामील व्हावे, ह्मणून चिरंजीव राजश्री भागिरथराव शिंदे यास लिहून पाठविले आहे. आजपर्यंत आपण सरकारचे लक्ष राखिलेंच आहे. त्याचप्रों पुढे सरकारउपयोग करून दाखवावा. वरकड इकडील अर्थ आपणासीं दुसरा नाहीं, हें मारनिले लिहितलि. पन्नाससाठ तोफा समागमें आहेत. ह्या दरकुचात लांब मजलींत चालत नाहींत. याकरितां पंचवीस तोफा समागमे घेऊन, वरकड तोफा मागे ठेविल्या. मागाहून येतील. तूर्त पंचवीस तोफा थोर लहान बराबर घेतल्या. त्यासुद्धां जलदच येऊन पोहचतों. तों पावेतों इंग्रजास टासून राखावें. वर्तमान वरचेवरी कळवीत जावे. रा छ २७ मोहोरम. बहुत काय लिहिणें? लोभ किजे हे विनंती. मोर्तबसूद.




---

पत्रांक २५३ श्री. १७०१ माघ वद्य ११

दंडवत विनंती उपरी. छ. २९ माहे मोहरमची हस्ताक्षरची चिठी पाठवेली ती पावली. पावोन संतोष जाहला. कित्तेक अर्थ खातरजमेचे लिहिले. यासी आजपर्यंत ममतेचें लक्ष अकृतिम आमचे ठायीं जाणोन सर्वस्वीं अर्थे प्राणें आमचें लक्ष सरकारचे सेवेंत. दुसरा अर्थ नाहीं. त्यापक्षीं सांप्रत जलचराचा प्रकार वृद्धिंगत. कोण्हीकडील साहित्य समयासीं न जालें. प्रांताचा विध्वंस. स्थळाचा अपाय जाहल्यास पुन्हा विशेष प्रयत्न श्रमसाध्य. कारस्थानी

समयोचित करणें तें करावें लागती परंतु ज्यात सरकारमसलहीत उपयोग त्याजवर नजर आहे यात अंतर असेल तर शपथ असे येविशींची खातरजमा असों द्यावी सविस्तर नाईक निवेदन करतील त्याजवरोन कळेल रा छ २४ माहे सफर हे विनंती

---

पत्रांक २५४

श्रीशंकर प्रसन्न त्रिसुद १७०१ माघ वद्य ३०

राजश्री पाटील बावा गोसावी यासी —

श्रीमतसकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री बाळाजी अनंत नि॥ श्रीमंत राजश्री फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर आशिर्वाद विनंती येथील कुशल ता॥ माघ वद्य पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष आपण राजश्री नारायणराव गोविंद यांसी आज्ञा दिली मारनिल्हे येथे आले सविस्तर कृपेचें वर्तमान सांगितलें त्यावरून बहुत संतोष जाहला आपण थोर, सर्व प्रकारें सांभाळ करित आलां पुढें आपण करितील श्रीमंत रा सेनाखासखेल आपणाशिवाय काडीमात्र नाहींत जी विनंती करणें ती मारनिल्हेस सांगितली आहे ती ध्यानांत आणून बंदोबस्त करावा आम्ही सेवक लोक पदरचे असों सेनाखासखेल यांसीं पत्रें येऊन रा केली आहेत त्यांचीं उत्तरें आपणाकडेस येतील त्याजवरून सविस्तर निवेदन होईल

( यादील शोधावरून हा मसुदा असावा असें दिसतें )

---

पत्रांक २५५ श्री १७०१ माघ वद्य

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नारोपतनाना स्वामीचे सेवेसी —

पो॥ बाळाजीनाईक भिडे सा॥ नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असलें पाहिजे विशेष राजश्री नारायणराव गोविंद हे राजश्री पाटिलबावांकडे पाठविले होते त्यांसीं बोलोन येथें आम्हांकडे आले त्यास त्यांच्या बोलण्याचालण्यांत पाटिलबोवांसीं आलें आहे तें सर्व आपल्यास निवेदन करतील तें ध्यानात आणून, त्या दरबारचा बंदोबस्त पक्के रीतीचा करून, सेनाखासखेल यांचे निदर्शणांत येई तें करावें सर्व मर ऽसा आपला आहे येथें विस्तारें ल्याहावें नलगे राजश्री भटो आबजी पुन्हां आपले दरबारीं साधनास लागले आहेत, म्हणोन वर्तमान परस्परें आईकितों त्यास, सर्व साधन करणें आपणाजवळ त्याअर्थी आम्ही काळजी कशास करावी ? आम्हांकडील व सेनाखासखेल यांजकडील मजकूर मारनिल्हे निवेदन करितील, त्याप्रमाणें बंदोबस्त करून देत असावा

---

मादी राजश्री फत्तेसिंगराव गायकवाड सेनाखासखेल समशेरबहादर सुा समानीन मया व अलूफ.

१ तुमची आमची निखालसता राजश्री बाळाजीनाईक भिडे याचे विद्यमाने जाहली आहे. आपणास खातरजमा पडावी येविशीं अलाहिदा कलमबंदी लिहिली आहे त्यावरून कळेल. ह्मणोन पत्र.

१ इंग्रजाचे मसलतीस आह्मी उभयता सरदार येणार आहो. त्यासमयीं आह्मा उभयताकडून अगर सरकारातून तुम्हाविशींचे प्रकार वाकडे आढळल्यास आह्मी तुम्हास सर्व प्रकारे हमारा आहो. अंतर देणार नाहीं ह्मणोन बेलभंडार दिला आहे कलम १

१ इंग्रजाचा व तुमचा वैरभाव पडल्यास तुमचे साहित्य सर्व प्रकारे करूं. म्हणोन पत्र. कलम.

---

पत्रांक २५७

( मुसाबुसी याचे पत्राची नकल ) श्री ( नकल ) १७०२ आषाढ वद्य २

जहामगब अवालिमरतबात शौकतमाली मनलतमुलान मेहरबान मदारुलमहाम बाळाजी पंडित मुनक मोहबतह्रू'—

छ १५ रजब पावेतो दरजागा गुडाल्लूर खैर आफियत जाणोन आपली पादमानी हमेशा कलमी करवीत असले पाहिजे. दिगर इंग्रेजानीं बहुत गरमी यदा तिकडे......करून खुष्की तमाम काबिज केले. आणीक करीत जातात. याजकरिता खुष्कीचे तमाम सरदारानीं इंग्रेजास तबी करून खुष्कीतून त्याजला खेरीज करावे. ह्मणून नकष टराऊन त्याजप्रमाणे इंग्रजावर चहूंकडोन खुष्कीवर मोहीम केली आहे. दर्यांत इंग्रजाची जहाजे वगैरे आहेत. त्याचे तबीबद्दल फरासीसाची जमियत पाठवणे. परंतु मसलत करून नवाब हैदरखान बहादर इज्जतमकान याजकडून फरासिसाच्या पातशाहास व वजीरासही ते खत लिहून मुजरतमहाम वगैरे पाठविले. करिता पेशर्जी मुसे सोडोब व मुसे खुपभैन बा। फरासिसाचे जमियत रवाना करून पाठविले होते. त्यास हाली आम्हासही सात हजार सालेदातसहित रवाना करून पाठविले. याकरिता आह्मीही गुडलुरास येऊन तीन महिने जाले. आह्मीं पाहिजे तसा सामान सरजाम व तोफखान्याचे बैलावर चारीच घोडे व खबरदारीकरिता बैल उंटें वगैरे खर्चास नकद व खाणेचा सरजाम नवाब फत्तेअलीखानबहादूर यांणी करून दिल्हा आहे, आह्मीं आपली जमियत व नबाब मौसूफ याची जमिय-

वेचें इंग्रेजपाकानें अनकरीव चेनापट्टणचें मकान घेऊन, इकडील इमजास व माम गारत करून, वैसेंच मुंबईकडे दर्याचे राहानें मुशाफुफरून्नें यास जाहा आसुदा रवाना करून पाठवून, आह्मी खुपकाचे रहानें येव असों खुदाचे फ जलेकडून मुंबई वगैरे मकाने घेऊन रावपंडितप्रधान याचे वालुके मकानांत वगैरे इमजानें घेतले आहे तेंही सहजाणें सोडून दिल्हें जाईल आह्मी आलों सें पाहून, इमज आपले जागा घाबरा होऊन, खुपकीचे सरदाराशीं फोडाफो डी करून, आपणाकडे करून घ्यावें म्हणून या तजविजेंत आहेत त्याची व जयीम आपण आपले करारमदारावर कायम राहून, तिकडे इमजोत संभी अमलात येईतसें करावें आमचे व आपले इत्तीफाकानें इमजाचें नांव निशाण नाहशिरस्ते नेस्तनाबूद होतील आनि बहुतां दफन होतील आपण हें काम रातीवार्नें, बनाव दूरंदेशी आहेत, कलमी करावें असें नाहीं इमजाकडील इमीष्टवीन गरनल व असीर जाहले आहेत त्यास सोडून घावें त्यास कैद करून ठेविले इमजाकडे रघुनाथराव आहेत त्याचा मदत होत आहे आमांस आपले दोस्त जाणून हमेषा आपली पादमानी कलमी करीत असें पाहिजे जिआदा काम लिहिणें असे।

---

पत्रांक २५८ ( असल घमोजीव नकल ) १७०२ श्रावण

पहत अजम बाळाजीपंत फडणवीस सलमल्लाहुताला

सो मेहेरवान करमफर्माय मुखलिसा यादस पौक मुलाकत मशरेत आसा व इत्तीहाद मामसरवाद येथील खुस्की जाणून आपली यादमानी हमेषा कलमी करीत जावें दिगर, आह्मीं घाट उतरून मसालिपाकडील कितेक गड किल्लेस ठाणा घातले मजकूरास पत्री लेहून पाठविलें असे, त्यावरून मालूम होइल चेनापटणाकडेही दौड पाठविलें असता, मकान मजकुराचे आसपास नीम कोसचे फासलेनें फिरंगीयांचे बाग आहे त्या भागातील फिर गी सरदार वगैरेस मारामारी केल्याचा मजकूर परभारें आपणास जहूरात येईल इकडील फौज चेनापटणचे चौगीर्दी मारामारी करीत फिरत आहेत सिलपैल, फिरंगयानी इकडे भारी धेद लागल्याकारिता मछलीबंदर वगैरे तमाम जागेची जमियेत बोलाऊ पाठविलें आहेत त्यापैकीं कांहीं जामियत येऊन जमा झाली आहे आणखी जामियत येऊन जमा होणार आहे त्यांणी जमा होऊन मैदानास निघतील तरी लढाई करावी, म्हणोन मुकरर केलें असे सिलपैल, या मुलखांत यारीयेचा घदत भार आहे तरी आम्हीं आपले दो स्तीवर नजर देऊन, वारीय वगैरे एकही न पाहतां, सख्ती कबूल करून, मुलहा पैशामी तंपीचे कामावर नमूद जालों असों जे जे संभी होत जाइल ते हुजुरात येईल नबाब निजाम अलीखां व मोघले तांहाल तामाप

याचा सबब काय न कळे. तरी कलमी करून पाठवावें. कृष्णराव नारायण तेथें पोहोचले असतील. आपणाकडून येथे राहावयाबद्दल रावमाारनिलेसच रवाना करून पाठाविणेचे करावे. हमेशा आपली शादमानी कलमी करीत यावे. जिआदा लिहिणे काय असे ? हे कितावत.

---

पत्रांक २५९.

छ १ शवाल. १७०२ भाद्रपद वद्य २.

श्रमित राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः--

सेवक रामचंद्र कृष्ण रिसबुड सा नमस्कार विज्ञापना. तागायत छ १५ माहे रमजान मुकाम आदवानी नजीक, नबाब बसालतजंग, जाणोन वर्तमान यथास्थित असे. विशेष. येथील वर्तमान छ २३ साबानीं जासूदजोडीसमागमें विनंतिपत्रें व नबाबचे इनायतनामे सहीत रवाना केले ते पावोन सेवेसीं अर्ज जाली असेल. अलीकडे छ १० माहे रमजानीं सेवक दरबारी गेलो असता, नबाब अमीरूलउमराव याणी खलबतींत च्यार घटिका बोलिले की, गटुरचा तालुका नबाब निजामद्दौलाबहादर याणीं आपणाकडे करून घ्यावयाविसीं इंग्रज फिरंगी बंगालेकर यांसी जावसाल लाविला आहे कीं, सरकारात घ्यावा. आह्मास ह्मणतात कीं आह्मी सरकारातून ऐवज नक्त देऊ. येविशीं आह्मी मुकरर अर्जी हुजूरात केली आहे की, आपण पहिलेपासोन सर्फराजी केली आहे, त्याप्रो अमलात आणावें. कदाचित् गटुर तालुका सरकारात ठेवणे मंजूर असलियास त्याचा ऐवज आह्मास द्यावा. महाल लाऊन द्यावे. कारण कीं, आह्मास पहिलेपासूनच जुन तालुका बहजार दिलात. कारवाई होते. तालुकियावर दामसुके करून देऊन व तनखा करोन देऊन कारवाई होते. नक्त ऐवज सरकारातून देऊ ह्मटलियास येथील निकडीने वारवार अर्ज मारून करावे लागेल. याअर्थी ते गोष्ट ठीक नाही. कृपा करोन पहिलेपासोन सर्फराजी आहे. त्याप्रों ऐवज तालुका अथवा तोच महाल ठीक करोन, आमचा आह्मास द्यावा. येविषयीं आपण हुजूरात सई व कोशिस करून नबाबास लिहिलियाशिवाय मामुलप्रो अमलात येत नाहीं. येविषयी राजश्री जिवाजीपंत वकील सरकार यास लिहून हुजुरात काम होऊन ते गोष्ट करावी. येविशीं, राजश्री कृष्णरावजीकडून लिहावें, म्हणजे कामाची बरामद होईल. आह्मी सर्व प्रकारे श्रीमंताचे मर्जीशिवाय व हजरत बंदगानअलीचे मर्जीशिवाय नाहीत. ज्यापक्षीं उभयपक्षीं सल्ला, तेंच आमची सल्ला. सल्लाप्रो वर्तणूक करोन हुजूरचे आश्रयाची बड आहे. यास, येविषयीं पूर्वी लिहिलें आहे. व हालींही पत्रें व इनायतनामे पाठविले आहेत. पत्र पावताच डाकेसमागमे मुसनापत्रें पाठवावीं म्हणोन बोलले. व म्हणाले की, येविषयी आपण सई करोन

बोलिल्याशिवाय बदोबस्त होऊन, काम चालणार नाहीं म्हणोन बहुतां प्रका रें सांगितल्येवरून सेवेसीं विनंती केली आहे त्यास, स्वामींनीं साहित्य केली याशिवाय परिणाम दिसत नाहीं छ ११ माहे मिनहून सुवरस्वार हैदरअली खानबहादर यांजकडून वर्तमान आलें कीं, आरणीचा किल्ला घेऊन अर्काट समीप उत्तरेसीं मोर्चे लाविले आहेत आजपर्यंत अठरा किल्ले घेतले व वे लूरचा सारखाल भेद केला आहे म्हणोन बोलत आहेत छ १२ माहे मीनहूस सेवक दरबारीं रात्रीं दोन प्रहरीं नबाबाकडे गेलें असतां, नबाब बोलले कीं, काल रात्रीं बहादर याचे लष्करातून कोणीं लिहिलें आहे कीं, पहिले कडाजुरी नदराज श्रीरंगपट्टणकर याजपासोन कर्ज घेतलेया रा एक क्रोड व्याज सही त व त्रिचनापल्लीचा किल्ला द्यावा दिलीयास सल्लुख करावा ऐसें मानस दिसतें म्हणून तेथून वर्तमान आलें आहे म्हणून बोलत होते पुढें दाहा ह जार फौज चिनापट्टणावरून रवाना केली आहे व राजश्री उत्तमराव व इत्य यारखान यांस हैदरअलीखान यांनीं रुकसत केलें दोन चार दिवसांत येणार म्हणून उत्तम सुवरस्वार तेथून पुढें आला त्यानें वर्तमान सांगितलें व पत्रें ही अलीखानबहादुर याणीं कर्नाटक प्रांतीं लूट केली व महमूद बंदर येथील हत्ती वगैरे आणिले म्हणून पेशजी विनंती केली आहे गोठर प्रांतींहून वर्तमान सावकारी लिहिलीं व लोक बोलतात कीं, मीर हैदर अलीखानाकडील यांणीं गोठुरचे तालुकियात स्वारी करून जमीदाराचे भेदान तमाम मुलखांत अमल आपला केला व फिरंगी काहीं पचवीस पन्नास व चार दोन प्यारसें गार्दी होते ते मगळगिरीकडे निघोन गेले म्हणोन वर्तमान आहे येविषयीं नबाबासही विचारलें असतां, बोलले कीं, आमचें वर्तमान काहीं आलें नाहीं, लोक बोलतात भागानगराहून वर्तमान आहे कीं, मुरते फडील फिरंगीयास चिनापट्टणकरांनीं बोलाविलें असतां, उत्तर पाठविलें कीं, इकडे काम कांहीं जालें नाहीं, मग आमचें येणें कोणे प्रकारचें होईल! म्ह णून वर्तमान आहे व कोंकणपट्टींत फिरंगी इमज बंदरकिनान्यानें पुण्यापा सोन सोळा कोसांवर आहेत, म्हणोनही भागानगरचे आंमधारेंत होतें येथील वर्तमान पेशजीं कपटराळचा किल्ला नबाबाचे फौजेंत घेऊन किल्ला पाहून नगे घर करून पुढे कोडकुरास फौज जाऊन महासरा केला आहे व मारसुवारन खान बबदरजंग ह नवाब निजामद्दौलाबहादर यांजकडून पत्रासीं आले ते अद्यापि येथेंच आहेत छ १३ माहे मीनहूस दरबारीं गेलों असतां, नबाब बोलले कीं, तुम्ही श्रीमंतास व आपणास आम्हांविषयी बहुत प्रकारें लिहावें कीं, गोठूरचे जिलियात अथवा पेशव महाल होत ऐसें करावें आम्ही सर्व प्रकारें आम्ही आपले फौजेनिशीं आपले आहोंत पुरातेज्यापासोन चढोवा आहे साहिता केलियाप्रमाणें हा आपसालास मामुलप्रमाणें अमलांत येते योजना करून लिहान असलात ये तें करावें त्याजवरून विनंती केली आहे नबा

बानीं आपली जोडीही दिल्ही आहे. मी बोललो कीं, आमची जोडी पाठवी-तच आहे, हे कशास पाहिजे? त्याजवरोन बोलले कीं, काम जरूरी, आपली जोडी व सरकारी जाऊन सत्वर उत्तरे घेऊन येतील. म्हणून पाठविली आहे. नबाबानी इनायतनामा आपणास एक व तीर्थस्वरूप राजश्री कृष्णरावजीस इनायतनामा व राजश्री हरीपंत तात्यास खलिता ऐसे घेऊन सेवेसीं पाठविले आहेत. येऊन पोचतील. जासुदास रोजमुरा द्यावयास आज्ञा करावी. उत्तराचीही आज्ञा होऊन रवाना करावे. पेशजीं तीन जोड्या जोडीमागून जोडी रवाना करीत गेलो. परंतु फिरोन एकही जोडी सेवकाजवळ आली नाही. रोजमुरेविशीं फार विलंब लागतो. वरचेवर पावत नाहीत. येथे महर्गता फार आहे. मागील रोजमुरे बाकी राहिले ते हाल्लीं ऐसे देऊन पाठवावे. सेवकास एथे येऊन एक वर्ष झालें. अद्यापि नेमणूकचिठ्ठी व जहागिरी गावचा बंदोबस्त व खर्चासही काही सरजामी होऊन येत नाहीं. यामागोन आजपर्यंत कर्ज सावकारी खादले. त्यास देण्यास कोठे ठिकाण नाहीं, आणि नित्य खर्चास पाहिजे. त्यास, साहेबीं कृपा करोन नेमणुकीची चिठी व जहागिरी गावचा बंदोबस्त करोन व खर्चास हुंडी चिठी नारायण पेठेची करोन पाठवावी. येविषयीं वारवार विनंती करावी. यास स्वामी सर्वजण आहेत. साहेबाशिवाय संरक्षण कसें होते? साहेबाचे मर्जीस ज्याप्रमाणे कृपा करोन बंदोबस्त करोन पाठवावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्रांक २६० श्री. १७०२ भाद्रपद वद्य १४

राजश्री पंतप्रधान गोसावी यासीः--

श्रीमंतसकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रो॥ खंडेराव जाधव कृतानेक साष्टांग दंडवत. विनंती उपरी येथील कुशल ता॥ छ २७ माहे रमजान मु॥ नजिक कासारबारी यथास्थित जाणून स्वकीय कुशल लेखन करावयाची आज्ञा केली पाहिजे. साहेबाची आज्ञा घेऊन स्वार झालों ते कोरेगावीं भीमा उतरोन, निंबदेहेरचे घाटे टोक्यावर गंगा उतरोन, मुक्काम मजकुरीं येऊन दोन चार मुक्काम केले समागमें पथकें व पागा नेमणूक आहे. त्याची मार्गप्रतीक्षा केली. परंतु अद्याप कोणीही आले नाहींत. आम्हीं येथून घाट उतरोन जावें, तर खानदेशांत तापीतीरीं शंभूचें प्राबल्य जालें आहे. महालोमहालचा आमल उतरून मामले निघाले. त्याजकडील जमाव भारी आहे. यास्तव जलदीनें जाता येत नाहीं. गांठ पडल्यास सरकारचा नक्ष राहून पारिपत्य जाहलें पाहिजे. याजकरिता पथकाची मार्गप्रतीक्षा येथेंच करीत असों. सेवेसीं वर्तमान श्रुत व्हावें, ह्मणोन विनंती लिहिली आहे. पथकें रवाना करावयास हुजरे गेलेच आहेत. आणखी ताकीद होऊन रवाना लौकर जाले

पाहिजेत एक दोन ठाणीं त्याणीं घेतलीं आहेत त्यावर हल्ला करून आवाच ठाणीं घेतल्याशिवाय दाब पडणार नाहीं येविशीं समक्ष विनंती केली होती साहेबाची आज्ञा झाली कीं, मागाहून च्यार तोफाही रवाना करितों त्याची रवानगी जाली असल्यास उत्तम नजली जाली तरी सत्वर तोफा रवाना करा वयाची आज्ञा आली पाहिजे विशेष काय लिहिणें ! कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति

---

पत्रांक २६१

पौ छ ७ सवाल हिदे श्री १७०२ आश्विन शुद्ध ९

हरीपडत फडके सलमहुताला

सौ मेहेरबान करमफर्माय मसलिसा यादव पोक मुलाकत मसरत आयात इत्तीहाद माअरवाद येथील खुषी जाणून आपली पादमानी हमेशा कल्मी करीत गार्वे दिगर, इगरेजाचे तालुक मातबरगड किले वगैरे घेऊन आर काडापार्शी उतरलों असतां, चेनापटणाहून जेनराल मंडोर नामे सरदार दोन्ही हजार गोरे फिरगी व आठसेहे तुरकस्वार व दाहा हजार बार व तीस तोफा सुर्मा लढाइचे इच्छेनें कंचीस आल्यावरून आहीं आरकाडाहून कूच करून कचीस पोहचून त्याचे फौजेस घेरा दिल्हा असतां, फिरगीचे कुमकेस गुदुर व मछलीमंदराहून जनरल बेली नामें सरदार चारीसोंह गोर फिरंगी व पांच ह जार बार व नाग तोफा वगैरे अंगी सरंजाम येण्याची खबर पोहचताच, त्याचे तबीकरिता इकडूनही फौज पाठवून मारामारी करविल्यावरून ते जमियत पुढें येऊं न सकतां कचीस चारी कोसाचे फासलेनें गढीचा आसरा घेसले त्याचे उपराळेस कंचीहून जेनराल मडोरानें आपले हमराहि जमियेतपैकीं होप नु निंदे पांचसें गोरे फिरगी व शेमरी तुरव सवार व निवडक दोन्ही हजार बार व पंधरा सरदार पालखीनिसीमुद्दा कंचीहून पाठविले करिता जनरल बेली नामें सरदार पहिल आपणापाशीं होते ते जमियत व कंचीहून गेले ते कु मकी फौजसहित जमाऊन मेऊन इकडील फौजेशी लढाइ करीत येणेची ख बर आल्यावरून त्याच वख्तीं आहीं कंचीस आलों ते मुलाइ पोपानी फौ जेमरही कित्येक फौज पाठवून त्याची फौज मुद्दां चाऊन जाऊन, मारामारी करून, जनरल बेलीचे फौजेस कतलआम केलें खुद जनरल बेलीनामें सरदार याशिवाय मातबर मातबर पालखीनिशीन तीस सरदार व गोरे फिरंगी पाचेसेहे जिव शाबूत सरकारांत दस्तगीर जाहले पांचसेहे फिरगी व दोन हजार बार पा येवों मारले गेले बाकी बार व तमाम बंदुका व याग तोफा वगैरे कुल त्याचें लष्कराचें लष्कर लुटून घेतलें हे खबर कंचीस आली ते जनरोल मडार पे कून आपले हमराही फौजमुद्दां रातचे वख्तीं फरारी जाहले सबब, इकडून

भारी फौजा पाठविल्या. करितां यास त्यास लढाई होऊन जेनरल मडोर याचे हमराही जमियत मारून घेतले. जेनराल मजकूर ताव आणता न सकता राहेत. आपले हमराही तोफा व रणगाडे व बारुतच्या पुटीया व बाटीर वगैरे सरजाम टाकीत टाकीत दोन्ही तिन्ही हजाराचे जमियतेचे निसीं कचीहून आठ कोसावर. चेंगलपटनामें गढांत त्याचा ठाणा आहे, त्या गढीच्या आसरेस जाऊन पोहचला. इकडील फौजही त्याचा पिच्छा करीत जाऊन त्या गढीस घेरली आहे. खुदाच्या फजलेकडून त्याचीही तवी आनकरीब होईल. त्यास कलमी करणेत येईल. आपण दोस्त असा. याकरिता येथे लढाई ज्या प्रकारें जाहली, ती त्याच नक्षे प्रमाणें मफसल लिहून पाठविले असे. परभारेंही अखबारे करून जहुरात येईल. हमेषा आपली पादमानी कलमी करीत यावे. ज्यादा लिहिणे काय असे ?

---

पत्रांक २६२ श्री. १७०२ आश्विन शुद्ध १२

यादी सदासिव दीक्षित वाजपेय याजी वा। शाहूनगर यास सरकारांतून प्रतिवर्षी दहा हजार रुपये पावत असत, ते सहा वर्षे पैसा पावला नाहीं. कदाचित् आजपर्यंत राहिले ते वजा करून पुढे सालमजकुरापासून काही निर्वाहार्थ ऐवज योजून नेमून द्यावा.

सिराळ्यापैकीं गाव देविला आहे तो ताकीद करून देविला जाईल. ऐवज देणे राहिला आहे. त्यास, दीक्षिताकडून कारकून आल्यावर किती ऐवज देणे तो समजोन, काहीं ऐवजाची सोय पाहून, वरात देविली जाईल. येणेंप्रो करार करावे.

छ १२ सवाल, इहिदे समानीन, आश्वीन.

---

पत्रांक २६३ श्री. १७०२ मार्गशीर्ष वद्य ३.

राजमान्य राजश्री विठल शामराज गोसावी यांसी:—

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सु॥ इहिदे समानीन मया व अलफ राजश्री तुकोजी होळकर इंदुराहून निघाले आहेत. त्यास बोलाऊ पाठवून सरकार कामावर यावें, म्हणून गंगाजल निर्मल अहिल्याबाई होळकर याणीं तुह्माकडून हुजूर लेहविले. त्यावरून इंग्रेजाचे मसलतीस लौकर फौजसुद्धां नमूद व्हावे, म्हणून त्याजकडे पत्रें पाठविलीं त्याप्रों ते कूच करून दरमजल सेंधव्यानजीक आल्याचें वर्तमान आले. त्याजवरून जलद खानदेशांत येऊन, केसो कृष्णाचें पारपत्य करून, लांब लांब मजलीनें, वसईकडे इंग्रेजांशीं दाट करून लढाई सुरू केली आहे, तिकडील उपराळ्यास सरकारच्या फौजा गेल्या आहेत, तुह्मी लौकर जाऊन पोहचून सरकार काम करणें, म्हणून त्याज-

कडे पत्रें गेलीं आहेत त्याप्रों ते जातील अहिल्याबाईनीं तुम्हांस सांगून ले- हविलें, त्यावरून माराविलेस लोकर बोलाविलें सरकारमसलतीचे समई आले परंतु, त्याची व अहिल्याबाई याची भेट जाली नाहीं त्यास, त्यास कडील पत्रें आलीं व रा मल्हारराव वाकडे व रसमाजी दादाची आले त्याच्या सांगण्यांत अहिल्याबाईची अमर्यादा कर्तव्य नाहीं, सरकार चाकरी ची आज्ञा होईल तसें करावयास सामर्थ्यच अर्थ आहेत त्यापरी अ हिल्याबाईनीं दुसरा अर्थ मनांत आणू नये पहिले मामलेदार असतील किंवा नवे त्यांनी केले असतील, त्यांची घालमेल करू नये मामलेदारांस ताकीद करून मरचेपरी माराविलेकडे खर्चाची पुरवणी होय असें करावें येविशीं अहिल्याबाईस अलाहिदा पत्रें पाठविलीं आहेत तुकोजी बावा येथील आले वरून निघाले नाहींत हुजुराहून निघाल्यावर त्यास येथील अमर्यादा न होता सरकार चाकरीवर न्यावें, म्हणून अहिल्याबाईनीं तुम्हाकडून लिहविलें त्याव घरून त्यास लिहिलें ते येतात असें असतां, अहिल्याबाई मनास वाकडें कां आणितात ? तुकोजीबावा येथें आल्यावर बाईची मर्यादा रक्षीत असाच (उप देश) होइल बाईचे ठाई येथें दुसरा विचार नसता, तुकोजीबावा मसलतीस आले मार्गी मामलतीच्या घालमेली व चपल्या होऊं लागल्यास त्यास चाक रीची उमेद कैसी होईल ! सरकाराल मसलतीचे उपयोगी काम पडतील ! फौजमुद्धां मसलतीस आले त्यास विरुद्ध वाटे असें केल्यानें सरकार काम नासतें, हें समजोन कोणतीही घालमेल करूंच नये या प्रमाणें तुम्ही बाईशीं बोलून, तुकोजी बावांस विरुद्ध न वाटे असें करणें

( खास दस्तुर ) 'सरकारकामावर सर्वांची दृष्टी असावी बाईही फार ए मजतात तेव्हां वाकडें पडे असें होणार नाहीं रा १७ जिल्हेज

---

पत्रांक २६४

( मसुदा अहिल्याबाईचा ) श्री १७०२ मार्गशीर्ष वद्य १

तुकोजी होळकर हुजुराहून निघाले आहेत त्यास पत्रें पाठवावीं कीं, बा ईची अमर्यादा न करितां, तुम्हीं लिहून सरकार कामावर न्यावें, म्हणोन पेशजी आपण राजश्री विठ्ठलश्यामराजमांस सांगोन लेहविलें माराविलेही लिहि त्यावरून इमानाचे मसलतीस फौज मुद्धां लौकर नमुद व्हावें, म्हणोन विक डे पत्रें पाठविलीं त्याप्रमाणें ते कूच करून दरमजल सेंधव्यानजीक आल्याचे वर्तमान आले त्यावरून अलद खानदेशांत येऊन, केसो कृष्णाचें पारपत्य करून, लांब लांब ममला करून, मराईकडे इमामांनीं दाटी करून लढाई सुरू केली आहे, तिकडील उपराळ्यास सरकारच्या फौजा गेल्या आहेत तुम्हीही जलदीनें जाऊन पोहोंचून सरकार काम करावें या अन्वयें त्याजकडे

पत्रें गेलीं आहेत. त्याप्रमाणे ते ( जातील. ) तिकडून लिहिल्यावरून त्यास लौकर मतलतीस येण्याविसीं पत्रे पाठविल्यावरून, सरकारमसलतीचे समई तेही आले. परतु आपली त्याची भेट जाहली नाहीं. यास्तव दुसरा अर्थ मनात आणाल तर आणू नये. पहिले मामलेदार असतील किंवा नवे त्याणीं केले असतील, त्याची घालमेल करू नये. मामलेदारास ताकीद करून वरचेवरी त्याजकडे खर्चाची पुरवणी होय ती गोष्ट करावी. त्याजकडील पत्रें आलीं. त्यांत व राजश्री वळवतराव वाकडे व रखमाजी दादाजी आले. त्याचे सागण्यात मातुश्रीबाईची अमर्यादा कर्तव्य नाही. सरकार चाकरी करावयाची. आज्ञा होईल तिकडे करावयास गुता नाहीं, हे अर्थ आहेत, लिहिल्या अन्वयें त्याचे फौजेची व खर्चाची तरतूद मामलेदारास ताकीद करून करीत जावी. नवेजुनेची घालमेल करू नये. विरुद्ध सहसा दाखऊ नये. येथील लिहिलेवरून तुकोजी होळकर निघाले नाहींत. निघाल्यावर तुह्मी.........इकडून लिहिविल्यावरून त्यास मसलतीवर येण्याविशी पत्रे पाठविलीं. ते येतात...... आहे. प्रसगावर सर्वांचें लक्ष असावे. येथें तुम्हाविशीं दुसरा विचार नाहीं. व ते येथे आल्यावर तुमची मर्यादा करीत असाच अर्थ होईल. ते हिकडे आल्यावर, त्याणीं कमाविसदार ठेविले होते ते तुम्ही दूर केले, दुसरे पाठविणार, असे करू नये. माणूस.........ते सरकार चाकरीस येतात. महालाची जप्ती होते, तेव्हा चाकरीची उमेद कशी राहील? हे ध्यानात आणावे. पाटिलबावाचें मत, वाकडें दाखवू नये, असेंच आहे. याजकरिता लिहिलें आहे. कोणतेंही नवेजुने करू नये. तुकोजीबोवा मसलतीस आले. त्यास विरुद्ध न वाटे असेंच करावें.

( खासदस्तुर ):—प्रस्तुत इंग्रेजाची मसलत सरवादात कशी पडली आहे आपली दूरदेशीं समज फार आहे. तेव्हा आपण दुसरी गोष्ट करणार नाहीं, हे खातरजमा आहे. रा छ १७ ज़िल्हेज.

---

पत्रांक २६५ श्री. १७०२ मार्गशीर्ष.

राजश्रियाविराजितराजमान्य राजश्री रावजी स्वामीचे सेवेसी:—

दिवाकर पुरुषोत्तम कृतानेक नमस्कार. विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असिलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविले ते प्रविष्ट जाहले. लिहिला आभिप्राय कळो आला. पूर्वी जाहलेला प्रकार यजमानानीं खास दस्तूर पत्रीं लिहिला आहे, त्याजवरून कळलें असेल. फौजेची समजोती होत आहे. चाळीस पन्नास लक्ष रुपयाची तरतूद केली आहे. बाजदबरसात हैदरावरी जाणार. शिंदे, होळकर आपलाले स्थळास निरोप घेऊन छावणीस गेले. उभयताचे एक्य फार चागले जाहलें.

बमोन विस्तारें लिहिलें ऐशियास, पूर्वी श्रीमंत नाना यांचें खासदस्तुर पत्र विस्तारें आलें तें अवलोकनीं संतोष श्रीमंतांस व मजला जाहला आहे, तो पत्रीं कोठवर ल्याहावा ! इच्छित प्रकार श्रीहरीनें घडविला, एतद्विषईंचा मजकूर पूर्वी लिहिण्यांत आलाच आहे ते लिहिल्या वरून तरी कोणताही गुता नाहीं मुख्य श्रीमंत महाराज रावसाहेब यांची एक निष्ठता, त्याचींच फळें, श्रीनीं दिल्हीं याउपरी, सर्व बंदोबस्त यथास्थित होऊन येईल वरकड, इकडील कित्येक मजकूर पूर्वी लिहिले आहेत व सा मत श्रीमंत नाना यांचे सेवेसीं लिहिले आहेत, त्याजवरून कळों येईल प्रस्तुत माझे शरीरास आराम नाहीं, शूल पचरा रोवांस जातो, अशक्त वायू उदरांत, पोट फुगलेंच असतें, जेवण मंद, दहपवीनें राहिलों, याकरितां श्रीमंतांस विनति करून कव्याबीस अगर आणीक जें मरजीस येईल तें पाठवून यावें हें जरूर करावें बळवंतरावमीस पुसून ते काय सांगतील तें लिहिणें वरकड आंगरेज वगैरा वर्तमान व नवाब मफरदौलेचे विशीं रा दादास सविस्तर सांगितलें ते लिहितील आजवरी रोग मोठा चारीगार होता एकदा कसेंही अरिष्ट दूर होऊन श्रीमंतांस यश आलें कुरापत जळून गेली नाहींतर याच रोगानें आज चारीमास कैसे सख्त दिवस गेले ते श्रीहरीसच ठाऊक ! वरते आपण तीन पत्रे प्रथमचीं पाठविलीं यावर तर कांहींच इष्ट कार्यांत नोहती गावेलगडच दिवस होता पुढें श्रीहरी काय करवितात तें सवभास दिसत असे आता हें लिहिणें ! आपांस रा दादा रोज बोलत कीं, माऊ देवाजीपत, मी माऊ कशाचा ? हें आपणासच लिहिलें होतं आणि तेच दिवस पहावे ऐसें देवानें दाखवून सर्वांची सत्ये याहीर पाहून आतां तरी नीट बंदोबस्त करावा, हें जर व्याहावें, तर सर्व बंदोबस्ताविशीं गुरू ! तेथें काय ल्याहावें ? आपलें शरीर आराम जर असेल तर श्रीमंतापाशीं यावें श्रीमंत आपासाहेब याची मरजी फार आहे कीं, श्रीमंत माहाराज रावसाहेब यांस पहावें तेव्हां, श्रीमंतांच्या भेटी व सर्वांच्या होतील, हें वारंवार बोलतात मी तर लिहिलेंसें वारंवार म्हण तात आंगरेज, शुजायतदौरेचा लेक व नजफखान व जयनगरवाले हे सव एक जाहले, हें ऐकिलें तेथें खबीर काय असेल ती ल्मरी मफरदौलेविशीं दादानें लिहिलें आहे यजमानानें त्याच्या दोपता व पत्रें पाठविलीं, खातरजमा पार केली, हेंही आहे हे विनंति

---

पत्रांक २६६ श्री १७०३ चैत्र

xxx ( पत्र ) टणाचें पारपत्य करून नेस्तनाबूत केले असतील इकडील मजकूर तरी गाडरनामें इंग्रेज वसईचा किला घेऊन दावमरी होऊन, घोर घाटाच्या माथां येऊन, अडचणीची जागा धरून बसला आहे त्यास, इक

डील फौजा राजश्री हरी बल्लाळ व तुकोजी होळकर त्याचे तोंडावर आहेत. नित्य सडे जाऊन, तोफा नेऊन लागू करून, तोफाचा व बाणाचा मार करितात. दाहा वीस माणूस जाया होतें. घाटाखालीं रा परशराम रामचंद्र यास दाहा बारा हजार फौजेनिशी पाठविले. दोन तीन लढाया करून रसदा लुटिली, लोक मारिले, बंदुका वगैरे आणिले, व त्याची रस्त बंद केली आहे. त्याच्या लष्करात माहागाई आहे व लोक नित्य गोरे व काळे कवाइतींत दाहा पांच नित्य येतात. मैदानांत येता तरी ठीक होते. त्यास त्याच्याने पुढे येवत नाहीं. याचें पारिपत्य लौकरच होईल. अर्काटप्रांतीं इंग्रेजानीं कित्येक ठाणीं, मुलूख घेतला होता. त्यास हैदरखान बहादूर याणीं तिकडे जाऊन, अर्काट घेऊन फुलचरी व चैनपटण वगैरे जेर केलें. व फरासीस खानमारनिल्हेनी आणून इंग्रेजास जरबेंत आणिला आहे. साराश, तुम्ही तिकडील पलटणाचे पारपत्य करून हटविलें, पळविलें, किंबहुना पारपत्यही केलेंच असाल. तुह्माकडील इभ्रतीने इंग्रेजाची कबरच बसेल. तुम्ही मातबर सरदार, मातबर मनसुबे करून कित्येक शत्रू पराभाविले. तेथें इंग्रेजाचा मजकूर काय? इंग्रेज साहुकार असता, त्याणीं शिपाईगिरीची उमेद धरून लढाईचा कस्त धरितो! तरी काय चिंता आहे? तुह्मी त्याचें पारिपत्यच करालच. तीर्थस्वरूप कैलासवासी नानासाहेब व राऊसाहेब पुण्यवान. त्यांचा आशीर्वाद आमच्या मस्तकीं आहे त्याचे आशिर्वादें व श्रीकृपेंकरून शत्रूचा पराभव होईल.*

---

पत्रांक २६७ श्री १७०३ चैत्र

... ..............................................

...... जाहाजें आलीं. त्याजवरील सरदार याचे जबानीवरून मालूम जाहलें. ......मुतर्णे नामें भारी जमावानिशीं उमदा सरदार जंगी सामान घेऊन सुतआकिब येत आहे. तो आलियावर इकडील इंग्रजाचें एक बंदर राहणार नाहीं. नूरमहमदखान व नरसिंगराव यासी आपलेपासीं ठेऊन आनंदराव यासीं कृष्णराव नारायण याजबराबर पाठवावें ह्मणोन मुफसल कलमीं केलें तें हर्फबहर्फ दिलनिषीन जालें. चुनाचे जनरल कूट चिनापट्टणाहून फुलचरी वरून गुडलूर अडचणीची जागा पाहून, तेथें जाऊन, आश्रियाम आला व आ मेहरबान मार्गांत मुखालिफास घाबरे करीत गुडलुराजवळ त्याचे फौजेस माहासिरा देऊन राहिले. हे षकल नेक दुरुस्त जाली. त्यास हाच कावू वख्त मुखालिफाचे पायमल्लीचा आहे. आसाहेबी खुषर्कीतून व फरासीस येणार व आला तो दरयातून बंदर किनारियासीं. या बमोजिब निकड जाहलियावर मुखा-

---

* ह्या पत्राचे पहिले दोन बंद गहाळ झाले आहेत.

रिफाय सूध सजा पॉहचेल, ऐसे इवानेयाचे दिलांत याटवें विलपैल, इक डील ममकूर तर गाडर बोरघाटाखालें येऊन तीन चार (पल) टर्नें घाटावर पाठविलीं त्यांचे मुकाबल्यास मेहेरबान हरीपंत व होळकर आहेत हा मजकूर पेशर्जी कलमीं करण्यात आलाच आहे फिलहाल परशराम पंडित मिरजकर धारा हजार व सरंजाम सुद्धा घांटाखालें इंग्रजाचे पिछाडीस रसद बंद करून पिछाडी करून पायबंद यावयाकरितां पाठविले इताकियात साचा गाडर घांटावर सरंजामसुद्धां आला दोन तीन पलटणें घाटाखालीं ठेविलीं आहेत त्यास, पंडतमारानिलें यांणीं घेराघेरी करून धावरें केलें आणि दोन हजार बैल व किराणा यामेचे व टटें व छकडे वगैरे सरंजाम भरोन रसद जात होती ते मारली बैल वगैरे लुटून आणिले हालीं घेराघेरी करून आहेत गाडर घाटावर आला ते दिवशीं मेहेरबान हरीपंत व तुकोजीराव होळकर ते तंळाव्यास गेले होते ते वस्तीं इंग्रेज अडचणीची जागा धरून मुकाम करून राहिला आहे तेथून दोन तीन पलटणें कोस दीडकोस चालून आलीं त्यावर सरकारचे तोफा व गाडद व बाणांची, मारागिरी होऊन लढाई युध तऱ्हेनें जाली इंग्रजाचीं ( पलटणें ) हटाऊन माघारीं घालविलीं ते लढाईत इंग्रेजाकडील दोन सरदारांपैकीं तोफेचे गोळ्यानें

व दुसरा बाणानें ठार जाहाले व फां पलटणातील लोक ठार व जाया बंद जाहला सरकारचे गाडदी वगैरे कांहीं लोक कामास आले व जखमी जाहाले यामभोजिब लढाई जाली इंग्रज पक्या अडचणींत घांटावर राहिला आहे तेथून तो मयदानांत यावयाचा कस्त करीत नाहीं त्याचे लष्करांत रसद घाटावरून व घाटाला खून पोंहचावयाची बंदी आहे सबब गिरानी व बहुत फिकीरींत आहे ( चि नेहून चाळीस जहाजें, पन्नास लक्षाचा माल भरून इंग्रजी जहाजें येत होतीं त्याची व फरांसीसांची लढाई जाहाली इंग्रजी जहाजें फरांसीसांनीं शिकस्त केलीं ) फरांसिस याची गलबल दर्यात आहे असें जासुदी ( याप्रमाणें फत्तेमारी जासुदी ) जहाज मुंबईस आलें त्याणें वर्तमान सांगितलें मुंबईत गलबल आहे अशी बातमी मुंब ईच्या सरकारात आली दर्यावित, इंग्रजी दाहा पलटणें हिंदुस्थानांतून यांतील दिखांत आणून शिप्रीकाल्हयावर आलीं ही खबर राय मेहेरबान माहादजीराव शिंदे यांस मालूम होतांच, अवल कांहीं फौज रवा नगी त्याकडे करून मुताअखिक आपणही मातबर फौज पयम तोफखाना व सरंजाम व सरकारचे सरदार बाळाजी गोविंद व शिवाजी विठल वगैरा मे फौज, येकूण तीस पसतीस हजार फौजेना जमाव करून, इंग्रजी पलटणांचे मुकाबल्यास गेले आहेत व पक्ष पलटणांची तवी होईल, तें गुहूराय मे इल गुजरायचे जिल्यात ( हंगामा ) करण्याविशीं पेशर्जी गणेशपंत बेहेरे वगैरे

सरकारची फौज दाहा हजार रवाना केली. त्याणींही इग्रजाचे तालुकियात शिरोन हगामा सुरू केला आहे. खुलस मुखालिफास, चहूकडोन ताण व घेराघेरी, आजीज होत ऐसी आमलात आली. आजिबाद होईल ते नमूदास येईल. कृष्णराव नारायण याची व फौजेची तयारी जाहाली आहे. लवकरच येऊन पावतील, ह्मणोन हैदरअलीखान यास नानांचे नांवें हिंदवी पत्र.

---

पत्रांक २६८ श्री १७०३ आश्विन वद्य १२

रा. मल्हारराव सोमवशी गोसावी यांसी:—

सुा इसन्ने समानीन मया व आलफ. तुह्मी आपले गावीं मौजे जवळे—पैकीं पारनेर एथे कलाल बाळगून दारू करवीत होता, ह्मणून हुजूर विदीत झालें. त्यास, कलाल यास सरकारात आणून चौकशी करिता, तुह्मी सरकार आज्ञेशिवाय कलालाकडून दारू करवीत होता, हा अन्याय तुह्माकडेस लागू झाला. त्यास, सदर्हू अन्याय तुह्मास माफ करून, नजरेचा ऐवज सरकारात द्यावयाचा करार केला. त्याप्रमाणें बदला देणे तो रंगो गोपाळ कारकून कुलशिलेदार यांजकडे खासे चाकरीच्या बायकांस व मुलांस व सुनास सन समानीनचे व सालगुदस्तचे मोईनपैकीं रुपये ४००० हजार रुपये देवविले असत. तरी तूर्त पावतें करून पावलियाचें कबज घेणें. जाणिजे. छ २६ सवाल.

---

पत्रांक २६९ श्री. (नकल) १७०३ कार्तिक वद्य १

(शिक्का सवाईमाधवरावसो.)

२ नोव्हबर, १७८१

यादी रो महिपतराव विश्वनाथ. सुा इसने समानीन मया व अलफ. तैनात सालिना रुा

४०००० खासा तैनात

३०००० विसाजी कृष्ण

१०००० महिपतराव विश्वनाथ

---

४००००

७००० कारकूनमडळी दरकदारसुद्धा

३००० शागीर्द पेशा

२७५०० राऊत

१२५०० पागाघारिदा लागवड
मा मुा मुद्दां
१० खाशी घोडी
१५ बारगीर

२६

दर ५०० प्रों प्रों
१५००० शिलेदार ५० दर
३०० प्रों १५०००

२७५००
२५०० हशी सरकारचा रतीब लागवड मा मुा मोषम

८००००

यासी सरजाम
१९००० दिगर महागिरीचे गांव मामले बीड पो राक्षसभुवन वगैरे फुटगांव हरी बल्लाळ याजकडे फौजेचे सरंजामास दिले होते ते दूर करून
१७ ०० परगण पासशहापूर बळ गांव निा महिपतराय विश्वनाथ पा कमाल बेरजेचे गाव लावून घावे
१२१०० पो वाळूज येथील मोकासा मुधरराय जाधव यांजकडे होता तो दूर करून
१२६० मल्हारराव पोपळ या अनदा? गापानार

कारात जप्त आहेत
त्या पो
१६९२ तो हवेली
संगमनेर
१५७३ ता देपूर

---

३२६५

५४५० मौजे कोरेगाव ता वे-
लापूर तनखा रुपये
७५०९ पो वजा मो-
कासा १०५० बाकी.
रुजू पो सावदेव येथील मो-
कासा मल्हारराव पोवार याज-
कडील अकरा हजाराचा सर-
कारात जप्त आहे त्यापो ला-
वून द्यावे.

२००० देशीं गांव मोजून द्यावा.
जुन्नर प्रा ससारास उप-
योगी.

---

८०३२४

ऐशीं हजार तीनशें चोवीस रुो बेरजेचा सरं-
जाम येणें प्रो करार करावे.

सरजामास महाल गाव दिल्हे आहेत. अमल याचे हवाली करण्याविशीं सनदा व ताकीदपत्रें देवावीं.

इनाम गाव जातीस दोन हजार रुोचा कमाल वेरजेचा मोजून द्यावा. येणेप्रों करार करावे.

कुरण पो गवत सुमारी १०००००

असाम्या पूर्वींपासोन
१ किल्लेनगर.
येथील मजमू.
१ किल्ले त्रिंवक ये-
थील सवनिशी.

---

२

दोन असाम्या दूर करून दुसरेकडे सांगितल्या आहेत. त्या सालमारीं दूर करून पूर्ववत प्रों दोन्ही

| | | |
|---|---|---|
| | एक लक्ष पुण्याचे सा इर्चे कुरण पाहून नेमून द्यावें | असाम्या करार केल्या आहेत यांजपासोन प्रयोजनी घेऊन वत न पेशजीप्रो पावत जावें ह्मणोन माम लेदारास सनदा त्रि मकची असामी चा लते, कारकुनापासून काम घेतात, परंतु वेतन देत नाहीं, ह्म णोन सांगितलें त्या स, चाकरी घेऊन वेतन राहिलें असे तरी सालमजकुरीं द्यावें.पुढें सालमारा पासून पावतें करावें याप्रों सनदेंत लि हून देणावें |

छ १५ जिल्काद कार्तिक मास सनदा लिहिणें

---

पत्रांक २७०　　　　श्री　　　　१७०३ फाल्गुन शुद्ध १५

पो छ १४ रावल, फाल्गुण, इसने समानीन आंचीवर आलें

दोन बद्दरास

सेवेसी आनंदराव भाजी व गणेश केशव कृतानेक साष्टांग नमस्कार वि ज्ञापना ता छ २६ सफर मुक्काम मुसळीपाक येथें स्वामीच्या कृपावलोकनें करून वर्तमान यथास्थित असे विशेष श्रीमंत राजश्री नाना यांनीं छ ६ मोहरमचीं पत्रें साहुदजोडीबरोबर राजश्री कृष्णराव बल्लाळ यांस पाठविलीं तीं छ १६ सफरीं पावलीं पत्रीं आज्ञा जे बंगाल्याकडे फौजेच्या रवानगीची सिद्धताच आहे पैक्याची सरबराई सर्जूद करून, सायसाल ठरवोन, उत्तर प्रत्योत्तराचा प्रसंग न पडतां, ऐवजाची रवानगीच होऊन येई तें करावें तशिवांची सरबुद न होय, तर निदान तिसांचा जायसाल ठरवून पाठवावा ह्मणून व दुसरें, पुरवणीपत्रीं लिहिलें जे इंग्रजाच्या कबजांतील मुलुख मा रून तारज करावा रसदेची वगैरे आमद रफ्त होऊं नये यास्तव सरकार

नन लोक रवाना केले होते. ते स्वाऱ्या करितात. याजपुढे इंग्रजाकडीलही जमाव मुकाबल्यास येऊन, झटपट जागाजागा चालविलीच आहे. च्यार गलबतें भरून कांहीं जिन्नस व लोक मुंबईकडून इंग्रजाचे लोक मुकाबल्यावर कोहेजेकडे होते. त्याच्या उपराळ्यास मनोरचे खाडीतून येत होते. त्याची वातमी राखून, किल्ले कोहज येथील सरकारचे लोक कांहीं मेले व कांहीं पाण्यात उड्या टाकून बुडाले. गलबतें सरकारच्या लोकानीं शिकस्त करून पाडाव आणिलीं. याजमुळें इंग्रजाकडील जमाव तिकडे रवाना झाला आहे. सरकारचे लोक तेथें आहेत. ते मजबुदीनें आहेत. व येथून भरतीस लोक वरचेवर रवाना होत आहेत. ह्मणून विस्तारें लिहिलें. ऐशियास, बंगाल्याचे मसलतीचे सरबराईविशीं सरकारातून पत्रें आचीवर जी जी आलीं ती तीं नबाब बाहादूर यास श्रवण करून, पत्राचे भाव समजाऊन, उत्तरें निरोत्तरें जालीं. त्या अन्वयें आचीवर लिहित गेलों. सांप्रत, मुंबईहून वकील पुण्यास आल्यामुळे त्याच्या वातम्या परभारें नानाप्रकारच्या येतात. तेणेंकरून त्याच्या चित्तात विकल्पाचे वृक्षच वाढले आहेत. याचीं परिमार्जनें करावयाचीं तीं करीतच आहों. सरकारचीं व स्वामीचीं पत्रे नबाबास येतात. परंतु स्वामीच्या लिहिल्याने व आमच्या बोलण्यानें खातरजमा होत नाही. याचे संशय निवारण व्हावयाचा विचार तर, मुंबईकर वकील माघारा लावून द्यावा व नबाब निनिजामअल्लीखा करारापमाणें मसलतीस नमूद होत नसल्यास कृष्णराव बल्लाळ यांणीं नबाबाशीं रुष्ट, तुटक भाषण करून उठोन यावें. याप्रों जालें. ऐसीं परभारे वकीलाचीं लिहिलीं नबाबबाहादूर यास आलीं ह्मणजे संशयाचा वृक्ष निर्मूल होईल. जाल्यास सरबराई तर्तुद, बंगाल्याची मसलत केल्यास, वीस लक्ष रुा ची होईल. तें प्रस्तुत घडत नाही. तेव्हा गुजराथ वगैरे प्रांत सोडवायाचे तजविजेस फौज रवाना केली ह्मणून वकिलाचीं लिहिलीं आलीं, ह्मणजे साल मजकुराचे बारा लक्ष रुा पाठवून देतील. याच अन्वयें पत्र जासूदजोडीसमागमें राजश्री कृष्णराव तात्या यांनीं राजश्री नानास व आह्मीहि सेवेसी पाठविलीं आहेत. जासुदास पोंहोंचावयास दिवसगत लागेल, याजकरिता आचीवरही रवाना केले आहे. सारांश, याच्या चित्तातील आशंकापरिहार, विना मुंबईकर वकील पुण्यास आला आहे तो तुटक गोष्टी सांगून माघारा लावून दिल्याखेरीज होत नाहीं. हा प्रकार घडावयाचा विचार कसा असेल, तो कळेना. स्वामीकडील बातनीनिसाचीं पत्रें विकल्पयुक्त येऊन बेमर्जी होती. नबाबसाहेब याचा शोध फार सूक्ष्म, केवळ गंभीरपणेंच हा काल पावेतो आहेत. दुसरे कोणी असतें तरी काय करतें कळेना. यांनीं यांनीं आपले जागा निश्चय केला आहे कीं, आपल्याकडून अंतर पडेलसा शब्द लाऊन घेऊ नये. तिकडूनच न घडावयाची गोष्ट घडल्यास मग कळेल त्या रीतीनें आपला मतलब साधावा. या विवचनेंत आहेत. आह्मास सांगितलें

आहे की, तुह्मी दररोज कळेल त्याअन्वयें येथील स्थितीचें व चहूंकडील ऐ कण्यांत येत आतील ती कोणे विषयींचे अंदेशे ध्यानांत न आणता खुलाशानें लेहून आंबीवर मोहोरेनिशीं रवाना करीत जाणें आह्मी तुमचा लासोटा क दापि फोडून पाहणार नाहीं याप्रमाणें आह्मी लिहिण्याकरण्यांत कांहीं आदि पश्चात पाहू ह्मणून खातरजमा करिताउ व आजपावेतों तसेंच चालवितही आहेत यामकडे दोष ठेवावयाचा प्रकार कांहीं दिसण्यांत सूर्त येत नाहीं वरचेवर पत्रें उगळून लिहून खेवेसीं रवाना करितों स्वामीकडून समर्पक उ त्तरें व त्या अन्वयें नवावास परभारें बातन्या निस्ताख्त येथील तो सुदिवस होइल सारांश, नवाबसाहेबांच्या चित्तांत विपरियास परिच्छिन्न आला आहे स्वामी पत्रें लिहितात व आह्मी खातरजमा करितों परंतु खातरजमा होत नाहीं याउपर सव अर्थ ध्यानात आणून, नवाबसाहेबाची खातरजमा होऊन, श्री लक्ष्मीची उजागरी होय, ऐस करणार स्वामी समर्थ असत तपशील कोठ वर स्याहावा ! ज्यांत सुदिवस दिसे तें करणार स्वामी समर्थ असत खेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक २७१ श्री १७०२ फाल्गुन वद्य ४

पौ छ १९ रावल फाल्गुन, इसने समानीन हा आंची

पुरवणी खेवेसीं विज्ञापना विशेष स्वामीकडून व सरकारांतून निवळ पत्रें येतात त्यांत दिकतीचा प्रकार कांहींच नसतो त्याअवरून आह्मीं नवाब बहादूर यांशीं खातरजमा करून बोलतों आम पावेतों आमचें बोल- णें व स्वामीचें लिहिणें यथार्थ आणून बगाल्याकडील वगैरे मसलती विशीं जें जें बोलणें झालें तें वरचेवरी अचीवरील पत्रें रवाना केलीं आ हेत अलीकडे इंग्रजाकडील वकील पुण्यास येऊन आपसासमें बोलणें निश्चयांत आलें ह्मणून वकीलाचें लिहिणें, व बातम्या चहूंकडून म्यंनित आल्यामुळें, यांच्या चित्तांत नानाप्रकारच्या कल्पना उत्पन्न होऊन, स्वा मीस लिहिण्याचा प्रकार सांगून, आह्माकडून लिहविलें आणि अवरों विनंती पत्राकडून चेनापटणकराशीं सलूखाचा सिलसिला लाविला त्या नवरून इंग्रज सर्वप्रकारें मान्य करून महाराजनिलेस पाठवून देणेविशीं लि हिलें आहे, म्हणून वर्तमान ऐकण्यांत आलें अद्यापि प्रगट नाहीं खरेंच अ सल्यास निदर्शनास येईल वस्तुतकरून खरें असेल येविशीं शोध करून महाराजनिलेस त्यासकडेस पाठऊन देणार अगर कसें काम, तें मागाहून लिहून पाठवितों आमपावेतों इंग्रजांच्या संमीविशीं दोन आधार होते त्यापैकीं स्वामी कडील आधार बिलकुल सुटलासा झाला दुसरा फरासिस येण्याचा तो कसा होतो तो पहावा एकूण नवाबचें चित्त अंदेशांत पडून, इकडील मस

ल्तीविशीं उदासीनता जाली. न जाणो, स्वामीकडील कायमी यथास्थित राहून आठपधरा रोजात फरासिसाची आमदानी जाल्या, योजिली मसलत सिद्धीस जाऊन नक्ष होतो. नाहीं तरी, हे इंग्रजाकडील राजकारण हरकसेही समेटून घेऊन चाल कोण्हीकडे करतील, हे नकळे. याच घेतावरी इकडील प्रांताची आस्था न ठेवता बेचिराख केला. अर्काट व अरणी हीं दोन मातबर स्थळें तींही खाली करून तमाम सावकारा वगैरे लोक व तोफा घाटावरी लाऊन दिल्ह्या. किल्ला न पाडता ठेवितील जरूर. असा प्रकार येथील जाला आहे. सर्व स्वामीस कळावयाकरिता विनति लिहिली आहे. सर्व दूरदेशीने जे करणे ते नुमूस न पडे व लौकिकात स्वामीचा नक्ष विशेष घडे असा प्रकार करावा. फरासिस करार आलेच असले, तर एक दोन रोजात तहकीक वर्तमान येईल ते जलद सेवेसी लेहून पाठऊ. फरासिस यावयाचा प्रकार नसला, तर ही आवई पाहून इंग्रेजासी राजकारण हर तऱ्हेनें समेटून घेतील. सेवेशीं श्रुत होय. हे विज्ञापना.

---

पत्रांक २७२ श्री. १७०२ फाल्गुन वद्य ४

पो छ १९ रावल फाल्गुन, इसन्ने समानीन ह्या आंची.

पुरवणी शेवेसीं विज्ञापना. छ ५ रबिलावलीं सध्याकाळीं नबाबसाहेब यांनी राजश्री भुजंगराव यास दरबारास बोलाऊन वर्तमान सागितलें जे: फरासीसाकडील जाहाजें येणार याची वार्ता होतीच. आताच वर्तमान आलें जे फरासिसाची चाळीस जहाजें लढवाई पाण्यातन् चेनापटणास दाखल होऊन तीन रोज जाले. जाहाजास लगर टाकून इंग्रजार्गी व फरांसिसाशी लढाई सुरू जाली ह्मणोन वदता आहे. याखेरीज वीस जहाजे खुपकीवरी उतरोन लढाई करावयाचे (इराद्यानें) फुलचरीस येऊन दाखल जाले. जमियत किती आहे, सरदार कोण आला आहे, हे वर्तमान काही तहकीक लिहून आलें नाहीं. एकदोन रोजानीं तपशीलवार लेहून येईल. म्हणजे मदारुलमहाम यांस लेहून पाठऊ. साप्रत वर्तमान ऐकण्यात आले ते रावअजम कृष्णराव नारायण यास सांगावे. तहकीक वातमी आली, त्यास बोलाऊ पाठऊन सविस्तर वर्तमान सागू. मदारुलमहाम याचा भरवसा खचित जाणून, फरासिसात आणावयाचा उदेग केला. तेहि येऊन पोहोंचले. अशा समयात मदारुलमहाम यानीं इंग्रजाच्या वकीलाकडे वचन गुतऊ नये. तमाम खुष्कींतील सरदारानीं एकदिल होऊन इंग्रजाचें तबीवरी कमरबदी केली आहे. याजकरिता यावरी फरासिस आले. मदारुलमहाम याजखेरीज वरकड सरदारांचे भरंवसे समजले! असो! आताहि मदारुलमहाम यानीं कायमी राखिली तरी, आह्मी मदारुलमहाम व फरासिस तिघे मिळून इंग्रेजाची बेबुनियाद करू, अशास, त्याप्रमाणें

राव मधारनिळे यासकडून मदारुळमहाम यास साफ ळेहून पाठवावें इम्र यांच्या सधीचा समय प्राप्त जाला आहे असा मजकूर वारवार यावयाचा नाहीं याप्रमाणें राजश्री मुबंगराव यास सांगितलें सविस्तर स्वामीस कळवण्याक रितां लिहिलें आहे आठ दिवसात पंधरा दिवसात सामसा येतात असें होतें आता लावणीचा प्रकार नाहीं दोन तीन रोजात समजेल सविस्तर श्रीमंत राजश्री नानांस राजश्री कृष्णराव यांस्यांनीं लिहिलें ; असे याउपर फरांसीस येतात, ऐसें आहे 'फरांसीस' ख्वालियावर इग्रजांचें पारपत्य नबाबबहादर यथास्थित करितात मागाहून आणिक एसादे दिमशीं वर्तमान सेवेशीं लि हून पाठऊ वरकड सविस्तर अर्थ, यांचीबरोबर वरचेवर पत्र सेवेसी लि हिलीं असत, त्यावरून विदित होईल सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना



पत्रांक २७३ श्री नकल १७०४

रु॥
१६२६१००० पैकीं वसूल रु॥

५९१६००० सन अर्बा सबैन पासोन ता। सन समा सालें ४
 २९५८००० गोविंदराव यांच्या दम्यामुळें दरोबस्त वसूल त्याजकडे पडला सनद सर कारी देणें सं॥ साल २
 २९५८०००मानिळे अमदाबादेस राहिले महीं पारच्या अमल त्यांनीं केला व सुरत अठाविसींत नेहमीं फौज त्यांत कडी ग राहिली, सनद माहालीं आकार न आहला

५९१६०००

२५००००० इग्रजाचे दंग्यांत व श्रीमंत दादासाहेब यांजकडे सम म्नमस सबैन, दरबारचा खर्च वगैरे सुद्धां
 १६००००० फिता
 ७००००० अमदाबाद आपले मागींा पम्न धर्तरीं व समई

२००००० अमदाबादेस पलटण होते ते काढावयास दिल्हे.

---

२५००००००

३५०००००० भडोच इंग्रजानीं घेतली इा खमस सबैन ताा अर्बा समानीन जाले सुमारी १० दहा.

११६६०००० वसूल सरकारात पावला अजमासें

५०००००० विाा अताजी नागेश सन सबा सबैन.

३००००० राजश्री बाळाजी नाईक भिडे याजकडून भरणा.

२००००० गुाा घनशाम नारायण माा गोविंद गोपाळ.

---

५०००००

१६०००० माा गोविंद गोपाळ, सन इहिदे.

१००००० कापड

५०००० सन इसने.

५०००० सन सलास.

---

१०००००

११५००० हरीभक्ति, सन, सलास.

८५००० विाा गमाजी पाा

८०००० दादासाहेब.

५००० विसाजी आपाजी वरात पेसजी बाा

---

८५०००

५००० मौजे काळुस वाभारे असले येथे जप्तीबाा

२००००० अमदाबादचे सिबंदीस दिल्हे

१५०००० अमदाबाद

५०००० विरमगाव

२०००००

११६६०००

१२०८२०००

या खेरीज ह्या पाशोन फौज नेहमीं दरमाही ठेवणें पडली सबब शिबंदी च्या पेंचांत आहों त्याचा खर्च आजपर्यंत भोगीत आहों सरकारलक्षांत *अंतर न पडावें म्हणोन सर्व पेंच माथा सोसून सरकारलक्षीं अंतर केलें नाहीं*

---

पत्रांक २७४ श्री १७०४ चैत्र

राजश्री सखाराम हरी यांसी—

आशीर्वाद उपरी, बारभाईकडून संदर्भाचा मजकूर लिहिला पाचांचे परगणे देणार. हजार फौजेनशीं आपा अथवा जो यातील मर्जीस येईल तो ठेऊन यावा, या अन्वयें लिहिलें त्यासी, आम्हीं गंगातीरीं एकटें रहावें त्यांणीं सारा दवलतीचा कारभार सबळ करावा तेव्हां कोणाशीं बोलावयाशीं कामास नये रिकामें बोलणें तरी तेंच निमित्य ठेऊन त्या माणसास धरून नेऊन पारिपत्य करावें किल्यावर पाठवावें तेव्हां आम्हांस राग यावा राजकारण तरी करूं नये ऐसें नाना उपद्रव सोसून रहावें, त्यापेक्षां दूर असावें तेणेंकरून आम्हांस वाईट वाटणार नाहीं, त्यासही आमचें भय नाहीं जवळ राहिल्यास परस्पर भय निमित्य ठेऊन, आमचे माणसांचीं पारपत्यें करणार याविषीं चे अनुभव पूर्वी बहुत भोगिले आहेत ते पाच देणार ते येथेंच पाठविले तरी काय वाईट ? *आमचे मनांत महोच अथवा सुरतेस नमदातीरीं रहावें !* बारभाई सरळ चालले तरी रणगची मर्जीची जागा आहे तेथें राहू आम्हां जवळ त्यांचे फौजेचें काय प्रयोजन ! तथापि पांचचारशें आमचे ममतेचे लोक राहिले तरी काय चिंता आहे ! गुमानें ध्यावयायोग्य, मात्र, नवावें ! आमचा खर्च निदान, दवलत सोडिली तरी, लक्ष रुपये दरमहा पाहिजेत इतकें कांहीं त्यांस बहुत नाहीं आम्हीं, मूळ गंगाबाईचा पराच असल्यास, निमे दवलतेचे वारस तेथें मारा लक्ष बहुत नाहींत तथापि ते लोभाविष्ट ! यास्तव, पाच देतात तितकेच घेऊन नमदातीरीं राहू आम्हाजवळ चौकी दाखल लोक नलगेत चाकरीचे रीतीनें हजार पाचशें राहिले तरी राहोत आपा राहिल्यास उत्तम आहे परंतु येथील हुकुमाप्रों चालावें असो आम्हां रहावें त्यांत व बारभाइचे बोलण्यांत असमान जमिनीची तफावत ! दहावीस

मराठे व कारभारी मध्यें येतील, आपली खातरजमा करितील, ह्मणोन लिहिले. तरी ते दरमजल देशाकडे जातात. आह्मी सुरतेत आहों. दिवसेंदिवस लावण पडेत. तेव्हां त्याची आस्था किती आहे, हें कळतच आहे! मऱ्हाटेही रा मल्हारजी होळकराप्रां कोणी नाहींत. तथापि आहेत त्यात चाकर मातबर मिळोन खातरजमा करितील, तरी पुढें सख्याचा मजकूर पडेल. तूर्त आह्मी अगरेजाचे पेट्यात सुखरूप आहों! थोडेबहुत खर्चास देतीलच. येथें काहीं उपद्रव आह्मास नाहीं. तिळमात्र बदी नाहीं. मोकळे आहो, व सुखरूप आहों! बरसात येथेच होईल. पुढें जें नेमिले ते होईल. साराश, येथील सुखापेक्षा तेथें अधिक सुख वाटेल तरी येऊ. दाटून सुख टाकून दुःखात कोण पडतो? छ १० राखर.

---

पत्रांक २७५ श्री १७०४ मार्गशीर्ष शुद्ध ५

राजश्री रघोजी आगरे वजारत–माब सरखेल गोसावी यांसी:–

नकलगुणालकरणअखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्नो माधवराव नारायण प्रधान आशीर्वाद विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावें. विशेष.सरकारात लग्नाचे साहित्याबद्दल सर्वांप्रमाणें तुम्हाकडे ५०००० पन्नास हजाराची नेमणूक केली असे. तरी सदर्हू ऐवजाचा भरणा सत्वर हुजूर करावा. जाणिजे, छ ५ मोहरम, सुा सलास समानीन मया व आलफ. बहुत काय लिहिणे? हे विनती लेखन सीमा.

श्री
राजाशाहु नरपती हर्ष-
निधान माधवराव नारा-
यण मुख्य प्रधान*

---

पत्रांक २७६ श्री. १७०५ माघ शुद्ध १३

वेदशास्त्रसपन्न राजश्री सदाशिव दीक्षित वाजपेय याजी स्वामीचे सेवेशी:—

विद्यार्थी बाळाजी जनार्दन सा नमस्कार विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें.

* न उलटा खोदला आहे.

लिहिला मजकूर सर्व कळला मकरसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले ते पावले स्वीकारिले फडतरे याजकडील ऐवजाविशींचा मजकूर लिहिला तो कळला त्यास, येविशीं फडतरे यास ताकीद करून ऐवज देविला जाईल. रा छ १२ रोवल लोभ असों द्यावा हे विनंति

पौ फाल्गुन शु॥ ६ शके १७०५

---

पत्रांक २७७ श्री १७०६ चैत्र शुद्ध ८




आज्ञापत्र समस्तराजकार्यधुरंधरविश्वासनिधि राजमान्यराजश्री माधवरावपंडित प्रधान ताहा मोकदम, मौजे कामेरी, ता॥ वदन, प्रांत वाई सु॥ अर्बा समानीन मया व अलफ, शके १७०६ क्रोधीनाम संवत्सरे. राजश्री विसाजी कृष्ण, उपनाम चिंचळकर, गोत्र वशिष्ठ, सूत्र आश्वलायन, मौजे तेरवण, ता॥ राजापूर प्रांत मजकूर, यांणीं हुजूर का॥ पुणें येथील मुक्कामीं विनंति केली कीं, आपण बहुत दिवस स्वामीसेवा एकनिष्ठपणें केली, कुटुंबवत्सल आहों, योगक्षेम चालिला पाहिजे, यास्तव स्वामींनीं कृपाळू होऊन आपणास कुटुंबाचे योगक्षेमार्थ एक गांव नूतन इनाम करून देऊन चालविलें पाहिजे म्हणोन त्यावरून मनास आणितां, यांणीं बहुत दिवस स्वामीसेवा एकनिष्ठपणें केली, कुटुंबवत्सल आहेत, यांचें चालविणें अवश्यक जाणोन, यांजवरी कृपाळू होऊन, यांस कुटुंबाचे योगक्षेमार्थ मौजे मजकूर हा गांव स्वराज्य व मोगलाई एकूण दुतर्फा देखील सरदेशमुखी दरोबस्त ऐवज सा होत्रा, कुल बाब, कुल कानू, हली पट्टी व पेस्तर पट्टी, खेरीज हकदार व कदीम इनामदार करून, जलतरुतृणकाष्ठपाषाणनिधिनिक्षेपसहित इनाम तिजाइसुदां सरकारांतून नूतन इनाम करून दिल्हा असे तरी, मौजे मजकूर सदरहूप्रमाणें यांचे दुमाला करून देऊन, यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालविणें दरसाल नवीन सनदेचा आक्षेप न करणें या सन

देची प्रति लेहून घेऊन, हे अस्सल सनद यांजवळ भोगवटीयास परतोन देणे. जाणिजे. छ ७ जमादिलावल. आज्ञाप्रमाण. लेखनसीमा.

---

पत्रांक २७८ श्री. १७०६

यादी आजमास राजमडळाच्या खर्चासी सो सुा खमस समानीन जमा रुपये.

६०००० बत्तीससिराळे येथील ऐवज.
१०००० शाहार सातारा छल्या व नकासा व जकात.
व पेठा गुरुवार बुधवार व सोमवार व रविवार.
१०००० हत्तीचा ऐवज सचिवपत याजकडून.
३५०० इदापूरचे देशमुखीपैकीं.
३७०० महादजीपत याजकडे सावोत्रा वगैरे.
२००० थोरला वाडा करजेचा ऐवज.
२००० उत्रार जमीन किल्ला सातारापैकी.
२००० बळवतराव बाजी याचा सरजाम जप्ती.
५० मौजे पळसीची सेरी.
१७०० कुरणाकडे.
१००० किरकोळी पाटिलक्या व सेन्या व बागा वगैरे.
१५०० दरेकराकडील आहिरवाडी वगैरे.
२५०० चिट्टीमसाला, खंडगुन्हेगारी, कारसाई, व कडबा शिवाय प्रतिनिधीकडील कारसाई तट्टे, भाजी.

---

१०००००

सदरहूपैकीं खर्च अजमास रुपये
२५००० दरमहाचा दरमहा दिल्हा राजमडलचे लोक आा४०० रोजमरा.
५००० कारकून दप्तरचे व राजश्री कडील व दोनी वाड्याकडील
३६००० राजवाड्यातील कापड सुद्धा
१५००० राजश्री
१०००० श्रीमत आऊसाहेब
८००० उभयता राण्या २
कापड

---

३६०००

४००० सानाबाद व वाइका एकंदर २२५ अनुभी
२००० धर्मादाव

१००० रामभीकडील नित्य गळ व मोहनासुधा
५०० भाऊसाहेबाकडे
५०० दोनी वाडे मिळोन

२०००

१००० धर्मादावें दोन्ही वाडे व रामभीकडील व शाहूमहाराज व आइसाहेब व भीमताकडील कारमारी त्र्यंबकराव यासमासून कृष्णराव परियेंत

७५०००

रोजमारा दुमाहीचा दुमाही धावा

शिवाय भीमताकडील स्वार १५०० आहेत व सरकारचीं मनुष्यें रोज मरेचीं आहेत तीं शाहारची रख वाली करतील, स्वार न पाठविले कोठें तरी

पत्रांक २७९ श्री १७०७ ज्येष्ठ

यादी जनरल वाइम यासीं सरकारतर्फेनें बोलणें सुा सीत समानीन मया व अलफ कलमें

फरांसिसांचा व तुमचा विचार पेशजीं जाला होता अलीकडे सलूख जा हला त्यास, निखालसपणानें बेकिलाप सलुख चालत आहे कीं कसें आहे ! सरकारांत फरांसिसाकडील बोलणें, टिपूवर सरकारांतून मसलत जाल्यास आम्हीं इमयाहा मदतीस चाकरीबद्दल येण्याचें, लागलें होतें दोनतीन वेळां त्याजकडोन पैगाम आले परंतु इमजाचीं व सरकाराचीं निखालस दोस्ती तेव्हां फरांसिसास सामील आपणें ठीक नव्हे इमजांशीं दारमदार स्नेहाचे शाबे आहेत त्यांचीच वृद्धि असावी यावर नजर देऊन फरांसिसांचें बोलणें सरकारांत पसंद न केलें हालीं टिपूचे पारिपत्यास सरकारांतून फौजा या होणार. तेव्हां फरांसिसाचें बोलणें इकडे सरकारांत नापसंद जाल्यामुळें, कदा चित हिंदुस्थानांत आपला पैलाव ज्यासती व्हावयाठमेदीनें फरांसिसानें टि पूशीं सलूख करून, त्याचे मदतीस सामील होण्याचें ठराऊन, त्याच मदतीस आल्यास, याचा विचार इंग्रज करितात, हें जनराल यास पुसावें मशारनिल्हेचा

विचार थोर. तेव्हा विलायती हुकुमाशिवाय कोणताही मनसबा विचार कसा होतो, असे कदाचित् म्हणतील. तर, विलायतेस लिहून, तेथे ठराव होऊन तेथील हुकूम यास येऊन, मसलत करणे, त्यास अवकाश बहूत पाहिजे. आणि इकडे तो मसलत प्राप्त जाहाली. उपेक्षा होऊन अवकाशावर पडि-ल्यास, पुढे दिवसेंदिवस त्यास भारी पडतें. सरकारात टिपू सुरळीत वर्तोन सरकारमर्जीप्रमाणें सलूख करून मोकळा जाल्यावर, फरासिस सामील आहे. त्यापक्षीं मसलत इग्रजासच जड पडेल. याचा दूरदेश विचार त्याचे ध्यानात येऊन, याचे पैरवीचा मनसबा कसा कायम आहे? सरकारात तों इग्रजाचे दोस्तीचे बद्दल खातर. फरासिसाचे मसलतीस येण्याचे बोलणें ऐकिलें नाहीं. येविशींचें सविस्तर लिहिल्याअन्वयें जनराल यासीं बोलोन त्याचें उत्तर काय करितात, ते लेहून पाठवणे.

कलम १

मेस्त्र मालिट मुबईहून कलकत्त्याल गेले आहेत. हेच पुण्यास वकिलीचे कामावर कलकत्त्याहून आल्यास, सरकारचे कामाचे उपयोगीं पडतील व आह्मापासोनही साहित्य कामकाजाचें घडेल. यास्तव, सरकारातून कलकत्त्यास सूचना मालिटचे रवानगीविषयीं जाल्यास चागले, म्हणोन जनराल तुह्मापाशीं बोलले. त्याजवरोन कलकत्त्यास सरकारातून पाठविलें आहे कीं कलकत्त्याहून पुण्यास वकील रवाना करणार, त्यास मेस्त्र मालिट वाकब आहेत, तेच आल्यास फार चागले. येविशीं तुम्ही बोलावें आणि उत्तर काय ते कळवावें, ह्मणोन पत्र गेलें. याप्रमाणें जनराल यास सागितलें कलम १

---

पत्राक २८० श्री १७०७ भाद्रपद शुद्ध २

यादी राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा व राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरधर याजकडील करारमदाराचीं कलमे. सुा सित समानीन मया व अलफ.

घरचा अगर बाहेरील कसाही प्रसग पडला तर सरकारचे लक्षाशिवाय दुसरे लक्ष धरणार नाहीं. येणें प्रो करार.

तुह्मीं पुत्रसुद्धा सरकारचे लक्षात असावे, दुसरे लक्ष धरू नये. येणें-प्रो करार.

इग्रजाचा बिघाड जाला तर शरीक सरकारचे. येणेंप्रो करार.

प्रात गगथडी येथील महाल सरकारात आले आहेत. तेथील वासदाणा तुमचा. तो तुह्मीं घेऊ नये. याचे ऐवजीं प्रा वरकड येथील सरदेशमुखीबाबतीचा ऐवज सवादोन लक्ष रुा तुह्माकडे दरसालचें येणें ते तुह्मास माफ केले. याप्रों करार सन-इसने सितैनींत जाला आहे. व त्या अलिकडे सन तिसा सितैनात ब्रह्मेश्व-

पांच हजार खार्यांचें कापड या ळापूर व धारीमचें सरकारात दरसाल घावें असा करार पेशवींचा आहे त्याप्रों, सालमजकूर सन सीत समानी नापासून सरकारात दरसाल पावतें करीत जावें येणेंप्रों करार.

याचे सालीं अकरा माहालचा घास दाणा घेऊन एकसा करार आहे त्याचा फडशा पेस्तर सालीं करावा येणेंप्रों करार.

त्र्यंबेश्वराचे मुकामीं कैलासवासी जानोजी भोसले सेनासाहेबसुभा यांशीं करार जाले आहेत त्याप्रों चालावें येणेंप्रों करार.

छ ३० सवाल, सन सीत समानीन, भाद्रपद, मुकाम पुणें

---

पत्रांक २८१ श्री १७०७ माघ वद्य १२

*राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री शिवाजी विठ्ठल स्वामी गोसावी यांसी* पोष्य माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जा णोन स्वकीय लिहीत जाणें विशेष संस्थान करोली येथें सरकारचा अमल आहे त्यास, संवत १८११ पासून सरकारचे अमलाचा ऐवज येणें, त्या विशीं राजश्री माहादाजी शिंदे यांणीं ठराव करून दिल्हा त्याजवरून व स्यानिकांनीं ठाणें मौजे कुडगांव व तर्फ मागदोल ऐवजात लाऊन दिल्हीं आहेत त्यास, मौजे मारी व तर्फमारी संबलगडाकडील ठाणीं तुम्हीं घाल णार, म्हणोन हुजूर विदित जालें त्याजवरोन हें पत्र लिहिलें असे तरी सं स्यानिकांनीं आपले संस्थानपैकीं मौजे मार व तफमजकूर सरकारचे ऐवजीं सरकारात ठाणीं सुद्धां हवालीं केलीं असता, तुम्हीं उपद्रव करणार, हें ठीक नसे तुम्हीं ते प्रांतीं फौजसुद्धां असता, सरकारचा अमल बसऊन वाचा तो अर्थ न होतां, जाहाल्या अमलास खलेल करितां हे गोष्ट उत्तम नाहीं मौजे मारास व त्या मारास तुम्हीं कोणेविशीं उपद्रव न दतां, सरकारच ऐवजाचा झाडा होऊन येई तें करणें फिरोन बोभाट येऊ न देणें जाणिजे छ २६ रबिलाखर; सुहुा सीत समानीन मया व अलफ बहुत काय लिहिणें ! हे विनंती

---

पत्रांक २८२ कदाचित् १७०८

*राजसों मुरब्बत मेहरबान करमफर्माय मुखलिसां दामकरमहू* याद आर्जूय द्यापत्त स्वामी मवासलत सरासर येहजत कैमुत ज्यादिबुतहरीर हमक सुप अमीर सलसुप विजिरयाद आपलें कृपापत्र आमचे पत्राचा दरजाब पावलें आम्हांकडील समिपतीचे मुमदीनाचा तरतूद होळकराचे लढाईचा खामरा वाचे लिहिल्यावरून आपले ध्यानांत आला व येरेरे व अनंत एक हजार

स्वारानिसी होळकराविशई रवाना केले व आनखीं अवघें मजकूर सखाराम रामचंद्राचे लिहिल्यावरोन कळेल, ह्मणोन पत्रीं आज्ञा. त्यास, सुचनेप्रमाणे होळकर मजकुरासीं सल्ख घडून येईल. होळकराचे खडणीचें व पायमलीचें नुकसान महालातीस जालें त्याचे ऐवजाचे मुकुदम्यात आपले कृपेचे उमेदवार नारायणराव..................

---

पत्रांक २८३ श्री १७०८ चैत्र शुद्ध ३

श्री बाळकृष्ण प्रभु चरणारविंदी.

तुह्मीं विनतीपत्र फाल्गुन वद्य चतुर्थी, मुकाम नजीक लुरापूर वाघनगीरा श्रीकृष्णाउत्तरतीर येथील पाठविलें, ते चैत्र शुद्ध द्वितीयेस पावले. कित्तुरावर टिपूचा जमाव फौज व गाडदी मिळून पचवीस हजार होती. ते राजश्री तुकोजी होळकर व गणेशपत वेहेरे त्यापासून पधरा कोसावर जाताच ते निघोन धारवाडचे आश्रयास गेले ह्मणोन वातमी आली, वगैरे राजकी सविस्तर लिहिलें ते श्रीचरणीं निवेदन जाहालें. तुमचीं पत्रें दोन तीन आलीं. त्याचीं उत्तरें पाठविलीं तीं पावलींच असतील. रवाना चैत्र शुद्ध तृतीया.

---

पत्रांक २८४ श्री.(असलबमोजिब नकल.)१७०८ ज्येष्ठ वद्य ११

विनती ऐसीजेः—कृष्णापार रायचूरपावेतो नबाबाचे सरदारासमागमें मी गेलों. श्रीमत राजश्री गोविंदराव बापू व गोविंदराव भगवत यास नबाबानीं त्याचे समागमेंच ठेविले कारण कीं, अदवानीचा महसरा उठविणें. त्यास उभयतानीं विचार पाहिला कीं, पुढें छावणीचाही बेत उत्तम प्रकारें जाला पाहिजे. म्हणून हेही समागमेंच राहिले. अदवानीचें वर्तमान ऐकून व इकडून पत्रें गेलीं यावरून, श्रीमत राजश्री तात्यानीं राजश्री आपा व रघुनाथराव व बाजीपत अण्णा यान्ची फौजेसह रवानगी अदवानीचे सुमारें केली. ह्या सर्व तपशील बापूनीं पेशजीं स्वामीस लिहिलाच आहे. तीं पत्रें इंदापुरकडून स्वामीस पावलीं असतील. यानतर, छ १७ साबानीं रायचुराहून निघोन छ २५ माहे मजकूरीं भागानगरास नबाबाकडे मी आलों. नासिरुलमुल्ख व मुगरुलमुल्ख व समशुमुल्ख याजपाशीं कोन्हेर बाबूराव यास ठेविले आहे. टिपूनें हल्ला केल्या तितक्या मोठ्या जुरमतीनें महावतजंग यानीं मारून काढल्या. याचा तपशील पेशजीं विनती लिहिण्यात आलीच आहे. अलीकडील वर्तमान आलाहिदा पुरवणीपत्रीं लिहिलें आहे. त्यावरून ध्यानास येईल. हे विज्ञापना.

---

पत्रांक २८५ श्री १७०८ ज्येष्ठ वद्य १३

राजश्रियाविराजितराजमान्यराजश्री महिपतरावबापू स्वामींचे सेवेसी —

पोष्य हरी बल्लाळ साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष सुर्सीं छ २० साबानचें पत्र पाठविलें तें पावोन लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें बहुत संतोष जाहाला प्रकृतीचें वर्तमान लिहावें म्हणोन लिहिलें त्यास, तीस मीहने जाहाले, वायूचा उपद्रव जाला आहे मातुश्री बाइ येथें आली होती ते समई प्रकृत पाहिली त्याजवर औषध चालवेंच आहे त्यास, अधिक उणी प्रकृत होते अद्यापि ठरली नाहीं उपाय करीतच आहों ईश्वर *कृपा करील तुमची प्रकृत चांगली आहे म्हणोन लिहिलें त्यास, ईश्वरानें कृपा केली श्रीमंतांचे दर्शनास याव याविषीं पूर्वी लिहिलें आहे श्रीची आज्ञा घेऊन यावयाचें करावें रा छ २७ साबान बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनंती

---

पत्रांक २८६ श्री १७०८ आषाढ शुद्ध ६

सेवेसी विज्ञापना आपली स्वारी येथें असतां टिपूकडील श्रृंगेरीपंत रा जश्री मुधोजी भोसले याजकडे आला त्याजबरोबर भोसल्यानीं आपलेकडील लालाबुखमदास देऊन आज्ञा झाली त्याप्रों मुद्दे सांगून पाठविले ते अद मानीस टिपूकडे गेले छष्करावाहेर अर्ध कोसावर डेरा दिल्हा तेथें रहावयास सांगितलें दोन दिवस भेट जाली नाहीं तिसरे दिवशीं सायंकाळीं पत्राऊ पा, पत्र दिल्हें, व वर्तमान सांगितलें त्यास करकद कांहीं नाहीं, सालाबादी पैका राहिला असेल तो देऊं, त्यांत पायमली मजुरा द्यावी, बदामी घेत ल्यानें तीस लक्षाची नुकसानी झाली, असो, ही आम्हाकडे द्यावी तुमचा नरगुंदचा किल्ला काळोपंत दतो, त्यानें पेशकशी कराराप्रों द्यावी, किंतुर तर आमचें लष्करींच सस्थान मार्प्रो भाषण जालें तीन प्रहरपर्यंत बसोन तेच समई निरोप दिल्हा पत्र लेहून दिल्हें तें घेऊन, भृंगरीपत व लाला मनूचे मुकामापलीकडे गेले तों सेनाधुरधर गेले चिरंजीव यथें आहेत त्याजकडे जाऊन पत्र दिल्हें वर्तमान सांगितलें त्याजवर तें पत्र व लालास आम्हांकडे पाठविलें लालानें मजकूर सांगितला, तो लिहिलाच आहे पत्रांत मजकूर स्नेहाचें फार लिहिलें होतें दुसरें कांहीं नाहीं ! भोसल्याचा मजकूर उभयता वर भावून लिहिला आहे तें पत्र पाहून आम्हीं सांगितलें कीं, टिपूचा आ मचा फासला जवळ आहे राजकारणाचा भाव समजला त्यापक्षीं, जाब लि हून दऊन लावून द्यावा त्याजवर आम्हीं लालास पुसलें कीं, कांहीं अधिक

---

* हरिपंत फडक्यांना पोटदुखीची व्यथा होती तीतच त्याचा अंत झाला

उणे सांगितलें आहे कीं, काय ? त्याणीं सांगितले कीं, सांगितला मजकूर इतकाच. तेव्हा रवाना करण्याचा निश्चय ठरला. त्यावर, शृंगेरीपताने सांगितलें कीं, मजला मुधोजी बावासी बोलावयास सांगितले आहे. त्याची गांठ पडली पाहिजे. तेव्हा पुसले कीं, कागद पाहिला, तुह्मीं मजकूर सांगितला याहून अधिक काय बोलावयाचें ? त्यास, भेट जाली पाहिजे, हाच आग्रह. नाहीं ह्मणावें तर चिरंजीवास वाईट वाटेल, व लष्करात नसावा, याजकरिता जाणें तर जा, ह्मणून सांगितलें. त्यावरून मुधोजीबावाकडेस रा केला. काय अधिक सांगतो पाहावें. लष्करातून पीडा लाऊन दिली. धुरधराची गांठ पडल्यावर पत्र आले ते दृष्टीस पडेल. त्याजवळ अधिक मजकूर काय सांगितला असेल तोही कळेल. राजकारणाचा प्रकार समजलाच आहे. परंतु कच्चे वर्तमान ऐकलें ते सेवेसीं लिहिले आहे. रा छ ४ रमजान. सेवेसीं श्रुत होय. हे विज्ञापना. लालाबरोबर एक हत्ती व चार वस्त्रें पाठविलीं. हत्ती लंगडा आहे. तो चिरंजीवानीं येथें चालेना ह्मणून ठेऊन घेतला. विदित झाले पाहिजे. हे विज्ञापना.

---

पत्रांक २८७ श्री १७०८ आषाढ वद्य ३

राजश्रियाविराजितराजमान्यराजश्री महिपतरावबापू स्वामीचे सेवेसीं:—

पोष्य हरी बल्लाळ साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. पत्र पाठविले तें पावोन बहुत समाधान जाहले. लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें. शरीरप्रकृतीविशीं लिहिले. त्यास औषध घेत असतो. मातुश्री ताई तेथे आली होती. त्याणीं प्रकृत पाहिली त्यापेक्षा आता प्रकृत दिवसेंदिवस चांगली आहे. श्रीकृपेकरून आरोग्य होईल. तुह्मी येण्याचा मजकूर लिहिला तो कळला. श्रीस प्रार्थना करून यावयाचें करावे. मुरवा कोहळ्याचा पाठविला तो पावला. वैद्यास पुसून घेतों. कळावें. रा छ १७ रमजान. बहुत काय लिहिणें ? लोभ असो दीजे. हे विनंती.

---

पत्रांक २८८ श्री १७०८ श्रावण शुद्ध ११

राजश्री हरीपंततात्या स्वामीचे सेवेसीं:—

विनंति उपरी. भोंसल्याचे दरमहाचे तीस हजाराहून मी अधिक बोलिलो नाहीं, व बोलत नाहीं. इतके द्यावे लागतील. देऊ खासा पुण्यास येतील, त्यास येथें मेजवानी स्वामींनीं केली. त्यानीं आपणास केली. त्याजवर फिरोन गांठ पडल्ये, तेव्हा श्रीमंताचा निरोप व आपला घराऊ निरोप द्यावाच लागेल. दसरा जाहल्यावर मी येतो, अगर सेनासाहेबसुभा यास पाठवितो. ऐसे

शपथ पूर्वक बोलून, आपलें काळीज आमच्या हवाली करून गेले आहेत शफ्त वाहिली, याजमुळें करतीलसें दिसतें स्वामीची गाठ पडल्यावर या गोष्टी निघतील फिरोन सुचित करून घ्यावें याचा उपयोगअनुपयोग फार करून समजला परंतु, मसलतीवर हट त्यापक्षीं च्यार सरकारी माळगावींच पाहिजेत मंडल्याविषीं भमी आहेत येविषीं बुंदेल्यांस निक्षुन लिहून, याचे स्वाधीन होय, तें करावें सर्व अर्थ ध्यानात आहेत त्याहायेंसें नाहीं ह्मणोन विस्तारें लिहिलें तें कळलें त्यास, धुरंधर येथें आले भीमरावांचा निरोप व आह्मी आपला मराठा निरोप, वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे योग्यतेप्रमाणें केलें त्यांणीही आपल्या योग्यतेप्रमाणें केलें येविषींचा वगैरे सविस्तर मजकूर छ २७ रमजानीं लिहून तुह्माकडे पाठविलाच आहे, त्यावरून कळेल सर कार्री माळगावयाची सबय तुह्मांस आहेच त्याप्रों घडतही आहे मंडल्या विषीं पत्रें लिहून कारकून व हुजरे हाली रवाना केले रा छ २ सवाल हे विनति

पो छ १० शवाल, प्रात काळ, श्रावण, सबा समानीन

---

पत्रांक २८९ (नकल) १७०८ भाद्रपद वद्य १२

पो छ ११ जिल्हेज सबा समानीन

राव अजम अकरम लक्ष्मणराव रास्ते सलमहाहुताला

*सो मुपफ्क मेहेरबान कदरदां करमफर्माय मासल्हिशां बादज शौक मुला* *कत मबहुद जमीर मुनीरत बेहुदसलमीर नमुदा मा आयद येथील खुषी* जाणोन आपली यादमानी हमेषा कलमी करीत आलें पाहिजे दर्रीविला छ ७ जिल्कादचें खत अजराहेमेहेरबानगी पाठविलें तें पोंहचून खुषी हासल अहा ली तुह्मीं उभयतां येथें होतां येथील बोलण्याचा जातेसमई सर्व मजकूर रुबरु सांगितला होता व तुह्मीं येथें असतां तुह्मांकडून वारंवार पत्रें लिहून पाठविलींच होतीं तुह्मीं तेथें जाऊन पोंहचल्यानंतर उत्तम प्रकारें बोलून वहाचें पर्याय कांहींच न लिहिले यावरून अपूर्व दिसून आलें अमुक प्र कारचा तह करावयाचा म्हणून तपसील लिहून पाठवावा म्हणून लिहिले होते सर, आह्मी तेथून येते समई पेषकषीचा ऐवज व दरबारखर्चाचा ऐवज सहित दिल्हे या तरफैनची दोस्ती मजबूत होत आहे ह्मणून अण्णा यो सांगितला होता त्याप्रमाणें आमचे खाविंद खुदावदन्यामतांस जाहीर केला त्यास, पेषकषीचा ऐवज देणें सर्वांकडून तकरारच नाहीं वाजबी जें देणेंच असेल तें दिलें जाईल दरबारखर्चाचे मजकूर लिम्हापदी नाहीं मुनासीब देणेंच असेल तें देऊं या जिरहीत तरफैनचे दोस्ती मजबूद जाहल्यावर, आणखी ज्यां ज्यांत मुनासीब जेथपर्यंत करणेंच तेथपर्यंत केला जाइल, ह्मणोन परमा

विले. आपण दाणा व दूरदेष आहेत. सहल कामाकरिता आपले खाविंद श्रीमतासीं करोडोंचे पेंचात न घ्यावा आणि तर्फैनचा खल कुळाच्या रफाईवर नजर देऊन मदारुलमहाम यास ज्याप्रकारे बोलावे की त्याप्रमाणें बोलून तर्फैनचे दोस्ती मजबूत होत असे करून इतिल्ला घ्यावा. तर्फैनचे दोस्तीचे कामास सिवाय तर्फैनचे उमदा लोक दरम्याने आले. अगर दहा वर्षे ऐसेच कज्या खटपट असलियाही फैसल्ला पावणार नाहीं. साबक पचवीस तीस वर्षां खाले कैलासवासी रघुनाथराव व माधवरावसाहेब असताना, इकडून मातबर वकील खाननुरुल्ला व करीमखान गेले होते त्यास, उभयता रावसाहेबानीं ताजीमतवाजू देऊन मानपान केले होते. त्याजप्रो तिकडूनही आनंदराव निंबाजी येथें होते. त्यास, आज ह्मा मुलाकत ताारागीन्यावस्ती त्यानीं हुजूरदरबारास आले. त्यावख्तीं ताजीम व अत्तरदान पानदामचामुदार होत होते. हे मजकूर आम्हीं आपणास जाहीर केला होता. बोललों. आताहि आनदराव निंबाजी हमराही लोक असतील ते आपणाला जाहीर केलेच असतील. आम्हीं आलो असता श्रीमताकडून मानपान जाहाले ते आपणास जाहीर आहे. श्रीमताचे व सरकारअसदुल्ला हीच दोस्ती मजबूत जाहाल्यावर हमेषा तिकडून उमदा लोक येथें यावा, येथील उमदा लोक तेथें यावा. त्यास, मानापानात फरक आलिया कैसे येतील ? याकरिता तेथें मदारुलमहाम यासीं वगैरे बोलून, येथून उमदा शखस आलिया श्रीमताकडू ताजीम देणेंचेही मार ठराऊन लिा पाठविलिया, येथे आम्हीं हुजुरांत अर्ज करून येथून उमदा शखस पाठविला जाईल. आसाहेबाकडील खैरआफियतेचे खबर निगारष करीत आलें पाहिजे. रा छ २५ जिल्काद ज्यादा काय लिा. हे किताबत. १७०८.

---

पत्रांक २९० श्री. १७०८ आश्वीन वद्य १२

राजश्रीयाविराजित राजमान्यराजश्री महिपतराव बापू स्वामीचे सेवेसीं.—

पो हरी बल्लाळ साष्टांग नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष तुह्मी छ १७ जिल्हेजचे पत्र पाठविले ते पावोन संतोष जाहाला. लिहिले वर्तमान सविस्तर कळले. फार दिवस पत्र आले नाहीं, विस्मर जाहाले, ह्मणोन पत्रीं लिहिले. ही गोष्ट खरी आहे. परंतु माझे शरीरास सावकाश नाहीं. यामुळें पत्र पाठविण्यास विस्मरण पडले खरे राजश्री रामचंद्र नाईक याजवळ आपले प्रकृतीचें वर्तमान पुसत असतो तेही सांगत असतात. तेव्हा विस्मरण नाहीं. तुमची प्रकृती नीट असावी अशीच प्रार्थना ईश्वराजवळ आहे तुह्मीं लिहिले की, श्रीदेवाजवळ

आल्यापासून वीस दिवसास संग्रस बरी आहे त्यावरून अति संतोष जा
हला तुमची निष्ठा श्रीजवळ आहे तेव्हां ईश्वर कृपाच करील सदैव नाहीं
सेवा चालते त्याप्रों चालों शाबी सदैव पत्रीं कुशल वृत्त लिहीत जावें, आ
मचें प्रकृतीचें वर्तमान तर पोटास दुखत असतें उपाय करितों चार दि
वस बरें वाटतें, फिरोन नीट नाहींसें होतें इलाज करीतच आहें कळावें
रा छ २८ जिल्हेज बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनती
छ ४ मोहारम

---

पत्रांक २९१ श्री १७०२ पौष शुद्ध ९

बक्षिसनामा शके १७०८ पराभवनाम संवत्सरे पौष शुा ९ नवमी शुक्र
वार ते दिवशीं राजश्री बाळाजी जनार्दन, उपनाम भानू, गोत्र काश्यप,
सूत्र आश्वलायन, महाजन, मौजे वेळास, ता बेसवी, सुभा दाभोळ, यांसी
न्याहालकुंवरबाई, कुंवमानसिंग जाधवराव व राव जगदेव उर्फ राजे भानद
राव बिन जाधवराव, देशमुख व देशपांडे सरकार दौलताबाद, वगैरे सुभे
*खुजस्तेबुनियाद सुा सबा समानीन मया व अलफ, सन ११९६ फसली*
कारणें बक्षिसनामा लिहून दिल्हा ऐसा जे सन११८९ चे सालांत राजे मान
सिंग जाधवराव देशमुख देशपांड्ये कैलासवासी जाहाले सबब व नबाबमंद
गानअल्ली यांणीं माहालानिहायचे वतनाची जप्ती केली ते सोडून वधारते
पदरीं सनदा करून घ्याव्या म्हणोन आम्हीं हैदराबादेस गेलों सरकारचे मु
त्सद्दी वगैरे यांचे शिा जायशाल लाविला तों भाऊबिरादर मानसिंग
जाधव वलद यशवंतराव जाधव हे वृत्तीसंबंधें वादास आले आम्हां
कडील विठ्ठल बयाजी दिवाण माहितगार पुरातन होते, त्यांचा
काळ जाहाला सर्व प्रकारें गोष्ट बिलग पडिली वतनाचे त्याटप
*टीस माहितगार जायशाली म्हणून कोणी पदरीं नाहीं हें संकट जाणोन*
तुम्हांकडे पैगाम लाविला कीं, आपण श्रीमंत राजश्री पतप्रधान यांचा राज्य
कारभार सर्व चालवितां, नवाब मदगानअल्ली यास तुमचा स्नेह बहुत आहे,
त्यांचपाशीं वकीलकीचे कामास राजश्री शिवाजी रघुनाथ आहेत, त्यांजला
आम्हाविषीं लिहून त्यांजकडून हरएकविषीं आमचें साहित्य होय आणि वत
नाच्या सनदा मोकळीविषीं आम्हांस प्राप्त होत, तें करावें याप्रों आमचें
बोलणें ऐकून, आमचे परोपकारावर व थोरवतनाचें संरक्षण करावें यांत इहपर
पुण्य पुरुषार्थ आहे हें जाणोन, आपण शिवाजीपंत यांस लिहून आमचे सा
हित्यास अनुकूल केलें त्याजवरून शिवाजीपंत यांणीं नवाब मंदगानअल्ली
*यांचे दरबारीं साहित्य करून, पूर्ववत्प्रों वतनाचे महालीच्या सनदा आमचे*
नांवें करून ठेविल्या वतनाचा मोगवटा पूर्वीपासून आपले वडीलवडील

करीत आले त्याप्रमा आपणही अनुभऊ लागलो. गेलें वतन पुन्हा प्राप्त जालें हा लाभ आह्मीं चित्तात आणून, आपला उपकार बहुत जाहला याचें उत्तीर्ण काय व्हावे याचा विचार करिता, शिवाय वतन द्यावयाजोगा अर्थ दिसत नाहीं हे जाणोन, पो वरूळ ऊर्फ राजपुर येथील देशमुखदेशपाड्येपणाची वृत्त पूर्वीपासून आपली आहे, त्यापैकीं देशपाड्येपणाचें वतन पेशर्जी जिवाजी रघुनाथ याचे पुत्र खंडेराव व अमृतराव जिवाजी यास देऊन देशमुखीची वृत्त आपणाकडे चालत होती ते आपणास दिल्ही. याने काहीं उपकार फेडिलासा जाणोन, देशमुखीची वृत्त देहे एकतीस द्यावयाचा करार करून, हें बक्षीसपत्र तुह्मास आत्मसंतोषें लिहून दिल्हें असे. तर सदहू एकतीस देहे येथील देशमुखीचें वतन व वतनसंबंधें हक्क रुसूम वगैरे भोगवटा द्यावयाचीं कलमें बितपशील:—

१ हक्क रुसूम दर गावास तनखे यास दरसदे रुा ३ द्यावयाचा शिरस्ता आहे त्यापौ देशपांडे रुा १ घेतील. बाकी रुा २ तुम्हीं घेत जावे.

१ सिरपाव सरकारातून अगोदर तुम्हीं घ्यावा, मागाहून देशपाडे घेतील.

१ वतनी कागदावर वगैरे दसकत तुम्हीं आपले नावें करावें. तुमचे बाजूस देशपांडिये दसकत करितील.

१ भेट तुम्हीं अगोदर हकीमापुढे ठेऊन, मग देशपाडे याणीं ठेवावी.

१ विडा सरकारचा वगैरे अगोदर तुम्ही घेऊन, मागाहून देशपाडे याणीं घ्यावा.

१. वरकड हरएक मानपान वतनसबधें अगोदर तुम्ही, मागाहून देशपाडे याणीं घेत जावे.

१. देशमुखीचे वतनाबाबत वाडा कसबे मजकुरीं आहे, तेथें इमारत बाधून नादावें.

१. कसबे मजकुरीं वगैरे हरएक

१ भेटी दर गावास दोन, तुम्हीं व तुम्हाकडील गुमास्ता प्रों मजकूरचे कामाकाजास ठेवाल त्याणीं घेत जावी. कलम.

१. धनगराचे माग ज्या गांवीं असेल त्या गावीं दरसाल चवाळें एक घेत जावें.

१ चाभाराकडील जोडा दर गांवास दरसाल एक घेत जावा.

१ कसबे मजकुरीं सायरान हक्क आहे तो घेत जावा.

१ शाहा दावलपिदर याचे मुजावरापासून दरसाल तबरुकाबाबत रुा ३ तीन घ्यावयाचा शिरस्ता आहे. त्यापैकीं देशपाडे याचा रुा १, बाकी दोन तुम्हीं घेत जावे.

१. भाकरीबाबत ऐवज गावगन्ना येईल तो निमे देशपाडे यास देऊन बाकी निम्मे तुम्ही घेत जावा.

१. कलावत थेर भोरीप वगैरे यास त्याग अगोदर तुम्हीं, मागाहून देशपाडे याणीं द्यावा.

गावीं बाजार भरेल तेथें शेवसबकी तुम्हीं घेत जावी

१ इनाम जमीन बिराईत, बागाईत, पूर्वीची आहे ते तुम्हीं अनुभवीत जावी

१ सणाची मोळी माहारांकडील दर गांवास घ्यावी

१ सफातीचे तीळ व पिष्टार्चे तूप दर गावास घेत जावें

१ प्रो मारीं हरएक कामकाजामुळें प्राप्त होईल सें तिसरा हिस्सा देशपांडे यास देऊन, दोन हिस्से तुम्हीं घेत जावें

१ परगणे मजकुरीं सरकारचें येणें वगैरे पडेल तें तिसरा हिस्सा देशपांडे व दोन हिस्से तुम्हीं घेत जावें

सदरहूप्रमाणे कलमें करार करून दिल्हीं आहेत त्याप्रमाणे व तुम्हीं आपले कारकिर्दीस नवीन संपादन कराल ते तुम्हीं आपली मिरास मुस्तकीम जाणून, तुम्हीं व तुमचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरेनें भोगवटा घेत जावा वतनास दुसरियाचा अधिकार नाहीं कालक्रमें कोण्ही वारीसदार मुजाहीम जाला, तर आपण त्यासी वारूं तुम्हास तोषीस लागों देणार नाहीं सदरहू करारास आमचे वंशाचा कोण्ही दिकहरकत करील त्यास कुळस्वामी व पूर्वजांची शपथ असे हा बक्षिसनामा लिहून दिल्हा सही

---

पत्रांक २९२ श्री १७०८ पौष वद्य ५

सेवेसीं वेंकोजी अनत थिर सा। नमस्कार विज्ञापना ता। पौष वद्य ५ पा। घेवों स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष आरे प्रो स्वामींचें आज्ञापत्र राजश्री कृष्णाजीपंत यास प्रविष्ट केलें त्यानींही सेवेसीं विनंतिपत्र लिहिलें आहे त्याचा उद्धार होयसा केला पाहिजे इकडील वर्तमान तर आविंध तळ कोंकण सलचेरी यदरावर आहे, त्याची फौज आठ हजार स्वार पागा व सीलेदार दहा हजार व बार व कर्नाटकी प्यादे मिळोन साठ हजार व तोफा लहान मोठ्या दोनशें, याजपैकीं पांच हजार स्वार व पंधरा हजार बार वगैरे प्यादे व पधरा तोफा लहान इतका जमाव बुघा बुरानदीन यास कित्तुरावर पाठविला त्यानें कित्तुरचें काम करून तेथेंच होता हालीं आपले फौजेची भावई पडल्यावर अविंधाचे आज्ञेनें हुबळीवर मुक्काम म्हणून एकंदर परवाना आला आहे आणखी दोन परवाने आल्यावर तेथून कूच करून हुबळीस येऊन धारवाड, कोपल, गजेंद्रगड, बदामी, तुगभद्रातीर धरून, इकडील मुलुखांतील कडबा जाळून टाकणेंविषीं ताकीद व जमीदार जागो जागाचे व त्याचे कारभार करणारास धरून कैद करून ठेवाव आणि उत्तरेकडील फौज कृष्णापार होतांच मुलुख तमाम जाळून जमादारांस पटणास पाठविणे विषीं एक परवाना आला आहे प्रस्तुत समय आहे आपई न धास्तीं

लष्करें तुगभद्रेवर आलीं तर वैगण काडीही आहे. आणि जमदार लोकाचा व्यय होत आहे, आणि फौज तिकडे शहास गुतला आहे. चित्रकलदुर्गास आपली फौज येई तोपर्यंत तो कांहीं इकडे येत नाहीं. तेथील शह भारी पडला आहे. एक वेळ युद्धप्रसग जाहला. मोड याचाच जाहला. म्हणून त्यास खादून काढावें म्हणन बसला आहे. आपली फौज भारी होऊन आल्यास दुर्गाचे मैदानात आपणाकडून आणखी एक सरदार भारी जमावानिशीं पा. लढाई करावी. तहकीक वर्तमान मुद्दाम ब्राम्हण जाऊन आपाजीरामाची राहुटीस ऐकोन आला. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्राक २९३. श्री. १७०९ चैत्र शुद्ध ५.

मुरलीधर जोतिषी पातपाही याचे पत्राचा तरजुमा:—

विशेष फार दिवस कृपापत्र आले नाहीं. तरी पाठविले पाहिजे. आह्मी आपले शुभचिंतक जोतिषी आहो. पूर्वी कितेक पत्रें आपणास पाठविलीं होतीं. हाली काहीं विचार शास्त्राजेवरून लिहितो, तो ध्यानात आणावा. आपले ग्रह बहुत चागले आहेत. तणेकरून शरीरीं आरोग्य राहावें. प्रतिष्ठा वाढावी. ईश्वराची कृपा व्हावी. लहान थोर सरदार हुकमीं अनुकूल राहावे. शत्रूचा नाश व्हावा. स्वपरदेशात विख्यात कीर्तिवृद्धि व्हावी. थोर थोर राजे याणी आज्ञा मानावी. अनेक नजरा येतील. पेशकशी येतील. स्वामींच्या रूबरू मान वाढावा. दुष्ट, चाहाड, लबाड याचा नाश होईल. आपल्या फौजास यश प्राप्त होईल. हैदर—नाइकाचे पुत्रावर हे वर्ष फार वाईट आलें आहे. शनिश्वर मकर राशीचा आहे. कर्नाटक देशाचे राज्यास मारील. पूर्वींही आह्मीं आपल्यास लिहिलें होते तें वर्ष हेच आलें आहे. त्याचा मुलूकही श्रीमताचे हातास येतो. घोडे, हत्ती, माल, तोफखाना येईल. च्यारी तर्फेचे फौजेवर श्रीमताची फौज यशस्वी होईल. राज्यात आपला अधिकार वाढत जाईल. दोन सरदार आपआपल्यात लढतील. आपल्यापासून सलूख होईल. शरणागत येतील. राजा आपले इच्छेचें फळ पावेल. पौष—शुद्ध—पौर्णिमेस ग्रस्तास्त—चद्र—ग्रहण होईल. सूर्य, मगळ, बुध, शुक्र, राहु एका राशीस येतील. त्याचेही ग्रहण होईल. याचे फळ हेच आहे कीं, ज्यालवर आणि अटक—अयोध्या— × × × ता येथील स्वामी आपल्या + +++ करून मारले जातील, अथवा अक ++++ थोर याजवर पडेल. राज्य श्रीमताचे ++ दक्षणेस ज्या त्या देशावर जागा जागा दाखल होईल. याप्रमाणे शास्त्राज्ञा आहे. फाल्गुन मासीं तेरा दिवसाचा पक्षही पडला आहे. तीन सरदार मारले जातील अथवा मृत्यूनीं मरतील —अयोध्येचा स्वामी, कर्नाटक देशचा स्वामी. अटकचा स्वामी हा विचार शास्त्राचे आज्ञेवरून केला आहे पुढे ईश्वर—इच्छा बलिष्ठ आहे. एक थोर

सरदार शत्रुत्व करील अंत करणापासून विषाद करील परतु कांहीं होणार नाहीं वास्तव, एक—सहस्र चंडीपाठ करवावा, सहस्र कन्याभोजन करवावें सकल अरिष्ट दूर होईल आपले घरीं या वर्षांत दिव्य संतान होईल अथवा गर्भ होईल आषाढमासीं आमचे कन्येचा विवाह आहे तरी कृपा करून सा हित्य करावें आम्ही निरतर आपणास लिहीत आहों कीं, श्रीमतांचा प्रताप वाढेल, अस्त—उदय होय तों राज्य होइल, थोर थोर मुलूक हातांत लागल एक चाकर माहादजी शिंदे पाटील यांणीं आऊन अमल दाखल सव केला गड—किल्ले मुलूक घेतला परंतु आम्हास दक्षणा न पाठविली हालीं कन्येचा विवाह आहे मि॥ चैत्र—शुद्ध ५, सवत १८४१

---

पत्रांक २९४ श्री १७०२ चैत्र वद्य ११

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्यराजश्री बळवंतराव दादाजी कामदार प्रांत कल्याण भिवडी गोसावी यांसी —

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सुा सबा समानीन मया व अलफ रा बाबाजी अनंत ढवळे यांचे तीर्थरूप अंताजी नारायण हे सन ईहिदे समानीनांत इंग्रजाचे लढाईंत सरकारकामास आले सबब, यांस दोडशें रुपये आकाराची जमीन, नूतन इनाम, कल्याण प्रांतीं, यांचे सोइस पडेल तेथें, नेमून घ्यावयाचा साल्गुदस्तां करार जाला आहे परंतु सनद सादर जाली नाहीं त्यास, हालीं हे सनद तुम्हास सादर केली असे तरी सदरहू दीडशें रुपये आकाराची जमीन प्रांतमजकुरीं यांचे सोइस पडेल त्या गांवीं, नेमून देऊन, यांचे नांवें पेस्तर सालापासून इनामपत्र लिहीत जाणें आणि चतु सीमेचा जाबता हुजूर लेहून पाठविणें त्याप्रमाणीं इनामपत्र करून दिल्हीं जातील प्रांतमजकूरचे अवमासाड साल्गुदस्तां व साल्मजकूरच्या दुसाला ऐवज तीनशें रुपये घ्यावयाची नमणूक केली आहे त्याप्रमाणें सदरहू रुपये जमिनीबद्दल मांस पावते करणें जाणिजे छ २५ रबिलाखर

आज्ञाप्रमाण

लेखन सीमा

---

पत्रांक २९५ १७००

कटीस नित्यानीं एकटें दुकटें होऊन भेटतात आपली फौज जाऊन शामील

जाली याजमुळे रामसिंगजीची बाजी सरशी दिसते, विकानेरकरही अद्यापि उभयपक्षीं येऊन शामील जाला नाहीं. राजश्री सवाईमाधोसिंगजी याचा व बख्तसिंगजीचा पूर्वींपासून स्नेहभाव होताच. व साम्प्रतकाळींही त्याजकडील कर्णीदान चारण येऊन ठाकुर पेमसिंगजीचे विद्यमानें मजबुती करून गेला होता. न कळे, कसा काय करार जाहला. एवच टिका, हाथी, घोडे, वस्त्रे, जवाहीर त्यास पाठवून ऐक्यता जाणविली. कुसळसिंग झालाबेकर याजकडी-लही राडा आजि पधरा सोळा महिन्यापासून पडून राहून, त्याचा पुत्र कुवर जसवतसिंगजी रुसुवा करून घरी जाऊन बसले होते. दिवाण हरि गोविदजी-चा पुत्र व कन्हईराम दिवाण या उभयतार्सी, त्याजला समजाऊन आणावया-निमित्य, पाठविलें असता ते न आले. व राजीं बसल्यानंतर देवशार्सी जाऊ-न, एकदा वडील कोणी याचे कुळात सत्या जाहल्या जाहेत, त्याचीही पूजा एकदा जाऊन करणें जरूर, ऐशा कित्तेक विचारानुरूप राजश्री सवाईमाधो-सिंगजीनीं अजमीरचे रुखें डेरा उभा करविला. व मजसमागमें हठराम धभा-ई व रविदत्त जाट......रामजीचा पुत्र चिमणराम याजकडून झालाविस ठाकूर कुसळसिंगजी व कुवर जसवतसिंगजीस समजाऊन आणावया निमित्य पाठ-विलें. आजि पधरा महिने जाले कीं नित्यानी येऊ येऊ करित होते. स्वामीचे पुण्यप्रतापेंकरून त्यासी भाऊबदसुद्धा तेथून स्वार करून आणिलें. तो सवाई-जी डेरे दाखल जाले होते उभयपक्षीं भेटीगोष्टी करून, त्याचीं जागीरपट्टी जे काहीं पावत होतें ते यथापूर्वक त्याजवर बहाल करून देऊन, सन्मानपूर्वक सौख्य सपादून दिधले. पाहता गती तो बाहेरही निघायाचें कारण इतकेंच होतें. परतु इताकियात कुवर सुरजमल जाठ यासहवर्तमान ठाकूर पेमसिंगजीसी येऊन पावले. सुरजमलजीसी व बख्तसिंगजीसीं परम स्नेह. याजकरिता त्यानींही बहुत काहीं विचार केला कीं, इतके दिवस दक्षणी चौथाईचे ग्राहीक म्हणवीत होते. आतां सर्वस्व ग्राहीक जाले. आगरियात अमल दखलच केला. राहिली अजमेर. याचीही सनद हातीं ठेवितात. फौज रामसिंगजीचे कुमकेनिमित्य गेलीच आहे. तुर्कानीही तिकडेच डोल दिधला आहे. या गोष्टींची पैरवी आतापासून केलिया उत्तम. त्यासीं सवाईजीनीं तर हाच जाब दिधला कीं, आमचें तर काहीं त्यानीं इतके अधिक केलें नाहीं व स्नेहभावाचा विचार आपला भिन्न भिन्न आहेच. जरी ये समई केवळ राम-सिंगजीकडेच पाहावें तर बख्तसिंगजीनीं जोधपूर घेतले तें बजोरमर्दीनें घेतले. व रामसिंगजी पाहता नाचारीस. व सरदाराही त्याची कुमक विचारली असता तटस्थच राहणें उत्तम. अथवा सरहद्देवर एखाद्या मातबराबराबर फौज देऊन पाठवावे, जिकडील सरशी पाहावी तिकडील गोष्ट सागावी, हाही एक तट-स्थतेचा विचार आहे. वरकड प्रसंग तर विना सार्वभौमादिकांविरहित होणें दुस्तर. तेव्हा, सुरजमल्लानीं स्वीकार केला कीं, मजशीं व बख्तसिंगजीशीं

कोणेही रीतीनें द्वैतार्थ नाहीं वजीरुलमुमालिकांसीं व त्यांसीं निपट एकोपा ते ही निभावयासीं सिद्ध मल्के, सार्वभौमासींही काढाडतील या गोष्टीची मजबुती जे करावयाची ते करून घेतली आहे अपण मात्र ठाकूर प्रेमसिंगजी हयार स्वारप्यायानिशीं समागम दिधलें पाहिजे म्हणून राजीहि करून तिनी चारी दिवस पायतां राहून, शिर्णी राहून, सदाचा चाळिसां हजाराचा महाल सेट मुरारजी व किशनजी यांचे येथें गहाण असतां ते आगा इनाम घेऊन, पेमसिंगजी सहसर्तमान रुखसत होऊन गेले त्यासी याचा मनसुबा हा दि सोन आम्श कीं, दिल्लीस जाऊन वजीरउमरावसार्वभौमादिकांसी मर भरून बाहेर काहाडून, एकदां काय आगरें व काय अजमेर या जिल्हेंत वजीरासीं अथवा सार्वभौमासीं आणून, एकदां राजनिग्रज करून, सर्व जमीदार राजे एकत्र होऊन, पुरुषार्थ करून दाखवावा ! समदु सी तो सकलही जाइलेच आहेत जाटाचे सातरदारीस्तव यांनीं पेमसिंगजीस त्यासमागमें दिधलें कीं, कितेक दिल्लीतील सनदअसनदाचें काम बाकी आहे तें सपादणें जरूर. दुसरें, राज्यीं वस त्यानतर, दिल्लीस जाऊन सलाम केला नाहीं, मादशहा आहेत, न गेलिया , वास्तव ऐसें दिशेन मेर्ते जे कांहीं लोक गेल्यानें राजकारणांचा अभाव जालिया वेथपरही जाऊन सलाम मुजरा करून यावें त्यास, वजीरजी तूर्त हजुरेंत नसले आहेत रुकसत होत नाहीं मायेदस्तानाची व वजीरजीसीं अनयनाय जाटासीं वजीरासीं सोह त्यासी हर प्रकारें काहाडून आगऱ्यासी अथवा अजमेरकडे न्यावें, या उद्योगात आहेत वख्तसिंगजीवहि आशायद केलें आहे जे, उभयतांहि दिल्लीस जाऊन सवकरच वजीरासीं अथवा सार्वभौमास अथवा एकाद्या मात बरासीं लवकरच घेऊन येतों, सोंयर उतावळी न करणें जरी इतकियांत उ भयतांत युद्ध होऊन सरशी जालिया, त्रिकडील सरसी होइल तिकडील वज यीच केली जाईल नाहीं तर, धीरेधीरें जें कांहीं होवें तें पाहतच आहों म्हणून जाव सुरजमलजी बहुतकरून सरखुदेंत लागलेसे दिसतात मवाजी राठोड, व वख्तसिंगजीचा मामा, व हरनाथ टपार्स हे उभयतां येऊन पायले त्याजवरावर सदाशिवभट, सवाई माधोसिंगजीचे विद्यागुरु, यांजवरावर दोनी हजारनिशीं निदा केलें याहियार्थीं तर हेंच म्हटलें कीं, जेणंकडून मुलस्यापुतण्यांत सोर प्यता मात्र होइ



पत्रांक २९६

पो छ १ सफर श्री 'लक्ष्मीकांत' १७०१ आश्विन शुद्ध ८

सन समान समानीन, कार्तिक १७०१

राजश्री हरीपंत तात्या गोडवी यांसीं —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रो रघोजी भोसले सेनाधुरंधर सुभा दडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत

जावे. विशेष. येहतिशाकजग याजबाबत किस्तबदीचे ऐवजाकरिता वारवार आपलीं पत्रें आलीं. त्यास त्या ऐवजीं येथून साडेतीन लक्ष रुपयाचा भरणा राजश्री रामचद्र गगाधर ओंकार याचे दुकानीं केला आहे. मुदतीप्रों मार-निले ऐवज देतील. याजप्रो घेऊन पावलियाचें उत्तर पाठवावें. रा छ ४ माहे मोहरम. बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनती. मोर्तबसुद शिक्का ( पूर्वीं दिल्याप्रमाणें )

---

पत्रांक २९७ श्री. १७०९ कार्तिक शुद्ध ७

'अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य राजश्री माहिपतराव कृष्ण गोसावी यांसीं:—

सेवक माधवराव नारायणप्रधान नमस्कार. सुहूरसन समान समानीन मया व अलफ. तुह्मी विनंतिपत्रें पाठविलें ते प्रविष्ट जाहालें. लिहिला मजकूर अवगत जाहाला. शरीर प्रकृत चागली आहे म्हणून लिहिलें, ते कळलें. तीर्थरूप मातुश्री ताईची रवानगी लौकरच करण्यात येईल. रवाना छ ६ सफर. बहुत काय लिहिणें ? लेखनसीमा.

---

पत्रांक २९८ श्री. १७०९ माघ शुद्ध ५

अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य राजश्री माहिपतराव कृष्ण गोसावी यासीं:—

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार. सुहुरसन समान समानीन मया व अलफ. तुम्हीं विनंतिपत्र व मकरसक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले ते प्रविष्ट जाहाले. रा छ ४ जमादिलावल. बहुत काय लिहिणें ? लेखनसीमा. ( पौ ) माघ शुद्ध १० मदवासर.

---

पत्रांक २९९ श्री १७०१ वैशाख शुद्ध २

शिक्का सवाईमाधवराव साहेब ( अस्सल व० नकल )

यादी सिद्धेश्वर महिपतराव याचे तीर्थरूप माहिपतराव विश्वनाथ मृत्य पावले. सबब मशारनिल्हेचे पुत्र याचे नावें सरजाम पेशजी महिपतराव विश्वनाथ याजकडे चालत होता त्यापैकीं सालमजकुरापासून करार. सुा समान समानीन मया व अलफ.

सालीना रुपये

१०००० खासा तैनात पेशजीची बेरीज पैा ४००००

७००० कारकून मडळी पेशजीप्रों दरकदार वगैरे

१००० शागिर्दपेशा पेशजी रु १००० पौ

३६००० पागा व पथक

२१००० पागेकडे सरंजाम पेशजी पचवीस स्वाराचा साडेचार हजारांचा होता त्यास पागा जास्ती सबब पेशजीची मोळी दूर करून, पागेकडे मोबम चदी लागवड वहल मुशाहिरा वगैरे मिळोन

१२५०० कदीम

८५०० जाजती

२१०००

१५००० सरंजामी स्वार ५० दर ३०० प्रों

३६०००

२५०० हत्ती सरकारचा रतीब लागवड बदल मोबम

५६५००

छप्पन हजार पांचशें सरंजामाची बेरीज ठरली त्यास, सदरहूप्रमाणें लाऊन दिल्हा असे येणेंप्रमाणें करार करावे

करार—

सरंजामास महाल लाऊन दिल्हे आहेत त्यास याजकडे वसूल सुरळीत देणें, म्हणोन सनदा व ताकीदपत्रें देवायीं देणें

कुरणा पौ गवत एक लक्ष याव याचा पेशजी प्रों नेमून द्यावें येणें प्रों करार करून चिठी दवायी देणें

किता कलमें

१ मौजे घोरपडी, तालुका हवली प्रांत पुणें जमीन बिघे १०

१ मौजे भिवडी, तों फडेपठार,

खेरीज तैनात

१ इनामी गांव माजे कारी, ता वदन प्रों वाई

१ खेरीज तैनात मौजे नन्द ता० कया त मावळ

—

२

दोन गांव चालविणें येणेंप्रो। क रार करून गांवास ताकीदपत्रें देवायीं देणें

असाम्या पशजीप्रमाणें

पौ पेशजीप्रो.

—

२

सरजामाचे कलम सालमजकुरापासून, म्हणोन लिहिले आहे. त्यास साल गुजरले. याजकरिता, पेस्तरसालापासून करार करून सनदा घ्याव्या.

येणे प्रो करार करावे. करार पागेच्या ठाण्याचे गाव

१ मौजे वडाले, पौ काहीं.

१ मौजे कुभारगाव, पौ इदापूर,

१ किल्ले नगर येथील मजमू.

१ किले त्रिंबक येथील सबनिसी.

१ किल्ले बेळगाव येथील सबनिसी.

—

३

तीन आसाम्या करार करावे, वेतन पेशजीप्रो पावीत जावे, म्हणोन सनदा देवाव्या. देणे.

छ ३० रजब सन समान वैशाख सनदा लिहिणे.

येणेंप्रमाणे करार केला असे. छ ३० रजब, सुा. समान समानीन मया व अलफ

---

पत्राक ३०० श्री १७१० वैशाख शुद्ध ६

वेदशास्त्र—सपन्न राजश्री सदाशिव दीक्षित वाजपेययाजी स्वामीचे सेवेशी:—

विद्यार्थी बाळाजी जनार्दन सा नमस्कार विनति उपरी येथील कुशल जाजाणोन स्वकीये कुशल लिहित जावे. विशेष. तुम्ही चैत्र वद्य सप्तमीचे पत्र पाठविलें तें पावले. वैशाख—मासीं राजश्री पतप्रतिनिधी याचे विवाहाकरिता कऱ्हाडास येणार, असें ऐकिलें. त्यास, येते—समई सातारि—यास येऊन श्रीमत माहाराज छत्रपती याचे व श्रीमत आईसाहेब याचें दर्शन घेऊन जावें. त्याचा हेत आपले भेटीविसी बहुत आहे. मार्गशीर्ष—मासीं आम्हीं आपले भेटीकरिता मेणवलीस आलों होतो, त्यासमई श्रीमताचे येण्याविशी बोलिलो होतो. त्यास, श्रीमताचे येण्याचा अर्थ आपण घडवीतील त्या समई घडेल. परतु आपले येणे याप्रांतीं आहे, त्याअर्थी सातारियास येऊन राजदर्शन करून जावें, म्हणोन लिो. तें सविस्तर कळलें. त्यास, सातारियास *यावयाचे होते. परतु, राणी वारल्याचे वर्तमान आले. त्यास, बहुता दिवसीं येणे तें सुतकामुळें दूर वसावें, मजुरा करता नये हे ठीक नाहीं, याकरता न आलों. परभारे कऱ्हाडास जातों. आपणास कळावे. रा छ ४ साबान. लोभ असों द्यावा. हे विनति.

पो वो शुद्ध ७ सोमवार सन समानीन.

---

* येथून हस्ताक्षर नानाफडणीसाचे. समान समानीन बद्दल नुसते रमानीन असे पैवस्तींत चुकून पडलें आहे.

पत्रांक ३०१ श्री १७१० ज्येष्ठ वद ६

○श्री
राजा शाहु नरपति
हर्षनिधान माधवराव
नारायण मुख्य प्रधान

दस्तक सरकार राजश्री पंतप्रधान ता कमाविसदारान व चौकीदारान व बाजेलोकान व मोकदमान देहाय नावाडे वळेकरफेरी सुाा तिसा समानीन मया व आलफ सरकारची खासूदजोडी पजाजी नाईक कामगारीस रवाना केली असे तरी, मार्गी जातां येतां कोणेयिसी मुजाहिम न होणें नदीनाले पार करणें जाणिजे छ १९ रमजान

लेखन
सीमा

---

पत्रांक ३०२ श्री १७१० आषाढ वद १०

वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशिव दीक्षित वाजपेययाजी स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थी बाळाजी जनार्दन सां नमस्कार विनंति येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित असलें पाहिजे विशेष आपण राजश्री सदाशिव अनंत या समागमें पत्र पाठविलें, तें प्रविष्ट होऊन लिहिला अर्थ कळला एसीयास राजश्री थोंडो मल्हाळ आपल्याकडील कामकाजाबद्दल येथें हाते त्यावरून प्रसंगानुरूप तूर्त एक गांव हजार रुपयाचा, पाा सिरालें पैकीं, आपणास दे विला आहे व पाा सांगोलें येथील सन समानचे यपासनापैकीं पाचशें रुपय राजश्री भिकाजी कृष्ण याजकडे राहिले हात ते त्यास सांगोन देविले आहेत प्रविष्ट होतील रा छ २८ सवाल बहुत काय लिहिणें० लोभ असो दीजे हे विनंति

---

० येथपासून नानाफडणिसांचे अक्षर

पत्रांक ३०३. श्रीगणपती. १७१० श्रावण वद्य ५.




अज स्वारी राजश्री परशराम रामचद्र ता मोकदम, मौजे चिकुर्डे, क्रा कोडोली, प्रा पनाळा. सुा तिसा. समानीन मया व अलफ. रा बळवतराव जिवाजी देशपाडे प्रा—मा यांणीं विदित केलें कीं, नारायण आनदराव देशपाडे प्रा मा हे आमचे भाऊबद, आम्हास वतनाचा वाटा देत नाहींत, येविसी पेशजी श्रीमत कैलासवासी नानासाहेब याच्या वेळेस कैलासवासी हरी दामोदर याजकडे पचाईत नेमून दिल्ही. तेथे निवाडा करून मशारनिलेनीं पत्रे दिल्हीं. पुढें हुजूर फडशा व्हावा, त्यास श्रीमत नानासाहेब कैलासवासी जाले. पुढें दगेच होत गेले. अलीकडे आपणापासी येऊन पाच सात वर्षे वतनाचा विभाग ठेवावा म्हणोन विचारीत आलों. तेव्हा उभयतानीं फिरून वादास जावें असे ठरलें. थलपत्रही लिा. परतु, नारायण आनदराव वादास जावयासी निघत नाहींत. यास्तव, कृपा करून आमचा विभाग देवावा म्हणोन. त्याजवरून पाहता, हे भाऊबद खरे असोन, यास विभाग देत नाहींत. श्रीमत कैलासवासी नानासाहेब यांणीं हरी दामोदर याजकडे पचाइतीस लाऊन दिल्हे. तेथे निवाडा जाला आहे. परतु विभाग देत नाहींत. यास्तव हाली मौजे मा येथील देशपाडपणाचा इनाम व हक्क वगैरे कानूबाब पेशजीपासून चालत असेल त्याप्रमाणें बळवतराव जिवाजी याजकडे चालविणें जाणिजे. छ. १९ जिल्काद.

मोर्तब
सुद.

---

पत्रांक ३०४ श्री. १७१० भाद्रपद शुद्ध १०

सेवेसी महिपतराव कृष्ण सा नमस्कार विज्ञापना ता छ ९ जिल्हेजपर्यंत आपले कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. बहुत दिवस पत्र येऊन

सांभाळ होत नाहीं तरी ऐसें नसावें सर्वदा पत्रीं परामर्श करीत असिलें पाहिजे दर्शनास बहुत दिवस जाहाले प्रस्तुत श्रीची आज्ञाही जाहल्यातच आहे यास्तव दर्शनाचा येत आहे परंतु श्रीयोगेश्वरी कुळस्वामिणी आहे तिचेंही दर्शन जन्मात जाहालें नाहीं यामकरितां तेथें जाऊन, येऊन असळच श्रीवैद्यनाथ व श्रीनागनाथ दर्शन करून, सिंहस्थप्रयुक्त गंगास्नान करू. चरण सन्निध यावें, हें मानस आहे यास्तव विनंति लिहिली आहे त्या प्रांतीं पण आन्यांचा वगैरे उपद्रव बहुत, यामुळें एकटें जाण्याची सोय नाहीं, यास्तव शभर राऊत आल्यास जाणें घडेल, हें जाणोन विनंति लिहिली आहे तर कृपा करून स्वार पाठवावयाची आज्ञा जाहली पाहिजे दीड दोन महिन्याचें काम आहे यांस असी मर्जी असेल तसें करीन बहुत काय लिहिणें ? कृपा लोभ असावा हे विज्ञापना

---

पत्रांक ३०५

पौ छ २९ सफर तिसैन मार्गशीर्ष श्री १७१० भाद्रपद वद्य ७

श्रीमंत पंतप्रधान स्वामीचे सेवेसी —

विनंति सेवक रघुनाथ हरी कृतानेक सा नमस्कार. विज्ञापना येथील वर्तमान ता मा। वा ७ पो स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष छ २६ रमजानचें आज्ञापत्र सादर जालें तें छ १७ जिल्हेजीं पावलें पत्रीं आज्ञा कीं, ता धारी येथील मामलत तुम्हाकडे त्यास, मामलतीप्रों सरकारांत रसद येत नाहीं व हिशेब कचा पका साल होतांच भाकारून सरकारात समजाऊन मख्लेवर फडशे करून घ्यावे, सेंहीं गोष्ट तुम्हाकडून होत नाहीं मामलतीवर दुसरे गृहस्थ जाजती बोलतात याजकरितां सालमजकूरची रसद पुर्वी दोन लक्ष रुो भरणा करणें आणि कचा हिशेब सन तिसासमानीन पावेतों सरकारांत समजाऊन फडशा करून घेणें या प्रमाणें होत असल्यास उत्तम आहे नाहीं तरी, दुसरे मामलेदार बोलतात त्यास मामलत सागून, घालमेल करावी लागेल यविसींचें उत्तर सत्वर पाठवणें, म्हणोन आज्ञा ऐसीयासी, येथील सविस्तर वर्तमान व अजमास लिहोन राजश्री यानी जगन्नाथ व अंताजी विश्वनाथ यामकडे पाठविला आहे सेवेसी श्रुत करितील आगहीं सरकारचें खिलकी सेवक सरकारांत किफायत होत असतां नुकसानीची विनंति आम्हाकडून करवणार नाहीं येथील वैयाट मनास आणून आज्ञा जाली पाहिजे येथें तालुक्याची जमा थोडी खर्च भारी यामुळें किल्याचे व स्वारसिबंदीचा कारांचे पेचांत आहों दुसर गृहस्थ जाजती बालतात येविसी सेवकानीं विनंती कोणती करावी सरकार मर्जी असेल त्याअन्वयें आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत सेवकास आज्ञा होइल त्या आज्ञेस ऊणुर

नाहीं. हिशेब तयार जाले ते हुजुर दफ्तरात पोहोचतेच आहेत. अलीकडील बाकी तयार जाली तो विजयादशमी जालियानंतर रवानगी करितो. राहिले हिशेबही निवडीने तयार करऊन लवकरच हुजूर पावतील. आम्ही अशक्त नाजमुळे हिशेब सरकारात दडऊन मागील फडशा करावा. हेच इच्छा आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्रांक २०६. श्री लक्ष्मीकांत. १७१० आश्विन शुद्ध ५

राजश्री बाळाजीपतनाना गोसावी यासी —

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिले पाहिजे. विशेष. राजश्री पतप्रधान यांचे भेटीचे उद्देश नागपुराहून समुहूर्ते छ १७ जिल्हेजी डेरेदाखल जाहलो, आणि तेथून दरमजल मूर्तजापुरी येऊन मुकाम केला असे. अतःपर लाग लाग मजली करून अविलंबे येत असो. भेट होईल तो सुदिन असे. तेथे तीर्थरूप आत्रा यांचे राज्यकारण आटळले. म्हणोन सूचना व्हावी, याअर्थी राजश्री पतप्रधान यांणी राजश्री बापूराव विश्वनाथ यासी पाठविले. त्यास, ते पत्र येथे पाहून वजिन्नस तीर्थरूपाकडे पाठविले आहे. त्याचा बंदोबस्त सर्व घडून येईल. रा। छ ५ माहे मोहरम. बहुत काय लिहिणे ? लोभ असो दिजे. हे विनंती. मोर्तबसुद

श्री
श्रीराजारामपदांभोज-
भ्रमरायितचेतसः ।
बिंबात्मजस्य मुद्रैषा
राघवस्य विराजते ॥

---

पत्रांक २०७. श्री १७१०.

जाबता गुन्हेगारी तोतयासंबंधी बाबत मराठे वगैरे सरदार लोक-तालुके रत्नागिरी नि॥ राजश्री महिपतराव कृष्ण. सु॥ तिसा समानीन मया व अलफ. पेशजी सन सीत-सबैनात तोतया जाहला होता. त्याजकडे लोक सरदारी करून चाकरीस राहिले होते. त्यापैकी काहीं असामींचे फडशे गुन्हेगारीचे पेशजी होऊन, बाकी राहिले आहेत त्याजपासून गुन्हेगारी घ्यावयाविसी

हुजूरची आज्ञा जाहली त्याजवरून तोतयाकडे सरदार लोक चाकर राहिले होते, त्याचा मजकूर सुमा मनास आणून, लिहा–मशापक गुन्हेगारी करार केली त रुो

४२४८ तोतयाचे वेळेस नव्या सरदाऱ्या करून, बरोबर लोक घेऊन, चाकरीस तोतयाकडेस राहिले होते, सा रुो

८२० ता सगमेश्वर

७० महिमाजी दळवी, मौजे तरियें
९० बापूराव बिन माळोजीराव सुर्वे खोत, मौजे अंत्रवली
१०० हुमानराव बिन समाजीराव सुर्वे, मौजे मुचरी
१०० सेख अरदला पाटणकर, कसबा सग मेश्वर
४० धोंडजी नल्वडे खोत, मौजे करजुवें
१५ लक्षुमण चवाण, मौजे कुळे
७५ काजी हसन वा काजी अली, कसबा सगमेश्वर.
३५ बाबोजीराव सुर्वे राजवाडीकर, गुा बि साक्षी महादेव साठे
३५ कृष्णाजी सुर्वे राजवाडीकर, गुा बि साक्षी गोपाळ केळकर.
१४० राणोजीराव बिन रायाजीराव सुर्वे, मौजे मुचरी
४० गोविंदराव सुर्वे बिन यायाजीराव सुर्वे, मौजे मुचरी
१५ लक्षुमण चवाण हशाम, मौजे धामणी
६५ सियाजीराव बिन समानीराव सुर्वे, मौजे मुचरी

---

८२०

४१० ता देवळें

१०० ग्यदोजी बिन कृष्णाजी चवाण, मौजे माट

१० मदनाजीनाईक [illegible], ता। मौजे [illegible].
५० आपाजी [illegible], मौजे [illegible].
६० गोविंद [illegible] खोत, मौजे [illegible]
४० शिवाजी अवदगान खोत, मौजे [illegible].
५० अप्पाजी अवदगान खोत, मौजे [illegible]
२५ लक्ष्मण [illegible], मौजे [illegible].

---

४१०

१२१० ता। हातखंबे.

२०० बाळ सावत नळेकर, मौजे नळे.
२५ भोज सावत नळेकर मयत जाहाला. सबब त्याचा लेक हर सावत याजपासून घ्यावयाचें ठराविले ते.
५० दौलत सावत बिन देव सावत खोत, मौजे खेडसी.
४० माहादजी नागवेकर भटार्गी, मौजे खेडसी.
७० बाळ सावंत बिन लखम सावत खोत, मौजे खेडसी.
६० हर सावत बिन रग सावत खोत मौजे खेडसी.
३०० विठोजी देसाई, ता। मजकूर.
२०० गुण सावत बिन देव सावत पालकर खोत, मौजे पाली.
१०० दादजी देसाई, ता। मजकूर
५० नागोजी साळवी टेंबकर खोत, मौजे टेंब्ये
५० कृष्णाजी सरफेर, मौजे नाणीज
२५ भिकसावत टेंबकर, हाली वस्ती मौजे वेरल ता। कर्जे.
३० भवान साळवी टेंबकर, मौजे टेंब्ये.



---

१२१०

२०० ता हरचिरी

१०० हरजी येसजी नाईक खोत, था मौजे भाटिये

४५ गुण साळवी राय साळवी खोत, मौजे फणसप

४५ आपाजी साळवी बिन सुर साळवी खोत, मौजे फणसप

३५ गणोजी चागाजी मन्ये खोत, मौजे निरूळ

४० गोपाळजी बोरकर, मौजे सोमेश्वर.

३५ हरजी नाईक बोरकर, मौजे सोमेश्वर.

---

३००

५६५ ता सेतवडे

१७५ माधूराव बिन अमृतराव विचारे खोत मौजे वरवडे

७ मगवतराव बिन रायाजीराव विचारे खोत, मौजे वरवडे

७१ दौलतराव विचारे खोत, मौजे वरवडे

५० दौलतराव शिर्के, था का सेतवडे

२९ साव साळवी खोत, मौजे माल्गुड हा मयत जाहला, सा त्याचा माऊ सज नाजी यासकडे करार केले ते खो

२५ सुरसाळवी खोत मौजे माल्गुड हा मयत जाहला, समय त्याचा सकस्मडो जी साळवी यानकडे करार केले ते, गुा विठोजी साळवी

५० बाळाजीराव खोत, मौजे वरवडे, हाली वस्ती मौजे मेर्दे, सा पुणगुस, गुा आपाजी देसाई

५० येसवतराव विचारे खोत, मौजे वरवडे

४० लक्ष्मण साळवी खोत, मौजे माल्गुड

---

१६१ ना। लाजे

४५ हिरोजी कद्र मौजे देनंध.

३५ कृष्णाजीराव इदूलकर, मजेरे निवेसी.

२५ अदम नाईक लाजेकर, कसबा लाजे,

१६ हरजी कळवजे, कसबा लाजे, याजकडे रु॥ ४० चाळीस रु॥ करार केले होते त्याजवर तो मयत जाहला. पोटी पोर लहान पाच–सात वर्षांचा, केवळ ना-दार, भीक मागून खातो. सा॥ कळव-जा मजकूर जिवत असता वसूल आले होते, त्याप्रमाणे करार केले ते रु॥.

४० गोपाळ भिकाजी हळव्ये, वा॥ साठवली.

---

१६१

८०५ माहलानिहाय.

६५ दादजीराव राणे खोत, वा॥ वसणी का॥ नेवरे.

४५ संभाजी पोलेकर, वा॥ पेठ जजीर रत्नागिरी. हाली वा॥ मौजे कुळे ता॥ संगमेश्वर.

४० तानसावत विन भिकसावत देसाई, मौजे कांटिंपे ता॥ फुणगुस.

३० हरजी पंडित, वा॥ मौजे मुरवडी तालुके अजणवेली.

२५ कृष्णाजी तोडणकर वा॥ वटारद–पार ता॥ पावस.

६० मालजी जाधव, वा॥ मौजे नाखर ता॥ पावस.

४० विरोजी दळवी, मौजे फणसवळें ता॥ केळ्यें माजगाव.

६५ कमळोजी साळवी, मौजे करबुंड ता॥ केळये माजगाव.

१२५ बाजीराव विन आपाजीराव इदुलकर खोत मौजे विम्रवली ता॥ देवरूख.

---

४९५

१२३२

२८५ यशाभिन्या फा नेवर्रे.

७० कृष्ण सावंत विन दव सावत मीरकर
७० गुण सावत विन राम सावत मीरकर
२५ पोंड सावत विन कृष्ण सावत मीरकर.
५० रत्नोजी माज्या मडारी
४५ गणोजी माटकर भडारी
४० राजकोजी गयाजी पाटल भडारी
२५ याळ सावत राम सावत मीरकर

---

२८५

---

४२४६

२९८० सानवीलकर गांवगना ता लाबें यार्णी नव्या सरदाऱ्या केल्या व कदीम सरदार होते त्यार्णी नवे लोक ठेविले सा गुनेगारी करार केले ते रुो

१२५ विठोजीराव सानविलकर, मौजे इदवटी, नवी सरदारी केली होती, सा

७०० त्रिंबकराव सानविलकर, मौजे कुर्टे, हे मातबर माणूस पेशजीपासून सरसुभाकडे वसइस पथकसुद्धां चाकरीस होते तिकडून गोंवयास व ळागडचे मुकामीं येऊन भेटले व मौजे—मजकुरीं घरीं त्याचा कारभारी होता त्याणें मशारनिल्हेच नांवें सरदारी केली होती ऐशास ते हाली मयत जाहले त्यास, त्याचे पुत्र बळवतराव वसइस त्याचे सरदारीवर चाकरीस आहेत, त्याजकडे करार केले ते

४०० रामराव सानविलकर, मौजे कुर्टे, दादजीराव याचे मधु, यार्णी नवी सरदारी केली होती, सा करार केले ते रुो

१२ मुरारराव सानविलकर, मौजे मानवली, नवी सरदारी केली होती सा

२०० दौलतराव सानविलकर मयत जाहले त्यार्णी सरदारी नवी केली व त्याचे बाप जियाजीराव हि बरोबर होते, सबब करार केले ते रुा

रांत आहेत. याचे मार्फतीनें सलुखाचा पैगाम लागला आहे. मिर्जा इसमायलबेग खाकानोडचे प्रांतातच आहे. दोन्हीकडे सूत्र रक्षून आहे. जेपूरवाले यार्णी लाख रुपये खर्चास पो आहेत. परंतु वशर्थ मारनिलेची कुटुंबे शहरात दाखल व्हावी, तेव्हा ऐवज सावकारानें द्यावा, ऐसा करार आहे. त्याजवरून राज्याचा पाटील बावाचा तह ठरणार तेव्हा कुटुंबे तेथे पो ठीक नाहीं. यास्तव तेथें वमयकुटुंबसुधा तेथेंच आहेत. तह जाल्यानतरी पुढे काय ठरेल ते पाहावे. यानतरी छ ४ तारखेस हैदराबादेहून रो गणपतराव वकील याचा जासूद यामार्गे गेला. त्याणे जबानी वर्तमान सांगितले की नवाब स्वारीस शहराबाहेर निघाले होते. ते समई कोठून पत्र आले नाही, परंतु, हतीवर स्वार नवाब होते, त्यास लाखोटा आपले हातें फोडून पाहिला, आणि आपले जेबात ठेविला. मग मशरूनमुल्क याजकडे क्रोधाने अवलोकन केले, आणि स्वारी ते क्षणीं शहरात दाखल जाली. उपरांतिक बंदोबस्त खासपागास व फौजेस ताकीद जाली कीं, जमा व्हावें. येसी आज्ञा होऊन डेरे बारादारीवर जाले आहेत. जासूद संक्रातीस तेथून निघाला. मग डेरेदाखल कधीं जाले असेल ते न कळे. रुख कोणीकडे जावयाचा, हे समजले नाही. हैदरखानाकडील ही वकील तेथून बारा कोसावर आला होता. काहीं टिक्याचा सरंजाम बराबर आहे. दोन हाती, काहीं जवाहीर, घोडे वगैरे आणिले आहे. कांही फौज कुमकेस फिरंग्याकडे रवाना करावयास मागणार, ह्मणून ऐकिले. वरकड, येथील वर्तमान तरी दोहो दिवसा आड शाहाजादे स्वारीस निघतात. बागात सहल चार घटका करून हवेलीदाखल होतास. समागमें रो बळवंतरावजी वगैरे मडळी जात असते. नबाब अकबरअलीखान स्वामींचा स्तव बहुत करीत असतात की, श्रम बहुत जाला होता, परंतु आमचा गौर ऐसा केला की, खुशवक्ती त्याची कोठवर सांगावी, व बंदोबस्तही खातरखा आमचे स्वामी करितील ह्मणून नित्यशाह बोलण्यात येतें. सेवेसी श्रुत व्हावे. आढळलें वर्तमान ते सेवकाने लिहिले आहे. पत्राचे उत्तरीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणे? लोभ केला पो. हे विज्ञापना.

---

पत्रांक ३३६ श्री १७११ माघ शुद्ध ११

सा. नमस्कार विज्ञापना ता.

प्रातःकाळ पावेतो स्वामीचे कृपावलोकनेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री अलिबहादरबाबाकडून सरकारच्या लखोट्याची थैली एक आली. येताच डाकेबराबर सेवेसी रवानगी केली असे. थैली पावल्यानतरी सरकारचे लखोटे जे असतील ते सबनीस हुजूर प्रविष्ट करतील. इस्मालबेग पळोन जैपुरास गेला. तेथें राज्यानी घरास येऊन, बहुता प्रकारें खातरजमा

करून, येक हाती व तरवार व +++ घेऊन सन्मान केला यामों अैपूरचे पत्रें आलीं त्यावरून सेवेसी विनंति लिहिली असे सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक १३७ श्री
पो छ २५ जमादिलाखर तिसैन १७११ माघ वद्य ७

रु

सेवेसी श्रीराम सदाशिव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता छ २१ जमादिलावल, मु॥ लष्कर गंगातीर नजिक कोसमर प्रात तेलग, यथास्थित असों विशेष राजश्री रघोजी भोसले यांजकडील दिनचर्या छ १ रविलाखर प्रात कालीं स्नान देवपूजा करून, च्यार घटी बाईकडे दरबार करून, प्रहर दिवसा स्वारी सकरदरियास गेली तेथें डेरेराहुट्या पाहून आले सायंकाळ पासून दोन प्रहर रात्र पावेतों दरबार जाला शिलेदार लोकास वगैरे दोन दोन रोजमरे खर्चास देविले, व गगातीरीं धर्मादायबद्दल दाहा हजार रुपयां च्या अधेल्या पावल्या करावयास सागितलें गंगातीरीं व मार्गी जाताना मा हागाई बहुत आहे म्हणून रस्त यावयास याचा मुलूक आहे तेथ पावेतों क माविसदार यास ताकीद करविली कीं, जागा जागा परगणियांस वाणीउदमी असतील त्यांस सांगून गला भरून लष्करचे मार्गी आणीत जावा म्हणून सागविलें छ २ रोज प्रात कालीं स्नान देवपूजा करून, भवानी काळो व भवानीपंत मुनसी यांस बोलाऊन, दोन घडी खलबत करून, बाहेर कमा विसदार मंडळी बोलाऊन त्याजकडे बाक्या येणे त्या ऐवजीं लोकांस वराता करून देविल्या छ ४ रोज प्रात कालीं स्नान देवपूजा करून, आईकडे प्रह रभर खलबत केलें जाबवानीं तहमेकरिता अयविलें होतें, त्याचा जाबसाल चाभे मानकरी याजवर टाकला आहे चौघांनीं सांगावें तें उभयतां ऐकावें, असें केलें आहे परतु, हे चौघांचें ऐकतील हेंहि प्रमाण नाहीं छ ५ रोज प्रात कालीं हजामत करून माहादाजी लष्करी यांशी च्यार घडी खलबत केलें स्नान देवपूजा करून, प्रहरभर बाळाबाई याचे बोवरीवर बसून, पागेची घोडींशिंगरें आणून पाहिलीं छ ६ रोज प्रात कालीं माहादाजी लष्करी याशी दोन घडी खलबत करून स्नान देवपूजा केली बाईकडे च्यार घटी जाऊन यशवतराय नाईक रुसला होता त्यास, वेंकोजी भोसले पाठवून, त्यास सम जावून आणविलें छ ८ रोज मंदवार प्रात कालीं स्नान देवपूजा करून, बाई कडे जाऊन, भवानीकाळोस बोलाऊन, दोन घडी खलबत जालें तिसरे प्र हरीं स्वारी तयार करऊन पादशा पोशाख करून, चौकडा मोत्यांची कंठी घालून, घोड्यावर स्वार होऊन पश्चिमचे शुक्रवार–दरवाजानें निघोन, दक्ष णेस सकरदरियाचे यागामधळ डेरे दिल्हे, तेथें डेरे–दाखल, मागील दोन

घडी दिवस राहता, जाले. चिमाबाई वगैरे याची स्वारी च्यार घडी रात्रीस डेऱ्यास गेली. छ १० रोज प्रातःकाळीं स्नानदेवपूजा करून, भवानी काळो यासी च्यार घडी खलबत केले. प्रहर दिवसा स्वारी निघून, सितावर्डीजवळ संगमावर माहादेवाचे देवालय बाधितात ते पाहून, फुटाळ्या तळ्यावर जाऊन, घडीभर बसून, तळ्यात मणूप घालून, पाणी किती आहे म्हणून पाहिलें. तिसरे प्रहरीं सकरदरियास लक्ष्मीनारायणाचें दर्शणास गेले. छ ११ रोज कूच कराविले. पाच कोस मौजे पाचेगाव येथील मुा करविला. डेरे व लष्कर वगैरे झाडून गेले. माघून स्वारी जावी, तो पिराजी जाधव याणें तलबेकरिता पेशजी स्वारी सितावर्डीजवळ प्रहर रात्रपर्यंत अडविली होती, तेव्हा लटकी तोडजोड करून दिल्ही, त्याचा कज्या चुकला नाहीं, तेव्हां त्यांणीं आणखी सागून पाठविले कीं, माझे तलबेचा फडशा जाला नाहीं आणि स्वारी जाती हें ठीक नाहीं, तलब द्यावी तेव्हा जावें हे उत्तम आहे, नाहीं तरी स्वारी मार्गे कोणासी बोलावें, माझी तलब तो लक्ष सव्वालक्ष रुपये येणें, स्वारी गेल्यास मी येथे नागपूरचे वाणी बकाल व सावकार धरून दोन लक्ष रुपये वसूल करीन. या प्रमाणें जाधवाणीं सागून पाठविलें. तेव्हा स्वारी जाणें राहिली. पुढील मुा झाडून लष्कर गेलें. या मुकामीं खासे सडे व मुदसदी व बायकाच्या पालख्या मात्र होत्या. ते दिवशीं मुा जाला. अवघी रात्रभर तळावर जागाजामा खलबत–या ठिकाणीं दोन घडी, येथून दुसरे ठिकाणी दोन घडी या प्रमाणे–अवघ्या तळावर खलबत जालें. राहुटी, कनात, चादणी काहींच नाहीं. उघडे होते. सकरदरियाचे बागातून भोजन करून येत होते. दोन दिवस बायका देखील पालख्यामधेंच बसून राहिल्या. छ १२ रोजीं जाधव तो काहीं ऐकेना. याचें मानस चाळीस पन्नास हजार रुपये द्यावे. तेही चिठी–वरात द्यावी. जाधव तो एक रुपया सोडू ना ह्मणेत. तव्हा, त्याजवर लटकाच दाब टाकून, हल्ला करून लुटून घेतो ह्मणून गारदी व शंभर दोनशे लोक पाठविले. हल्ला जाऊन उभी राहिली. त्याणी सागून पाठविलें, हल्ला पाठवा, लुटून घ्या, आह्मी सिद्धच आहोंत, पाणिपतावर बुडालो अथवा बादामीवर मेलों म्हणू, जिवावरच उदार जालोंत, परंतु तलब सोडणार नाहीं. याप्रमाणें सागून पाठवीत. तेव्हा सायकाळीं जाधवास अठ्ठावीस हजार रुपये नख्त देऊन, बाकी ऐवजाची निशा दोन महिण्याचे करारानें महमद अमीखा पठाण शिवणीकर यांची दिल्ही. तेव्हा रात्रीं कूच केलें. प्रहर रात्रीस नगारा, निशाण, जरीपटका पुढें लाऊन दोन प्रहर रात्रीस स्वारी निघून पाचगावचे मुकामास गेली. समागमें पन्नास-साठ राऊत होते. रात्रीं काशीकर सावकार आला. त्याची भेट जाली. शंभर मोहरा नजर ठेवल्या. जाधवाचे तलबेकरिता दोन दिवस घोळ पडला. झाडून लष्कर कूच करून पुढील मुकामीं गेले. खासे सडे उघडे होते. लाख

रुपये देण्याचा मजकूर बहुतसा नाहीं कारभारी–मुत्सद्दी याजमध्यें कोणी भारी माणूस तोडजोड करून उलगडा पडेल असा नाहीं चाव्या–शिप्या प्रमाणें मुछद्दी आहेत छ १३ रोज साता कोसाचें कूच केलें मोखन मा ल्यावर प्रहर दिवसा घोड्यावर बसून, पेशजीं मुधोजी भोसले व साबाजी भोसले याची लढाई जहली ते जागा मुकामापासून दोन कोस होती तेथें जाऊन पाहात होते जिकडून तोफा लायल्या तिकडे त्यांचे लोक हुजेरे होते चौहूकडे रण पाहून घोड्यावर उभे घडीभर होते जागा बहूत यशस्वी आहे, म्हणून बोलले तेथून सायकाळीं स्वारी मगरघो कड्याचे मुकामास डेन्यास आली छ १४ रोज कूच नवा कोसाचें झालें प्रहर दिवसा स्वारी निघोन, मार्गांत मौजे चणवड व शिरसी येथील पागा व गाईंचे खिलार पाहिलें सायकाळीं स्वारी गिरडचे मुकामीं डेन्यास आली छ १५ रोज पधरा कोसाचें कूच जालें प्रहर दिवसा गिरडचा पीर डोंगरा वर आहे त्याचें दर्शनास गेले तेथून स्वारी निघोन सायकाळीं शेगावचे मुका मास आले पधरा कोस मजल भारी जाली म्हणोन छ १६ रोजीं मुा केला छ १७ रोज प्रात काळीं कूच जालें रघ पडली येसाम व बाजीराव पाटणकर यांणीं तल्बेकरितां येऊन अडविलें तेव्हां स्वारी मागील मुकामींच राहिली निमे लष्कर दहा कोस पुढें भाधाचे मुकामास आलें पाटणकर यांणीं अडविल्यामुळें तीन रोज स्वारी तेथेंच होती पाटणकराकडे यांचें कर्ज होतें तें तल्बेंत वजा करून, त्याचा रोसा त्यास देऊन आणखी नवहजार रुपये नक्त दिले तेव्हां तेथून कूच करून मा धाचे मुकामास आले छ २१ रोज कूच करून सात कोस चंद्रपुरास तिसरे प्रहरीं आले सायकाळीं माहाकाळी देवीचे दर्शनास स्वारी गेली छ २२ रोज प्रहर दिवसा स्वारी शहरांत गेली शहरचे दरवाज्यांत एक हत्या व वकरें मारिलें किल्ला शाहून फिरून पाहिला तेथून माहादजी गुजर यांचें घरीं भोजनास गेले तिसरे प्रहरीं शिकारीस गेले घावरा वगैरे लाऊन पा हिल्या शिकार कांहीं मिळाली नाहीं दोन घटी रात्रीस डेन्यास आले छ २३ रोज प्रात काळीं स्नान करून स्वारी निघोन शहराबाहेरून शहरास प्रदक्षणा केली पहिले रघोजी भोसले यांणी चद्रपूर घेतलें तेव्हां गांपकुसास व दरवाज्यास जागाजागा तोफाचे गोळे लागले आहेत ते पाहून जागा जागा उभे राहून पाहिले तिसरे प्रहरीं शिकारीस गेले तेथें पांचसात तितर मात्र मिळाले सायकाळीं डेन्यास आले चद्रपुरास बहुता दिवशा स्वारी आली म्हणोन तीन चार मुकाम करून शहर व किल्ला पाहिला छ २६ रोजीं चंद्रपुराहून कूच जालें नगारा, निशाण, जरीपटका, परसोजी भोसले यामधरोवर पुढें लाऊन स्वारी मागून दोन घटी दिवस राहतां मुा आली नगारा, निशाण, जरीपटका, स्वारीचा ठेयीत नाहींत लोकांचे मुजरे घ्यावयाचा मधुव प्राय येतो मागून स्वारी

बराबर दीडशें दोनशे लोक असतात. कोणे दिवशीं चाळीस पन्नास असतात. छ २८ रोज कूच दहा कोसाचे जाले. झाडीमुळे दिवसा मार्गांत स्वारीस चालवयास रवेची वगैरे बहुत दाटी होती. स्वारी लौकर चालत नाहीं. झाडी बहुत, मार्ग लहाण, याकरिता मागील प्रहररात्रीस स्वारी सर्वांची निघून पुढें गेली. दोन प्रहरा मार्गांत प्रणितो नदींत भोयाकडून मासे धराविले. तें जाळें तुटलें. मर्जी बहूत दिक्क जाली. जरीपटका, निशाण वगैरे मागून भवानी काळो घेऊन आले. छ २९ रोज कूच होऊन, स्वारी निघून मार्गांत शिरपुरचा किल्ला पाहिला. तेथील दरवाज्यात एक हल्या मारविला. छ १ जमादिलावल च्यार कोस मौजे मेटपल्लीचा मुा जाला. छ ३ रोज सात कोस मौजे नकलपल्लीचा मुा जाला. छ ४ रोज पाच कोस कोटपल्लीस मुा जाला. छ ५ रोज गुरुवारीं पहिले प्रहर दिवसा स्वारी गगेस आली. येथें चिनुराबर मोंगलाकडील फौज दोन हजार पावेतों आहे. राजा रड्डी भेटीस आला होता. स्वारी येताच त्याची भेट उभाउभी जाली. उभयता क्षौर केलीं. तीर्थ उपास करून छ ६ रोजीं श्राद्ध केले. छ १० रोजी प्रहर दिवसा स्वारी सर्वांची, मुा पासून काळेश्वर च्यार कोस आहे, तेथें प्रणितेचा सगम जाला आहे, तेथे स्वारी गेली. काळेश्वराचें दर्शण करून सायकाळीं आले. छ ११ रोज तिसरे प्रहरीं राज्या—रड्डी डेऱ्यास आला होता. च्यार घडी बसून गेला. छ १३ रोज स्वारी सर्वांची चिमाबाई वगैरे सुध्धा काळेश्वरास गेली. गगादक्षणतीरीं माडव घातले. वेंकाबाशास्त्री सोमयाग करितात. शास्त्रीबावानीं खाशास विचारिलें कीं, याग करावा असे चित्तात बहूत आहे, परतु साहित्य काहीं अनुकूल नाहीं. त्याजवरून खाशानीं सागितले, साहित्य काय पाहिजे तें देवितो. छ १४ रोज यज्ञास आरभ केला. छ १६ रोज प्रहर दिवसा स्वारी, चिन्नूरचे किल्ल्याजवळ अगस्तेश्वर महादेव आहे, त्याचे दर्शनास गेले. दर्शण करून किल्ला पहावा, अशी मर्जी होती. दोन प्रहर जाले, उशीर लागेल, पुढें एकादे दिवसा पाहू ह्मणाले. भोयकिल्ला आहे, लहाण आहे, त्याचें लष्कर पायदळ दोन हजार पावेतों आहे, तें बाहेर किल्याच्या जवळच उतरलें आहे. यज्ञमडप ठेंगणे घातले. त्यास तिसरे प्रहरीं, आहोती टाकते वेळेस, माडवास आग लागली. त्याचे शांतीच्या आहोती टाकल्या. छ १७ रोजीं तीन पशू, छ १८ रोजीं एक पशू, ऐसे च्यार पशू मारले. यज्ञमडपात शूद्रांणीं जाऊ नये, पाहू नये. खासे नित्य जाऊन कुडाजवळ बसत होते. आहोती टाकते वेळेस ब्राह्मणासी बोलावें. हे आहूत कोणती, कशाची ह्मणून पुसावे. होमाचे वगैरे ब्राह्मणाचे चाळीस पन्नास पात्रांचें स्वयपाकाचें साहित्य नित्य कोठींतून पाठवीत होते. छ १९ रोजीं यज्ञ समाप्त जाला. शास्त्रीबावा व आणखी ब्राह्मण खाशाजवळ बहूत स्तुती करीत होते:—महाराज! यज्ञ बहूत चागला झाला. हत्ती, नगारा,

गारदी, तोफा, वगैरे याराची शिळक समारम चांगला जाला कृता युगीं विश्वामित्राणीं यज्ञ केला होता, त्याप्रमाणेंच हा यज्ञ जाला अशी बहूत खुशी केली परतु हचीतोफा फुकटच्या होत्याच वरकड, आणखी कांहीं यज्ञसबधें धर्म किंवा ब्राह्मण भोजन-सतर्पण केलें नाहीं होमाचे सोळा ब्राह्मण व आणखी पचवीस तीस ऐशा पन्नास ब्राह्मणांस एक—एक रुपया दक्षणा दिल्ही मुछद्दी, मानकरी, शिलेदार वगैरे याणीं यज्ञापुढें, कोणी मोहोर, कोणी दाहा रुपये, पांच रुपये ठेवले, ह्मणून, मराठे मानकरी वगैरे सर्वांस मेजवानी शास्त्रीबावाकडून करविली साहित्य कोठींतून पाठवून दिल्हें नांव मात्र शास्त्रीबावाचें ब्राह्मणांस व लोकांस बहूत भ्रम होता कीं, यज्ञास साहित्य ला गेल तें देखितों ह्मणून खासे बोलतेत कनिष्टपक्षीं च्यार पांच हजार रुपये लागतील, असें सर्वांचें मानस परतु कांहींच न केलें अन्नमार्गें च्यार पाचशें रुपये लागले असतील गगेस आल्यापासून दीडशें दोनशें गोदानें दिल्हीं व अन्नछत्र घातलें नित्य दोनशें तीनशें च्यारशें ब्राह्मण जेवितात मंदोबस्त चागला नाहीं तिनशें पात्राचा स्वयपाक करवितात, तेथें पाचशें ब्राह्मण येतात तेव्हा, ब्राह्मण उपाशीं उठतात कोठाळे—कारभारी लबाडी करितात त्याची चौकशी नाहीं भूरदक्षणा ब्राह्मणास एकादे दिवशीं देणार व गजदान देणेंत आहेत छ २० रोज रामारुजी भोगळाकडील याची मेजवानी, मुदबखर्चें साहित्य व चाकरीं, आलीं होतीं तें निमें मानकरी वगैरे लोकांस वांटून देविली महागाई, आठ दहा शेराची धारण आहे समागमें फौज एक हजार व तोफा लहान अन्छेर गोळ्याच्या च्यार आहेत, व बाणाचे उट दाहा, व गारद दोनशें आहेत समागमें यात्रा नागपुराकडील वगैरे दोन हजारआली आहे येथें शिवरात्र करून, आमावास्या जाल्यावर, चिमाबाई वगैरे वेंकोजी भोसले एथून च्यार मजलीं रामेश्वरास जाणार. व रघोजी भोसले कूच करून शिरपुरास अथवा चद्रपुरास जाऊन राहाणार. चिमाबाई रामेश्वराहून आल्यावर, दुतर्फानी चंद्रपुरीं करून सवत्सरप्रतिपदेस नागपुरास जावें असा मनसूर आहे रामभी भवानी काळो याणीं येथें लक्ष—होम केला घोड्याचे छकडे व कारखाने वगैरे काल पुढें नागपुरास लावले स्वारीबार लौकर चालय नाहींत व तेथें महागाई आहे, यास्तव पाठविले सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक ११८ श्रीगजानन

पौ छ २५ रजब, तिसैन १७११ फाल्गुन शुद्ध ६

रु

श्रीमत राजश्री—नानासाहेब

स्वामीचे सेवेसी —

विनंति सेवक विश्वासराव आपाजी, दिा देवराव महादेव हिगणेकर सां

नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता। छ ५ माहे जमादिलाखर मु॥ गार-दौंड स्वामीचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं कृपा करून छ १५ जमादिलावलचे पत्र पा॥ सेवकास सनाथ केले. तेणेकरून अत्यानंद जाला. यानंतरीं येथील वर्तमान. रा। लाला फत्तेचंद तेथून आज्ञा घेऊन निघाले ते येथें छ २० तारखेस पावले. त्रितीय प्रहरीं मिर्जा मुजफरवक्त शाहाजादे याचे मुलाजमतीस राजश्री बळवंत रावजी, लालमुनशी वगैरे सर्व मंडळी गेलो. मुलाजमत जाली. खैर आफीयत मिजाज खुसीचे वर्तमान श्रीमंताचें व स्वामीचें पुसिलें. नंतर लालानी वर्तमान मुफसल हिंदुस्थानचे वगैरे निवेदन केलें. दोन घटका दिवानखान्यात होते. मग, नबाब अकबर आलीखान याची भेटी जाली. परस्परे खैरआफीयतचे बोलणे जाले. च्यार घटका बसून सायकाळी आपले घरास आले. दुसरे दिवशीं छ २१ तारखेस लालाफत्तेचंदजीस बोलाविलें. मग मारानिले नबाब यासीं हजर जाले. वर्तमान पुसिलें कीं, आता आह्मास श्रीमंत बंदोबस्त करून रवाना कधीं करितात? हिंदुस्थानचा रंग दिवसोदिवस बिघडत चालिला. मुलकाची खराबी होत आहे. दगा मिटत नाहीं. यैसा जाला आहे. त्यास, आह्मी येथे उगेंच बसलों आहो. तरी कांहीं काम आम्हाकडून घ्यावे. म्हणजे आह्मात कांहीं माणुसकी आहे किंवा नाही हे ध्यानास येईल. इसमालबेग कोठील कोण ऐसें असता पन्नास हजार फौज बाळगून कजागी करितो. त्यापक्षीं आमचे पदरीं तरी नाव आहे. तरी आपला उपराळा मात्र असावा. मग चिंता नाहीं. खातरसा हिंदुस्थानचा बंदोबस्त आपले प्रतापानें करू, व राजे रजवाडे इसमालबेग हे सर्व आमचे संधानांत आहेत. ऐसें विस्तारें बोलणें जालें. परंतु त्यातील मुख्य भावगर्भ हा कीं, आमचे खर्चाची वोढ, यास्तव सत्वर बंदोबस्त करून रवाना करावें. दिलीहून खोजेजादा निघोन जैपुरास गेला. त्यास रजवाडे व उदेपूरवाले याचें येक संधान होऊन, खोजेजादे यास सन्मान करून ठेविलें आहे, व गाजुदीखान शाहाकडून फौज घेऊन बिकानेरावर आला आहे. त्यास राज्याकडील वकील गेले आहेत कीं, तुम्ही येऊन सामील व्हावे. खोजेजादे येथें आले आहेत. त्यास याजला मुखतयार करून विजारतचा कारभार आपण करावा, हें एक राजकारण नवे निघालें आहे. त्यास या प्रसंगीं आह्मीं गेलो तरी हा बखेडा कांहीं होऊ पावणार नाहीं. आपले प्रतापानें दिल्ही, दक्षणहिंदुस्थान एक होईल. याप्रमाणे भाषण जाले. मग लालानीं आज्ञेप्रमाणे उत्तरें चांगलीं केलीं कीं, उतावळी न करावी. काम मोठे आहे. यास्तव सोईनें सर्व मर्जीनरूप होईल. याप्रमाणें त्यास नवाबानीं जे समयीं धडपसरचे मुकामीहून कूच जाले, त्या समई लालाफत्तेचंद याजपाशीं सात दफाची यादी लिहून दिल्ही होती कीं, श्रीमंत कैलासवासी भाऊसाहेबानीं जुवाबक्तशहाजादे यास वलीअहद करून बसविले होते व तोच इरादा धरून

आम्ही आपलेपाशीं आलों आहों ऐसी खर्चाची तकलीफ व शाहाजादे याचे इमसरची वगैरे सात कलमें लेहून दिल्हीं होतीं त्याचें उत्तर काय करून जाला ह्मणून पुशिलें त्यास, त्यांनीं आज्ञेप्रमाणें साकल्य सरकारचा उपर राखून, त्याची मर्जी संतोष वाटे ऐसीं उत्तरें केलीं तीं लालाफत्तेचंद समक्ष पायापासी विनंति करितील, त्यावरून ध्यानारूढ होइल सेवेसी श्रुत व्हावें मी गरीब निराश्रित आहें माझी शरम स्वामीचे चरणास असे बहुत काय लिहो ? कृपा लोभाची वृद्धि असावी हे विज्ञापना

---

पत्रांक ३३९ श्रीगणपती १७११ फाल्गुन शुद्ध १०

राजश्री गोविंद रघुनाथ जोशी स्वामी गोसावी यासीः—

सेवक परशराम रामचंद्र नमस्कार विनंती उपरि रा शामजी विठल कुलकर्णी मौजे चिकुर्डे, का कोडोली, यांणीं विदित केलें कीं, आमचा व आमचे पुतण बापूजीबाजी याचा वाट गिविसी पेशजी कजिया होता त्याचा निवाडा वाळव्यांचे थळीं होऊन परस्परें समजपत्रें व निवाडपत्र जालें आहे त्याप्रमाणें बापू बिवाजी आमचा फडशा करीत नाहींत येविशीं ताकीद जाली पाहिजे ह्मणोन, त्यावरून, हें पत्र लिा असे तर, तुह्मीं येविशींचें मनास आणोन, निवाडपत्राप्रों याचसी फडशा बापू बिवाजी करीत नसल्यास निक्षुण ताकीद करून निकाल करवणें तेथें न ऐकत, तर हुजूर पाठवून देणें जाणिजे छ ९ जमादिलाखर, सुा तिसैन मया व अलफ हे विनंती *

---

पत्रांक ३४० श्रीगजानन १७११ फाल्गुन वद्य ८

रु

पो छ २५ रजब तिसैन

श्रीमंत राजश्री नाना

साहेब स्वामीचे सेवेसी —

विनंति सेवक विश्वासराव आपाजी, दिा देवराव महादेव, कृतानेक सां नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ता छ २१ माहे जमादिलाखर मुा दौंड स्वामीचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष कृपा करून छ ७ जमादिलाखरचें पत्र पो तें पावलें सेवकास सनाथ केलें तेणेंकरून आनंद जाला यानंतरी येथील वर्तमान छ १८ तारखेस नबाब आकबरआलीखान यांचीं पत्रें व अखबार घेऊन येक नाजर मोहबत आवमू काशीहून आला व मकवी नबाब मुसादौला त्याचा पुत्र मुबारकदौला ऐसे उभयतां हिंदुस्थानांतून

---

* 'हे विनंती' येथवर्ही अक्षरें व मथळ्यावरील 'गणपती' हीं अक्षरें खुद्द परशरामभाऊ पटवर्धन यांचीं आहेत

आहे. त्यांणीं तिकडील अखबार आणिली आहे. त्यांत वर्तमान तरीः राजश्री पाटीलबावांना [illegible] आहे. एकून सरकारच्यीं पत्रें व स्वामींचीं पत्रें गेलीं कीं, [illegible] मसलत करावी, द्वैत नसावें, व [illegible] ठेवावें. त्यावरून पाटीलबावा बोलिले कीं, आम्ही [illegible] नाहीं, परंतु नबाब आलीबहादर ऐकत नाहींत, त्यास आमचा उपाय नाहीं. हिंमतबहादर येक दिवसीं आपला गळा कापून घेत होता. हे आलीबहादरबावास खबर जाली. त्यावरून तेथें गेले, आणि [illegible] सुरी घेतली. बहुत खातरजमा केली. खर्चाची तकलीफ होती. म्हणून, काहीं रुपये व वस्त्रें त्याचे जनान्यास नक्ती त्यावरून, [illegible] जिनस किनखाप पा। दिल्हे. आणि आलीबहादरबावा, पाटीलबावांचे [illegible] तेथें आहेत, त्यांचे डेन्यास गेले होते त्यास, [illegible] वर्तमान [illegible] सांगितलें कीं, बावा ऐकत नाहींत. आणि हिंमतबहादर आज आपला गळा कापून घेत होते, त्यास आमचा उपाय नाहीं. बावांना [illegible] त्यास काय करावें, त्यावरून फिकीर. बावा स्वार होऊन पाटीलबावांचे डेन्यास गेले आणि सांगितलें कीं आलीबहादरबावा [illegible] आले आहेत, तरी आपणही चालावें. त्यावरून पाटीलबावा व राणेखानभाई स्वार होऊन गेले. उभयेतांच्या भेटी परमलोभानें जाल्या. बहुत लोभाच्या बोलण्यीं जाल्यां. मग पाटीलबावांनीं बावास हातीं धरून आपले डेन्यास नेलें. परम शिष्टाचार केला. वस्त्रें वगैरे जवाहीर अकराचोन तयार करून हातीं घोडे दोन ऐसे आणिले. परतु बावांनीं काहीं घेतलें नाहीं. आतर, पानदान मात्र घेतलें, आणि स्वार होऊन आपले डेन्यास दाखल जाले. बरहड सुभाभाट फिरंगी याचे नवे पलटणें याची तयारी जाली आहे. त्यावरून बावास त्याची कवायत दाखवायास बोलाविलें. त्यावरून सुभेदारास बोलाऊ पाठविलें कीं, पलटण पाहावयास आपणही चालावें. त्यास सुभेदारानी निरोप सांगोन पाठविलें कीं, आमचे येथें लोकाचा गवगवा बहुत जाला आहे, यास्तव येणें होत नाहीं, आपण जाऊन पाहावी. ऐसें सांगून पाठविलें. आणि आपले लोकास सांगोन पाठविलें कीं, तुह्मी येऊन हागामा करणें. त्यावरून लोकांनीं येऊन हागामा केला. पाटीलबावा पलटणाची तयारी पाहून बहून खुशवक्ती जाली. मग स्वार होऊन डेरेदाखल जाले. रा। कासीबा होळकर दिल्लीस गेले आहेत. मुलाजमतीस शाहानिजामुद्दीन यांणी येऊन अर्ज केला कीं, मुलाजमतीस चालावें. त्यावरून बोलिले कीं, रा। पाटीलबावाप्रमाणें आमचा मान व त्या सिरस्त्याप्रमाणें खीलत वगैरे द्यावें, तरी येऊं, नाहीं तर सांप्रत येत नाहीं. त्यावरून शहाजीनें विनति केली की आज्ञेसिवाय मी नाहीं, परतु हुजुरात सांप्रत खर्चाची तकलिफ बहुत आहे, यास्तव लाच्यारगी आहे, नाहीं तरी गुंता नाहीं. मग कासीबानीं सुभेदारास पत्रें पाठविलीं

र्की, मुल्लाखमतीचा प्रकार याप्रमाणें आहे त्यावरून सुभेदारानीं लिहून पों र्की, पुर्वे मुलाखमतीस न जावें, पुढें आम्ही लिहून पा तेव्हां जावें त्यावरून महदूफ राहिले दिल्लीहून खोजे आदे जैपुरास गेले होते तेथून जोतपुरास गेले शहरापासून येक कोस बाग आहे तेथें मुकाम करून आहेत राज्यांनीं शिष्टाचार मात्र केला परतु मुलाखमत अद्याप जाली नाहीं राजे विजेसिंग याचा दिवाण आहे त्याणें कांहीं वर्तमान जैपूरकरास लिहीं त्यावरून दिवाणावर इतराज बहुत आहेत जैपूरवालेही आपले फौजेची तयारी करून आहेत जोतपूरवाल्याकडीलही फौज रवाना कुमकेस जाली आहे दिल्लीत डाके नित्य पडतात शह रांत बदोबस्त चांगला नाहीं पातशाई सलातीन आहे त्यांस उपोषणें पड तात वर्तें नाहींत रात्री सोतानें हैराण, तेव्हां पातशाहांनीं कांहीं रुपया करीद करून या दिल्या याप्रों दिल्लीचें वर्तमान लिहीं आहे त्याप्रों पाटीलबावाचे वगैरे लस्करांत नित्य चोऱ्या होतात घोडीं, उंटें नेतात सावकाराचें दुकान फोडितात ऐसा प्रकार आहे वरकड, येथील वर्तमान हुताशनीचा समारंभ वा ५ पंचमीस राजश्री बळवंतरायजी यांणीं रगाची तयारी करून कुसुंबी रंग व केशराचा व फुलांचा वगैरे गुलाल सर्व साहित्य घेऊन सर्व मडळी सुधा शाहाजादे यांचे हुजूर दिवानखान्यात समारंभ च्यार घटका नाचरंग जाला बहुत सतोष जाले मग नवाब अकबरआलीखान याजकडे दोन घ टका नाचरंग होऊन, सायंकाळीं आपले घरास आले सेवेसी श्रुत व्हावें यार्से वर्तमान तें सेवकानें लिहिलें आहे बहुत काय लिहिणें ? लोभ केला पों हे विज्ञापना

•

---

पत्रांक ३४१ श्री १७११

वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशिव दीक्षित वाजपेययाजी स्वामीचे सेवेसीः—

विद्यार्थी बाळाजी जनार्दन सां नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असलें पाहिजे विशेष आपण पत्र राजश्री बाळाजी भिकाजी याजबरोबर पाठविलें तें पावलें राजमंडळचे तैनातीचा व वर्षासनाचा ऐवज पावत नाहीं, व एलतपुरचा मार लिहिला व मारनिलेनें सविस्तर सांगितलें, त्याजवरून कळलें ऐशास, आपले लिहि ल्यावरून, राजश्री हरीपंत यांस वर्षासनाचे ऐवजाविशीं सांगितलें आहे, व सरकारची सनद येक हजार रुपयांची खानदेशचे ऐवजाची मारनिलेस दिली आहे सनदेप्रमाणें आपल्यास ऐवज पावता करतील व इनाम गांव चाहि बंदोबस्त करून देतील •लोभ असों दीजे हे विनंति

---

• येथपासून हस्ताक्षर नाना फडणिसाचें

पत्रांक ३४२ श्री. १७१२ अधिक आषाढ वद्य १

पंश्री मुख्य प्रधान श्रीराव सवाई माधौ राइजू. येते श्री महाराजाधिराज श्रीमहाराजा श्रीराजा धौकलसिंघजू देवके वांचनै आपर उहांके समाचार भले चाहिजै. इहाके समाचार भले है. आपर जादा दिननतै अपने पाती समाचार नहीं आये है, सो लिखिवी. अरु उधरकीं इधरकी बात आगै तै येक चली आई हे. काहूतरह जुदाइगी नही रही है. तिहितै अव आपकौ जादा जादा चलाउ नौ. इहा तै पश्री पांडित मोरौजी कौ पठवाये है. सो हकीकति इनके कहैनानि वी. पाती समाचार लिखत रहिवी. असाढवदि १ संवत् १८४६ मुा परना.

---

पत्रांक ३४३ श्री. १७१० मार्गशीर्ष शुद्ध १

अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य राजश्री महिपतराव कृष्ण गोसावी यासी:—

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार. सुहुरसन तिसा समानीन मया व अलफ. तुह्मीं पत्र छ ६ सफरचे पाठविलें तें छ २७ मिनहूस प्रविष्ट जाहलें. लिहिला मजकूर सविस्तर अवगत जाहला. श्री नरहरीसानिध्यें करून शरीरप्रकृत चागली आहे, ह्मणून लिहिले. उत्तम आहे. रा छ २९ सफर. वहुत काय लिहिणें? लेखनसीमा.

---

पत्रांक ३४४ श्री १७१० मार्गशीर्ष वद्य १४

छ मा अनाम देशमुखदेशपाडे मामले बीड यासी:—

माधवराव नारायण प्रधान सुा तिसा समानीन मया व अलफ. मामलेमार पो ादगर जाहागिरीचे गाव राक्षसभुवन वगैरे येथील अमल महिपतराव विश्वनाथ याजकडेस जातसि व पागापथकाचे बेगमीस सरमजाम चालत होता. त्यास ते मृत्य पावले, सबब त्याचे पुत्र राजश्री सिद्धेश्वर महिपतराव याजकडे जातीस व पागा पथकाचे बेगमीस सरजाम सालमजकुरापासून करार करून दिल्हा असे. तरी, मारनिलेशीं रुजू होऊन, अमल सुदामत प्रों सुरळीत देणें. जाणिजे. छ २७ रविलावल. आज्ञा प्रमाण. लेखनसीमा.

श्री
राजा शाहु नरपति-
हर्षनिधान माधवराव
नारायण मुख्य प्रधान.

पत्रांक ३४५ श्री १७१० पौष वद्य १२

तीर्थस्वरूप मातुश्री बाई वडिलांचे सेवेसीं —

अपत्यें माधवरावाचे साष्टांग नमस्कार विनंती येथील पौष बहुल द्वादशी पर्यंत वडिलांचे आशीर्वादें करून यथास्थित असे, विशेष आपणाकारणें मकर संक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले आहेत स्वीकारून उत्तर पाठविलें पाहिजे बहुतकाय लिहिणें १ हे विनंती

पौ छ १ जोवल उर्फ माघ शुा ४ शुक्रवार शके १७१०

---

पत्रांक ३४६ श्री ( नकल ) १७११ वैशाख शुद्ध ११

यादी राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा यांजकडील करारमदाराची कलमें पेशर्जी कैलासवासी मुधोजी भोंसले सेनाधुरंधर पुण्यास आले तेसमयीं करार जाला त्याप्रों वगैरे. सुा तिसा समानीन मया व अलफ

घरचा अगर बाहेरील कसाहि प्रसंग पडला तर सरकारचे लक्षाधि धाय दुसरें लक्ष धरणार नाहीं येणें प्रों करार

इग्रजाचा विषाद जाला तर शरीक सरकारचे येणेंप्रों करार.

निवर्गी सभू सरकारचे लक्षांत राहू, दुसरें लक्ष धरणार नाहीं, येणेंप्रों करार

पांचहजार रुपयांचें कापड पाळापूर व बासीम पेशजर्चि कराराप्रों दरसाल सन सीत समानीनापासून सरकारात देत जावें, असा करार आहे त्यास कराराप्रमाणें मागील कापड देऊ पुढें दरसाल देत जाऊ येणें प्रों करार

संस्थान गढे मडलें, रेवा उत्तर तीर, राजश्री खंडोजी भोंसले सेना बाहादर यास फौजेचे सरंजामास सर काराकून करार करून दिल्हें त्याचे

पा गगथडी येथील महाल सर कारांत आले आहेत तेथील घास दाणा तुमचा तो तुम्हीं घेऊ नये याचे ऐवजीं प्रा वराड येथील सरदे शमुखी व चायथीचा ऐवज सवादोन लक्ष रुा तुम्हाकडे दरसालचें येणें तें तुम्हांस माफ केलें याप्रों करार सन इसने-तिसेनात जाला आहे व अलिकडे सन तिसा तिसेनात महेश्व रचे सालीं अकरा महालचा घांसदाणा घेऊं नये असा करार आहे त्याचा पडशा पेस्तर सालीं करावा असा करार कैलासवासी सेनाधुरंधर यांणीं सन सीतसमानीनांत केला आहे त्या स, तूर्त नागपुरास जलदीनें जाणें यांज करिता पडशा मदनूफ करावा पेस्तर सन तिसैनात याचा पडशा धेपनिशेप करून देऊ यणेंप्रों करार

महेश्वरचे मुक्कामी कैलासवासी जानोजी भोंसले सेनासाहेबसुभा यांणीं

कलमबदीची याद सन सीतसमानी-नात जाली आहे. त्याप्रो सरकारातून चालवावे. आह्मी कराराप्रो निभाव-णी करूं. येणे प्रो करार.

करार जाले आहेत. त्याप्रो वर्तणूक करू. येणेप्रो करार.

छ ७ साबान, सन तिसा समानीन, वैशाखमास. मुकाम पुणे.

---

पत्रांक ३४७ श्री लक्ष्मीकात १७११ ज्येष्ठ वद्य ११

वेदमूर्ती राजश्री नाना दीक्षित यासीः—

प्रति रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दडवत विनति. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष. खासा स्वारी पैठणास गगा उतरत आहे. त्यास, कायगावीं ज्या नावा असतील त्या पैठणास जरूदी पाठऊन द्यावे. छ २४ माहे रमजान. बहुत काय लिहिणे ? हे विनति.

पौ शके १७११, सौम्य सवत्सरे, आपाढ शुद्ध मंगळवार.

---

पत्रांक ३४८ ॥ १ ॥ १७१२ कार्तिक वद्य ७

पश्री राजेश्री बाबूराउ केसोराउजू ऐते श्री राजघरबहादुर गजसिंघजू श्री गधृपसिंघजुके बाचने ओपर अपने समाचार सदा सर्वदा भले चाहिजै. तापी छे यहाके समाचार भले है. आपकी मिहरबानगीते ओपर आगैतै आपुसौ श्री हजूरी सौ जिहतरह व्यौहार रहो आयौ है सो हमेतो तौनउ तरह समजै है. अरु आपु जेठे सरदार हौ. हमारी बातके रखैया आपऊ हौ. आपुसि-वाइ हमै दुसरौ कोऊ नाहीं दिखातु आइ. अरु आगै पश्री पडित खडो-राऊ यहा आए हते सो राज्यकी जागा सबतहसन हसकरी अनै पश्री पडित लछमनराऊ झासी बारे आए, सो हमारौ ऊनकौ सूत हतौ हमसौ ऊनसौं तौ भैटऊन हौन पाई. तुहलौ श्रीनौनै अरजुनसिंघनें न्याऊ करमार कै भगाइ दए अरु लूट लए. ऊनकौ भगाकै अब हमारे राज्यपै आए सो हमै छैकैहै. जौतौ इनकौ पारपत होई अरु हमारी मदत होवे. मै आवे तौ हम आपके ऊकमी है. जौ तो हमारी दसपद्रा हजार धौरेकी मदत होवे. मै आवे अरु हमारे भया श्री गधृपसिंघकौ सग लिवा ऐ आवै, तौ हम पैसान श्री की दैवेकी राहबाधै अरु राज्यकी सजल बैढै तौ हम हमेस आपुके ऊकमी है. अरु पश्री पडित बालजी यहा है सो ऐ हमारी बात नाहीं चितमें धरत आइ. आपुकौ वडौ दुवारौ है जिहमै राज्य कौ सुधार होई सो कीवी. अरु जिहमै हमारे भैयाकौ ऊबेल होइ अरु हमारी बात रहै सो आपु कीवी. या हकीकति श्री नानासाहिब कौ जाहिरकर जिहमै राज्यकौ सुधार होइ तौन

आपुको करनो है और विदीवार हकीकति भटिकसारीमावानीसिंघको लिखी है सो ए माहिर कर है अरु इनऊके हाय मागो पाती लिखी है सोवचवाइ देखवी हम सब वातनपै काइम है सिलापनु होई मुकुरमाइ पठैवी मार्ग वदि ७ संवत १८४७ मुकामु मडफा (?)

श्री




---

पत्रांक १४९ श्री १७१२ कार्तिक मार्गशीर्ष

मेहेरवान हरीपंत हमवान मिस मुस्तफिद असता आपण पंत मवासुफ यास रोबरो जवान मबारकेनें फर्माविलें कीं, तुम्हीं मार्गे पुहुरगमीवर राहून फौजेस हमेसांकडे रवाना व मामुर करावें ये विशींचा तपशील त्यांणी इकडे निगारीष केला त्यावरून मुफसाल दर्याफ्त जालें चुनाचे, आपण सलाह फर्माविली ते मसलहतीस बहुत मुनासीब आईंदा कोणासही सरेमाय बेगळेपण दिसत नाहीं दोन्ही तमवा दवलतीच्या तकवीयतेस नेक व मुफीद आहे लेकिन, मिस्तर मालिट यांचा सवाल आमहानें कीं, जनराल साहीनें कलफ त्याहून मुकाबल्यावर आले सरकारांतून हरीपंत सरंजामसुद्धा मोहिमेवर रुखसत व रवाना झाले हे खमर त्यांस कलमी कर्याेत आली जनराल यांची दिलापासून खाहीष कीं, पत मोईन यांणींच फौजफेरोजीसहित पुढे यावें मुलस, मिस्तर मालिट यांच्या मुबालग्यावरून कियासात आलें कीं, खुद हरीपंत सरंजामसुद्धा गेल्यावांचून फकद फौज गेल्यानें जनरलाची खुषी नाहीं सबब, हुसुरांतून येविशीं पतमोईन यांस लिहून पुढें जाणें होय तें करावें म्हणोन निजामदौला बाहादूर यांस फारसी पत्र नानाकडून

---

पत्रांक १५० श्री १७१२

विशेष आपण पत्र पाठविलें तें पावलें दोकलसिंग यावर सदेराम हरी यांणीं जरब दिल्यामुळें निघोन गेले, त्यास बुंदले यांच्या सरकारचा माऊपणा, वास्तव ब्यार वो त्याजकडून करार करून घेऊन त्याची जागा

पणें त्याजकडे ठेवावी, यांत भाऊपणाही राहून कार्य होईल, त्याचे कबिले वगैरेस उपसर्ग खडेराव हरी याजकडून न लागे ते करावें, म्हणोन लिां ते सविस्तर कळले. येसीयासी, आपर्ली पत्रे पूर्वी येविसीं आल्यावरून राजश्री खडेराव हरी यासी लेहून पाठविले होते. त्यावरून मारानिलेनीं खोणीकडे मातवर पाटवून, त्यास घेऊन येऊन, सरजेतासिग व ढोकलसिग याचा कलह भाऊपणाचा होता त्याचा ठराव, दोन हिसे ढोकलसिग व एक हिसा सरजेतासिग, या प्रो करून हिसेरसीद फौजखर्च दोघाकडून च्यार रुो ठराऊन घ्यावे, असे ठरविले आहे. ढोकलसिग याचे कबिले वगैरेस उपसर्ग खडेराव हरी याजकडून लागणार नाहीं. येथून लिहिण्यात आले आहे.

---

पत्रांक ३५१ श्री. १७१२

सेवेसी विज्ञापना ऐसीजे. इकडील वर्तमान तरीः टिपूने कोयेमुदुराजवळ छावणी केली.आयाज वगैरे नायेमार झाडींत आहेत. परतु नायेमाराचे लोक फार जाया केले. त्याचा चिलर उपद्रव आहे. परतु बाहेर येऊ सकत नाहींत. कित्येक आनतगयेनच्या सरहदेस गेले ह्मणावयाचे वर्तमान टिपूनें ऐकून पहिलेपासून त्या स्थलावरी दातच आहे. याविषयीं काहीं हो, तें स्थल घ्यावें ह्मणून तजवीज करून फौजेची तयारी आहेच. त्यातही मुलकातील फौज जमा करीत आहेत. आनतगयेनचे सरहदेस लागून फौज उतरविली आहे. हें वर्तमान तेथील राजयास कळून, तेही आपली फौज घेऊन आपले सरहदेत उतरले आहेत. हामेशा इग्रेजी येक पटालबार रानांत होतीच. मध्यें गडबड जाहली, ते वेळेस दोन हजार बार आणखी पाठविला. तीन हजार बार मध्यें दोनी फौजेच्या उतरलेत. हे वर्तमान आत्रीस्थ गौरनरानीं ऐकून आपले हुशारींत लागलेत, आणि टिपूस पत्रें लिहिलींत कींः तुह्मीं आमचे जमीदारावराबरीं द्वेष वाढवून त्याचें मकान घ्यावयाची तजवीज केलियावरून पाहता आह्मासीच विरुद्ध करावे ह्मणून दिसोन येते. तुमच्या आमच्या करारात तें स्थल दाखल आहे ऐसे असता, घडीघडी उपद्व्याप करणे युक्त नव्हे. जर करावें म्हणूनच असल्यास आह्मास त्याहावें. आम्हींही त्याचे कुमकेस सिद्ध आहो. यावरी जें युक्त दिसेल तैसें उत्तर पाठवणे. त्याप्रमाणें आह्मी अमलात आणू. याप्रमाणें पत्र गेले आहे. याचे उत्तराची मार्गप्रतिक्षा करितात. दुसरे आपले तयारींत दारूगोळे वगैरेच्या सरजामात आहेत. यावरी जैसे होईल तैसें सेवेसी लिहिजेल. भटाचे घरचे वृत्त. अवघी बचबच आहे. मित्रही कामात फिरतात. परतु त्याचीही निभावणुकेची खातरजमा होत नाहीं. ऐसें काम बिघडलें. सेंजणास वसूलबाकीस गतवर्षींचे वसूल देणें. तेव्हा हाल विद्येमानची गती काय? असो. सर्वत्र हेंच म्हणतात जे, पुन्हा जेनपद स्वेताकात होईल. ईश्वरें क्षेम करावे. श्रेष्ट स्थलचे नृपास पैत्य-

प्रमाचा उपद्रव फार जाहला होता सवब पाच महिने काम आसर जाहलें त्या समई लोकलाजें येतों म्हणून लिहिलें होतें त्यास, तेथील लोकानीं उत्तर पाठविलें कीं, तुम्ही येक वर्षी तेथें असणें ऐसीं पत्रें रवाना जाहलीं इतकियांत केमल निघान गेला तदनतर पत्रें यऊन पावलीं त्यावरून पा हवा नूतन यावयासी च्यार दिवस लागतील, ऐसें दिसतें यावरी च्यार म हिने जाहाजें यावयाचा हगाम राहिला यावरी पाहावें जैसें मागाहून वर्तमान येईल तैसें सरकारचे जोडी बराबरी तपासिलें लिहिवेल सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक ३५२ ह १७१२

रफआत व अवालिपनाह तुबारत व मआलिदस्तगाह अजम येल चिमोर घुवेवासदे फरवाल सकट तारवदर गोंवा महफुज बाशद आबितर्प महाराम गिरानी जिजाऊसाहेब बशदज वुवा आंकी बहुत रोज गुजरले असता, अ जम विजरई यांकडील व आरपुअतपनाहकडील सत यम्लास नमवम रसूल होऊन, शादमानी दपदाद न आहली बईसबब कलमीं केलें चार्तें जे, साहेबीं अजम विजरई यास भाई म्हणविलें विजरई लोक सखुनास गुंवा बयाचे नव्हेत असें असतां सखुनास गुतोन, साहेवास तुम्हीं व त्यांणीं कलमीं करून पाठविलें त्यावरून साहेबाचा जजीरा साहेबाचेकडे आहे, ऐसें दिला मध्यें जाणोन तुमच्या यकसखुनावरी व कलमी केल्यावरी साहेब बेफिकीर आहेत साहेबीं भाई म्हणविलें आणि कार्यांस बहुत रोज गुजरले त्याहाजा पैदरपै कलमीं करावें लागतें ये बाबेचा सर्व प्रकारें अभिमान व हरे विजरई यांणीं व तुम्ही खातरेमध्यें आणोन, मुंबईकराकडे सत पत्रें कलमीं करून, हुजर पाठविले आहेत साराश, सरकारचा जजीरा सरकारांत तावीन होऊन साहेयानयळ वचन गुजलें आहे त्या क्रियेस मुक्त होऊन, यकसुरतीपणाची नेकी व खुषी सर्व टोपीकरांत जाहिरीस येइ, तें करणें वाजीब व लाजीम आहे बरकद आज्ञेप्रमाणें चिरंजीव राजश्री यशवतराव शिंद सुभेदार कलमीं करिता मालुम होइल जिआदा~~+++++++~~ ! लस्तनसीमा

---

पत्रांक ३५३ श्री १७१२ चत्र शुद्ध ३

ह

पौ छ १५ रजब तिसैन

सेवेसी भीगम सदाशीव पुसानेक सां नमस्कार विज्ञापना छ १ रजब येयास्थित असो विशेष राजश्री सेनासाहेवसुभा याचें छ ४ जमादिलाखरी गंगेहून कूच हाऊन छ ५ रोजीं नकलपर्हाच मुकाबीं नागपूरची डाक आली

भवानी नागनाथ मुनशीस फाल्गुन शुा ७ देवाज्ञा जाल्याचें वर्तमान आलें. मुनशीनिशीं सर्वांस हळहळ वाटली. गुडो शंकर कारकून येशजी आडपल्ली-कडे पाठविला आहे. वेंकटराव गोंड्याचें गाव तेलंग प्रांतीचें लुटितो. वस्ती होऊं देत नाहीं. गुडो शंकर याणे त्याजकडील एक ठाणें घेतलें, व लष्कर मार्गांत जाता येता रंजून येक दोन घोडी नेली. म्हणून सिरपुरचे मुकामीहून गुडो नवराम कुमक हिम्मतसिंगास पाठविले होते. तेव्हां वेंकटराव गोंड गुडो शंकरास भेटला. छ १९ रोज चंद्रपुरास मुकाम जाला. तेथें आठनव मुकाम जाले. हुताशनी करून चिमाबाई व व्यंकाजी भोसले राजेश्वरास गेले होते. ते छ २० रोजीं चंद्रपुरास आल्यावर, छ २१ रोजीं कूच करून, छ २५ रोज भृगुवार तिसरे प्रहरीं नागपुरास वाड्यांत दाखल जाले. देवघरापुढें दोन घडी बसले. रयत व जमानीसदार व राजाराम मुकुंद, बंगाल्याचे सुभे यांणीं वगैरे नजरा केल्या. चिमाबाई येताच बाहेर शंकरदरियाजवळ खंडोजी भोसले याजविशीं बहुत रडली. शहरात येताच वाड्यांत जावें तें गेले नाहींत. नागती बाळाबाई यांचे वाड्यांत जाऊन बसले. तेव्हां सर्वांणीं जाऊन समजाऊन आणिलें. बाईस वारंवार दुःख बहुत आठवते. मुनशीच वर्तमान ऐकून सर्वांस मुळ्यास नवीन वाईट वाटलें. हुताशनी चंद्रपुरावर केली. तेथें नाचरंग कांहीं केला नाहीं. याप्रा खंडोजी भोसले याचे वाईट कोणा-सच वाटलें नाहीं. त्याचे स्मरण खाशास किंवा मुळ्यास कोणासच होत नाहीं. असा बंदोबस्त येकच कट करून कृत्रिम करून अनर्थ केला. छ २७ रोज प्रातःकाळीं स्नान करून स्वारी मुनसीचे घरास गेली. त्याचे चिरंजिवाचे समाधान करून, दोन घडी बसून, राजाराम मुकुंद, बंगाल्याचे सुभे याचे घरास गेले. त्याचे बंधूस बंगाल्यात देवआज्ञा जाली. त्याची स्त्री सती गेली. राजाराम मुकुंद याचें समाधान करून आले. छ २८ रोज प्रातःकाळीं स्नान करून, प्रहर दिवसा स्वारी फुटल्या तळ्यास गेली. तळें पाहिलें. तेथें नवा बाग केला आहे, तो पाहिला. च्यार घडी निद्रा केली. बागातील केळें आणून पठाण वगैरे लोकास वाटलीं. सायंकाळीं स्वारी आल्यावर स्नान करून, सोमवारचे भोजन केलें. छ २९ रोज प्रातःकाळीं स्नान करून, सवंत्सरप्रतिपदेचें निशाण जरीपटक्याची पूजा केली. मुळदमंडळी वगैरे झाडून आले. देवप्रतिष्ठा जाली. श्रीरामनवमीचा उत्सव आहे. पूजाअर्ती जाल्यावर चार घटी दरबार जाला. बंगाल्यातील सावकार आला आहे. त्याणें हत्ती नग दोन नजर केले. येक मोठा व येक लाहाण आहे. महिपत दिनकर यास छत्तीसगडास जावयास मुहुर्तेकडून राहुटी बाहेर द्यावयास सांगितले. आठाचौ-रोजांनीं जातील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्रांक ३५४ श्री १७१२ वैशाख शुद्ध ०

श्रीमंत राजश्री बाबासाहेब साहेबाचे सेवेसी —

आज्ञाधारक अबाजी इंगळे रामराम विज्ञापना येथील क्षेम ता छ ८ माहे शायान येथें महाराजाचे कृपेकडून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष राजश्री नगोत्रा बापू आम्हांस येथें ठेवून गेले लोकाची नित धरणी लोकाचें मनांत कज्या करावा हें मानस पाहून, येथेंच च्यार रोज राहावें हें सांगोन, मथुरेस जावयास गेले सरकार—किफायतीची गोष्ट सांगितल्यास लोकांस धाइट दिसती त्यास धण्याची आज्ञा आली तर च्यार रोज मेवाडांतून काम काज करून येईन येथें रिकामे बसोन काय करावयाचें आहे ? त्यापेक्षां मेवा डाचें कामकाज आटोपोन धण्याचे पायाकडेस येईल त्यास मेवाडांत जावया ची आज्ञा जाहाली पाहिजे *बहुत काय लिहिणें ? लोभ करावा, शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक ३५७ श्री १७१२ आषाढ वद्य

राजश्री आपाजीराव स्वामीचे सेवेसी —

विनंति उपरी इसमालबेग नारनोळावर होता तेथें त्याचीं पलटणें फुटोन आपलेकडे सवान लावीलें, व मारवाडी यांजकडेही सवान लागलें तेव्हां फक्त मोगली फौज मात्र च्यार हजार पर्यंत राहिली तेव्हां तेथन कूच करून जैपूरप्रांतीं चालला नंतर आपले फौजेनें निकड केली तेव्हां पुढें निभाव न होय तेव्हा पाटण परगण्यांत लहान किला आहे, तेथें इसमाल्या व मारवाडी यांनीं मुकाम केला नंतर जेष्ठ शुद्ध दशमी व एकादशीस दोन लढाया जाल्या त्याजकडील माणूस मस्लमी व ठार फार जालें आपले फर्दाल ही थोडे मनुस जाया जाले सारांश तूर्त आपली फौजेची जरब त्याजवर चांगली आहे राजश्री बापूजी होळकर व कासिवा होळकर पुढें फौजसुद्धां आहेत हालीं राजश्री आलीयबहादर यांजकडील फौज दोन हजार राजश्री सदाशिवपंत यांचे चिरंजीव बळवंतराव यांजबराबर देऊन रवानगी केली सारांश तिघाही सरदारांचे चित्त शुद्ध नाहीं आणि मसलत हरी उभी राहिली आहे, म्हणोन लिहीं तें व फडणिसीचे कानू करावयाचें याल्गें होऊन यादी ठरल्या आहेत, त्याजवर मसलाहा होऊन न्यायाचा करार करून घाव याचा आहे, तो जाला म्हणजे सेवेसी तपसीलवार लिहून पाठवूं म्हणोन व तुमचें राहणें तूर्त च्यार महिने जालें, पुढें येणें कधीं घडेल पहावें, म्हणोन, लिहिलें तें सविस्तर कळलें त्यास, सांप्रत इसमालबेगाचादी मोड जाल्याचीं पत्रें आलीं आहेत त्यावरून पाटीलबाबा यांची निष्ठा श्रीमंताचे पायाशीं आहे

---

*हस्ताक्षर अंबोजी इंगळ्याचें

त्यापेक्षा अशाच गोष्टी घडतील. संतोष जाला. पुढे होईल तें ल्याहावे. फड-णिसीचे कायद्याचे यादीवर करार होणे. त्यास, तुह्मास जाऊन किती दिवस जाले, तेव्हापासून करार होतच आहे. आणि पाटीलबोवाचा व आमचा भा-ऊपणा. त्यापक्षीं इतके दिवस लागू नयेत. करार जालेच असतील. लिहून पाठवावे. तुह्मास पाटील यावानी ठेऊन घेतलें म्हणोन, त्यास काहीं कामाका-जाचे दिवस असतील म्हणून राहविलें असेल. उत्तम आहे.

---

पत्रांक ३५८ श्री १७१२ भाद्रपद शुद्ध २

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक जनार्दन शिवराम कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना ता। भाद्रपद शुद्ध २ पावेतों स्वामीचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमानेः आषाढ वा। मतमीस सरकारची जोडी रवाना जा-हली, ते पाऊन सकल वर्तमाने ध्यानारूढ जाहलीं असतील. अस्विनीस्थ नृ-पाचे वर्तमान दोन तीन पत्रीं तपसिलें लिहिलें ते ध्यानात असेलच. विद्य-मानी गोनर होरन बहादर यानीं आरणीचे दत्तपुत्र श्रीनिवासराव यास अ-धिकारावरीं स्थापिलें. आस्विनीस्थ नृपासी व आहालिकारासी आणि आत्री-स्थासी फारच वैमनस्क येऊन पडलें आहे. यासमई जे यानीं केलें तें केलें. तीन अधिकार उभयेता वधूसच आहेत. दुयेम गोनर कासमेजर यांचें काही चालत नाही. खामाखाये आस्विनीस्थ दत्तपुत्रासच स्थापावें ह्मणून फार आ-ग्रहात आहेत. त्यास निमित्य व येक आसरा नबाबसालाचा धरून हे काम करावें, ह्मणून आह्मास बोलाऊन सांगितलें जेः यानिपईचे अगत्य श्रीमंतास असावें. त्यानीं उपेक्षा केल्याकरिता ज्याच्या मनास जेसें आलें तैसें करितात. याकरिता याविषयीचा बदोबस्त करावा. मसविद्याप्रमाणे पत्रे आल्यास, श्री-दयेनें न्यायमार्गच केला जाईल. त्यास, तीन पत्रे यावीं. श्रीमंत महाराज शाहू-राजे यांचें पत्र यावें. जे, पूर्वी आह्मी सराचे बेलट केमळ यास चदावरावि-षयीं लिहिलें होतें. त्यानीं दरजबाब पाठविले नाहींत. आह्मी ऐकिलें होतें जेः इंग्रेज लोक न्याये पंचायेतीकडून काम पाहतात. ह्मणून ऐकत होतो. विद्य-मानीं बहूतच अविहित आमलत आणिलें आहे. ते काय ह्मणजे, तुलजाजीराजे यासी संतती नाहीं. तेव्हा आमच्या दायेजाचे मुलास दत्त घेतलें तें किंनिमि-त्य? म्हणजे अस्सल कौमेचा यास अधिकार, पण इतरास नाहीं. प्रतापसिंग राजे यानीं येक कलवातणीस ठेविलें होतें. ते न व्हता, व्यकणा म्हणणारासी तीसी समंध पडला. ऐसें असता, तिला येक लेक जाहाला. त्यासमई प्रताप-सिंगराजे म्हणाले जे, हा मूल मजसारिखा नाही, व्यकणा सारिखा आहे. ऐसें म्हणून तिजला इतराजीखाले ठेऊन, त्या मुलास नजरबंद ठेविलें होतें. ऐशा

मुलास तुळजाजी याचा मालू म्हणून, त्याला पट बांधिलें आहे, म्हणून ऐ किलें त्यावरून हे न्यायेरीती कोणती ? दत्तपुत्र घेतला त्यास सोडून देऊन, गैरवारसास आमचें घर देणें फार अनुचित तुम्हास व आम्हांस स्नेहभाव वि शेष आहे त्यामुळें लिहिलें जातें जें, आमचे घर काढून ऐशीया कचिनी च्या मुलास देणें अविहित मुख्य आमच्या कौमांत पुत्र नसल्यास दत्तपुत्रच अधिकारी, ऐसें आहे यात आपल्या चित्तास वित्यास भासल्यानें, आपण अपरोक्षी आमच्या शास्त्रप्रकारें न्यायेरीतीनें आमच्या दायेआचा मूळ तुळजा राजे यानीं पोसणा घेतला त्यासच आमचे घरीं ठेविणेसें केलें पाहिजे येसा हे आपले चित्तीं असेल कीं सराचे वेळत केला त्याप्रमाणें केलें हें मनात असेल तरी, हें वर्तमान समग्र आमचे स्नेहात स्नाट कारणबाळिसयांस विनति लिहून त्याचा हुकुम घेऊन आमचे मुलास आमचे घरीं ठेविलें पाहिजे आ मचे मुलास आमचे घरीं ठेविनास गेल्यानें तुमच्या व आमच्या स्नेहाची अभिवृद्धि कशी होईल ? आणीही हे अर्थ आघवे सूचना केली आहे कुंपणी ची आमची दोस्ती आहे त्यापक्षीं आपले चित्तीं ही स्नेहाभिवृद्धि करावी म्हणून असेलच परंतु इतरता येणार नाहीं, व ऐणें करून हरदो तर्फेची खुषी होऊन दोस्ती राहील तेच आपण करितील, हे आमच्या चित्तात सासरजमा असे दोस्तीचे ठाईं ज्यादा कलमी कायेद्याप्रमाणें महाराज राजे याचे मोहरे निशी येक पत्र यावें तैसेच सरकारचें पत्रांत ल्याहावें जे महाराजानीं लिहिल्या प्रमाणें तुम्ही अमलात आणावें येणेकरून खुषी होऊन दोस्ती राहात आहे अेणेकरून आमचे राजेयाचे घरचा बंदोबस्त होऊन संतोष होवेल तें करावें बाबरी ऐसें सरकारचें पत्र मर्जीस आल्यास सरकारचे तर्फेनें जे ल्याहावयाचे भाव ल्याहावे तिसरें, आपलें खास पत्र यावें जे, येथील कितेक बाबती राजे यानीं व श्रीमतांनीं तुम्हास लिहिले आहेत त्याप्रमाणें संस्थानचा बंदोबस्त करून उत्तरें लवकर पाठवावीं येणेकरून सकल लोकांस समत व खुषी होत आहे अेणेकरून न्यायेप्रकारें कोणी शब्द ठेविनासारिखें आम्ही लिहिल्याप्र माणें अमलात आणावें सर्व बाणत्यास विशेष काय लिहिणें असे ऐशीं तनि पत्रें आणवावीं म्हणून सांगितलें, व मसविदाही त्यांनींच ठराऊन दिल्हा त्याप्रमाणें सेवेसी विनति लिहिली आहे तरी याविषयींची तजवीज करितां लिहिल्याप्रमाणें पत्रें यावीं येणेकरून सरकारास कीर्ति येत आहे दुसरे संय स्थानचा अभिमानही प्रसिद्ध होऊन दाब राहत आहे नूतन स्थापना जाहा ल्यासीयाय सरकारचे लक्षांत येत नाहींत अधिकारस्थ विप्रास आकाश ठीट थोट आहे कोणासही म्हातेंरत आणीत नाहींत आपले ठिकाणीं जशी सर कारची मोहर आहे तद्वत पंतप्रधानाची मोहर केली असो आपले परांत काहीं करोत परंतु सरकारची बरोबरी व सरकाराशी स्पर्धा केल्यानें कल्याण कैसें होतें राजपत्न्या वगैरे सर्वत्रांस येदिल करें आहे हें समग्र तपशील ता

सिले सरकारचे जोडबिराबरी सेवेसी लिहिले आहेत. त्यावरून ध्यानास आलें असेल. यांची उत्तरें लवकर यावी. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्रांक ३५७ श्रीव्यंकटेश प्रा. १७१३

सेवेसी सा नमस्कार विनती ऐसी जे. स्वामींनीं दोन नकला व एक पुरवणी कित्ता खास दस्तूरची चिठी पाठविली ती पाऊन भाव समजला. स्वामीनीं लिहिलें ते सर्व यथार्थ आहे. मीहि स्वामीच्या आज्ञेप्रमाणेंच वर्तणूक करितों. स्वामीकडे जाऊन आलो याच तर्कावर कयास बांधून रास्ते यास लिहिले असतील, इतकाच अर्थ. आपण चित्तात संदेह आणूं नये. वरीष बारा जाल्यासहि लेख किंवा उच्चारात गोष्टी येणार नाही. आदिपश्चात सर्व ध्यानात धरून कोण्या रीतीने आज्ञा कशी कशी जाहली आहे त्याच बेताने कार्यास प्रवर्तलो आहे. इकडीलविशीं जशी पाहिजेल तशी खातीरजमा असली पाहिजे. पेशर्जी दुर्गचें टिप्पण करून पाठविलें आहे, म्हणोन सेवेसीं विनती लिहिली होती. त्यास, एक वेळ तेथपर्यंत माणूस जाऊन वाटा चालत नाहींत. दुर्गाभोवताले स्वार फिरत आहेत आणि दुर्गचें संधानहि भाऊकडे लागले आहे. अशात, आपण गेले असता पत्र पुढे रवाना होणार नाहीं, म्हणोन माघारा आलों. त्यानंतर सर्वेच त्या बा जोडी करून देऊन तेथें एक दोन पत्ते पूर्वील वळखीचे बोलेने संधान होते ते सांगून, मुख्य कोठे आहे तेथेंच रवाना केले आहे. माणूस येथून गेला तो शाहाणा आणि इतबारी, यात गुंता नाहीं. दोन रोज अधिक उणे, उत्तर घेऊन येईल. कामकाज बनून येणें तेथील आस्था प्रमाण. राजश्री आपाजीराम संधानाकरिता आला आहे ह्मणोन येथे आल्यावर ऐकिलें, हेंहि खरें. पूर्वीं कराडीं असतांना पळून सावनुरास आला आहे, ऐसे ऐकिले होते. येथे आल्यावर व स्वामीच्या लिहिल्यावरून संधानास आला आहे, असे समजले. पूर्वीपासून त्याचें लक्ष्य स्वामीच्याठाई नीट आहे आणि माझे सर्व ठाईंहि विश्वास आहे. त्याजकडे कोणासहि पाठविल्याने आम्हाकडे वळेल. यात गुंता नाही. परंतु मुख्य बडबड्या व भोळा. चित्तात गोष्टी राहत नाहींत. कागदींपत्रीं जावसाल लाविल्यास, आपल्या महत्त्वाकरिता पत्रे दाखवायास देखील अंदेशा करणार नव्हे. तो साधक नव्हे. सिद्ध पुरुष आहे. तेव्हा इकडील अडचणी त्याचे ध्यानात कोठून भरणार? याजकरिता कागदींपत्रीं संधान नीट पडणार नाहीं.त्याकडेहि कोणसा आप्त पाहून निरोपानेंच स्थूलमानेकडून तेथीलहि भाव घेतो. मुख्य मूळापासून काम होऊन आल्यास सर्वोपरी चांगले. त्याच प्रयत्नात आणखी एकदोन संधाने आहेत. एक वेळ हरप्रयत्नें श्रीमंतानीं आपणास सांगितल्यावर शेवकहि हडी तो उतरून देतो. पेस्तर सिद्धीस नेणे स्वामीकडे. आमचे चुलते तीा रा लक्ष्मणराव व रामराव ह्मणोन, बाहादराच्या सैन्यास स्वामी होते त्या वेळेस

त्याची भेटी स्वामीस करविली होती आणि त्याचे प्रयोजनास स्वामी अनुकूल झाले होतेत यदुसफरून स्मरणात असेल तीा लक्ष्मणराव तो त्यांजकडेच आहेत तीा रामरावकाका हे मात्र वराड आले होते ते आजपर्यंत घरींच होते सांप्रत आमच्या भेटीकरितां आणि एकदोन मुलीहि पाहून आहेत ते येथेंच आहेत त्यांसीहि वरचेवर बोलण्यांत येत जावें पुढें परंतु पूर्ण निखालसता आमची जाली म्हणजे त्याची रवानगी मुख्यापर्यंत करून, मनस्यास हुजुरात राहून कामकाज करून वरचेवर पाठवणेस येईल, आणि योग्यताहि आहे चित्तावर घेतल्यास सर्वहि करितील हें आणून त्याची रवानगी करावी म्हणतों पुढें समर्पक दिसल्याप्रमाणें करीन कोणेविषयींहि इकडील चिंता आपण करूं नये आपल्या घाटेस येई तोच प्रकार इकडून घडेल पत्र पाहून विसर्जन करावें लोभ करावा हे विनंती तीा रा रामरावकाका यांणीं स्वामीस पत्रें लिा आहेत विदित होईल हे विनंती

---

पत्रांक ३५८ श्री १७९३ वैशाख सुमारें.

पुरवणी सेवेसी विज्ञापना

× + + घडवाव्या त्या आज्ञापासून जाल्या नाहींत त्यांचीं कारणें तर्फी च पत्रीं सांगतां येत नाहीं त्यास, आता श्रीमंत राजश्री नाना यांणीं सद सबबीं बोलणें ऐकोन घेऊन तहावरील गोष्ट पाहित असल्यास, मीच पुणियासी येतों याचसबबें आम्हीं टिपूस लेहून पाठवून, लाख दोन लाख रूप यांचें जवाहीर नजर करावयासीं घेऊन येतों आमचें बोलणें सर्व ऐकून घेऊन, जेणेंकरून टिपूची दौलत राही अशी एखादी तोड काढून समेटांत आणावें असें बहुत सपसीलें विनंती करावयासीं सांगितली आणि आपल्यास यणेविशीं श्रीमंतांनीं आज्ञा केल्यास, टिपूकडून जवाहीर नजरेचें आणावयाचें त्यास वाटेनें साडणीस्वार निभायले पाहिजेत त्याविशीं श्रीमंतांचीं पत्रें राजश्री तात्या यांसीं व राजश्री भाऊ यांसीं असावी नाहीं तरी, मध्येंच लुटले जातील असें सांगितलें त्याजवरून सेवेसीं विनंती लिहिली आहे सेवकास बदरीजमानखान बक्षें देत होता घेतलीं नाहींत तेव्हां एक घोडा लहानसा द्यावयासीं लागला तोहि मीं घेतला नव्हता मी निघोन पुढें सात आठ कोश आलों तेथें मागाहून माणसाजवळ देऊन मजकडे पाठविला तथापि मी घेत नव्हतों माणूस माघारा घेऊन जाइना तेव्हां तो घोडा मी बरोबर घेऊन आलों आहे बदरीजमानखान बहुत योग्यपणीं बोलला आहे सेवेसीं आल्यावरी समक्ष विनंती करीन करवीरास आलों, तों महाराज श्रीकृष्णा स्नानास यन्यागत आहे म्हणून गेले पांच सात रोजीं येतील आले म्हणजे येथील गुता उरकोन सेवेसीं येतों बदरीजमानखान याचे बोलण्याचा भाव

आतुरपणा बहुत दिसतो. कसेहि करावे आणि तह होय अशी गोष्ट व्हावी असे बोलणे आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.*

---

पत्रांक ३५९ श्री १७१३ वैशाख वद्य १३

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री हरी बल्लाळ स्वामी गोसावी यांसी:—पोष्य माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष. तुम्ही पत्र छ ५ साबानचे पाठविलें तें छ १३ मिनहूस प्रविष्ट जाहले. व दुसरे पत्र छ १० साबानचे पाठविलें तें छ १८ मिनहूस पावोन लेखनाभिप्राय अवगत जाहला. नवाबाची भेटी प्रथम दिवशी जाहलियावर पत्र आले त्याचे उत्तर पेशजींच रवाना जाले आहे. नवाबाशी मसलतीची बोलणी ठगवात येऊन, तुम्हीं कूच करून सरकारचे फौजेंत कर्नूळचे मुकामी दाखल जाला व नवाबाची फौज सामील जाल्यावर पुढें जावयाचा इरादा होईल. इग्रजानें बेगरूळचा किल्ला छ १५ रजबीं घेतला म्हणून किन्विस लिहून आले त्याजवरून लिहिले ते कळले. इग्रज श्रीरंगपट्टणकडे जाणार. मार्ग दुर्घट. तथापि बातमी येतच आहे तशी लिहिन म्हणून लिहिले ते कळले. व दुसरे पत्री मजकूर की, नबाबाची फौज चाळीस कोसाचे अतराने इग्रजाजवळ जाऊन पोंचली. दरम्यान टिपू आहे ह्मणून अवघड. सरकारची फौज दहा हजार पुढे पाठवायची त्याची तयारी केली. त्यास नवाबाची फौज गेली त्याच मार्गें रवाना करितों, म्हणोन लिहिले ते कळले. टिपूस व इग्रजाचे फौजेस आठ कोसाचे अतर होतें. त्या पक्षीं मुकाबले झालेच असतील. बातमी येत जाईल तशी वरचेवर लिहून पाठवित जाणें. जाणिजे. छ १ रमजान सुहुरसन इहिदे तिसैन मया व अलफ. बहुत काय लिहिणे ? हे विनती. पो छ २७ रमजान, मुा नजीक श्रीरंगपटण.

---

पत्रांक ३६० श्रीव्यंकटेश प्रा. १७१३ ज्येष्ठ

शेवेसीं सा। नमस्कार विनती ऐसीजे. तीा रा आनंदराव बागलकोटेस आले आहेत. म्हणोन ऐकिले आणि आपणासहि पुणेहून कळून लिहिले. त्यानी आपल्या महत्वाकरिता बागलकोटेस राहून दक्षणेकडील बातमी पुण्यास रास्तेकडे लिहून पाठवीत असतात. त्यात, मी पुणेस जात असता मध्ये स्वामीकडूनच फिरोन आलों. त्याजवरून कयासानें लिहिले असेल. आह्मीं तेथून आल्यावर कोणासहि भापणात आणिले नाहीं. त्याचे लक्षणें नाहीं. ते सभूती उठऊन थोरथोरामध्ये विक्षेप पाडावा हें पूर्वीपासून. त्यांत

---

* पत्राचा पहिला किंवा पहिले बंद गहाळ.

स्वामीची कृपा माझे ठाई आहे त्यास, इसप्रकारें रास्तेस लिहून पाठऊन त्यांत व आपणांत पुन्हा विक्षेप पाडावा, त्यायोगें मी स्वामीच्या पायांपासून दूर व्हावें, ही कवायत पुष्कळ भरले आहे सर्वीहि स्वामीच्या ध्यानांत असों यावें मी बहुत सावधगिरीनें वर्तणुक करितों स्वामीचें बोलणें किंवा लेख प्राणहि गेल्यास इतराच्या दृष्टीस अथवा कर्णास स्पर्श होणार नाहीं, ही खातरजमा असावी माचें निदर्शन दिवसें दिवस कार्यावर समजत जाईल हें पत्र आपण मनन करून सर्वेच विसर्जन करावें टिपूचाचें वर्तमान बेंगळु रापलीकडे वाटेंत मागडीचा किल्ला आहे तेथें सरजाम ठेऊन, आपण पुढें करेशाकरेधात, गीविलें थावतगी म्हणोन पाहावी लोक आहेत त्यांचे आवरियानें जबरदस्तीनें आहे तूर्त मात्र, इकडील फौजा पटणपर्यंत जाऊन लूट करून घेऊन येतात एंवढा प्रर्जन्यकाळीं कांहीं दम असल्यास उपद्रव्याप करील सोडणार नाहीं केवळ तो यासमई मुवाल्यासारिखा आहे परंतु, परि णामास जी गोष्ट उतरेल ती खरी अवरंगचा भाव इंग्रजांशीं स्नेह करून घे ऊन, उपरांतीक इकडील समाचार घ्यावा, या याचनेत आहे येविशीं इंग्रे- जांशीं जावसाल फराशिसाचे विद्यमानें विलायतींत लिहून पाठविला आहे, म्हणोन कोणी कोणी तिकडील पक्षाचे बोलतात सर्व निदर्शनास येईल तें खरें आम्हांकडूनहि माणूस गेला आहे त्याचें काय उत्तर येतें तें पाहावें आणि तीा रामराव काकासही रवाना करितों कसें कसें उत्तर येत जाईल तें सेवेसी श्रुत करीत जाईन एक वेळ स्वामीच्या विचारें पुन्हां त्यांजकडील अनुसंधान लागावें, तेणेंकडून सेवकाची सेवा रुजू व्हावी, ही इच्छा आहे परिपूर्ण करणार श्रीहरी आहे हे विनंती

---

पत्रांक १६१ श्री व्यंकटेश प्रा १५१२ ज्येष्ठ वद्य १०

पो छ २१ जिल्काद, इसने तिसैन

स्वामीचे सेवेसीं विनंती पोष्य भुजंगराव अण्णाजी सा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ज्येष्ट वदि १० पावेतों स्वामीचे कृपेंकरून यथास्थित असे विशेष अलीकडे स्वामीकडून कृपापत्र येऊन वर्तमान कळत नाहीं येणेंकरून चित्त सापेक्षित आहे तर, सदैव कृपापत्र पाठऊन सांभाळ करणार स्वामी समर्थ आहेत इकडील वर्तमान पेशजी स्वामीकडून माणसें आलीं होतीं त्याजबरा विस्तारें लिा आहे विदित जाहलें असेल यागडकोटेस तीर्थरूप आनंदराव आहेत त्याचें पत्र आलें होतें त्यांत दक्षिणेकडील वर्तमान होतें जे टिपूसो नागमंगळावर होता त्यास साहा कोसांचे अंतरानें इंग्रज व मोगल उतरले होते यांजवर छापा घालावा म्हणून तयार होऊन येत अस तां, उभयतांस वर्तमान कळून, हुशारीनें मुनगें मार्गे देऊन, पुढें सटे होते

याची त्यांची गांठ पडून दोन प्रहरपर्यंत गोळागोळीनें लढाई जाहली. उभयपक्षीं लोक फार जाया जाले. शेवट टिपूसो सर्वेच निघून पटणास दाखल जाहला. त्यानतर, हेहि जाऊन लागलीच कावेरी पार होऊन शहर गंजम येथें उतरले आहेत, ह्मणोन वर्तमान. आणि कोणी कोणी म्हणतात जे, पटणास मोर्चे लाविले आहेत ह्मणोन, पटण घेतलें, टिपूसो,सडे पळून गेला ह्मणोन. असें तिकडे अनाहूत जाले आहे. ह्मणोन वर्तमान ऐकिलें ते शेवेसीं लिा आहे. यात खरेलटके स्वामीस पुण्याहून बातनीचें वर्तमान येत असेल त्या अन्वयें पाहावे. एकूण तूर्तच्या प्रसगीं तिकडील तों असे आहे. हेच शाश्वत राहोन परिणामीं भटी नीट उतरली पाहिजे. राजकारण कोण्या थरास जातें पाहावे. स्वामीस सैन्याहून व पुण्याहून तहकीक वर्तमान येत असेल. तपशीलवार लिहून पाठवावे. व इकडूनहि माणसे गेलीं आहेत. अद्यापि फिरलीं नाहींत. येताच तहकीक वर्तमान कळेल. त्याप्रो शेवेसी विनती लिहीन. अवदा नवरा व नवरी दोन्हीं चित्ताप्रमाणें मिळालीं नाहींत. याजकरिता लग्नें राहिलीं. पुढें ऋणानुबध सर्वांविशी स्वामीचे पाय आधारभूत आहेत. विशेष लिहिल्या उपरोध दिसेल. क्रिया केवळ उत्तम. सर्वज्ञाप्रति बहुत काय लिहिणें ? लोभ असो दीजे हे विनंती.

---

पत्रांक ३६२ श्री व्यकटेश प्रा. १७१३ श्रावण वद्य २

पो छ १४ जिल्हेज

इसने तिसैन

स्वामीचे शेवेसीं. विनंती. भुजंगराव अण्णाजी कृतानेक सांा नमस्कार विनंती येथील कुशल तागायत आपाढ वद्य ७ पावेतों स्वामीच्या कृपावलोकने करून यथास्थित असे. विशेप. इकडील वर्तमान लिहून लाखोटा बागेवाडीकर सुभेदार याच्या विद्यमानें पाठविला होता. शेवेसीं प्रविष्ट होऊन मजकूर विदित जाहला असेल. आज पावेतो त्रिवर्गाचे शैन्य पटणासमीप होते. सांप्रत पर्जन्यकाळ आला याजकरिता, उभयतांनीं कार्याकारण पार्यचे लोक फिरगीयाचे हमराहा करून, फौज घेऊन, माघारे चित्रदुर्ग व गुती या पट्टीस छावणीस येणार. टिपूसो आजपावेतो किल्ल्यांत होता. तो, किल्याबाहेर उभयकावेरीमध्यें दोन पेठा आहेत, त्या दरम्यान येऊन उतरला आहे. तहाचे बोलणेंहि लाविले आहे, ह्मणे. या प्रकारें कोणी कोणी तिकडून आलेले गृहस्थ तहकीक वर्तमान ह्मणोन सागतात. परतु लष्करची व मुख्यमुख्य स्थलची बातमी पुण्यास येऊन परभारें स्वामीस विदीत होत असेल. त्यात लिहिलें येईल ते खरे. येथें ऐकिलेलें शेवेसीं विनती लिहिली आहे. मुख्यापर्यंत आह्माकडूनही तीन प्रतीचीं पत्रें व माणसें गेलीं आहेत. त्यांतून एकहि पुनरागम नाहीं. तात्या साहेब! पूर्वीं कोण्ही एक्या पादशहाने कृपावत होऊन

एक्या महत्त्वास समुद्राच्या लाटा योजून आणणें बहुत श्रेया सांगितली, सबे! याचा अन्वये माझ्या उमेदीसही श्रेया योजून मुख्य स्थळाहून प्राप्त जाहली तेव्हां दैवाची परिक्षा समजावी आताचा प्रसग पाहतां, आमच्या हातून कार्य सिद्धी घडून स्वामीची व यजमानाची कृपा यथादर्षे उघड दिसत आहे त्यांतहि श्रीहरीच्या चित्तीं काय आहे नकळे! कोणत्याहि आर्तीत एकवेळ त्याहून अधिक चाकरी करून पुत्रपौत्रास अन्नास ठिकाण करितात असमा दिकांच्या जातीस वारवार यथार्थ चाकरीवर कृपा स्वामी ऐसें ठरलें असे! योजिल्या प्रमाणें सरकारचाकरी घडल्यास सत्वरीच स्वामीचे पाय पाहणें नाहींपर्वी कृपेची वृद्धी असावी अंवदा कर्नाटकात फौजा गेल्यामुळें श्रीमंतां च्या नांवाप्रमाणें कार्य तो सिद्धीस गेलें, व बहुत लोक, गतराज्य व प्राम व उद्योगगत व नूतन संपादन श्रीमंतास कल्याण चिंतून खुशाल आहेत आम्ही हि त्याहून अधिक चित्तांत आनंद मानून, रात्रंदिवस स्वामीच्या पायांचें स्मरण करीत, या प्रांतात कुटुंबसुद्धा आनंदेंकरून आहों स्वामीची कृपादृष्टि पूर्ण असावी मीहि एक वचनाचा दास स्वामीचा आहें विसरूं नये ही विनंती उभयतांसहि मिळून आहे लोभ करावा हे विनंती

---

पत्रांक ३६१ श्री १७१३ श्रावण वद्य २

राजश्री तुकोजी होळकर गोसावी यांसीः—

छ सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो माधवराव नारायण प्रधान आशिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें विशेष राजे माधिकपाळ संस्थान करोली मंडरायल याजकडे सरकारचा सालाबदी ऐवज येणें त्यापैकीं बाकी बहुत राहिली आहे त्यास, तुम्हीं फौज पाठवून, संस्थानिकास त्रास देऊन, ऐवज बाकी सुद्धां महिपतराय कृष्ण व रा रामचंद्र माहादेव याच विद्यमानें वसुलांस येऊन, पुढील सरकारचे साला बादी ऐवजास नेहमीं गाव लाऊन देवावा, याविषीं पत्रजी तुम्हांस लिहिलें असतां, अद्याप बंदोबस्त यथास्थित जाहला नाहीं, सणोन हुजूर विदित जालें त्याजवरून हें पत्र लिहिलें असे तरी तुम्हीं संस्थानमजकुरी फौज पाठऊन, संस्थानिकास त्रास देऊन, सालमजकूरपर्यंत मागील बाकीसुद्धां ऐवज मार निलेकडे वसूल होय तें करणें व पुढें सरकारचे ऐवजास गांव नेहमीं लावऊन देवऊन, अमल सुरळित चाल तें करणें जाणिजे छ १४ जिल्हेज, सुा इसने तिसैन मया व अलफ बहुत काय लिहिणें! हे आशीर्वाद मोर्तब असे

---

पत्रांक ३६४ श्री १७१३ श्रावण वद्य ८

श्रीमत महाराज राजश्री नाना साहेब स्वामीचे शेवेसी:—

आज्ञाधारक शामराव बल्लाळ कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना ता। छ२१ जिल्हेज सोमवार दोन प्रहर दिवस महाराजाचे कृपावलोकनेंकरून मुकाम वरुड नजीक वाफगांव मडळीसहवर्तमान येथास्थित असे. विशेष. दत्तु खिजमतगार याणें मल्हारजीस तयार करून रातोरात काढून न्यावे हा विचार पका जाला. ही बातमी रा। भगवंतराव बल्लाळ दिवाण मानिलें याणें जलदी करून सिबदीचे लोक ममतेचे दत्तूकडे पाठवून, दत्तूस हस्तगत केलें. हा मजकूर मल्हारजीस कळताच त्यांणी दत्तूची कुमक केली. ह्मणोन सिध्याहाती मल्हारजीसही धके मारून वाड्यांत अटकाऊन भोंवताली चवकी बसविली. खूनकरी दत्तु व खासा मल्हारजी कैद केला आहे. त्यास महाराजानीं, मतकर होळकरांचा मामा वाकडू पा। सेवसी आलाच आहे, त्याची खातर रक्षावी. हा प्रसंग उपयोगींचा आहे. तीर्थस्वरूप राजश्री नारायणराव व सखारामपंत याजकडे रातोरात दत्तुखिजमतगारास कैद केल्याचें वर्तमान लिहिलें आहे. त्यांणीं श्रुत केले असेल. पक्की बातमी भगवंतराव यांजकडे सूत्र आहे, तिकडून आली. महाराजाचे पायांचे प्रतापें जें होणे ते होत आहे. उत्तराची आज्ञा व्हावी. बहुत काय लिहिणें ? कृपा करावी. हे विनति.

---

पत्रांक ३६५ श्री ( नकल ) १७१३ आश्विन शुद्ध १

राजश्री बळवतराव माहादेव कादार पा। आमझरे गोसावी यांसी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ माहादजी शिंदे दंडवत. सु॥ इसन्ने तिसैन मया अल्लफ. बद्दल देणें विनायक माहादेव व नारो कृष्ण कारकून नि॥ बक्षी. यांसीं वेतन जातीस व मुदबखचे रोजमुरे व शागिर्दपेशा वगैरे बाबत. ता। सन इहिदे तिसैन अखेर साल बा। करार चिठ्या ए॥

| | |
|---|---|
| ८२८० | वेतन व शागिर्द पेशा वगैरे दरसाल रु॥१८२० प्रा हिद छ १७ सफर सन सबां ता॥ सन इहिदे तिसैन अखेर साल माहे ५४८१८ आकार रु॥८२८० |
| २१४॥ | मुदबख बा। वगैरे सालिना ७०२ रु॥ प्रा हि॥ छ ९ जाखर सन इहिदे ता॥ छ १७ सवाल येकंदर साल माहे ३८२० |
| ४३९। | दफ्तरखर्च नि॥ बक्षी खा॥ कागद व समया |
| ११७ | खा॥ उटनफर १ एकूण रु॥ |
| १६४९॥। | चदी व लागवड घोड्यास व उटास इ॥ सन तिसैन ता॥ सन इहिदे तिसेन दुसनला रु॥ |

१४६। सारवान व मसालची याचे हिशेबाबद्दल रुा
१४२। रुा तेल दीपास व मशालेस

१०९९०

पैकीं आदा, पाथर्डी माहाल पौ मा आपाजीराम फडणीस रुा ५५००
बाकी देणें रुा ५४९० पैकीं पा सझोदे वगैरे माहाल येथील सन सलास
तिसैनचे रबीचे ऐवजीं वराव लाऊन दिल्ही रुा २७४० बाकी देणें ते
२७५० रुा एकूण दोन हजार सातशें पंनास रुा वुजाकरून देविले असेत
तरी पामार येथील पेस्तर साल सन सलास तिसैनचे रबीचे ऐवजीं सदरहु
सत्तावीसशें पंनास रुा जेष्ठ शुा १५ पौर्णिमा शके १७१५ पंधराचे मितीस
मारनिल्हेस उज्जन चल्पी आरा करून कबज घेणें जाणिजे छ २९ माहे
मोहरम बहुत काय लिहिणें ? हे विनति मोर्तबसूद

पत्रांक २६६ श्री १७१२ पौष वद्य ११

दडवत विनंति आपण वेदमूर्त राजश्री नारायण भट बावा दीक्षित यांजबरोबर आशीर्वादपत्र पाठविलें, तें पावोन समाधान जाहालें पत्रीं लिहिलें कीं, दो लग्नाचा उपाधेपणाचा विषये राहिला आहे, तो नारायणभट बावास देणें म्हणून लिहिलें, त्यावरून आम्ही त्याचा फडशा केला आपण रविसंक्रमणाचे तिळ शर्करायुक्त पाठविले ते पावले स्वीकार केला वारंवार आशीर्वादपत्र पाठऊन परामृष करीत असावें बहुत काय लिहिणें ? कृपा लोभ असों दिला पाहिजे हे विनति

पौा पौष वद्य ११, विरोधकृत

पत्रांक २६७ श्री रामोजयति १२१४ चैत्र शुद्ध १०

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गणेशपत दादा स्वामी यांचे सेवेसी —

पोष्य राघो आपाजी कृतानेक सां नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित गेलें पाहिजे विशेष आम्ही लष्करांत यजमानासमागमे गेलों होतों, त्यास रविवारीं सायंकाळीं नांदगांवास आलों त्यास, आपले भेटीस सत्वरच येतों पुणियाचे मुक्कामीं आपले व राजाचें बोलणें जाहलें त्याजे तेच आपण जाहेत त्यावरून आम्हांस राज्यांनीं माघारें रवाना केलें आहे तर महसबद सर्व पेशजीपासून बोलणें आहे गुदस्तांहि बोलणें जाहलें त्याप्रमाणें आपण निभावणी करून घेतली बाकी बोलण्यापैकीं बाकी राहिली आहे त्यास, भेटी नंतर फडशात येईल दाखांचेहि बोलणें आहे त्यास,

आल्यानंतर आपले विचारें होणे ते होईल. आम्हांस भाऊ आपण म्हणविल्याचा अभिमान सर्वप्रकारें आपणासच आहे. तेथे लेहून कळवावें ऐसें नाहीं. म्हसवडाविषयीं आता नवीन काहीं घालमेल न करावी. सुदाम यजमानानीं आपलेकडे पाठविले आहे. आणखी कितेक बोलणीं आहेत. समक्ष बोलणें होईल. येविषयी राजश्री तात्या स्वामींसही विनति करावी. आह्मी पदरचे आणि राज्याविषयीं सर्व प्रकारे अभिमान आपणास उभयता आहे. त्यापेक्षा कोणताही अर्थ दुसरा नाहीं. वचनें दिल्हीं तीं रामबाण आहेत. आताच येतों. परतु स्वारीचेमुळे उष्णाचा उपद्रव जाहला. त्यास, प्रकृतीस ठीक नाहीं. काहीं स्वस्थ जाहल्यावर लवकरच येतों. दादा ! भाऊ म्हणविल्याचा अर्थ आपण शेवटास न्यावा. काम काज होणें तीं होतील. राज्याचे अभिमानी आपण. त्यापेक्षां आह्मी ल्याहावें, ऐसें नाहीं. पत्राचें उत्तर द्यावें म्हणजे दोन रोज आज्ञेप्रमाणे राहुन येईन. नाही तर, तैसाच येतो. कळावे. बहुत काय लिहिणे ? लोभ करावा हे विनती.

पैवस्ती छ ९ साबान ईसनै तीसेन.

---

पत्रांक ३६८ श्री १७१४ आषाढ वद्य १०

वेदशास्त्रसपन्न राजश्री सदाशिव दीक्षित वाजपेययाजी स्वामींचे सेवेसीं:—

विद्यार्थी बाळाजी जनार्दन सा। नमस्कार विनति येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावे. विशेष. आपणाकडून ज्येष्ठ शुद्ध येकादशी व आषाढ शुद्ध चतुर्थीचीं पत्रें आलीं तीं पावलीं. लिहिला मजकूर कळला. राजश्री कृष्णराव अबीकर याचे पथक सातारीयांत चाकरीस आहे. त्यांतील स्वारानीं गुदस्ता श्रावणमासीं आमचे वाड्यांत येऊन रात्रौ मारामार केली. खिजमतगारास तोडलें व माहातास मारले. अशी आगळीक केली. याचा जाबसाल त्याणीं करावा तो अद्याप केला नाहीं. येविसीचा विचार आपण केला पाहिजे. व आंबे याची डाली येक पाठविली आहे घ्यावी. म्हणोन लिहिले. ऐशियास, आपलें पत्र आलें, त्यावरून राजश्री सदाशिवपंत अभ्यकर यांस अंबीकरास ताकीद करून ज्यापासून आगळीक जाली असेल त्याजकडून आपणाकडील माणसाची समजूत करवावी ह्मणोन लिहिलें आहे. ते करवितील. आंबेयाची डाली एक पाठविली ती पावली. * रा। छ २२ जिलकाद. लोभ असो दीजे. हे विनति.

पौ आषाढ वद्य १४, परिधावी सा.

---

* येथपासून अक्षर नानाफडणिसाचें.

पत्रांक २६९ श्री ( नक्कल ) १७१४ भाद्रपद वद्य ११

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री मोरोपंत स्वामीचे सेवेसी —

पो माळाची जनार्दन सां नमस्कार विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष वेदशास्त्रसपंन्न राजश्री सदाशिव दीक्षित ठकार वाजपेययाजी यांचें वर्षासन रुो एक हजार पो सटाण येथील देश मुखीचे ऐवजावर आहे त्यास, साल्गुदस्तां सन इसन्ने तिसैनचे वर्षासनाचे रुो दीक्षितांस पावावे, ते पावले नाहींत म्हणोन कळलें त्यास, तुम्ही पो मजकूर येथील देशमुखीचे हकापो एक हजार रुो वसूल करून साल्गुदस्तां सन इसन्ने तिसैनचे वर्षासनाचे सदरहू रुो दीक्षितांस पावते करून, त्यांची पावती घेऊन पाठवावी कदाचित् साल्गुदस्ताचा ऐवज फत्तरे यांणीं नेला असल्यास, सालमजकुरीं देशमुखीचे ऐवजीं निकडीनें वसूल करून, दीक्षितांस पावते करावे रा छ २४ मोहरम बहुत काय लिहिणें ! लोभ असों दीजे हे विनंति

---

पत्रांक ३०० श्रीगणपती १७२४ पौष शुद्ध १२




अजरत्वारी राजश्री परशराम रामचंद्र सा मोकदमानी, मौजे बोरगांव, प्रा सिराळें सुा सलास सितैन मया व अलफ

राजश्री येशवंतराव सगनीवन नाडगौडा, पो मजकूर यांजकडे कर्जाऊ ऐवज येणें त्याचे रद कर्जास प्रों मकुरची नाडगौडीचा ऐवज लाऊन दिल्हा त्याचें वसुलाचें काम राजश्री गोविंद रघुनाथ जोशी यांजकडे सांगोन आलाहिदा सनद सादर जाहाली असतां, मौजे मजकूरचा हकाइनामाचा वसूल सुरळीत देत नाहीं, म्हणोन विदित जाहालें तर, सालाबादप्रमाणें हकाचा व इनामाचा वसूल सुरळितपणें मशारनिल्हेकडे देणें

इनामाचा वाटेकरी यांस ताकीद करोन बाकी देवणे. फिरोन बोभाट येऊ न देणें, जाणिजे. छ ११ जमादिलावल.

मोर्तब
सुद.

---

पत्रांक ३७१ श्री. १७१४ माघ शुद्ध १३

विनती विज्ञापना ऐसिजे. नवाबानीं हिशबाचे प्रकर्णी मुनीरुलमुल्ख बाहादूर व राजे चंदूलाल यासीं पेशजीं बोलणें केलें होते. त्याजवरून कारभारी व मुत्सद्दी याणीं हिशेब तयार करून दाखविले. ते प्रत्ययास न येतां उत्तरें होत गेलीं. यास्तव राजाजीनीं आपले खाविंदाचे मर्जीचा खुलासा माहालातून व शिकंदरयारजंग व शिकंदरकुलीखा याजकडून घेऊन कृपा संपादावी, याजकरिता काहीं ऐवज नजर प्रमाणें कबूल केला होता. त्या ऐवजाची तर्तूद होऊन प्रविष्ट जाला नाहीं. यास्तव नवाबाकडील बोलणार निरंतर उभयता कारभारी याजकडे येऊन बोलणें करीत होते. परतु जाबसाल उगवण्यांत आला नाहीं. जाणोन छ ४ रोज गुरुवारीं प्रथम प्रहर रात्र गुदरल्यावर, नवाबानीं चोपदारासमागमें मुल्खमनसूफ व राजाजी यांजकडे ऐवज प्रकर्णी निरोप निकडीचा सागून पाठविला. त्याजवरून राजे चंदूलाल आपले जागा बहुत विचारात राहून, मीरआजमदअलीखां यांस बोलाऊ पाठविलें. मशारनिले, आलियानंतर दरबारास जाब सागून, आपण व राजे गोविंदबक्ष व खानमजकूर याचीं बोलणीं खिलवतीत अडीच प्रहर रात्रपर्यंत जाहालीं. छ ५ रोज शुक्रवारीं राजाजी दरबारास मुनीरुलमुल्खबहादुर यांचे जाण्यापूर्वीं भोजनाचा गुता उरकून, प्रथम प्रहराचे अमलात मुत्सद्यासहित खिलवतीचे दिवाणखान्यात जाऊन बैसले. उपरातिक दोन घटिकाचे अवकाशानें मुल्खमवसूफ येऊन पोचले. उभयता कारभारी दरबारास आल्याचे वर्तमान समजल्यानतर, नवाब नवेदमहालात बरामद जाहले. तेथे शामतजग व हाफजयारजग व शिकंदरकुलीखा व आसदयारजंग व अकबरयारजग व मयाराम व मिर्धेताहरअलीखा यास बोलाऊन घेतले. त्याचा सलाम मजुरा जाहाल्यावर किताबा पाहात बैसले. मीरदेतोहरअली समागमें शुका लेहून कारभारी याजकडे पाठविला. तो उभयतानीं पाहून, त्याचें प्रत्योत्तर लेहून दिल्हे. दोन प्रहर दोन घटकापर्यंत तीन वेळा नवाबाकडून शुके मिर्धे व आसीकबराबर आले ते पाहून त्या......तर, राजे चदुलाल याणीं पाठविली. मर्जीप्रमाणे जाबसाल उगऊन आले नाहींत. याजमुळे दरबारास जाब न सागता निद्रा केली. कारभारी खिलवतीचे दिवाणखान्यात बसून राहिले. तीन प्रहरांनंतर

चापस होऊन कारभारी याजकडे निरोप व शुक मिर्झेबाहदरअली व असीक समागमें पाठवीत गेले त्याचीं उत्तरें व हिशेबाच्या फर्दा सरत्तेवर साविदाचे आज्ञेअन्वयें तयार करून राजे चदूलाल पाठवीत होते एक प्रहर दोन घटका रात्रपर्यंत बैठक होऊन परस्पर शुके येत गेले नबाबाचे मनोदयारूप अमलांत न आलें रात्र फार आहली यास्तव दरबारास आव बोलून मना न्याचा बंदोबस्त जाहला कारभारी व मुत्सद्दी आपआपले मकानास गेले राजाची हवेलीस येऊन पोंचतांच, मीरअमदअलीखां इंग्रेजाचे कोठीस जाऊन, त्यासीं बोलणें करून आले होते त्यांजला बोलाऊन घेऊन गोविंदबक्षसहित त्रिवर्गांची खिल्वत अर्धीच प्रहर रात्र पावेतों जाहली उपरांतीक खानमबसुफास निरोप देऊन, उभयता बधूनीं भोजन करून, निद्रा केली छ ६ रोज मदवारीं प्रथम प्रहरांत कारभारी व मुत्सद्दी यांनीं नित्यनेम उरकून दरबारास जाऊन, दिवाणखान्यांत बैसले नबाब नबेद माहालांत जनान्याचे बंदोबस्तानें किताब पाहत होते छ मजकुरीं कारभारी यांजकडे निरोप कांहींएक सागून पाठविला नाहीं अर्धीच प्रहराचे सुमारास दरबारास जाब बोलून निद्रा केली मंडळी आपाआपले मकानास गेली अमवदअली खा प्रात:काळीं रसल साहेब यांजकडे जाऊन त्यासीं राजे–मनसुफांचे सागितल्याप्रमाणें बोलणें करून मशारनिल्हेनीं नानकराम याचे बागांत येण्याचा निश्चय ठराऊन आले याची इतल्ला राजे–मोहनास केली त्याजवरून बागांतील हवेलींत फर्शाची तयारी करवून, तीन प्रहरीं उभयतां बंधू व अमजद–अलीखा पालखीचे स्वार होऊन गेले नंतर एक घटकेचे आवकाशानें सावितजग–बाहदूर व छोटे रसलसाहेब व कनिष्ट बधू ऐसे त्रिवर्ग बोल्याचे स्वारीनें हवा खावयाचे निमित्यें निघून नानकराम याचे बागात येऊन पोंहचले चदूलाल व गोविंदबक्ष उभयतां बागांतील दरवाज्यियाबाहेर येऊन घेऊन गेले प्रथम बागाची सहल व मकानाची होजकारजी इत्यादिक सवारी पाहून, क्षेम कुशलप्रश्नोत्तरें आपमें जाहलीं तदुत्तर, खिल्वतीचे पकानीं उभयतां राजाची व इंग्रज व खानममकूर ऐसे बसून, दोन घटिका रात्रपर्यंत बोलणें आलें त्या बैठकींत राजे मनसुफानीं आपले खाविंदाचे मर्जीचा व दियानतीचे सद्गुणकीचा वगैरे ममकूर सपविलें समजाऊन बहुतच उदासीची बोलणीं केलीं त्याज वरून मेस्तर रसल साहेब यांनीं उभयतां बंधूची खातर जमा फारच करून, असेरीस वचनप्रमाण जाहलें उपरांतिक राजेमोहन आपले जागां संतोष होऊन, त्यापतीबद्दल फर्द लिहून दिल्हा आतर पानदान, फुलाचे हार व तरमेवा व सुफमेव्याचे सोन व ओन्याच्या डाल्या दिल्या त्या घेऊन, इंग्रज बहादुर स्वार होऊन, कोठीचे मकानास गेले तदुत्तर, चदूलाल व गोविंदबक्ष यांनीं संध्या करून फार प

टिका रात्रीं मकानास आले. साराश, नबाबाचे बोलणे की, हिशेबीं बाकी पस्तीस लक्ष आहे. ती व शेरणीबाबद रकम मीरमरहूम गेल्यापासून आजपर्यंत सरकार दाखल करावी. त्यास, येविसीं राजाजीचे बोलणें कीं तालुकियांत आमदानी कमी, याजमुळे शेरणीचा ऐवज वसुलांत आला नाहीं. माहालीं बाक्या येणें आहेत. तो रुपया निकड करून घेतला असता, तालुकियाची लावणी न होता उज्याड होतात. श्रीमत महाराज याचे सरकारांतून कौल मनस्वी देऊन रयतीस तगाई देतात, याजकरितां तमाम तालुकियातील असाम्या उठोन श्रीमताच्या राज्यांत गेल्या आहेत व जातात. यास्तव ऐवज उगवून येत नाहीं म्हणोन. त्यास हे बोलणें नबाबाचे ध्यानास न येता ऐवज मागण्याची निकड असे. आख कोडीवरता आहे. व ज्याफतीबद्दल फर्द रसलसाहेब यास दहा हजार रुपयाचा लेहून दिल्हा. ऐसे ऐकतों म्हणोन राजश्री त्र्यंबकपत निसबत रायराया व अबादासपत यांणीं समजाविले व आणखी एक दोन जागा मातबर ग्रहस्थाचे मुखे बोलण्यात आलें. त्याजवरून सेवेसी विनती लिहिली आहे. याउपरी जाबसाल निश्चयात येऊन पक्केपणीं समजेल त्याची विनती लिहीन. सेवेसी श्रुत व्हावे. रा छ ११ माहे जमादिखर. लोभ असावा. हे विज्ञप्ति.

---

पत्रांक ३७२ श्री १७१४ अखेर

विज्ञापना. मीर अबदूल कासम याचे रवानगीचे वेळेस मषीरुलमुल्क यांणीं गोविंदराव उभयता यांस बोलाऊन मजकूर सांगितला कीं: मीर साहेब याजला रवाना करीत आहोंत. त्यास, त्याचे चित्तात अंदेशे कित्तेक आले आहेत. रा तात्या येथें आहेत. त्याचा याचा बहुतसा परिचय नाहीं. यास्तव तुह्मीं त्याची खातरजमा करावी. रा तात्यास पत्रे लिहून द्यावीं. पुणेयास मदारुळमाहाम याचीं पत्रें आणवावीं कीं मीरसाहेब यासीं दुसरा अर्थ नाहीं. रा तात्यांही दुसरा अर्थ न धरावा. आपल्या सल्लेख जी गोष्ट येईल त्याचा इतल्ला याजला करीत जावा. याजला प्रसगोचित मार चागला आढळून येईल तो येऊन अर्ज करितील. लिहिणार शाहाणे, बोलणार चांगले आहेत. याप्रो पत्र आणवितों ह्मणोन त्याची खातरजमा करावी. ह्मणोन सागून, बाहादूर उभयतां गोविंदराव, मीर अबदुल कासम याचे घरीं आले, त्यासीं बोलणीं बहुत जालीं. त्याची खातरजमा केली. पत्रे देतो व स्वामीचीं पत्रे पुणेंयाहून आणवून देतों, ह्मणून बोलले. कर्नाटकप्रातीच्या यादी निवडून काढिल्या आहेत. त्या रा रायास बोलाऊन वाचून दाखविल्या. त्याची फारशी करून मीर साहेबांबरोबर दिल्या. इतकें बोलणें होऊन चंपी कलवतीण तेथे आली होती, ते गोविंदराव भगवत याजपाशीं बोलत होती कीं, रंभाजी बाजी याजला आश्रुन्याकरिता येथे बोलाऊन घ्यावे. त्यास बाहादूर यास

चपीनें व गोविंदराव भगवत यांणीं मार पुसोन घेतला त्यास हुजुरास अर्ज करून सागू म्हणोन बाहादूर यार्णी उत्तर केलें उपरांत बाहादूर उठोन गेले मीरसाहेब यार्णी उभयतां गोविंदराव याची ज्याफत केली

| गोविंदरावकृष्ण | गोविंदराव भगवत |
|---|---|
| १ शिरपेंच | १ पागोटें |
| ५ शालजोडी किनखाप | १ शालजोडी |
| जामेवार काशीचा | १ किनखाप |
| दुपट्टा, पागोटें, विजार | २ जामेवार थेले |
| — | — |
| ६ | ५ |

येणें प्रो देऊन रुकसत केलें त्यास, बाहाला मार तो लिहिला आहे उभयता काय लिहिणार तें लिहोत हे विज्ञापना

---

पत्रांक ३७३ श्री १७१४ अखेर.

विज्ञापना ऐसीजे कलकत्याहून सात आठ पलटणें तेलगी, त्यामध्यें दाहा बारा गोरे कर्ते होते त्यास सांगितलें कीं, तुम्ही खुसगीच्या मार्गे चेनापटणास जावें तेव्हां ते निघून दोनचार मजली आले मागाहून हुकूम आला जे तिकडून न जावें जलमार्गे जावें तेव्हां गोरे होते त्यांनीं तेलंगे वेषधारी होते त्यास सांगितलें, हुकूम याप्रमाणें आला आहे तेव्हां हिंदू होते त्यांणीं साफ सांगितलें कीं, याचा निभाव हिंदु धर्माचा जलमार्गे आम्यार होणार नाहीं तेव्हां गोरे यांणीं कलकत्यास लिहून पाठविलें त्याचें उत्तर आलें कीं हिंदु आहेत त्यांचें पारपत्य करणें हें वर्तमान हिंदू लोकांस समजलें तेव्हां एका करून गोरे वगैरे होते त्याची त्यांचीच बनली तेव्हा गोरे वगैरे माणूस पाचसातशें माणूस ठार झालें कांहीं गोरे पळून कलकत्यास गेले हिंदुमाणूस राहिले तेंहि अफरातफरा जाहलें गजम शहर समुद्राचें तिरीं आहे तेथें एके दिवशीं लाल मत्स्य मोठा निघाला हें वर्तमान तेथें साहेब होता त्यास कळलें त्यांणीं किवायत काइन पाहिली तेथें निघालें कीं आमके दिवशीं समुद्राचें पाणी येऊन शहर बुडेल ! तेव्हां ताकीद करून शहर वोस केलें कोणी राहिले त्यास पाणी येऊन शहर वाहून गेलें म्हणोन वर्तमान समजलें खरें लटकें देव जाणे ! हे विज्ञप्ति

---

पत्रांक ३७४ पुणा २

राजश्री नाना गोसावी यांसीः—

* साहेब किल्यास आले तेव्हांही त्यास कांहीं तस्ती पोंहचली नाहीं, व आपणाकडूनहि पोंहचत नाहीं, याजवरून दोरी बहुत पडली ? हे जाव भेद

मोन. याचा इश्वास धरूं नये. मागेपासोन लबाड्या करीत आले ते विदितच आहेत. त्याचे निसबतीचें माणूस आहे ते चाकरीचुकरी सांगितली तरी मानीत नाहीं. हें राजश्री सदाशिवपंत दादास निवेदन केलेंच आहे. आह्मी वारवार आपणास लिहावे तरी ठीक दिसत नाहीं. सूचनार्थ लिहिले आहे. कळेल त्याप्रो बदोबस्त करावा. बहुत काय लिहिणें? कृपा लोभ करीत असिलें पाहिजे. हे विनती.

---

पत्रांक ३७५ श्री. १७१४ अखेर

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री आबा स्वामींचे सेवेसीं.--

पो बाळाजी जनार्दन सा नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावे विशेष. वेदशास्त्रसंपन्न राजश्री बापूभट घारपुरे यांणीं श्री हरीहरेश्वर माहादेव याचे नवीन देवालय जनस्थानीं बांधिले आहे. त्यास देवाचे पूजा नैवेद्य व नंदादीप वगैरे खर्चास कुलबाब व कुलकानू कमाल आकाराचा गाव च्यारसें रुपयाचा नुतन इनाम पा नासीक अगर पा वणदिंडोरी या माहालांत श्रीमंतांनीं देविला आहे. त्याची सनद अलाहिदा तुमचे नावें आहे. त्यास, सनदेप्रमाणें गाव भटजींचे दुमाला लौकर करावा आणि लेहून पाठवावे. त्याप्रमाणे इनामपत्रे करून देवऊं. पत्र पावताच आधीं हे काम करावें. कमाल* आकार याप्रमाणेंच हाल वसूल व खटपट केलीयास शें पन्नास रुपये अधिक होत असेहि गाव असतात. या रीतीचा पाहून लौकर नेऊन द्यावा. बहुत काय लिहिणे ? लोभ असो दीजे हे निनति.

---

पत्रांक ३७६ श्री तालीक

राजश्री हरीपंत तात्या गोसावी यासीः--

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रा महादजी शिंदे दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. रघुनाथसिंग चौधरी पो देवास याजकडे पोमाचे चौधरातीचें कामकाज सुदामतपासून चालत आहे. याचे भाऊबंद हक्कदस्तूर हिशाप्रमाणे घेत गेले. ऐसे असतां, कृष्णसिंग पेशजी पुण्यास येऊन आपले परी सरकारात विनंति करून, हुजरे देवाशास आणोन दगा केला. त्यावरी रा॥ सदाशिव दिनकर लष्करातून गेले. त्यांणीं हा मजकूर समजोन देवाशाहून हुजरे माघारे नेले. हें वर्तमान मारनिलेनीं सविस्तर सांगितलेंच असेल. रघुनाथसिंग याचा काळ जाहाला. त्याचा पुत्र खुमानसिंग हालीं भोगवट्याप्रों वहिवाट

---

* येथपासून अक्षर खाशाचें.

करीतच आहे कृष्णसिंग पुन्हां सरकारात गैरवाका समजावितो म्हणोन ऐकिलें त्यावरून आपणास लिहिलें आहे तरी रघुनाथसिंगाची चहिवाट बहुत दिवस चाल्त आली आहे त्याप्रमाणें चालवावी कृष्णसिंग गैरवाका समजावील त्यास ताकीद जाहाली पाहिजे रा छ २ रमजान बहुत काय लिहिणें ! लोभ कीजे हे विनति मोर्तब असे शिका

---

पत्रांक ३७७ श्री

राजश्री रामचंद्र माहादेव गोसावी यांस —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो तुकोजी होळकर दंडवत विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित असिलें पाहिजे विशेष कसबें कडुस ता खेड येथील धर्माजी व काळोजी पोटे धणगर यांणीं विदित केलें कीं कसबें मजकुरीं आमचे मिराशी सेत नवसडी जमीन आहे त्यापो कांहीं आम्ही वाहतों व कांहीं पडित होती ते गांवकरीयानीं दुसऱ्यास वाविली प्रस्तुत, जमीन आमचे आम्हीं मागत असतां वावयासीं गावकरी दिकत फरितात येविशीं त्यांस ताकीद जाली पाहिजे येैशियासी, कसबे मजकुरीं आपल्याकडील कमावीसदार असेल त्यास पत्र देऊन याचा करीणा मनास आणून पोटे मजकूर याची जमीन ज्याकडे गेली असेल तो वावयासीं दिकत करीत असला तर त्यास ताकीद करून, वाजबी यांचें मिराशी सेत जें असेल तें वाजून यांचें यांजकडे देवावें येविषयीं लढा० पुन्हा न राहे तें करावें रा छ २४ मोहरम बहुत काय लिहिणें ? हे विनति मोर्तबसुद

श्री माळसाकांतचरणी
तत्पर मल्हारसिुत
तुकोजी होळकर

---

पत्रांक ३७८ श्री

*यादी राजश्री शिवाजीराव सुर्वे मोकाशी मौजे कुसगांव ता पोनमावळ* हा गांव सरकारांतून नानाजीराव सुर्वे आपले वडीलरूप यांणीं शिदी सावावर

● येथपासून साक्षाचें अक्षर

वार केले सबब सत्तावीस जखमा आगावर लागल्या, ह्मणोन बहुमान करून सदरहू गाव दिला. चुलता आत्माजीराव आपल्या तीर्थरूपाबरोबर चाकरीस होता. भाऊपण्याचा वेटाळेपणा सर्व ठांकच जाहला आहे. चाकरी मात्र एक जागा करीत होते. त्याजवर भाऊसाहेबाबरोबर हिंदुस्थानात आपण व आपले चुलत भाऊ खंडोजी सुर्वे बिन भिवजीराव सुर्वे गेलों होतो. तेथे सर्व घोडी पिढीं जाऊन परतोन माघारें आलें. पुण्यात कर्ज बहुत जाहले. ते समई खंडोजी सुर्वे यांणीं आमचें व आपलें नाव घालून कुसगावासी सनद सरकारातून घेतली आण आपले घरास गेले. त्यापासून आज वीस बावीस वर्षे खंडोजीचे कोणी हुजूर चाकरीस आले नाहीं. आपण सरकारची चाकरी करीत आलो दरम्यान घोडपेच्या साली निरोप घेऊन घरी गेलो. मग घोडपेस स्वारी सरकारची जाली. ते समई आपणास चाकरीस बलावणें गेलें. नंतर आलों. तो स्वारी होऊन पुण्यास श्रीमत आले. आह्मी हुजूर पागेकडे निसबतीस होतों. त्यास, सदरहू चाकरीस चुकलों हें निमित्य ठेऊन गंगाधर पत हुजूर पागेकडील यांणीं गाव जप्त केला. त्याजवर गाव सोडवावयास सरकारात नजर रुपये १३०० व दरबारखर्च ३०० एकूण सोळाशे रुा पडिले. नतर आणि एकवेळ चाकरीस यावयास चार रोज अधिक लागले ह्मणून मागतीस गाव जप्त करून रुा ६०० घेतले. एकूण बेवीशे रुपये आपणास पडिले ते व्याजसुद्धा तीन हजार सावकाराचे जाहाले. तेव्हा व्याज भारी सबब कैलासवासी नारायणरावसाहेब याचे कानावर मजकूर घालून, राजश्री महिपतराव कृष्ण याजकडून तीन हजार रुपये एकोत्रा व्याज घेऊन, सावकारास देऊन, गाव मारानिलेकडेस ठेविला. हाल्लीं इग्रजाच्या दग्यामुळें वगैरे, कोळ्याच्या दग्यामुळे व तोतयाच्या दग्यामुळे गाव दोनतीन वेळा वोस पडिला. मागती लावणी करून चाकरी सरकारची नेहमी करीत आलो असतां हाल्लीं नारायणजी सुर्वे खंडोजी सुर्वे याचे पुतण्ये, येऊन कजिया करितात. हाल्लीं ठकारदिक्षिताची भीड घालून गावची सनद करून घेतली आहे. त्यास सनद माघारी घेऊन, साहेबीं वाजवी इनसाफ मनास आणून, कर्तव्य ते करावें. बेवीस वर्षे चाकरी सेवा कोणी केली? चाकरीचा गावबलाडे सोसले. रोजमुराहि आज दहावर्षे सुरळीत पावत नाहीं. ऐसें असोन साहेबी निमे गावची सनद नारायणजीस दिल्ही! याची चौकशी जाली पाहिजे. शेवेसी श्रुत होय. हे विज्ञप्ति.

---

पत्रांक ३७९ श्री

यादी होळकरा बाा ऐवजाच्या वराता गाईकवाड याजपासून घेतल्या. सुा खमस सितैन

५५००० अंताजी नागेश कमादार पाा ढवळके. सदरहु वरातेचे वसुलास भिकाजीपंत पैलाड्ड आहेत.

२५००० गोविंदराव गाईकवाड पो सिमेर नजीक बडोदें सदरहु ऐवजाचे वसुलास गोविंद व मनोहर किंकर यांस
१०००० चिंतो त्रिंबक कादार प्रा सराई वसुलास माणूस दिा हू ठेविलें असे
५००० चिमाबाई गाईकवाड प्रा कोरेळ सदरहु वराव वसुलास मनोहर नाईक किंकर.
५००० केदारजी गाईकवाड कादार प्रां अवापूर. सदरहु वराव मारीनसेचेच हवालीं रा कृष्णाजी नाईकानीं केली

१०००००

सदरहु वराता रा कृष्णाजी नाईक यांणीं हवालीं जिकडील तिकडे केल्या आहेत

---

पत्रांक ३८० श्री १७१५

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री दादा स्वामींचे सेवेसी —

पो महिपतराव जिवाजी सां नमस्कार विनंति उपरी येथील कुशल छ १ जिल्हेज जाणून स्वकीय कुशल लिहित गेलें पाहिजे विशेष आपण पत्र पा तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाहाला श्रीमंत उभयतां मंगळवारीं प्रात काळीं स्वार होऊन सातारियास राजदर्शनास जाणार. श्रीमंत राजश्री नानासाहि येथें येऊन च्यार पांच दिवस जाहले त्याणीं आपल्यास यावया विशीं पत्र लिहिलेंच आहे लौकरीच दर्शनलाभ होईल वरकड भेटी नंतर सविस्तर कळेल बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे हे विनंति हे० हे०

---

पत्रांक ३८१ श्री १७१४।१७१५

विज्ञापना मशीरुलमुलूक यांसीं उभयतां गोविंदराव यांसीं नबाबाचे स मक्ष बोलणें जाहलें कीं इंग्रजांचे पत्र मिस्तर कनवी यांचे विद्यमानें आलें आहे व मीर अबदुल कासम यांचे विद्यमानें आलें आहे त्यास, प्रगुत्त त्याजला जाब लिहून द्यावा कीं, टिपूचा करार रायपंतप्रधान यांचा व आ मचा राजश्री हरीपंत यांचे विद्यमानें जाहला होता त्यास तीन साल जालीं त्याजकडून कांहींशी पेशकदमी आढळून आली श्रीमंतांशीं ऐवजाचा करार केला तोहि करारप्रमाणें अमलात न आला वास्तव रायपंतप्रधान यांजला आम्हास त्याची तंबी करणें जरूर होती इतकियांत तुमचीं पत्रें आलीं त्याजवरून बाहिर निघावयाचा निश्चय केला त्यास, तुम्हांस गुपगीनून यावें लागतें समुद्रांतून येणें तेव्हां समीप पडतें हा मजकूर एक दुसरा मजकूर

कृष्णापासून त्याचा तालुका लागतो. त्यास, तालुका टाकून पुढे येता येत नाहीं. तालुका हस्तगत करून पुढे यावे. तालुका, किल्ला तैसाच ठेऊन पुढें आल्यास आमची स्वारी येईल. मागाहून वरचेवर लोक येणें, रसद येणें, त्याजला अडथळा होईल. यास्तव फौज पुढे रवाना करावी. रावपत-प्रधान याचे आमचे मुलाकात नाहीं. मुलाकात घेऊन इतफा कोणत्याचे मुल-खात चालणे जाहलें तर चालावे. अथवा अलाहिदा अलाहिदा चालावें. त्यास, रावपतप्रधान याची स्वारी प्रथमतः त्यास, मुहूर्त चांगला पाहून नि-घाले पाहिजे, थोरली मसलत च्यार महिने कमजादा जाहल्यास चिंता नाहीं, याप्रो पत्र पाठवावी असा निश्चय जाहला. हे विज्ञापना.

---

पत्रांक ३८२ श्री १७१५ आश्विन—कार्तिक

विनति उपरी. राजश्री गोविंदराव गाइकवाड याजकडील खंडो आवजी अथवा गणेश कासी याचे बनता दिसत नाही. फौज जमा होऊन रिकामे दिवस जातात. याजकरिता त्याचें ह्मणणें आहे कीं, आम्हास फौजसुद्धा गुजराथेस जावयास आज्ञा करावी, जातों. उद्या दिनशुद्धी निरोपास आहे. याजकारिता त्यास तिकडे जावयास निरोप द्यावा. किंवा कसे करावें, हे लिहून पाठवावें. हे विनति.

सरकार* लक्षाचा आत कोणी असल्याखेरीज हातीं गोष्ट राहणार नाहीं. येवढा संदेह. वरकड जातात हें चांगले आहे. दोघांतून येक होता तर बरें होते. राजश्री माधवराव यास सांगोन कांहीं तरी बंदोबस्त राही असें करून मग निरोप द्यावा.

---

पत्रांक ३८३ श्री १७१५ मार्गशीर्ष शुद्ध १४

वेदशास्त्रसंपन्न राजश्री नारायण दीक्षित व यज्ञेश्वरदीक्षित स्वामीचे सेवेसी:—

विद्यार्थी माधवराव नारायण प्रधान नमस्कार. विनति. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावे. विशेष. वेदशास्त्रसंपन्न सदाशिव दीक्षित वाजिपेययाजी याचा काल जाहल्यापूर्वीचे त्याचे पत्र आलें, त्यात आमचा माहाप्रयाण आहे असें लेहून वगैरे मजकूर लिहिला. नतर दीक्षित यास देवाज्ञा जाहाल्याचें वर्तमान कळले. ऐशास, दीक्षित यांस आपलें माहाप्रयाणच आहे असें त्यांस समजोन त्याणीं लिहिलें, हें परम आश्चिर्य वाटलें. व त्यांचा काल जाहला, हे गोष्ट वाईट जाली. ईश्वरीछा प्रमाण. यास विवेकावाचून

---

* येथुन मजकूर खुद्द खाशाचा म्हणजे नानाफडणिसाच्या हातचा.

तुसरा उपाये नाहीं याजकरिता विवेक करून विचार्चे शांतवन करावें गा छ १२ जमादिलावल, सुा अर्बा तिसैन मया व अलफ *बहुत काय लिहिणें ? हे विनति

---

पत्रांक ३८४ श्री १७१५

कोल्हापुरवाले राजे

श्रीमन्माहाराज राजश्री छत्र–पति स्वामीचे सेवेशी –
विनति सेवक दौलतराव सिंदे कृतानेक विज्ञापना ता छ पावेतों स्वामीचे कृपें करून मुा सुखरूप असों विज्ञापना ऐसी जे:–स्वामीनीं आज्ञापत्र पा त्यांत आज्ञा जे –पत्राचा सकल मा जिनस पा आहे, घेऊन पावलियार्ने विनतिपत्र पा म्हणोन त्यास आज्ञेप्रा याचप्रकारें सदैव परामृश करणार स्वामी समर्थ आहेत सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

श्री

अकलकोटकर भोसले

राजश्री राजे फत्तेसिंग भोा गोसावि
सकलगुणालंकरण–अखंडितलक्ष्मी–अलंकृत राजमान्य
स्नो दौलतराव सिंदे रामराम विनति

---

श्री

राजश्री पतसचिव गोसावी योसी
सकलगुणालंकरण–अखंडितलक्ष्मी–अलंकृत राजमान्य स्नो दौलतराव सिंदे दंडवत विनति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिा जावें वरकड अष्टप्रधानास सकलगुणा–

---

श्री

भामगडवाला

राजश्री राव बरजोरसिंग गो
अखंडित–लक्ष्मी–अलंकृत राजमान्य स्नो दौलतराव सिंदे राम राम सुा

---

मंदोसर

मीरजा गुल्लेन–बेग फा पा मंदोसर वगैरे सुायवस्त यावद
मुख्यायस–सदवर–दस्तगाद आज दौलतराव सिंदे सुा सलाम

---

* येथून हस्ताक्षर सवाईमाधवरावाचें

मीरजा जमालबेग खुा बापद
आज दौलतराव सिंदे सलाम सुा.

---

नगरवाला मोगल.

आजम सवाजे मोगल महमदखान कवीजंग बाहादर दाममोहबतहू.
मोहिबान–मुखालिसान–दस्तगाह आजदिल यकलास दौलतराव सिंदे सलाम आकी येथील खैरखुसी जाणोन तुह्मी आपली खैरखुसी कलमीं करीत जावी दीगर खत पाा ते पावले. लिा मार.

---

प्राा व पाा हाय देशमुख व देशपांडे.
मोा आजम देशमुख व देशपांडे पाा सुा.

---

राजश्री राज जालमसिंग गोा.
अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य रामराम विनती उपरी.

---

बासवाईकर कुसलसिंग.
राजश्री राणा कुसलसिंग गेाा
आखंडित रामराम विनती उपरी.

---

मांधळेतकर.
राजश्री राव सखतसिंग गोा.
अखंडित–लक्ष्मी रामराम सुा.

---

पुण्याचे जकातदार
विसाजी भिकाजी, जकात प्रांत पुणें व जुनर गेाा दंडवत सुा.

---

पनवेली कोकणप्रात.
बाबूराव हरी.

---

बीडकरसाहेब.

श्री श्री श्री परब्रह्ममूर्ती श्री श्री श्री कादर साो बाचे चरण सेवेसी. दासानुदास चरणरज दौलतराव सिंदे साा दंडवत विज्ञापना. येथलि कुशल ताा छ पर्यंत आपले कृपेंकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष.

---

तीर्थस्वरूप मातुश्री लक्षाबाई वडिलांचे सेवेसी
अपत्य दौलतराव सिंदे दंडवत विनति

भीमत राजश्री देव सस्थान चिंचवड स्वामीचे सेवेसी
सेवक दौलतराव सिंदे विनति उपरि येथील कुशल ता छ
पर्यंत श्रीचे कृपेकरून यथास्थित असे विशेष

१ राजे मा जगदार दी तोफखाना खुपमस्त—मापद आम दौलतराव सिंदे सलाम सुा ज्यादा काय लिो पुर्वे मोर्तब किलावत नाहीं

१ मो मानसिंग जगदार यास सुा

तीर्थरूप मातुश्री लक्ष्मीबाई व भागीर्थीबाई व यमुनाबाई सिंदे वडिलांचे सेवेसी
आपत्यें दौलतराव सिंदे चरणीं मस्तक ठेऊन सांा दंडवत विज्ञापना ता वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष
हो तीा केसराबाईस दंडवत विज्ञापना सदैव पत्रीं तोषवीत जावें
हो रहिमान बिवी पन्हा—बाई व जोहारबाई व सरसरुपबाई व बिंनत व मुरादनबाई यास दंडवत विज्ञापना सदैव पत्र पाठवून तोषवीत जावें

चिरंजीव बाळास

सरकाड याा प्राा च तीर्थरूप मातुश्री मैनाबाई सिंदे यांस

उभयता आंग्रे मामा यास तीर्थस्वरूप व दंडवत उपरी

वैसिंग अंग्रे यांस आसांकित सुा सेवटीं विनति नाहीं बहुत काय लिहिणें येथें मोर्तब

लक्ष्मण जामदार यास मो जाणोन

गंगाधर गोविंद सागरवाले यास आसाकित विनंति उपरी तीर्थरूपाचें नांव लिहावें

राव रंभाजी जयवंत निंबाळकर यांस सकलगुणा विनति लिा जावें

रामचद्र नारायण सुभेदार पुणे आखडित विनति.

---

मालोजी राजे घोरपडे आखडित व विनति.

---

विनंतीवाले.

१ मातबर पागे व सिलेदार.
१ आबाजी इंगले भावासुधा.
१ खडेराव हरि.
१ श्रीमताकडील सभावित काा दार.
१ आनदराव बहिरव.
१ सखारामपत बापू पानसे.
१ माधवराव रामचद्र.
१ जगन्नाथराम व लक्ष्मण अनत.
१ बाबूराव कृष्ण किलेदार साताऱ्याचे.
१ थत्ते.
१ गोविंदराव भगवत.
१ माधवराव बाबर.
१ सेळूकर उभयता.
१ माधवराव बाजी.
१ बामनाजी हरी.
१ पाडुरग बलाळ निाा कवीजग बाहादूर
१ जगदले मानसिग व राव व खडे-राव मग्रूरकर.

---

दाभाडे तळेगावकर.

यशवतराव दाभाडे सकलगुणा गंगाजळनिर्मळ मातुश्री लक्ष्मीबाई दाभाडे यास.

स्नेहपूर्वक विनति.

---

देहूकर.

हरिभक्तपरायेण राजश्री खडोबा गोसावी सस्थान देहू यासी.

स्नेहपूर्वक दवलतराव सिंदे दडवत विनति उपरी.

---

रास्ते.

राजश्री आनदरावजी रास्ते गोाा.

छ सकलगुणा दडवत विनति उपरी लिहित जावें.

---

श्रीमताचे हातची चिटीचे उत्तर.

सेवेसी विनति सेवक दौलतराव सिंदे कृतानेक विज्ञापना ताा छ पर्यंत स्वामीच्या कृपावलोकनें यथास्थित असे. विशेष माा पत्रांतील जमेस धरून उधार लिहावा. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

---

श्रीरामदासबावा गुरुजी यास पत्र

श्री सचिदानद परब्रम्हमूर्ति श्रीबाबाचीचरणसेवेसीं दासानुदास चरणरज दौलतराव सिंदे चरणीं मस्तक ठेऊन सांा दंडवत विज्ञापना ता छ पर्यंत श्रीकृपेंकरून वर्तमान यथास्थित असे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

---

सुमत

गगाजलनिर्मळ मातुश्री गोपिकाबाई यांस स्नेहपूर्वक दंडवत विनंति

---

सुरापूरचे वेरडास

राजश्री व्यकट आपा नाईक बहिरी महादर, सस्थान सुरापूर गोसावी यांसी —

छ अखंडित-लक्ष्मी विनंति उपरि

---

मेाा हिरु व वाढण पेंढारी यास सुा

---

बीडकर

१ सखाराम कृष्ण पासटे यांस अखंडित सुा सन

१ रामाजी अनत व सखोरुद्र गोा विनंति

---

श्री

श्रीमत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनति सेवक दौलतराव सिंदे, पुढें हावचिरी प्रांा

---

श्रीमत राजश्री पतप्रतिनिधि स्वामीचे सेवेसी —

सेवक दौलतराव सिंदे कृतानेक विज्ञापना ता छ पावेतों यथा स्थित असे विशेष

---

गुरु ली बीडकर

श्री श्री श्री परब्रह्ममूर्ति श्री श्री श्री हवीबासाहेबाचे चरण-कमल सेवेसी दासानुदास दौलतराव सिंदे कृतानेक सांा दंडवत विज्ञापना छ पावेतों श्री-कृपावलोकनें करुन सेवकाचें वर्तमान यथास्थित असे

---

खा पत्र कादर साहेबाचे नांवें

सालीक मसालीक हकीकत आगाज-मआहीज मारफत श्रीकादरसाहेब ज्यात-कदरहू आर्जदास्त वंदगी विनति येथील कुशल

---

सकल–गुणाचे

१ चंद्रोजी भोसले सेनासाहेब सुभा गो। लेखन करीत असावे.

१ मानाजी आगरे कुलाबकर वजारत –माब–सरखेल गो।

१ दतराज–आज्ञा

१ नीलकंठराव पुरदरे.

१ राजश्री गोविंदराव गाइकवाड सेना–खासखेल समसेर बाहादूर गो.

१ राजे खेमसांवत भोसले बाहादर सरदेसाई प्रांत कुडाळ वगैरे महाला–निहाय.

यात भोसले नागपुरवाले यांस मात्र लेखन करीत असावे, आण वरकडास लिहीत जावें.

---

आजम मेस्तर कोरनेल गाडर इस्कोयर दाम–मोहबतहू

छ मकान–मुखलिसान–दस्तगाहाये आतीजादज्यादा–दोस्ता दौलतराव सिंदे बादज–पौक आंकी येथिल खैरखुसी जाणून आपली खैरखुसी कलमी करीत असिले पाहिजे. दीगर.

---

गोवेकर प्रधान नवा आला आहे तो.

आजम जू–नेकेतान–पाचकतवार–शक्रतार–दोइस्ताद खुषवख्त–बाषद मोहिबान–मोखलिसान–

छ दस्तगाहाये आजि दौलतराव सिंदे सलाम येथिल खैर–खुसी जाणोन तुह्मी आपली खैर–खुसी कलमी करीत जावी दिगर.

---

आजम नवाब मोहिदीनखा नजमुदौले बाहादूर दिलावरजग दाम मोहबतहू.

छ शाहामत–आवली–पन्हा–मर्तबात व सदामत व मजीलत–मवाकत–दस्तगाहाये आतीजाद–दोस्ता आजी ज्यानीब दौलतराव सिंदे सलाम येथिल खैरखुसी जाणून आपली खैरखुसी कलमी करीत जावी दीगर.

---

गोवेकर राजा गोवर्णदोर.

आजम फ्रासिस्क–आंतोन–दावियोग–काबराल–तेनेत–जनराल–गोवर्णदोर बदर गोवा दाममोहबतहू.

छ श्याहामत–आवली–मर्तबात व हशमत मजिलत–मवाकत–दस्तगाहाये तज्यादा–दोस्ता आजी ज्यानीबा दौलतराव सिंदे सलाम दरबात आज पानम आकीं येथील खैरखुसी जाणोन आपली खैरखुसी कलमी करीत जावी दीगर.

---

महमदसाहेबखान टाके दाम–मोहबतहू

छ आम–दिल येकखास दौलतराव सिंदे सलाम आंकी येथील खैरखुशी जाणून आपली खैरखुशी कलमी करीत जाणें

---

सुफेल्उलसमान समादतनकावेखान दान शेराफत सयेद शाहा निजामु दीन आहामद ज्यादा कदरहू

छ आमदिल–येकखास दौलतराव सिंदे सलाम आंकी येथील खैरखुशी जाणून आपली खैरखुशी कलमी करीत जाणें

---

शाहासाहेब आशफाम मजहरदाम मोहबतहू

छ आम दिल येकखास सलाम आंकी येथील खैरखुसी जाणून आपली आफीयेत कलमी करीत असावी दीगर

---

गोवकर याचा कारभारी

आजम सेखास्तियाय खुनेफेररवमरोकवक्तारदोहस्तापवु ॥ मापद

छ मोहबत–दस्तगाहा आजी दौलतराव सिंदे सलाम आंकी येथील खैरखुसी जाणोन आपली खैर–आफीयेत हामेशा कलमी करीत जाणें दीगर.

---

फकीराचा माना

शाहादत पन्हा सयेद हदरुसदाममोहबतहू

छ आजी दौलतराव सिंदे सलाम आंकी येथील खैरखुसी जाणोन आपली खैर–आफीयेत कलमीं करीत जाणें दीगर.

---

काजी

शेरीयेत पन्हा दाममोहबतहू

छ आजी दौलतराव सिंदे सलाम सुा

---

नवाब आजम टिपू–सुलतान–बाहादूर–सलमहूकवाला

साहेब–मेहर्बान–करम–फर्माये–मोकलिसान बादज–शौक–मुलाकात मसरत–आमावमपहूदसमीरहदीहादरीमीरयादयेथील खैरखुसी जाणून आपली शादमानी कलमी करीत असिलें पो दीगर.

---

गंगथडीचे कमाविसदार.

राजश्री नारायेणराव नागेश व बापूजी रघुनाथ कादार मा हाय पा गंगथडी गोसावी.

छ दंडवत सुा

---

सवस्थान विशाळगड.

राजश्री आनंदराव प्रतिनिधी गोसावी यासि

छ सकलगुणा

---

कडपेवाले पठाण

शाहामत व अली मर्तबात आलफखान बाहादूरसलामहूकताला.

छ आजी दिलये कलास दौलतराव सिंदे सलाम आकी येथील खैरखुसी जाणोन आपली खैरयत कलमी करीत जावी. दीगर.

---

चंदीचंदावरचे राजे.

श्रीमंत महाराज राजश्री अमरसिंहजी–साहेबाचे शेवेसी.

विनति विशेष दौलतराव सिंदे कृतानेक विज्ञापना. ता छ पौ. साहेबाचे कृपावलोकने–करून वर्तमान यथास्थित असे विशेष.

---

हसनखान बाबा.

शाहामत व आवली–मर्तबात–भाई इसनखानदाम–मोहबतहू.

छ आजी ज्यानीब दौलतराव सिंदे बाद सलाम बजेवाद आकी येथील खैरखुसी जाणून आपली खैरखुसी कलमी करीत जाणे दीगर.

---

देऊळगावकर जाधव.

राजश्री रावजगदेव आनदराव जाधवराव गोसावी यासी.

छ अखडित–लक्ष्मी

---

सातारचे दीक्षितास.

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री रामचद्र दीक्षित बावा स्वामीचे सेवेसी.

सेवक दौलतराव सिंदे सां दडवत. विनति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जावे.

---

उजनकर खोबरे.

१ मुला कमरुदिन व सलाबुदिन खुा बाषद आज दौलतराव सिंदे स-

छाम येथील खैरखुशी जाणोन तुम्ही आपली खैर-आफियत कलमी करीत जावें दीगर.

---

सुरतकर थोरले मुला
महमद ईसफ व नजमुदीन यांसी आसीरवाद लिहीणे

---

सवाराजपुरीकर हामसी यासी
आजम याकुतखान दाम मोहबतहू

छ रफायत व अवलि-मर्तबत-शोकत-मशीलत-दस्तगाहा बादज शोकमशे हूद-अमीर मुमीर गरदानीद मीआयदके येथील खैरखुशी जाणोन मोहियी आपली खैर-आफियेत कलमी करीत असिले पो दीगर आ आकारपन्हा कबून (बील फैल मोहबतनामा येऊन यकजाणाचे तरीके याचा ईतम आम दाह दोस्तीचे आगां व्हाव तें न व्होता आमुल होऊन खत खतूत न आलें यावरून लाजूम असे हामेशा मकातीन पाठऊन दोस्ती येकजहतीदीन बदीन ज्यादा होय तें नमुवत मार्वे ये बाब तारीख महिना सुा

---

हाजी आबदुल्ल मजीद यास
हाकामेकआगामारीफ-दस्तगाहा शाहा हाजी आबदुल मजीद हीप मुला हेताला

छ आज न्यानीब दौलतराव सिंदे येथील खैर दीगर तुम्ही आपली खैरमत लिहीत जावें

---

वो सुवर्णदुर्गचे सुभेदार
मोरो बापूजी यासी आसीरवाद-लक्ष्मी विनंती

---

सौा बाइजाबाई सावतवाडीकर यासी तीर्थस्वरूप आपलें
दंडवत विनंति सेवटीं हे विज्ञप्ति

---

राजश्री रगराबआपा येदकर
छ अशीरवाद विनंति उपरी

---

आजम प्राग्रिस्क-आंवोन-दावियोग-फायराल-गोवणदोरे-कपवान-जनराल रुस्तुमुल्मुल्क सर्फराजुदौले मुस्तकीम खगबाहादूर मदर गोवा दाम मोहबतहू

छ बाहामत-अवलि-मतबत व हशेमत-मजलत-मवकत-दस्तगाहा-येत ज्यादा दोस्ता आजी ज्यानीब दौलतराव सिंदे वसम आर्की येथील खैर.

श्रीगणेशायनम:

श्रीकाशीजीकेराजा वगैरेह

श्रीस्वस्ति श्री श्रीमहाराज बहादुर चेतसिंघजी जोग्य श्रीमहाराजाधिराजके दंडवत.

---

राजश्री बालारावभाई रामजी जोग्य कुमाउचे पाहाडचे राजाको अलकाय (ब).

---

स्वस्ति श्रीमदगणित–विद्या–विनोद–कुशल–गाडगिलोप–नामक–श्रीजनार्दन भटेषु विद्यार्थिनोपमा माधवराव सिंदे कृतानेकेश: साष्टाग–नतय: समुल्लसतु शमिह श्रीमदाशिषा तत्र सतटिहामहे उदतसुमवदिय.

---

स्वति श्रीश्वरचरणस्मरणपूर्वक–रूप–नारायणेत्यादि–विबुध–बिरुदावलि–विराजमान–मानोन्नत–श्रीगिरिराज–चक्र – चूडामणि–श्रीमन्महाराजाधिराज–श्रीउदोतचंद्रदेवेषु सदा समरविजईषु.

---

उदेपूर.

श्रीमन्निषिल–निगदित–नीलोमारमण–चरण–शरण–श्रीमहाराजा श्रीभीमसिन्हजी एतान श्रीमहाराजाधिराज–श्री–महाराजा अलीजाह सुबेदारजी श्री माधौराघजी सिंदे केन वाच्य अठाका समाचार भला छे अपका सदा सदा भला चाहिजे अपर च.

---

बलमगडवाले.

श्रीमहाराजाधिराज श्रीमहाराजाबाहादुर आजितसिंघ जूदेव एते.

---

कृष्णगढ.

सिद्धिश्रीसर्वोपमा–महाराजश्रीप्रतापसिंघजी जोग्य

---

बेगुवाला

सिद्धिश्रीसर्वोपमारावत श्रीसवाईमेघसिंघजी–जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकमहाराजा श्रीमौहौकसिंघजी–जोग्य.

---

साहपुरा

सिद्धिश्रीसर्वोपमालायक–राजाजी श्रीभीमसिंगजी जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकरावतजीश्रीमीमासिंघजी जोग्य

---

राणाजीची माता

सिद्धिश्रीबाईजीराज एवे आठाका समाचार भला छे अपका सदा भला चाहिजे अपरच

---

सिद्धिश्रीअमजरासु—थानें श्रीराजसिंघजी— जोग्य

---

जोधपूर मारवाड

सिद्धिश्रीसर्वोपमाश्रीमहाराजाधिराजराजराजेश्वरमहाराजाश्री विजैसिंघजी जोग्य अठाका समाचार भला छे राजरा सदा भला चाहिजे

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकठाकरा श्रीगोवर्धनसिंघजी जोग्य

---

सिद्धिश्रीसर्वोपमाठाकुराराजश्री—सवाई—सिंघजी—जोग्य

---

विकानेर

सिद्धिश्रीसर्वोपमाविराजमानमाहाराजाधिराजमहाराजासिरोमणिश्रीसुरतसिंघजी जोग्य

---

करकेडी

सिद्धिश्रीमहाराजकुंवाश्रीअमरसिंघजी जोग्य

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकमौणोग्यानमलजी जोग्य

---

सिद्धिश्रीठाकराबुधसिंघजी जोग्य

---

सिद्धिश्रीसर्वोपमामगरीश्रीकील्याणदासजी जोग्य

---

जैनगर

सिद्धिश्रीसर्वोपमाश्रीमहाराजाधिराजराजराजेंद्रमहाराजाश्रीसवाईप्रतापसिंघजी जोग्य अठाका समाचार भला छे राजका सदा भला चाहिये अपरंच

---

सिद्धिश्रीसर्वोपमाश्रीमहारानिश्रीभामि चोंडावतजी जोग्य

---

सिद्धिश्रीसर्वोपमाजोग्यरावबहादूरश्रीसहजसिगजी जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकरावचतुर्भुजाजि जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकविद्यागुरुभटराजाजीश्रीजज्ञदत्तजी जोग्य.

---

उनियारेवाला.

सिद्धिश्रीसर्वोपमालायकरावश्रीबिनासिघजी जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमाराजाबोहरेषु—सालिरामजी जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकठाकुरश्रीराजसिघजी जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकरायाजिश्रीरतनलालजी जोग्य.

---

अलवरमाचाडी.

सिद्धिश्रीसर्वोपमालायकरावराजाजीश्रीप्रपतावरासिघजी जोग्य.

---

दुदुवाला.

सिद्धिश्रीराजश्रीठाकुरापाहाडसिघजी जोग्य.

---

सिद्धिश्रीषवासरोडाराम जोग्य.

---

बुदि.

सिद्धिश्रीसर्वोपमामाहाराजश्रीरावराजाबिसुनसिंघजी जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमामहाराजश्रीदिपासिंघजी जोग्य.

---

सिद्धिश्रीसाहालछिरामजि जोग्य वा पचोलिथानसिंघजी जोग्य.

---

सिद्धिश्रियाभाईबषतरामजी जोग्य.

---

कोटा.

सिद्धिश्रीसर्वोपमामहाराजश्रीमहारावउमेदसिंघजि जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकपौंडरिकजी श्रीव्यासगोपालरामजी जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकराजश्रीरामबालिमासिंघजी जोग्य

---

मदावर.

*रामा सा १८४८ सावण सुदि छ ८*

सिद्धिश्रीमहाराजाधिराजश्रीमहाराजामहेंद्रप्रतापसिंघबहादुरदेवजू

---

वेदमूर्तराजश्रीश्रीमिहोत्रिमोहनानाथजी जोग्य

---

सिद्धिश्रीसर्वोपमापुरोहितराजश्रीलक्ष्मीनाथजि जोग्य

---

बुंधेलखंड

पौंडछो

श्रीमहाराजाधिराज श्रीमहाराजाश्रीराजाविक्रममाजीतजूदेव

---

दतिया

श्रीमहाराजाधिराजश्रीमहाराजाश्रीरावराजासमजीतबहादुरजूदेव

---

सिमथरवाले

सिद्धिश्रीमहाराजापाहाडसिंघबहादुर जोग्य

---

चंदेरी

सिद्धिश्रीसर्वोपमामहाराजश्रीराजारामचंद्रजूदेव

---

पुरवणी दतिया

श्रीमहाराजकोमारश्रीकुंवरबहादुर पंचेसिंघजूदेव

---

बगहाई

परणेवाला

श्रीमहाराजाधिराजश्रीमहाराजाश्रीटोकजसिंघजूदेव

---

श्रीमहाराजकोमारश्रीदिवानमुसाहेबकेसरसिंघम

*सिद्धिश्रीहजूरिरायसिंघजू*

---

श्रीवगासिहरिकृष्णदासजूश्रीमहाराजकोमारश्रीनोनेअर्जुनसिंघजूदेव एते

---

गुमानसिंघकेमेटाबगैरे.

चरखारि
श्रीमहाराजाधिराज श्रीमहाराजाश्रीराजाविजेबाहादुरजूदेव.

---

श्रीमहाराजकौमारश्रीकुवरबाहादुरदलगजनजूदेव.

---

श्रीअमलसिंघकुमालुम होय.

---

परवानोश्रीलालमानिकचंदजोगु.

---

श्रीमहाराजाधिराजश्रीमहाराजा–श्रीसरनेतसिंघजूदेव.

---

श्रीसाम्राटवाजपेईरमापतिजू तथा प श्रीसाम्राटवाजपेईकीरतसिंघजू.

---

गुमानसिंघ.

---

बादेवाला.
श्रीमहाराजाधिराजश्रीमहाराजाश्रीराजासवाईबखतसिंघजूदेव.

---

गजसिंघ
श्रीमहाराजाधिराजश्रीमहाराजाश्रीराजागजसिंघजूदेव.

---

सोपर
सिद्धिश्रीसर्वोपमालायकराजाश्रीराधिकादासजी जोग्य.

---

गढामंडल.
श्रीराजाहारीसिंघजूदेव,

---

पातोली.
सिद्धीश्रीपातोलिसुस्थाने जोरावरसिंघजी जोग्य.

---

सिद्धिश्रीसर्वोपमाठाकराश्री भोपतसिंघजूदेव.

---

सिद्धिश्रीसर्वोपमालायकठाकुरश्रीजोरावरसिंघजी जोग्य.

---

करोली
सिद्धिश्रीसर्वोपमामहाराजश्रीराजामानिकपालजी जोग्य.

---

वरकड साधारण राजे यांस लिहिणें तर सिद्धिश्रीअमुकसुयाने करावं अथवा राजा अथवा ठाकुर याची चौकसी करून लिहित जावें

---

नाथद्वारे जे गोसावि कागद सुखाचे लिा

श्रीमद्वल्लभकुलभूषणेषुहरिभक्तपरायणेषु श्रीगोस्वामी श्रीगिरधारिजीमहाराज प्रवेश्री दंडवत बंचे अपके

---

*काकरोलीवाले गोसावी कागद वारीक*

स्वस्तिश्रीवृजभूषणजिगोस्वामि महाराज प्रवेश्री दंडवत आपके

---

गायगवाचे जमिदार.

श्रीमंत राजश्री महाराजाधिराज आलीजाहा बाहादुर सुभेदारजिश्री दौलत रावजि सिंदे ह्यांके सरकारसें मौजे

---

करोलिवाले कागद वारीक

सिद्धिश्रीसर्वोपमाळायकराजाश्रीमाणिकपाळजी जोग्य

---

विचदास उदेपूरचे कारभारी

सिद्धिश्रीसर्वोपमाराविचदासजी

---

पत्रांक ३८५ श्री १७१६

यादी होळकर या पेशव्याच्या वराता गाईकवाड यांजपासून घेतल्य ा खमस सितैन

५५००० अजाबी नागेश का दार पा दवळकें सदरहू वरातेचे वसुलास मिकाजी पतंडी पैठाहू आहेत

२५००० गोविंदराव गाईकवाड पो सिंभेर नजीक बडोदें सदरहू पेशव्याचे वसुलास गोविंद व मनोहर किंकर यांस

१०००० विसो त्रिंबक का दार प्रा सराई वसुलास माणूस दिा लाहू ठेविले असे

५००० भिमाबाई गायकवाड प्रा कोरळे सदरहू वरात वसुलास मनोहर नाईक किंकर.

५००० केदारजी गाईकवाड कादार प्रां अंतापूर. सदरहू वरात *मार निसदेचेच हवाली रा कृष्णाजी नाईकांनीं केली*

---

१०००००

सदरहू वराता रा कृष्णाजी नाईक......यांणीं हवाली, जिकडील तिकडे केल्या आहेत.

---

पत्रांक ३८६ श्री. १७१६ माघ शुद्ध ३

राजश्रीयाविराजित राजमान्य राजश्री परशराम रामचद्र स्वामी गोसावी यासी:—

पोष्य माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे. विशेष. वेदशास्त्रसपन्न राजश्री नारायणाचार्य व शामाचार्य यांणीं हुजूर विदित केलें कीं, मौजे मागले, ता सातवें. प्रा पनाळा, हा गाव दरोबस्त इनाम आपले वडील माधवाचार्यप्रभृति यास श्रीमत कैलासवासी राजाराम साहेब याणी देऊन पत्रे करून दिल्हीं. त्यास, पाचजण भाऊ. त्यापैा कृष्णाचार्य याचे नातू गोपाळाचार्य हाणों लागले कीं, गाव आपल्यासच दिल्हा. सबब त्याचा व आमचा कलह नऊ वर्षे लागला. त्याची पचाइत सरकारात होऊन, गोपाळाचार्य खोटे जाहाले. तेव्हा, पाच-हजार एक रुपया आह्मा जवळोन हरकी घेऊन गाव पाच जणाकडे चालवावयाविशीं सरकारचीं पत्रें दिल्हीं. त्यास, आपण कष्टमेहनत केली. याज-करिता वाटणींखेरिज दर असामिनीं सालदरसाल शभर रुपये प्रो चारशें आह्मास चोघा भावानीं राजश्री माधवराव गगाधर याचे विद्यमाने द्यावयाचा करार करून, पत्रे करून दिल्हीं. त्याप्रों चालत असता, अलीकडे चारशे रुपये द्यावयास दिकत करितात. येविशींची ताकीद जाली पाहिजे हाणून. त्याजवरून हें पत्र लिहिले असे. तरी याचे भावाबदानी दरसाल रुपये चारशें देत जावे हाणोन पत्रे करून दिल्हीं आहेत. त्याप्रों चालवावयास दिकत करीत असल्यास ताकीद करणें. जाणिजे. छ १ रजब, सुा खमस तिसैन मया व अल्लफ बहुत काय लिहिणे ? हें विनती.

---

पत्रांक ३८७ ॥ श्री. ॥ १७१६ माघ शुद्ध ५

राजश्री दवलतराव—बाबा शिंदे गोसावी यासीं:—

छ अखडित—लक्ष्मी—अलंकृत राजमान्य गगाभागीर्थी अहिल्याबाई गाइकवाड मुा देवळाली प्रो नाशीक विनति विज्ञापना येथील कुशल ताा माघ शुद्ध ५ पावेतों आपले कृपा—अवलोकनेंकरून यथास्थित असो. विशेष. आमचें वर्तमानः आमचे धणी कैलासवासी जाले नतर मानाजीराव गायकवाड यानीं पचवीस—तीस लक्षाचें *वित्ते घरात होतें ते दरोबस्त लुटून नेले. आह्मास एक वस्त्रानसी एक घर लहानसें होतें तेथेंच टाकीत ठेविले. आण मानाजीराव देवलोकास गेले. तदनतर गोविंदराव गायकवाड आले. त्यानीं येताच प्रथम आमची खायाखर्चाची नेमणूक दाहा हजाराची होती ते बंद

केली आण घरास सणतें लाऊन एक लक्षाचें विर्ते नेलें मग सर्व आमचे चुलते नारोजी देशमुख होते त्याजपाशीं आम्ही डागिने पचलक्षाचे ठेविले आण आम्ही श्री मार्तंडाचे दर्शणास जेजुरीकडे निघालों आमचे मागें देशमुख मजकूर यांनीं गोविंदराव—बाबास सांगून डागिने पचलक्षाचे त्यांस दिले आण आपण मामलत करून गेले आम्ही ये प्रांतीं आलों तेव्हा आ म्हांस वारीस एक श्रीमार्तंड किंवा आपण आहेस यास्तव विनंति लिहिली आहे तर, आमचा बंदोबस्त करून देविला पाहिजे आम्ही भेटीस यावें, तर येथें आम्हास खर्चाची आबळ आहे, यास्तव हें पत्र लिहिलें आपण गोविंद राव बाबास त्याहार्थे आमचे धण्याचे हातची नेमणूक आहे ते आम्हांस देवावी व हाली रावसा पुणें प्रांतीं येणार आहेत त्यांनलाही ताकीद करावी दुसरें नारोजी देशमुख यांचे साठ गाव आहेत त्यांतून तीस गांवांवर आपण बसी पाठऊन, आपण आम्हास हात उचलून खायाखर्चास घाल, त्यांत आम्हीं राजी आहों आपण बहुतांचें पालन केलें तैसें आमचें केलें पाहिजे विनंतीपत्र लिहिलें आहे हें उदास न करावी दुसरें आमचे ध ण्यास एकर्षेसाठ बायका होत्या त्याव चौघी बाखा गोविंदराव गायकवाड यांणीं बायका दरोबस्त काढून दिल्या आण आमची चौघींची हे गते केली हें वर्तमान सेवेसी विनती लिहिली आहे तर, आमचा बंदोबस्त करून दिल्हा पाहिजे आमचे धण्यानीं कोट्याणकोट पैका असोन, त्याचें देऊळ कोणें बांधलें नाहीं, हें आपल्यास भुत होये आपण पाटिलबाहेबाचे पोटीं कुळदीप आहेत मी धर्माची बहीण जाणोन, हें कार्य केलें पाहिजे आण हें न जाल्यास आपले पायापाशीं येोऊन ध्यावें आपण शेर पीठ घाल तर खाऊन बसू. यादो भास्कर याणीं सर्व बंदोबस्त करून, बरोबर लाविले दमाजीबाबाचे हातचे दोनच्यार गांव पाटिलकीचे आहेत, त्यास सर्वपरी काळ याचा आहे, आमचें कोठें चालं देत नाहींत आम्हांस पत्रें आणून दाखविवात कीं, आम्हांस धण्यानीं सागितलें मग खरें किंवा खोटें हें नकळे त्याजमागें मानाजी बाबाचे येळेस बाण्यांनीं उपसर्ग दिल्हा त्याजमागें आतां तर परभूमयच चालें सर्व कारभार सोडून बायकांस छटितात सेवेसी भुत होय हेतूप्रमाणें भरवसा जाणून, हें पत्र फोण्डास न दाखवणें आण उत्तर पाठविलें पाहिजे बहुत काय लिहिणें ? हे विज्ञापना

---

* ह्या पत्रांत विर्ते, गते, असे दोन शब्द आले आहेत, ते वित्त (वित्त) गत्य ( गती ) ह्या अपभ्रष्ट उच्चारांचे अपभ्रंश आहेत असले अपभ्रंश शूद्रादि अशिक्षित लोकांत फार मगलोर येथें छापलेल्या स्टेफन्सकृत खिस्त पुराणात सते ( सत्य ), मुते ( मृत्य, मृत्यु ) वगैरे असेच अपभ्रष्ट उच्चार योजले आहेत

पत्रांक ३८८ श्री. ( नकल. ) १७१७ आश्विन शुद्ध १

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाळाजी गोविंद स्वामी गोसावी:—
पो माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहणें. विशेष. तीर्थस्वरुप कैलासवासी नानासाहेब यांणीं सस्थान गढेमडळेपैकीं रेवादक्षणतीरचे सोळा माहाल कैलासवासी रघोजी भोसले यास करार करून दिल्हे होते. परतु भोसले याचा अमल महालीं दखल जाला नाहीं. त्यास, हालीं राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब यांणीं पुण्याचे मुक्कामीं येऊन व दक्षणतीरचे महालाविसीं रजबद्दल केली. त्यास मशारनिले सरकारलक्षाप्रमाणे चालतात. सबब त्यास सरकारातून रेवादक्षणतीरपैकीं, खेरीज चौरागड करून, कमाल आकाराचे माहाल रुा ४००००० च्यार लक्ष रुपयाचे द्यावयाचा करार ठहरला. ते महाल दक्षणतीरचे बीतपशील.

१ पा बचई.
१ पा बिछिया तालुके दोन.
१ पा बर्गी तालुके आठ.
१ पा भोवरगड तालुके तीन.
१ पा सायपूर चवऱ्यागड तालुके सात.
१ पा खाडेब्रान्हे तालुके नव.
१ पा कठोठिया.
१ पा पलाहो.
१ पा देवरघा.
१ ता मुकुंदपूर.
१ पा सभलपुर.
१ पा रामगड.

१२

एकूण बारा माहालपैकीं सरकार अमल ज्या माहाली असेल त्यापैकीं किल्ले चौरागडच्या खर्चाबद्दल रुपये ५०००० पंनास हजार रुपयाचे माहाल व गांव किल्ल्या लगत असतील ते सरकारात किल्ल्याचे खर्चास ठेऊन, बाकी सरकारअमली माहाल सेनासाहेबसुभा याजकडे सदरहू चार लक्षाचे यावयाचे करार करून, ते सनद तुह्मास सादर केली आहे. तरी मशारनिलेचे दुमाला करणें. चार लक्षाचे बेरजेहून अधीक बेरीज सरकारअमली माहाली जालियास, त्याचे माहाल सरकारांत ठेवणें, च्यार लक्षाचे भरतसि अमलीं माहालपैकीं बेरीज कमी आलियास, गैरअमली माहाल आहेत त्यापैकीं भरतीस कमाल

आकाराचे वेरजेचा माहाल लावून देणें जाणिजे छ २९ रा वळ, सुधीत तीसैन मया व अलफ बहुत काय लिहिणें ? हे विनती

पत्रांक ३८९ श्री नकल १७१७ आश्विन शु ३

राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा गोसावी यासी —

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो माधवराव नारायण प्रधान आशीर्वाद विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीयें कुशल लिहित असिलें पाहिजे विशेष संस्थान गडेमंडलें, सेरीज चौरागड करून, रेवादक्षणतीरचे माहालपैकीं वितपशील

१ पा नांचई
१ पा बिछिया तालुके दोन
१ पा मरगी तालुके आठ
१ पा मवरगड तालुके तीन
१ पा रायपूर चौरागड ता सात
१ पा लाडेयान्हे तालुके नव
१ पा पलाहो
१ पा देवरखा
१ पा मर्कुदपूर.
१ पा संमलपूर.
१ पा रामगड
१ पा कटोटिया

१२

एकूण माहाल बारा पैकीं श्यार अव बेरजेचे माहाल आपलेकडे चावया विशीं राजश्री बाळाजी गोविंद यांसी अलाहिदा सनद सादर केली असे तरी ते माहाल लाऊन देतील ते घ्यावें सदरहू माहालपैकीं ज्या माहालीं सरकारी अंमल बनला नसेल, तेथें आपण अमल बसवून वायमाचा करार केला आहे त्याप्रमाणें अमल बसवून देऊन, आपलेबराबर बापूजी लक्ष्मण कारकून दिल्हे आहेत त्याचे हवालीं करून द्यावें दिक्कत पडूं नये रा छ १ माह रावर, सुहुरसन सीत तीसैन मया व अलफ बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे हे विनती

पत्रांक ३९० श्री ( नकल ) १७१७ आश्विन शुद्ध ३

यादी राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा यांजकडील आपसाल गुा

सीत तिसैन मया व अल्लफ नबाबनिजामअल्लीखांबाहादर याजवर कालेंकरून विघाड जाहला तर तुह्मीं शरीक असावें, हा पूर्वीचा करार. त्याजवर सरकारातून विघाड जाला. आह्मांस ज्या ज्याप्रमाणें इशारा केला त्याप्रों अमलात येऊन आमचें येणें होऊन, भेटीचा प्रकार घडून, सर्व प्रकारें शरीक जालों. नबाबाचा सलुख जाहला, त्या वेळेस नबाबाकडून कामे उगवून दिल्हीं. कलमे.

प्रात गंगथडीचा घासदाणा एकदर रुपये ३५०००० साडे तीन लक्ष करार ठरले. त्याप्रों प्रात मजकुरीं घासदाण्याचें एकदर माहाल तीन लक्ष अठरा हजार याचे माहाल लाऊन द्यावें. याप्रों ठरलें कलम १.

प्रात गंगथडी येथील घासदाण्याचा एकदर ऐवज येणें. त्याप्रों ऐवज लावून दिल्हा. बाकी मुबलक राहिली. त्याचा ठराव रुा २९०००००

तपशील.

१५००००० नक्त.

८००००० नबाबाचें येणें वराडात सन ११८५ सालीं जालें. तेव्हां पांच लक्ष रुपये देऊन, आठ लक्ष रुा रोखा लिहून दिल्हा. तो माघारा द्यावा.

६००००० आपले भेटीस आलों तेव्हा मागात घासदाण्याचा ऐवज असेल, तो मामलेदाराचे रुजु(वाती) ने मुजरा देऊन, बाकी राहील तो ऐवज द्यावा.

कलम १

———

२९०००००

वराडांत सांप्रत नबाबाचा व आमचा अंमल चालत आहे तसा चालावा. पुढें परस्परें ज्यादा तलबी होऊं नये. याजप्रों करार जाहला आहे. कलम १.

---

पत्रांक ३९१ श्री १७१७ आश्विन शुद्ध ३

याद.

९ सरकार निसबती.

१ मंडले.

१ चौरागड पन्नास हजाराची जागीर मुद्दां.

१ दस्तावेज पहिले द्यावेत.

१ गंगाथडीचे माहाल लाऊन द्यावेत.

१ किस्त नबाबाकडील बमय कलम.

” ” दरबार खर्च.

१ नबाबास थैली.

१ गोविंदराव कृष्ण यांस

१ बुदेले यांस ताकीदा

१ भोपाळकरास पत्र

---

९

६ खासगत

१ सनदा गांवच्या ३

१ पचवीस हजाराचे भरतीचे गांव व स्वराज्याची माफी

---

२

४ खासगत खातीचे

१ जलगाव परगण्यास गाव इनाम वंशपरंपरा

२ पुण्यात

१ हवेली राहण्यास

१ वाडी व जमीन एक चाहूर इनाम वंशपर.

---

२

१ १ असामी चिरंजिवाचे नांवें सरकारची

---

४

---

६

---

पत्रांक ३९२ श्री (मसुदा) १७१७ आश्विन शुद्ध १

राजश्री बाळाजीपंतनाना गोसावी यांसी :—

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रो रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी आपणापासून कर्ज घेतले मुा रुपये ३००००० तीन लक्ष चांदवडी हे रुा व बाळमार्गी सरकारातून मंडले सस्थान आश्वास दिले त्याजबद्दल आपले फारखुनाचा ऐवज करार केला रुा ५३५००० पांच लक्ष पस्तीस हजार चांदवडी, विा नारायण बापूराव वैद्य, यांसी मुदती

३००००० अलाहिदा खत आहे त्याप्रों मार्गशीर्ष वद्य १

५३५००० वगैरे मंडलेयाचा अमल बसे तोंपर्यंत नारायणराय वैद्य

यांजसी अनामत असावें. याचा फडशा पौष अखर शके १७१९ करून देऊं.

---

८३५०००

एकूण सदरहू दोन मुदतीस आठ लक्ष पस्तीस हजार रुा देऊ. त्यांत पांच लक्ष पस्तीस हजार रुायाचे अलाहिदा वराड व गोंडवण येथील आह्मी आपले अमलावर वराता लिहून दिल्या आहेत. त्याचा ऐवज पावेतों तेथें उपद्रव लागणार नाहीं. याप्रमाणे दोहो मुदतींनीं आठ लक्ष पस्तीस हजार रुा क्षेपनिक्षेप श्रीरामचंद्रजीचे शफत पावते करूं.

---

पत्रांक ३९३ श्री १७१७ माघ वद्य ७

मसोदा गाइकवाड यास पत्र.

विशेष. इकडील ऐवज येणें, त्यास बहूत दिवस जाहले, अद्यापि निर्गमात येत नाहीं. पेशजी दोन तीन पत्रें पाठविलीं, त्यांचीं उत्तरेंहि आलीं. तथापि ऐवजाचा निकाल पडत नाहीं. हालीं कारकून पाठवावयाची सिध्धता केली असता, राजश्री नीलकंठराव अनत व जावजी पाटील गौळी याचें ह्मणणें कीं, येविसीं पेशजी पत्रें रवाना जाहलीं आहेत, हालीं पत्र लिहून द्यावें, आह्मी लिहितों आणि ऐवजाचा निकाल होये ते करितों ह्मणोन, त्याजवरून, आपणास लिहिलें आहे. त्यास इतक्यावर सत्वर ऐवजाची सरबरा होऊन यावी. येथील जाबसाल मसलतसीर, ऐवजाची निकड. या प्रसंगीं लिहिल्यान्वयें अमलात आल्याने, परस्पर घरोबा चालत आला त्यात अतर न दिसोन, उत्तरोतर, ऐक्यत्वाची वृध्धि राहील. याउपरी उत्तम दिसेल तैसें घडावें. रा रावजी आपाजी व जावजी पा येथें निर्गमांत आणून देत, ऐसें तर्तूद जरूर करविली पाहिजे.

छ २० साबान, सन सीततिसैन.

---

पत्रांक ३९४ श्री. १७१७

यादी सरकार भरणा यास भोंसले याणीं ऐवज लावून दिल्हा. केशवदास याजकडून हप्ता रुा ४३३००० पैकीं.

२००००० केशवदास याजकडून.

२८५०० कित्ता ऐवज लावून दिल्हा त्याजबा.

१३००० हत्ती नग दोन. ८०००|५०००

१२५०० आगठी व बाळ्या हिऱ्याच्या रवाना खंडो मुकुंद याजबा.

३००० मा नारायण बापूराव यांस खर्चास

२८५००

४६६२॥ कर्जजमा, हुकणावळीचा गुा विठ्ठलदास ऐवज रवाना केला त्याजवा

२११९६२॥

ऐन भरणा सरकार

१००००० जवाहीर दागीने तीन अन्याबा याजसमागमें पा ते

५५००० पोंहोची हिऱ्याची

३५००० आगठी हिऱ्याची

१०००० स्मरणी पाचेची

५०००० रोख हुन्या चांदवड गुा विठ्ठलदास

१५००००

७५००० श्रीमत अमृतराव साहेब यांजकडे

२०००० किा चांदवड

५५००० किा धिका गुा विठ्ठलदास व केशवदास २५०००, ३००००

७५०००

पत्रांक ३९५ श्री १७१७

यादी सरकारचा ऐवज हाप्त्याबाबद भोंसले यांजकडे येणें:—

४३३००० ऐन

१५१५० ऐन हाप्ता सा ४३३००० पो हुजूर भरणा जवाहिर व हत्ती वगैरे १३०००० बाकी ऐवज ३०३००० याची बट्टा हुंड णावळ सरासरी दरसेंदे सा ५ प्रो

४४८१५०

पैकीं वसूल

२००००० केशवदास मारवाडी याजकडून

१००००० गोमाजी पाटेदार याजकडून

१२५०० आंगठी हिऱ्याची १०००० व माळ्या हिऱ्याच्या २५००

१३००० हत्ती नग ३ यो ८०००,५०००
३००० वा। देणे नारायण बाबूराव यांणीं खर्चास घेतले.

---

३२८५००
बाकी ऐवज येणे ११९६५०

तपशील.

१०४५०० ऐन भरण्यापैकीं कार्तिक अखेर द्यावयाचा करार आहे तो देवावा.
१५१५० हुडणावळ व वस्त्याबद्दल येणे.

---

११९६५०

---

पत्रांक ३९६ श्री १७१७

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बाबूराव स्वामीचे सेवेसीः—

पो बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यास बारशाचा अहेर व मुलास अलंकार व सनगें साडणीस्वाराबराबर येणेप्रमाणे खासगत आमचा.

सनगे.
७ अहेरास.
१ तिवट बागपुरी.
१ शेला बागपुरी.
१ किनखाफ ताबडे.
२ जामेवारे बागपुरी.
१ लुगडे पैठणी.
१ खण पैठणी.

---

७
२ मुलास सनगे बदली.
१ कुंची
१ पेहेरण.

---

२

---

९

अलंकार मुलास दागिने.
२ मणगट्या पाच मण्याच्या व मोत्याच्या जोड १ यो दागिने यो शहांत.
१२ मोत्यें.
१० पाच ( दाहा ) मणी.

---

२२
१ पिंपळवन यो शहात.
९ हिरे.
१२ मोत्ये.
५ लोलकास.
७ सरास.

---

१२

---

२१

२ घाळे सोन्याचे पायांतील मोड
एक १ येणेंप्रमाणें दागिने

५

याो सनगें नऊ व दागिने मुलास पांच पैकीं जवाहीर दागिने तीन व सोन्याचे दोन येणेंप्रमाणें पाठविले आहेत प्रविष्ट करून उत्तर पाठवावें रा छ १ माहे सिलकाद बहुत काय लिहिणें। लोभ असों दिजे हे विनंती पो छ १२ माहे सिलकाद

पत्रांक ३९७ श्री १७१८ ज्येष्ठ शुद्ध ११

वैनात—आवसा, रघु वाा फिरंगोजी

सुाा सबा—तिसैन—मया व अलफ माा निळेचा मागील हाा मोहरम ताा छ १० सीलकाद पावेतों हिसेबाचा फडशा करून पो छ ११ सीलकाद नवी तारीख असे बोली नवी सेर धावा व दरसाल रुा २७ प्रों देणेवा मानिळे-कडे तारीख माडून दिल्ही असे

१८ हाा छ ११ रोज ताा छ २७ रोज १५ दरमाहा २ प्रों सेर होता छ २८ रोजीं सेर बंद जाला

हाा छ २८ सिलकाद ताा

दरमाहा ४।। कोरडा सेर नाहीं

आदा होय

११ माहे सिलकाद मैशास

१० रघू घरीं गाता मास

१ गगू

११

माहे सिल्हेस, जेष्ठ मास

१ खुर्दा पैसे ६४ शुद्ध ११

पत्रांक ३९८ श्री १७१८ ज्येष्ठ वद्य ३

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री सदासिवपंत अभ्यंकर स्वामीचे सेवेसी

पो बाळाजी जनार्दन साां नमस्कार. विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणें विशेष वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदासिव दीक्षित बाम पेथ यांजकडे सालाबाद सातारियाहून नेमणूक पानसुपारी व दिवटीचें तेल

व भाजी व मशालेचे पोत व शाई येणेप्रमाणे चालत आहे. त्यास भाद्रपद मासापासून आलीकडे चालत नाहीं ह्मणोन दीक्षितानीं लिहिले. ऐशास किरकोळ कामाचा बोभाट नसावा. सा पानसुपारी शाकभाजी वगैरे सदरहू प्रो सुदामत चालत आल्याप्रमाणें याजकडे देत जाणें व सातारियाचे पोतापैकीं वर्षासन दीडशे रुपये पावतात ते सन आर्बापासून पावले नाहींत ह्मणोन कळले, ऐशास याच्या वर्षासनाचा ऐवज दीडशे रुपये प्रो सन आर्बा व खमस व सीत तीन सालऐवज याचा वर्षासनाचा राहिला असेल तो देणें. रा छ १७ जिल्हेज. बहुत काय लिहिणे ? लोभ असो दीजे हे विनंति.

---

पत्रांक ३९९ श्री ( नकल ) १७१८ ज्येष्ठ वद्य ३

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री सदाशिवपंत अभ्यंकर स्वामीचे सेवेसी:—

पो बाळाजी जनार्दन सा नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जाणें. विशेष. वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशिव दीक्षित वाजपेय याजकडे सालाबाद सातारियाकडून नेमणूक पानसुपारी व दिवटीचे तेल व भाजी व मशालेचे पोत व शाई, येणेप्रमाणे चालत आहे. त्यास, भाद्र. मासापासून अलीकडे चालत नाहीं. ह्मणून दीक्षितानी लिो. ऐशास, किरकोळ कामाचा बोभाटा नसावा. सदर पानसुपारी शाकभाजी वगैरे सदरहूप्रमाणें सुदामत आल्याप्रमाणें याजकडे देत जाणें. व सातारियाचे पोतापैकीं वर्षासन दीडशे रुो पावतात ते सन अर्बापासून पावले नाहींत, म्हणून कळले. ऐशास, त्याच्या वर्शासनाचा ऐवज दीडशे रुोप्रमाणे सन अर्बा व खमस व सीत तीनसालऐवज याचा वर्शासनाचा राहिला असेल तो देणें. रो छ १७, जिल्हेज बहुत काय लिहिणे ? लोभ असो दिजे. हे विनंति.

---

पत्रांक ४०० श्री नकल. १७१८ आषाढ शुद्ध १०

यादी संस्थान गढेमंडळसंबंधें दरबारखर्चाचे करार सुा सबा तीसैन मया व अलफ. मुा पुणे.

५००००० श्रीमंत राजश्री नाना.
५०००० गोविंदराव भगवंत.
५०००० नारायण बाबूराव.
३०००० किरकोळ दरकदार वगैरा.

पैकीं वसूल ———————————— रुपये ————

१५००० श्रीमंत नानाकडे दागिना आगठी हिऱ्याची — ७००० नारायण माधूराव खर्चास

१५००० — ७०००

४२०००

बाकी ———————————— रुपये ————

५८८०००

तपशील

९३००० बाकी चिठी सावकार पैठणकर दिनानाथ नाईक महाजन व राजाराम नाईक छदू व बापूदेव

४९५००० पो वराता प्रात वराड व गोंडवण मिळोन अलाहिदा असेत

येकूण, पांच लक्ष अठ्यायशीं हजार रु मशर्त अमल रुपये पुणियात चांद यक येणेंप्रमाणें करार

छ ८ माहे मोहरम सन १२०७

पत्रांक ४०१ श्री १७१८ आषाढ वद्य २

वेदशास्त्रसंपन्न राजश्री लक्ष्मीनारायण दीक्षित स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थी चिमणाजी माधवराव प्रधान नमस्कार विनति उपरि येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावें विशेष सरकारांतून पालखी पाठविली आहे तरी श्रावणमासाचे उत्साहाचे समारंभास आपण सत्वर यावें छ १६ मोहरम, सुा सबा तीसैन मया व अलफ बहुत काय लिहिणें? हे विनति

पत्रांक ४०२ श्री १७०८ आषाढ वद्य ५

वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशिवदीक्षित वाजपेय याजी स्वामीचे सेवेसी

विद्यार्थी बाळाजी जनार्दन फडनीस सा नमस्कार. विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे विशेष आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहाला वरकड मजकूर व तुम्हीयेतां चिरंजीवाचे वेतनाविषीं लिहिलें तें कळलें ऐशास, वेतनाचा ऐवज सोईसोईनें पावेल आम्ही बदामीचा किल्ला घेऊन, तेथील बंदोबस्त करून, रामश्री हरीपंत तात्या यांस फौजसुधा करनाटकांत छावणीस ठेऊन, आम्ही पुण्यास आलों नंतर हरीपंत तात्या गजेंद्रगड घ्यावयाकरितां गेले, तों किल्लेकरी यांणीं दहपत होऊन कौल घेऊन खालीं उतरले किल्ला फते जाला त्यावर अद वानीकडे टिपूची फौज येऊन महसरा घातला हें वर्तमान येताच, चिरंजीव

राजश्री आपा बळवंत व राजश्री बाजीपंत अणा फौजसुधा पाठऊन, कुमक करून, महासरा उठविला. तुंगभद्रेस पाणी येईल याजकरिता फौजसुधा अलीकडे आले, तो दुसरे दिवसी पाणीहि नदीस आले. साराश, श्रीमताचे पुण्यप्रतापेकरून शत्रूवर जरब बसून फौजा अलीकडे आल्या. आपल्यास कळावें याजकरिता लिहिले असे. रा छ १९ रमजान. *बहुत काय लिहिणे ? लोभ असो दीजे हे विनंति.

---

पत्रांक ४०३ श्री. १७१८ आषाढ वद्य १४

राजश्री नारायेणराव वैद्य गोसावी यासी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावें. विशेष. वेदशास्त्रसंपन्न राजश्री व्यंकटशास्त्री द्रवीड रामानुज ब्राह्मण, थोर, सत्पात्र व दक्षणी गायनकळेविसीं निपुण, त्यांणीं विनती केली. याचे विनतीवरून व राजश्री सदाशिव बापूजी याचे लिहिल्यावरून, सविस्तर समजण्यात आलें. त्यास, शास्त्री मशारनिले दक्षिणीगायनकलेत वित्पन्न व ब्राह्मणहि थेर सत्पात्र आहेत हे समजोन, इकडेस येण्याविसीं तेथे तुह्मीं व सदाशीव बापूंनीं त्यासीं बोललाच आहा. त्यापक्षीं त्यांणीं सरकारात येण्याचें करावे. येविसींचे मजकुराची आज्ञा जी करणे ती तुह्माकडील राजश्री राघो धोंडदेव यासी केली आहे. लिहितील. व राजश्री सदाशिव बापूजी यासी लिहिलें आहे. बोलतील, त्यावरून कळेल. व शास्त्री मशारनिल्हेचेहि नावें पत्र सरकारातून लेहून पाठविलें आहे. रा छ २७ माहे मोहरम. बहुत काय लिहिणें ! हे विनती. मोर्तबसुद.

---

पत्रांक ४०४

पो छ ११ रावल सबा तिसैन. श्री. १७१८ श्रावण वद्य ५

अजम व अकरम सिंद्धेश्वररावसाहेब साहेब सलाम हुताला:—

साहेब म्हेरबान मुशफक कदरदा फौज जाक्ष फौरसा अजिदील एकलास सेख हिंमतअल्ली अरब जमादार किल्ले बेळगाव सलाम बाजत सलाम मौवल करून आकी. येथील खैर ता छ १९ सफर साहेबाचे कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. दरिआयाम, अलीकडे साहेबाकडून आज्ञापत्र येऊन सेवकाचा साभाळ होत नाहीं. तर, साहेबीं वरचेवर आज्ञापत्र लेहून दिलआराम होई तें करणार आपण धणी असा. चरणाजवळ यावयाचें मानस. गुदस्तापासून विनती लिहितच आहें. परतु येणेंविशीं आज्ञा आली नाहीं. तर, वर्षास

---

* येथून अक्षर नानाफडणिसाचें.

साहेबाच्या चरणाजवळ एकदोन वेळां येऊन, चरण पाहिलेवर चित्त संतोष असतें त्यास, विनंती लिहिण्यास आज्ञा येतच नाहीं नाहींपेक्षां गणेश च तुर्थी होतांच शेवेसीं येतों शेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना ●

---

पत्रांक ४०५ श्री १७१८ ज्येष्ठ–कार्तिक

मा अनाम देशमुख व देशपांडे पो लोणार यासी —

चिमणाजी माधवराव प्रधान सुा सबा तीसैन मया व अलफ परगणें मजकूर येथील निमे मोकासा व सिंजाई खारकुडा श्रीहणमंतराव दरेकर सर लष्कर याजकडे फौजेचे बेगमीस सरंजाम पेशवीपासून आहे त्याप्रमाणें करार असे तरी, साल्मजकुरापासून रा नारायणराव विश्वनाथ दिवाण व फडणीस निा सरलष्कर याजकडील कमावीसदारासी रुजू होऊन परगणें मजकूरचा निमे मोकासा व सिंजाई खारकुडाचा अमल सुदामत प्रो सुरळीत देणें सर लष्कर यांजकडे न देणें

---

पत्रांक ४०६ श्री लक्ष्मीकांत प्रसन्न १७१८ आश्विन शुद्ध ९

श्रीमंत महादेव आलमेल मगापति श्री त्रिमलनाथ व्यंकटेश त्रिभुवनपति आनंतकोटिब्रह्मांडनायेक कल्पवृक्ष चिंतामण स्वामी क्षमानिधि परिपूर्ण सागर परंजोतिप्रकाशगहना श्रीवछेलाछेन श्रीत्रिमलनारायेण भुवनवैकुंठपति निराकार त्रिलोकनाथ माहास्थळ शेशाचळपरवत राजेलोक व्यंकटनायेक श्रीमाहाराज व्यंकटेश चिरंजीव भक्त राजा शाहूछेत्रपति माहाराज व श्रीमंत पेशवे मुखे प्रधान व अष्टप्रधान व राजेउमराव व कमाविसदार यासि समस्त पारपत्यकार रघुनाथ आचार्य मुद्राधिकारी फौजदार मुकाम तीरपति सरकार चेद्रगिरी देसी आसनपति देवद्वारी संनिध वसून आशापत्र आसीरवाद उपरि स्वामसेवा कारण आसीजे गोविंदआमा देशमुख पराडकर यांणीं हाजुरगिरीस येऊन वर्तमान विदित केलें कीं, समुद्रापरियेंत त्रिमलि याजकडे धरजमेचा वैवज यकला वसूल होत नाहीं त्याजवरून आशापत्र रवाना केलें आहे तर सर कारचे सिपाई देऊन, ताकीदपत्र देऊन, जेथवर त्रिमली असतील त्यास नि क्षून ताकीद करून वैवज धरजमेचा गिरीस दाखल होये तें करावें याचा फिरून बोभाट न ये तो आर्थ करावा स्वामीची आज्ञा आहे चिरंजिवास माहे मान्य करून स्वामीचे कार्यास ततपर आसावें ह्मणजे चिंतले मनकामना पूर्ण होईल हा स्वामीचा पूर्ण भरवसा धरावा तुह्मास प्रसाद गंध मनोहार पाठविला आहे सेरी वसून घेणें हा आसीरवाद मिती शके १७१८ नळनाम संवतसरे आस्वीन शुद्ध ९ नवमी

---

● मारवाडीत दस्तखत–सही

पत्रांक. ४०७ श्री. १७३८ आश्विन वा १३

श्रीमहाराजाधिराज श्रीमाहाराजा आलीजाह सुबेदारजी श्रीदौलतरावबहादुर सिंदेजू. येते श्रीमहाराजधिराज श्रीमाहाराजा श्रीराजा धौकलसिंघजूदेवके वाच. आपर, उहाके समाचार सर्वदा भले चाहिजै. इहाके समाचार आपुके करेतै भले हौतैं. आपर पाती षलीता आवो. हकीकति जानीया. भाति लिपिवेमें आई कै इहाके राज्यका बंदोबस्तु जलदी भयौ जातु है. फेर अपनै राज्यके कामकौ जावुस्वालु कारि जरूर निरयार कारि पठवाईवेमैं आइ हैं. और श्रीमाहाराज कोमार श्रीरावप्रथीसिंघजुदेवकौ लिपी है, तासौ जानिवेमैं आइ है. ताकौ और हकीकती सब तपसीलवार श्रीरावककामुसारनलेकी याती तै जानी, सो भातिभाति पातिर भई. आपुके करे तै तौ जबूदीप भरेके कार्जनकौ सुधारु होतु है. यौ राज्य तौ आपुहीकौ आई. अव हमारे कामकौ जरूर फैसला कारि पठवाइवेमैं आवै. अव देर न होइ. जेठिनके पग वदले भाईचारे व्यौहारपर नजरि करिवेमैं आवे. यौ राजु हम सब आपुहीके है. और हकीकति श्री–रावक कामुसारनलैके लिषे तै जानिवेमैं आइ है. उहाके आनद पुसी कपिवरे हमेस लिपवेमै आइ है. कातिक वदि १३ सवतु, १८५३ मुकामु रींवा.

---

पत्रांक ४०८. श्रीरामजी. १७१८ आश्विन वा १३

सिधि श्री सर्वोपमाजोग्य महाराजाधिराज आलीजाह माहाराजा श्रीसुबेदार दोलतिरावजी सींदे जोग्य लिषत राव स्यभूस्यंगकेन मुजरो बच्या ऐंठाका समाचार भला छे. आपका सदा भला चाहिज्ये. अपरच. आप कृपामेहरबानी राषे छे, तींसू विशेष रापेला. ओर दोन्यौं दरबाराको व्योहार कदीमसू चाल्यो आवे छे, सो दिन–बरदिन वधतो जाणेला. ओर केतायेक समाचार पंडित बालुबा तांतियाजीनें लिष्या छे, सो जाहरि करेला. ओर कृपा करि कागद–समाचार लिषाबो करेला. मीती काती बद १३ सवत १८५३ क.

माहाराजाधिराजआ. श्रीसूबेदार दोलतिरावजी सींदे जोग्य.

---

पत्राक ४०९ श्रीपाडुरगायनमः १७१८ कार्तिक शुद्ध ८

राजश्री रघुनाथराव भोसले गोसावी यासीः—

सकलगुणालकरणअखडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राो

दौलतराव सिंदे रामराम विनति उपरी येथील कुशल ताा छ ७ जमादिलावलपर्यंत मुक्काम लस्कर नजीक ग्वालियेर, येथें येथास्थित जाणून स्वकीय कुशल लेखनीं सतोषवीत असावें. तदनंतर अलीकडे पत्र येऊन वर्तमान

कळत नाहीं तरी, सदैय पत्रीं संतोपवीत असावें यानतर, किल्ले जापानेर येथील महालासमीप आपल्याकडील फौज आपल्या माहालानिहायच्या बंदोबस्ताकरितां येऊन पडली आहे तेव्हा इकडील किल्लेमारचे माहाली गावगना कहीकाबाद व घासदाणा वगैरे उपसर्ग लागतो, ह्मणोन समजण्यांत आलें ऐसियास, परस्पर पूर्वापार स्नेह त्यापक्षीं तिकडील महालाचा बंदोबस्त होऊन इकडील माहालीं उपसर्ग लागणें, हे अयुक्त येविपई निक्षून ताकीद होऊन इत'पर इकडील माहलची तसनस न होय सें व्हावें वेणेंकरून इकडूनही तिकडील माहलीं उपसर्ग व्हावयाचा नाहीं घरोब्याचे ठाईं पुरवील चालींत न्यून नसावें ह्मणजे, स्नेहाची वृद्धी, पुरवीपासून अहेत, त्या अन्वयें उभयपक्षीं चालींत अतर नसावें, हें स्नेहास चागलें बहुत काय लिहिणें ! लोभ असावा हे विनति

---

पत्रांक ४१० श्री १७१८ कार्तिक शुद्ध ९

यादी रघुनाथराव शुक्ल सावनेरीस लढाई आहली परसराम रामचद्र यांचे ते समई जखमी जाले सुा सबासीतैन मया व अलफ यिाा दौलतराय लक्ष्मण कारकून छ ८ जमादिलावल

---

पत्रांक ४११ श्री १७१८ कार्तिक वद्य ४




राजश्री दौलतरावबाबा गोसावी यांसी —

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो अलीबहादूर रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असले पाहिजे विशेष यशवतराव नाईक निंबाळकर यासी व यांपेले यासी लढाई जाली नाईक सरकारकामास आले त्यास, इकडे आपणाकडील फौज आहे त्यासला ताकीद कुमकेविसी यावयाविशई पूर्वी सविस्तर लिहिलेंच आहे त्यास, राजश्री जगन्नाथ राम व आंबाजी इंगळे यांचीं पत्रें आह्मांस आलीं कीं, राजश्री माधवराय फाळके व पलटणें आह्मी कुमकेस पाठविलीं आहेत व आह्मीहि मेळून पोहचवों ते येऊन

पोहोचले ह्मणजे मोठीच गोष्ट जाली. त्यास आह्मांस आपल्याकडील भरवसा याप्रमाणेच होता. त्याप्रो या समयीं दिष्टीस पडला. पूर्वापार स्नेह चालत आला आहे तोच लोभ आपण राखितील. त्यास, आह्माकडील पुरावा करावयाची काळजी आपणास असत जावी. रा छ १७ जमादिलाखर. बहुत काय लिहिणे ? लोभ कीजे हे विनंती.




---

पत्रांक ४१२ — १७१८ कार्तिक वा ८

श्रीमत महाराजाधिराज महाराज आलिजाह दवलतरावजी सिंदे बाहादुर साहेबजी योग्य:—

माहाराज चेतसिह बाहादुरकै आशीर्वाद. माहाराजके कुशलक्षेमते इहाके समाचार भले है. आगें इहासें खरीता सरकारमो भेजा है. सो राए ब्रजलाल वकीलने गुजराना होयगा. कृपा करकें जबाब ईनायत होयगा तद तसली होयगी. सरकारके कृपापत्र आवनेसे चित्तकोबडा बोध रहता है. और रातदिन यही मनावते रहते है जो सरकारका तशरीफ ल्यावना हिंदुस्तानकों जलद होय, तो अपना दुष सब सरकारमें बिनती करै और कामयाब होवै. बाकी, समाचार रायमजकूर अर्ज करैगा जांदा सुभ हमेशा कृपापत्रसें याद फरमाया कीजियेगा. मीती मार्गशीर्ष कृष्ण ८ मगळवार, सवत १८५३ बहुत का लीखै. आशीर्वाद.

---

पत्रांक ४१३ — श्री — १७१८ कार्तिक वद्य १४

यादी मसुदे. पत्रे:—

जगो बापू पत्र जे. मौजे इच्छापुरी व च्यटशहापुरा आमलेप्रमाणे माडोटी जागीर तुयुल—नबाब अजीम—उल—निसाबेगम—पातशाजादी याजकडे चालत आहे. त्यास, हालीं तेथें कमालखान याचे पुत्रानीं हर दो गावचा अमल बसनद करितात. येविसी जगोबा बापूकडून ताकीद पुस्तपना होऊन पेशजी चालत आल्याप्रमाणे बेगम याजकडे गाव चालेत,

सदरहूअन्वयें एकच पत्रे दोन जगोबाबापूस व यशवतराव यासि जे: मौजे सिखेडा प्रा ज्यलालाबाद जागीर अलतमगा—मीर—मेहेर—अल्ली व मीर—करमअल्ली याजकडे पेशजीपासून शाहा—निजामद्दीन याचे पर्यंत चालत आला. त्यास उभयतास पत्र जे, पेशजी गाव चालत आल्याप्रमाणें मशारनिलेकडे सुदामत चालो देणे, ह्मणून पत्रे.

मुरळित होय, तें करावें फिरोन यो माट येऊ न देणें अगत्यवाद घरून कार्य करीत जाणें म्हणून पत्र १
*सनदेशिवाय कमालखान यार्गे गाव दामावयास कारण काय? तरी, मुदामतप्रमाणें पेगमेकडे चालू करणें व दोन पत्रें देवणें

* वाजबी असता, जप्त करावया स कारण काय? तरी, मुदामतप्रमाणें मल्हारनिल्हेकडे देवणें म्हणोन पत्रें यावीं छ २७ जमादिलाखर.

---

पत्रांक ४१४ श्रीरामजी १७१८ कार्तिक

श्रीसकलमकुलभूषणेषु हरीभक्तिपरायणेषु श्रीगोस्वामी श्रीगिरिधारीजी महाराज एते श्रीमहाराजाधिराज श्रीमाहाराजा आलीजाह सुबेदारजी श्रीदौलतराव सिंदेके दस्तखत यांच्य इहांके स्माचार श्री—जीके कृपासु भले हैं आपके सदा भले चाहिजे अपरच पत्र आपकों आयो स्माचार बांच्या आपने श्रीजीका प्रशाद वा प्रसादीवस्त्र उपाध्याय प्रद्युम्नजीके साथ पठवाया सो पोहच्यां और सेवाबमधी उपाध्याय—मुलारनिल्हेके कहेमाफक इंहासों साकीदपत्र उगैरेह बदोमस्त करवाय दीया हैं सस्थानको कोईका पलल न होगा पत्र स्माचार हमेशा लीपत रहेंगे

---

पत्रांक ४१५ श्री १७१८ मार्गशीर्ष शुद्ध ७

शके १७१७ चे सालीं श्रीमत माधवराव नारायण पंत प्रधान कैलासवासी जाले यांचें कारण ऐसीजे श्रीमंत दादासाहेब याचे पुत्र बाजीराव व चिमणाजीआप्पा व अमृतराव हे जुनरास नाना फडणीस यांणीं ठेविले होते तेथील रखवालीस मोमोरीकर नागोराम यांचे पुत्र बळवंतराव नागनाथ यांमला ठेयिले होते त्यानें बाजीरावाशीं सख्य करून सरकारचाकरी करीत असतां यानीरा यानीं बळवंतरायास विचारिलें कीं, श्रीमंत रावसाहेब यांचे दर्शनाची इच्छा बहुत आहे (पण) हा हेत पूर्ण कसा होइल? त्यावरोन, बळवंतरायानीं विनती केली कीं, आपण म्हणतां हें उत्तम आहे, परंतु पत्र दिल्यास एकातीं श्रीमंतास प्रविष्ट करीन, आणि आपलें वर्तमान विदित करीन असें बोलले नतर बाजीरावांनीं श्रीमंतरावसाहेबास पत्र लिहिलें कीं, स्वामींचे पाय पाहावे असें चित्तात आहे, भेट होईल तो उत्तम दिवस याप्रमाणें लिहून बळवंत रायापाशीं दिलें त्यानीं पुण्यास येऊन, एकांत श्रीमंतांस पत्र लिहून, सविस्तर वर्तमान विदित केल्यावरून, हर्षायमान होऊन, उत्तर दिलें कीं, तुमचा हेत

*हा मसलाशा जगोयापूच्या हातच्या

तद्वतच आमचा हेत कीं, तुमची भेट व्हावी. त्यास थोडक्याच दिवसांत चित्तानुरूप अर्थ घडतील, चिंता न करणे. याप्रमाणे लिहून दिले. बळवंतराव आपले घरास गेले. हें वर्तमान जवळच खिजमतगार यानें ध्यानात आणून जाहले वर्तमान नानाफडणीस यास विदित केलें कीं, बळवंतराव नागनाथ यास श्रीमंतानीं चिठी दिली. त्याजवर, नानानीं बळवंतरायाचा कारकून बोलाऊन आणून सांगितले कीं, श्रीमंतानीं बळवंतरायास काय चिठी दिली ती कलमदानात किंवा गोमुखात असेल. तिचा शोध करून बळवंतरावास न कळता आणून देणे. त्याने शोध करून, बळवंतरावास न कळता आणून दिली. चिठी घेऊन श्रीमंताकडे नाना गेले आणि एकांती श्रीमंतास विचारू लागले कीं, आपण बळवंतरायास कशाची चिठी दिली ते सांगितलें पाहिजे. श्रीमंत बोलले कीं, आह्मीं कांहीं चिठी दिली नाहीं व त्यासीं कांहीं भाषणही केले नाहीं. मग नानानी शपथ घालून विचारिलें. तेव्हां शपथपूर्वक याप्रमाणेच बोलले कीं, बळवंतरायास आह्मीं चिठी दिली नाहीं. मग नानानीं चिठी पुढे टाकिली. ती श्रीमंतानीं पाहून खालीं पाहू लागले. मग नाना कांहीं उणें अधिक बोलले. ते ध्यानात ठेऊन जरब घेतली. इकडे, बळवंतरायास नानानी बेडी घालून किल्ल्यास पाठविले. घरीं चौकी बसविली. असें जाणून, श्रीमंत बहुत खिन्न झाले. नानास बोलावून सांगितलें कीं, बळवंतरायाकडे काय अन्याय आहे, जें केले तें म्या केलें, त्याची बेडी काढावी. तें नानानी कांहीं ऐकिलें नाहीं. पुढे दसरा आला. दसऱ्याचे दिवशीं श्रीमंत सीमा उल्लंघन करून आले. परंतु असंतोषीच होते. तदनंतर त्रयोदशीचे दिवशीं माडीवरून अकस्मात् उडी टाकिली. हात पाय मोडले. औषधउपाय करतां, मृत्यु पावले. तदनंतर एक दोन महिने नानानी राज्यकारभार तसाच चालविला. दादासाहेबाचे पुत्र त्रिवर्ग जुन्नरी असतां, त्यांस आणून राज्यभार त्याचा त्यास देऊन चालवावे, ते न करिता, दत्त घेऊन रावसाहेबाचे बायकोचे माडीवर बसवून राज्य चालवावे, या मसलतींत सिंदे, होळकर आदिकरून सरदार व मुत्सद्दी यास, आपण करतो हें सर्वांनीं मान्य करून दत्त घ्यावा हे नानानीं आरंभिले. तेव्हां कोणी रुकार निखालसपणे देईनात. प्रत्यक्ष श्रीमंताचा वंश असतांना, दुसरा वंश निभणार नाहीं. बाजीरायास वस्त्रें द्यावीं आणि आपण आपले कारभार करावे असा आग्रह दौलतराव शिंदे याचा पडला. सबब, नानाच्या व शिंद्याच्या चित्तात विकल्प विशेष वाढून, वैरत्वास गोष्ट पडली. कारण, शिंद्याचा जोरा विशेष पडला. बाजीरायाकडे शिंद्याचें आत्र लागलें. त्याजला शिंदे पुण्यास घेऊन येऊन गादीवर बसविणार, पुढें आपला परिणाम नाहीं, असे नानास समजलें. तेव्हा नानानीं परशरामभाऊ पटवर्धन यास बोलाऊन मदत करून ठरविले कीं, शिंद्याचे अगोदर आपण उभयतां श्रीमंत यास बहुत सन्मान करून आणून बसवावे.

४३

असा निश्चय केला येविषीं परशरामभाऊनीं नानापाशीं शपत घेतली कीं, त्यास आपल्यास गादीवर बसवावें, पुढें विकल्प आणू नये तेव्हा नानांनीं शपथ दिली कीं, कांहीं विकल्प नाहीं, तुम्ही जें कराल त्यात आपण असों असा निश्चय झाल्यावरून, रावोराव परशरामभाऊ जुन्नरास जाऊन त्रिंबकेश्वरी बाजीरावास भेटले आणि विनंती केली कीं, आपण पुण्यास चलावें, आपलें राज्य करावें म्हणोन बहुत प्रकारें विनती केली येविषीं त्यानींहि राजमकरणीं अनेक प्रकारची विकल्पना काढून बोलत गेले तितक्यांचीं निराकर्णे परशरामभाऊ नीं आगेवर्णी करून केलीं शेवटीं, त्यानीं शपथा करविल्या त्याहि केल्या दूधभाताची क्रिया केली गणपतीच्या दुर्वा उचलून दिल्या तुळशी दिल्या गाईच्या शपथा केल्या याप्रमाणें केलें त्याप्रमाणें भीमतानींहि आपले तर्फेनें शपथा करून कूच केलें अमृतराव तेथें राहिले उभयतां बंधु पुण्याचे नजीक लडकीच्या मुकामास आले इकडून नाना आदिकरून भेटीस गेले नानांनीं विनती केली कीं, मी अपराधी आहें त्याचें उत्तर बाजीरायानें केलें कीं, तुमचे अपराध तुम्हांस माफ केले, स्वस्थ असावें. याप्रमाणें बोलून, मस्तकीं हात ठेऊन, अभिधान दिलें कीं, तुम्हीं आम्हांस दादासाहेबांप्रमाणें आहांत असें जालें पुढें विचार नानांनीं केला कीं, रात्रौ समारंभ करून शहरांत आणावें, वाड्यांत चिमणाजी आपा साहेबांस न्यावें आणि बाजीरावांस कि त्याकडे न्यावें हें त्यास कर्णोपकर्णी श्रुत जालें व शिंद्याकडील पत्र आलें कीं, आम्हीं येई तोंपर्यंत आपण वाड्यांत न जावें इकडे नानांचें व शिंद्याचें वैमनस्य, शियबामखी शिंद्याकडील मृत्यु पावल्यामुळें, पडलें होतें समय, गोविंदराव पिंगळे, मोंगलांचे वकील, नानाकडून शिंद्याकडे गेले होते त्यासीं तापट भाषण शिंद्यानीं नानाविषयीं केलें त्यावरून तें नानास भयप्रद वाटून भीमताकडे निरोपास आले आणि म्हणों लागलें कीं, शिंद्याचे चित्तांत आमचे विषीं विकल्प आला आहे, ते आमची स्थित ठेवणार नाहींत, त्यापक्षीं त्यांची व आमची समक्षता होणें ठीक नाहीं याकरितां आम्हास निरोप द्यावा तेव्हां, भीमतांनीं उत्तर दिलें कीं, आम्हीं असता तुमचें शिंदे काई करीत नाहींत, तुम्ही बेफिकीर असावें असें बहुत प्रकारें खातरजमा केली परंतु चि त्तास चैन पडेना आणि इतबारही पुरेना मग, पायावर डोई ठेऊन, निरोप मागितला त्यांनीं विडे दिले ते घेऊन, त्या घटकेस कूच करून, पुरंदरास आले तेथून फाल्गुन शुद्ध ५ निघोन, रावोरास साताऱ्यास येऊन राहिले इकडे शिंदे पुण्यास येऊन भीमताची भेट लडकीच्या तळावर घेतली पुढें राज्य करण्यास शिंद्याकडील बाळोबा पागनीस व इकडे परशरामभाऊ यानीं एक चित्त करून, बाजीरायास बर्से आणून, गादीवर बसवावें, हे मसलत सिद्ध जाली असता, शिंद्यास समजाविलें कीं, बाजीराव नानाचा आक्षेप सोडीत नाहींत, पुढें आपला परिणाम काय ? इकडे बाजीरावास सांगितलें कीं आपण

नानास अभय दिल्हे असता, शिंदे पारपत्य करू ह्मणतात, हे काय ? ऐसा उभयतात वीट पाहून, शिंद्यास सागून, बाजीरायास कैद करविले. इकडे चिमणाजी आपास आपण घेऊन पुण्यास आले. चिमणाजी आपा येईनात. तेव्हा बळेच अप्रतिष्ठा करून, पालखींत घालून आणविले. सर्वस्वे परशरामभाऊचे माडीवर श्रीमताची मान असता, त्याची हे गत केली. आणि अशास्त्र करून बाईच्या वोटयात चिमाजी आपा घातले. दत्तविधान केले व गादीवर बळेच बसऊन राज्यकारभार परशरामभाऊनीं पागनीस याच्या अनुमतें चालविला. अविधीकर्म केल्यापासून सर्वास असाध्य जाले. शिंद्याचेच लोक व आणखी सरदार शब्द टेऊ लागले. बाजीरायानीं चिमाजी आपाचा छंद फार घेतला. उपोषणे देखील केली. परतु उभयताची भेट करीनात. बाजीरायास परस्थळी नेऊन कैदेत ठेवावे, असा निश्चय करून, त्यास ह्मणो लागले कीं, तूर्त येथें बखेडा आहे, नानाचे पारपत्य जाल्याउपरी तुमची गादी तुह्मास देऊ, तूर्त आपण चार दिवस जामगावास जावे. त्यास, बाजीराव बोलले कीं, तुह्मीं आह्मास आणिले त्यापक्षीं येथेच काय होणे ते होईल, किंवा आह्मा त्रिवर्ग बधूस एकत्र करून मग चित्तास येईल तेथे ठेवावें, तोंपर्यत आह्मीं येथून सुप्रवृत्तीनें जाणार नाहीं. म्हणून माजरीच्या तळावरी हट्ट धरून बसले. तेव्हा, यानीं बहुत अमर्याद तगादा केला. पाणी बद केले. लोकमानाना सुद्धा सात उपोषणे पडलीं. तदनतर निरुपाय म्हणून शिंद्यासीं उत्तर केलें कीं, आह्मी मरणास सिद्ध जालों असता तुह्मी ऐकत नाहीं, तर तुमच्या चित्तास येईल तेथ राहू. आह्मीं सर्व सोडिलें. मग दौलतरायानीं शपथ वाहिली कीं, तुमच्या पायापाशीं दुसरा अर्थ आपला नाहीं. चार दिवस आपण जामगावास जावे, पहिन्यापधरा दिवसात सर्व बदोबस्त होऊन आपण गादीवर बसतील. ऐशीं बहुत प्रकारें खातरजमा करून, समागमे फौज देऊन, जामगावाकडे वाटे लाविले. इकडे, नानाकडे बापूची रवानगी केली. नानानीं मसलत लढविली कीं, पागनीस व परशरामभाऊ यास धरावे ह्मणजे आह्मीं येतों आणि सर्वत्र मिळोन बाजीरावसाहेब यास राज्य द्यावे, वस्त्रें द्यावीं असा निश्चय केला. हें वर्तमान अवश्यमेव शिंद्यास होतेंच. मग दरबारास पागनीस व धोडोबा दादा यास बोलाऊन आणून कैद केले. आणि आपा बळवत यास चिठी पाठविली की, परशरामभाऊस तुह्मी हुजरात घेऊन कैद करावें. तो ती चिठी परशरामभाऊचे हातीं गफलतीनें लागली. तो इतक्यात सावधगिरी करून वाड्यात आले. आणि चिमाजी आपास घेऊन आपले फौजेंत आले. तों मागाहून होळकराची व मोंगलाची फौज चालत आली. गोट लुटला. परशरामभाऊ सडे दो हजारानिशीं चिमाजी आपास घेऊन जुन्नरास गेले. फौजाही मागोमाग गेल्याने मार्गीं सापडत गेलें तें लुटलें. तेथे शहरात फौज ठेऊन, किल्यावर चिमाजीआपास घेऊन, परशरामभाऊ गेले. तो किल्लेदारानीं आ-

पासाहेबांस घेतलें आणि परशरामभाऊस कांहीं घेतलें नाहीं मग बाहेरील फौजेनें चिमाजीआपास किल्यावरून आणून, आपणाजवळ घेतल्यावर, परशरामभाऊवर हल्ला केला संपूर्ण लुटून फस्त केला लोक असामी बहुत मारले कांहीं पळून गेले दोघे पुत्र व परशरामभाऊ असे धरून, रास्ते यांनी कैद करून, आपले गोटास आणिले आणि लवेच फराटयाचे माळवगणास पाठविले इकडे, जामगावाहून बाजीराव व अमृतराव असे शिंद्यांनी पुण्यास आणिलें श्रीमंताची भेट सर्वांनी घेतली तोंपर्यंत रघोजी भोंसले फौजेसुद्धा पुण्यास आले त्याच्याहि भेटी जाहल्या बाजीरावसाहेबास वस्त्रें देऊन, त्रिवग वधूनीं राज्य पूर्वी कैलासवासी नाना, भाऊ व दादासाहेब यांनी चालविलें, या अन्वयें राज्य करावें, असें सिद्ध झालें नंतर राज्याकडील वस्त्रें सातान्याहून आणिलीं, आणि मार्गशीर्ष शुद्ध पंचमी रविवारीं तेरा घटका रात्रीं श्रवण नक्षत्रावरी बाजीरायास वस्त्रें अलंकार देऊन, दुसरे दिवशीं सोमवारीं प्रातःकाळीं शहरात बहुत समारंभ करून, वाड्यांत आणिलें शके १७१८ नलनाम संवत्सरे, सन १२०६ मार्गशीर्ष मास

---

पत्रांक ४१६ श्रीगजानन प्रा १७१८ मार्गशीर्ष शुद्ध ७

कृष्णगडवाले यांसी पत्र कीं, पो सामर येथील कमाविसदार याजकडील कारकून माणसें तुमचे गावीं राहून, सामरेखेरीज मारवांववाल्याची नाव पंच भद्रा वगैरे मिठाचीं बंदरें आहेत तेथून मिठाची भरती करून, बेपारी तुमचे प्रांतांतून जातो त्याजपासून फौजदारीचा हासील घेतात दरम्यान तुम्हाकडोन दिकत होते व तुम्हाकडील वकीलानीं गैरवाका समजाऊन फौजदारी बाब पदरचे कादारास नेली ऐशियासि, सरकार–अमलापासून चालत आलें, त्यात दिकत केल्यास ठीक नाहीं सरकारनुकसानीचा बाब तुम्हांस करणें लागेल तरी फौजदारीचा सरकार–अंमल सुरळीत चालेल, फिरोन बोभाट न ये, तें करणें म्हणोन, व सदरहू–अन्वयें यशवंतराव शिवाजी, यांसी, असे रीत पत्र

*सदरहूअन्वयें पत्र लिहून यावें छ ६ जमादिलाखर सबा तिसेन

---

पत्रांक ४१७ श्रीगजानन प्रा १७१८ मार्गशीर्ष शुद्ध ७

पो सामरचे बंदोबस्ताविषयीं सरकारचीं पत्रें

१ सुदी व कोठेवाले यांसी कीं, वणजारा बेपारी तुमचे प्रांतांतून मिठाचे भरतीस जातात त्यां, पो सामर येथील कारकून तेथें राहून बेपारीयांची पेट करून सामरेस भरतीस पाठवावे, आणि सागरेखेरीज नावा पंचभद्राकडे मिठाचे भरती करून येतात त्यांजपासून फौजदारीचा हासील लागतो तो

---

* येथून हस्ताक्षर मुख्याधिकाऱ्याचें मसलाशी

घेतात. ऐसें चालत आलें असता, सालमजकुरीं दरोबस्त बणजारा मारवाड-वाले यांच्या बदरास पाठविले, सामरची फौजदारी घेऊं दिल्ही नाहीं, ह्मणोन विदित जालें. ऐसियासी, ये गोष्टीनें सरकार-नुकसान ध्यानास न आणिता, कादारास न मानून बखेडा करता. तरी, इतःपर तुह्मीं बेपारी सामरेकडे भरतीस जाऊं न दिल्यानें पा। मारचे जमेंत कसर होऊन, त्याचा जाब तुह्मास करणें लागेल, ऐसें समजोन सरकार अमलापासून वहिवाट चालत आल्याप्रमाणें चालवणें. फिरोन बोभाट येऊं न देणें.

१ लालाजीबाबास पत्र ऐसें कीं, बुटीकोटेवरून बणजारा बेपारी मिठाचे भरतीस जातात. त्यास सामरेकडे जाऊं न देता, मारवाडवाले याच्या बदराकडे पाठविले. सामरेसेरीज भरती येते त्याजपासून फौजदारीचा हासील पा। मारचा कारकून माणसें सस्थानमारीं असता त्यास घेऊं न दिल्हा. रागड्याकडून सरकार-अमलासी दिकत जाली. तरी तुह्मी त्यास ताकीद करून सुरळित चालवावा, ऐसें न होता, तुह्माकडीलच कारकून रागड्याचे तरफेचें बोलणें बोलतात. ऐसियासी, बेपारी कोणी सामरेकडे न पाठविला आणि फौजदारीचे हासीलात दिकत केलीयानें पा। मारची जमा कैसी बसते, हें तुह्मीं ध्यानास न आणल्यानें सरकार-अमलात सालमारीं बखेडा जाला, ह्मणोन विदित जालें. त्यास, अतःपर फौजदारी वगैरे सरकारअमलापासून चालत आल्याप्रों हाली न चालल्यास सरकारनुकसानीचा जाब, ऐसें समजोन फौजदारी हासिलाचे वगैरे सुरळित चाले तें करावें. फिरोन बोभाट न ये तें करणें.

*सदरहूचा साराश पाहून पत्र द्यावें. छ ६ जमादिलाखर सबा तिसैन. मेघशामराव जमे बक्षी.

---

पत्रांक ४१८ श्री. १७१८ मार्गशीर्ष वद्य ६

श्रीमत राजेश्री बाबासाहेब साहेबाचे सेवेसीः—

आज्ञाधारक येशवतराव व अमृतराव सिंदे कृतानेक रामराम विज्ञापना तागाईत छ २० जमादिलाखर मुकाम दिल्ली साहेबाचे कृपावलोकनें करून वर्तमान यथास्थित असे. विशेष. पेशजी आज्ञापत्र पाठविलें त्यात आज्ञा कीं श्रीमत राजश्री बाजीराव साहेब पत प्रधान याच्या व आपल्या भेटी जाहल्याचें वर्तमान लिहोन अर्जी हरजत पन्हा याशी पाठविली आहे. त्यास, तुम्ही हे अर्जी हुजूर गुजरून, याचे जबाब जलदी पाठऊन देणें; म्हणोन त्यावरून अर्जी व आज्ञापत्रें येथे येऊन पोचतांच, आज्ञेप्रमाणें अर्जी हुजूर गुजरून प्रत्योतराचे शुक्याबदल अर्जी केली. तेव्हा शुके लिहावयाचा हुकूम होऊन आज शुके लिहिले. तयार करून सेवेसी पाठविले आहेत. साहेबाचे नांवें एक

---

*येथपासून मजकूर मुख्याधिकाऱ्याच्या हातचा.

शुका, व भीमत राजश्री बाजीरावसाहेब पंतप्रधान यांचे नांवें येक शुका, व भीमत राजश्री नाना फडणीस यांचे नांवें येक, ऐसें तीन शुके हुजूरून लिहिले ते हार्लीं डाके समागमें रवाना करून दिल्हे आहेत प्रविष्ट जाहल्याचें प्रत्यो त्तर यावयासी लेखनआज्ञा जाहली पाहिजे यानंतर इकडील वर्तमान धण्याचें पुण्यप्रतापेंकरून सर्वहि यथास्थित आहे आम्ही अहिर्णिशीं हजरतपन्हाचे खि जमतींत हाजर राहोन, मुरशदजादे आदिकरून सर्वांचें तबीयतींत किंचितहि नाखुष न होऊं पावे अशी चौकशी क्षणक्षणा करून, सरकारसेवेच्या लक्षें हरयेकविशीं कामकाजाचा बंदोबस्त राखोन आहों चाकरीची बूझ करून सांभाळ करणार धणी समर्थ आहेत येथील किल्यांत किलेदारीचा जिमा गुदस्तापासून या मानसिंग गौतम याचा होता सांप्रतकाळीं मार्निलेहेचें चित्त सरकारचाकरीचे ठायीं कपेश दिलगीर, ऐसें राजश्री जगोबाबापू यांस समजल्यामुळें, किलेदारीच्या सनदा आमचे नांवें करून पाठविल्या त्या फाळच आम्हांकडे येऊन पोंचल्या एका दो रोजांत किलेदारीची दखल येऊन, किल्यातील बंदोबस्त चौक्या पाहारे व दिली दर्वाजे वगैरेचा बंदसुरी चालत आहे, त्या अन्वयें करून मागाहून सेवेसी विनंतिपत्र लिहोन पाठ विणें बहुत काय लिहूं ! कृपा निरंतर केली पाहिजे हे विज्ञप्ति

---

पत्रांक ४१९ ॥ श्री ॥ १७१८ मार्गशीर्ष वद्य ११

मसुदा सरकारचे ताकीद यावयाचे दिल्लीचे सुभादार येशवंतराव सिंदे यास ताकीद लिहावेयाचे —काशीरामराय, कमळनयन मुनशी निा सरकार याचे पुत्र, काशीराम यास दिल्लीचे सुभाचे मुनिशीगिरी मोकरर जाहली आहे तेथील लिहिणें-पुसणें वगैरे आवश्यक त्यांजकडून घेत नाहीं, म्हणून कळलें, आणखी दुसरे चुनीलालकडून लिहिवितां म्हणून समजलें जे लि हिणें, फारसींचें लिहिणें काम काय असेल तरी सरकारचे मुनसीशिवाय दुस रयाकडून न घेणें मुशारनिलेकडील चुनीलाल यास बरतर्फ करणें तो पहिला गुमा स्ता त्या जवळ होता हाली मुनसीसहि चुनीलालासहि बनत नाहीं, यास्तव तुम्ही त्यास बरतर्फ करणें फारसीचें लिहिणेंचें जे कारभार असेल तरी का सीराम मुनसीचे हातीं घेत जाणें काशीराम मुनसीस दरमाहा रुपये ५० पन्नास देत जाणें हे रोसमरोसमत रुपये पाछाई सुभेत सर्व मुजरा आहे दर शेकडे रुपया ॥ आठ आणेप्रमाणें पादशाई सुभेचे मुनसीस तहरीर पा दशाई महालाची आमदानीवर मोकरार आहे हरयेक अमील यास ताकीद करून, हे रुपये काशीरामास देवित जाणें या गोष्टीचे तकरार न होणें या जविपई फिरिये द सरकारांत येऊ न देणें आणि हरसहाय म्हणार कमलनयन मुनशीचे नातू आहे, त्यास दिल्लीचे तैनांत महंमदीखान पलटण आहे त्या

पलटणाचे फारसीचे सिरस्तदारी सांगितले आहे. तरी पलटणचे शिरस्तेचे काम-काज हरसहाय याजकून घेणे. यास रोजमरा मागला सिरस्तदारीचा यास देणे. कदीम सिरस्तदारास बरतर्फ करणे. याजविषई खानमजकुरास ताकीद करणे. दुसरेचे हातें एकदर काम पारसीचे न घेणे. काशीरामाचा राजीनामा पाठविला आहे. फिरून बोभाट न ये ते करणे.

साराश पाहून दोन पत्रे लिहावी. छ. २७ जमादिलखर, सबा तिसैन.

---

पत्रांक ४२० श्री १७१८ मार्गशीर्ष वद्य ३०

साहेबाचे शेवेसी आज्ञाधारक लक्ष्मण अनत कृतानेक विज्ञापना विनती ता। छ २९ जमादिलाखर मुक्काम श्रीगगातीर, येथें महाराजाचे कृपावलोकने-करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. साहेबीं आज्ञापत्रें पाठविलीं, त्यात आज्ञा जे:—खातरजमेने कोणेविसींचा आदेशा न करिता येऊन काम-काज पूर्ववत्प्रमाणें करीत जाणे. त्यावरून आह्मीं सैन्यात जाणेची सिद्धता करून सेवेसी विनतिपत्रें दोनतीन पाटविलीं आहेत. प्रविष्ट जाहलीं असल्यास सेवकाकडील अभिप्राय ध्यानीं आला असेल. राजश्री जगन्नाथराम याणीं च्यार सरदार आह्मास न्हेणेंविसीं पाठवणे विचारिलें. त्यास, आह्मास चौथा सरदा-रासी प्रयोजन काय? आण—खातरजमा कशास पाहिजे? येक गोष्टीची खात-रजमा पाहिजे. मजकडील कोणी काहीं सागेल आगर लिहितील तर त्याची छाण धण्यानीं करावी. छाण केल्याअतीं दुसरेयाचे सागणे करार पडले, तर मग आमचे धण्यानीं पारपत्य करावें, क्षणाचा उजूर करू नये. आणि छाण न करिता तुफान, ऐसें धण्याचे ध्यानीं आल्यास सेवक निर्मल होईल. येद-र्थाचें मात्र पक्के वचन साहेबाचे घ्यावे. कारण गरीबीची आबरू सेवकाची आहे. विनाइलजाम कोणाच्या सांगितल्यावर जाहाला आबरूस खत्रा न व्हावा, इतकाच सकल्प. ह्मणोन अर्ज करून वचन घ्यावें ह्मणोन, चिरजीव देवबा यासी लिहून पाठविले. तीं पत्रें पोहचून चिरजीवाकडोन साहेबाचे श्रवणी सेवकाची विनति आली कीं नाहीं कळेना. ऐसें असोन, सेवकाकडील हरामखोरी कोणाच्या सांगितल्यावरून धण्याचे ध्यानीं आली? ह्मणोन ऐकिलों कीं हा जाऊन नवाबाच्या अमलात बसोन आगरेच्या किल्ल्याची मजबुदी केली आहे. हरामखोरीवर प्रवर्तेल ऐसे चित्तीं आले. त्यासी नवाबाच्या मुल-कात सैन्यातून येणेचा परियाय येक आबरूकरिता. तो मजकूर सविस्तर, दोन तीन विनतिपत्रीं पेशजी लिलिला आहे. पत्रें सेवकाचीं पोंहचल्यास ध्यानीं आलाच असेल. आगऱ्याचे किल्ल्याची मजबुदी नवीन आज ती कशाक-रिता करावी? आगरेची जप्ती करणेविसीं सडे फौजेंतलि सरदारास लिहून आले असेल. त्यावरून गुलाबराव कदम आगरेस सरदारानी रवाना केले.

परंतु, सरकारचें आज्ञापत्र सेवकाचे नांवें नाहीं तेव्हां विनाआज्ञापत्र किल्ला स्वाधीन करून ! या उभा धण्यानीं विचारिलें कीं कोणाचे आदेश रून किल्ला दिल्हा ! तर उत्तर द्यावयास जागा नाहीं लहान गढी असली त्याच्या तीन परमानग्याचा उजूर करावा लागतो हा आगरेचा किल्ला बिना सरकार आज्ञापत्राशिवाइ किल्ला कैसा द्यावा म्हणोन, राजश्री विश्राम अनंत यांणीं साहेबास विनंतिपत्र लिहून परभोरी कैलासवासी माहाराज यांचे संकेतानुप्रमाणें रवाना केली आहे पत्रें पोंहचून उत्तर आलें म्हणजे किल्ला स्वाधीन करून, कबज घेऊन, चरणापाशीं यावें ऐसें साहेबाच्या, चरणीं लक्ष असतां, गैरवाका सेवकाकडील सरकारांत ध्यानीं येतो तस्मात मददचा ऐसी म्हणोन लटिके आळ येतात येक मजबुती आगरेच्या किल्यांत इस्माइलबेग हरामखोर याची केली कारण सेवकाचे शरीरीचें वर्तमान मशहूर जाहलें तेव्हां शिव दीचे लोक वगैरे आपापले ठिकाणीं दिलगीर होऊन, बंदोबस्त प्रसंगीं कमी पडोन, हरामखोर निघोन गेल्यास, जाहला हरामखोरी माथां येईल, त्या काळीं प्राण द्यावा लागेल यास्तव आगरेत बरोबर हरामखोराचा बंदोबस्त परिस्थापेक्षा अधिक जपून राखणेंविशीं लिहीत गेलों किल्याविशीं सरकारी आज्ञापत्रें घेऊन किल्ला देणेंत उजूर करतों, तर मग धण्यानीं सेवकाची ह रामखोरी ध्यानीं आणावयाची होती ऐसे प्रकार लटिके धण्यास कोणी सांगू लागेल, तेव्हां सेवकाचा परिणाम काय ! त्यास सेवकाची विनंति हेच कीं, येक वेळ चरणापाशीं बोलाऊन ध्यावें, मजकडे कोण काय इलजाम सांगतील त्याचे जाबसाल मी सर्व पुरऊन देईन इलजाम येकहि अंगीं लागल्यास ते क्षणीं पारपत्य करावें आण साहेबाचे कृपेनें मी येकनिष्ठपणें वर्तणूक प्रकरणा न करतां केली असलेस लिलप्राय इलजाम लागणार नाहीं त्याकाळीं ध ण्याची निश्चा जाहल्याअर्ती मग धणी कृपाळू होऊन जे सेवा सांगतील त्या सेवेंत हाजर आहे प्रथमपासोन संकल्प, धणीकामावर या शरीराचें सार्थक व्हावें, ऐसा आहे धण्याचे प्रतापें माझा संकल्प सिद्दीस जाईल दृढ भाव दर्शनें येकनिष्ठता ठेऊन लहान–मोठ्या चाकऱ्या धण्याच्या केल्या असतां, साहेबाच्या चरणाचा वियोग होऊन अरण्यवास घडला आहे त्यासी आमची निष्ठा धण्याचे चरणीं असल्यास, धणी कृपाळू होऊन चरणाची भेट होईल वरकड राजश्री पाटील विनंति करितील कृपा करून उत्तराची आज्ञा जाहली पाहिजे सेवक पदरींचा म्हणोन, साभाळ करणार धणी समर्थ आहेत सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ती

---

पत्रांक ४२१ श्री १७१८ पौष शुद्ध ६

यशवंतराय यांसि पत्र सरकारचें कीं—

आर्सी हजरत पातशाहा म गुरावतमादे—आराम यांसि अमदास व

अर्जी हाजीजी याचे मार्फतीनें पाठविली. त्याजकरितां तुम्हांस वाईट लागले. व दुसरी अर्जी श्रीमत् बाजीराव–साहेब–बहादर व बाळाजी जनार्दन फडणीस याजविसी शुके आणवावयाविसी पाा होती. त्यास, मुनशीजी यासि लिहून देता, तुम्ही मोहर होऊ देत नाही, याचा अर्थ काय? तुम्ही व मानसिंग किलेदार मिळोन वारवार हजरत पातशाहापासी अर्ज करिता जे, हाजीजीचे मार्फतीने हुजूर अर्जदास्त न यावी, व हुजूरचा जाबसालहि न करावा, शुके दर–जवाब अर्जाचे आम्हींच पाठवून देत जाऊ. तुम्ही पातशाहासी बोलणे बोलता, ते काय समजून, हे पुरते समजावें. सरकारातून मर्जीस येईल त्याचे हातून काम घ्यावयाचें. व हजरत पातशाहाहि मुखत्यार आहेत. त्याचे मर्जीस येईल त्याचे हाते काम–काज घेतील. कैलासवासी माहाराजहि हाजीजीचे हातें दाहा वर्षे काम काज घेत आले. तुम्ही यात मन घालू नये. ज्या प्रो पातशा आज्ञा करितील त्या प्रो मुनसी शुके लिहून हाजीजीचे बधू तेथें आहेत त्याचे हवाली करीत जावें. तुम्हास काम–काज सांगितलें आहे तितके करून राहावे. हजरत यासी व आम्हासी राज्याचे जाबसाल हरएक होतात त्यात तुमचे कारण नाहीं. या प्रो निक्षून पत्र यावे.

* यशवतराव शिंदे यास पत्र कीं श्रीमत बाजीराव–साहेब पतप्रधान व राजश्री बाळाजी जनार्दन फडनवीस याचे नावें शुके आणविले होते व अर्जा हुजूर केली होती. त्यास बहुत ध्यानास आणता कळलें कीं, तुम्ही अर्जीच हुजूर पोहचविली नाहीं व शुकेहि पाठविले नाहींत. त्यापक्षीं शुके कसे येणार ? हे ठीक न केले. येथे काम नेटाचें आणि तुमची तो नवी ज्याजबदारी. यामुळें मोठ्या कार्यास विलब पडला. तरी, याउपरीं पत्र-दर्शन हुजूर अर्जी देऊन, शुके तयार करऊन, पाठवून देणें. हाली येथें हाजीजी आहेत. त्याचे मार्फत अर्जी जात आहे. शुके त्या अन्वयें येत आहेत याची तक्रार तुम्हीं न करावी. आणखी कोण्हीकडिल काम आल्यास चौकशी करणें नीट आहे. याचे मार्फतच्या कामास उजूर पडू न देणें. हमेशचा शिरस्ता आहे. याचे मार्फत अर्जी जाईल. शुका यावयास विलब न करणें म्हणोन पत्र पाठवावे. छ ५ रजब, सबा तिसैन.

---

पत्राक ४२२ श्री. १७१८ पौष शुद्ध १२

श्रीमत माहाराजाधिराज माहाराज आलीजाह दवलतरावजी सिंदे बहादुर साहेबजी योग्यः—

माहाराज–चेतसिंह–बहादुरकै आसिर्वाद. माहाराजकी कुशलक्षेम सदा भली चाहिये. माहाराजके कृपातें इहाके समाचार भले है. अपरच, मकर-

---

* वरील तक्रारीला यशवतरावाचें हे स्वहस्तें उत्तर आहे.

तफ़ाउके विल शरफरायुक्त इरसाल कीये हैं, सो कृपा करके कबूल फर्माइयेगा और हमेशा कृपापत्र भेजके याद फर्माया कीजिये आदा सुभ मीति पौष शुद्ध १२ सवत १८५२ * बहुत का लिखें आशीर्वाद

---

पत्रांक ४२३ श्री २ १७१८ पौष शुद्ध १४

श्रीमंत राजश्री बाबासाहेब साहेबांचे सेवेसी —

* धार आहों परद्ध शहाची फौज बहुत त्याच्या मुकाबल्याप्रमाणें इक डीलहि फौजेचा जमाव असता, तरी चिंता काय होती ! तूर्तकाळीं सरकार च्या फौजेचा भरणा इकडे थोडा राजश्री बापू येथून पधरा मजलावर फाल पीस आहेत घरचेवर पत्रें त्याजला लिहितच असतों परंतु लवकर येऊन उपराळा करितील तो सुदिन आहे तेथूनहि बापूस आज्ञापत्रें बहुत जलदीनें लिहून, अतित्वरा बापू फौजेसह वर्तमान इकडे येऊन पोचत, ऐसा अर्थ केला पाहिजे हें वर्तमान एक महिना येथें क्रमवेस येतें नित्य आम्ही लस्क रांत लिहितच होतों परंतु लाहोरास आलेशिवाय सत्य-मिथ्या समजेल का रण कीं, लाहोरा पलीकडील मुलुख त्यांचा व अटक उतरलेशिवाय इकडील इरादा समजत नाहीं परंतु नित्य फर्से वर्तमान लस्करांत लिहितच होतों आतां ईश्वरें याप्रमाणें प्रसग मांडला आहे तर धण्यांनीं त्वरा उपराळा केला पाहिजे आम्ही तर सासाचे पेचांत आलों आहों ईश्वर पार पाडील चिंता नाहीं सर्व पुण्य धण्याचें कागदपत्रीं लवकर उपराळा केला पाहिजे या स मयास तहसील मुलुकांतील बंद होऊन पधरा दिवस जाले एक पैसा येत नाहीं पातशाचा खर्च व सिबदीसुद्धां साठसत्तर हजार रुपयांचा दरमाहा आहे हें हिंदुस्थान ! क्षणाक्षणाची हया घेतात ! कर्ज मुळें एक रुपया कोणी देत नाहीं या समयास उपराळा केला पाहिजे बहुत काय लिहिणें ? कृपा निरं तर असो दिल्ली पाहिजे येथील उत्तरें पातशाचीं वगैरे जीं सला करणें तीं, येथून लस्करांत लिहिलें आहे, त्याचें उत्तर येईल त्याप्रमाणें करूं. आपणहि आज्ञा करणें ती करावी व कांहीं लास पन्नास हजार रुपयेचा ऐवज पा व णजे पातशाचा खर्च चालेल नाहींतर, येकतर फौजेचे निकड, दुसरे, हुजू रचा खर्च न चालला तर कठीण न जाणो, निदान अशाच प्रसग पडला, आण पातशायास येथुन काढूं झटलें लाखो रुपये खच पाठवायाची तजवीज करून उत्तर पत्र मारवतीच पाठवायास आज्ञा केली पाहिजे हे विज्ञाप्ति

---

पत्रांक ४२४ श्रीरामप्रसन्न १७१८ पौष शुद्ध १४

राजश्री रायाजी पाटील गोसावी यासी —

अखंडित-लक्ष्मी-अलंकृत राजमान्य स्नो मेहरबंतराव व अमृतराव शिंदे

---

* येथपासून हस्ताक्षर चेतर्सिंगाचें

रामराम विनंति येथील कुशल ता। छ १३ रजब आपले कृपें करून मुकाम दिल्ली वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमानः—विलायत–वाला फौजबदी करून, या प्रातावर चढाई करून येतो, हें वर्तमान आज एक महिनापर्यंत आहे. परतु, मुख्य आपले ठिकाणींहून निघाला नवता. दोन तीन दस्ते फौज पुढे येऊन लाहोरचे मुकामीं पडली होती. आणि प्रतिवर्षीं याचप्रमाणें आवाई येत असती. याकारिता तहकीकात वर्तमान न दिसोन पक्केपणें लिहिणेंत न आले. त्यास, आजच लखनौवाले याची डाक विलाईतपर्यंत बमली आहे. त्यातून एकवारीची लाल थैली आली. त्यातील कलमी वर्तमान कीं:—छ २९ जमादिलाखरी शाहा फौजेनिशीं लाहोरास दाखल जाहाला, एक लाख फौज समागमें आहे. पुढें दरकुच लौकरच येतो. हे वर्तमान प्रातात लोकानीं ऐकोन बहूत घाबरेले आहेत. दिल्ली वेगली करून, तमाम शहरें—जागे पळोन गेले. लखनऊसुद्धा गडबडली आहे. दिल्लींतीलही अमलाफैला पळावयाचा ईरादा करीत आहेत. परतु हा काल तर आह्मी दीलदिलासा देऊन खातरजमा केली आहे. परतु, लाहोराहून त्याणें कुच करून एक मजल पुढे आल्यानतर शहरचे लोकाचा धीर काढणार नाहीं. ईश्वरें ही गोष्ट न करावी. कदाचित जाहल्यास लाहोर येथून कच्चे दोनशें कोस त्यास यावयासी विलंब लागणार नाहीं. त्यात हे हुजूर. सस्थानिक जागा. येथील भ्रम गेल्यासें, हिंदुस्तानचा भ्रम राहणार नाहीं. धण्याचे पुण्येंकरून ही गोष्ट होणार नाहीं. परतु, त्याची फौज मोठी. श्रीमत यजमान दूर राहिले. राजश्री बापू यासहि वर्तमान वरचेवर लिहीत असतों. त्याची स्वारी या प्रातीं असती तर चिंता नव्हती. आपणहि तेथून बहूत निकडीनें बापू यासी लिहोन, स्वारी या प्रातात अविलबें येवून इकडील बदोबस्त होई ते जलद केले पाहिजे. आह्मी किल्याचा व शहर–आदिकरून बदोबस्तानें हजरत सहवर्तमान पातशाहाजादेसुद्धां खिजमतींत चौकस राहोन सरकारनक्ष होईल तेथवर करीत आहों. बहुत काय लिहिणें ? लोभ करावा. हे विनति.

---

पत्रांक ४२५ श्री. १७१८ पौष वद्य १

( नकल )

नवाब–साहेब मेहेरबान दोस्ता आजमुल–उमदाबहादुर सलमहुताला:—

छ १० माहे रजबीं आपल्यासी बोलून बाणाजी व कृष्णाजी सेटे आले. त्याणीं आपला खुलासा त्रिवार वचनाचा सागितला. तो ध्यानास आला. त्याजवर छ ११ माहे रजबीं राजश्री कल्याणराव राजेबहादुर याजबराबर कालचें बोलल्याप्रमाणें आपण रुका व जिन्नस पाठविला तो पावला. त्या अन्वयें आह्मीहि तुह्मासी निखालस आहों, येविसी खातरजमा ठेवावी. दुतर्फा

सरलता नाही जें होणें तें आपले आमचे विच्यारें होईल आपण राजश्री बाळाजीपंत नानाविषयीं दोन गोष्टी लिहिल्या त्यास नानांनीं कारभारात असावें अगर नसावें याचे गुणदोष पुरतेपणें पाहून, तुम्ही आम्ही मिळोन ज्यात श्रीमंतांचे दौलतीस चागलें तैसें करू. आपली आमची दोस्ती पूर्वीपासून आहे आणि छ १ माहे जमादिलाखर सन १२०६ फसलीमध्यें तहनामा आला आहे त्याजवर आपण आम्ही कायेम आहोंतच पुढें ज्यात दोस्ती ज्यादा वाढेत जाये तैसें दुतर्फा वर्तणुकेंत येत असावें रा छ १४ रजब, मु॥ सबातीसैन मया व अल्फ

आदा काय लिहिणें ? हे किताबत

---

पत्रांक ४२६ श्री १७१८ पौष वद्य ८

राजश्री लक्ष्मादादा स्वामीचे सेवेसी —

सा॥ नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीयें कुशल लिहित जावें विशेष मरवासागरेश्वर यरात सरकारातून शालमजकूर मा॥ राजेश्री भगवतराय विठ्ठल मोदी याची जाहली आहे तिचा ऐवज पटऊन देणेंविशीं पेशजी पाचच्यार धरू पत्रांत लिहिलें असता, हालीं तुम्हीं लिहिलें कीं, ऐवज कृष्णाजी अंबादास याचा ह्मणोन आम्ही भेऊन, नरवरचे किल्याकरितां दारू गोळी आणविली होती, त्याजवा दिल्हे त्यास, हें ठीक नाहीं कृष्णाजी अंबादास याजकडून गुदस्ताच सती जाहाली शालमजकुरी यरात याची जाहाली याजस्तव वाकीद करून ऐवज देवावा, ह्मणोन लिहिणेंस आलें असें असोन चालमेल केली, हें ठीक न केलें त्यास, पत्र पावतांच यरातीचा ययाणमसेरूो गोवर्धनदास याचे दुकानीं जमा करून देवऊन पावती पाठऊन द्यावी येविशि फिरोन लिहिणें न पडेसें करावें रा छ १८ रजब हे विनंति

---

पत्रांक ४२७ श्री १७१८ पौष वद्य ९

पत्र दिलें

यादी बापू शिंदे यासी सरकारचें पत्र जे —

नबाब सिराजुद्दौला—मीरज्या—ग्यासबहादर याचे जाहागिरीविशी जगोबा बापूनीं लिहिलें त्या अन्वयें तुम्हीं चालवावें येविशी फिरोन बोभाट येऊ न द्यावा ह्मणून पत्रें

*सदरहू मान्यपत्र द्यावें छ २२ रजब, सबा तिसैन

---

*अधिकाऱ्याची ममलाशी

पत्रांक ४२८ श्री १७१८ पौष वद्य १०

यादी: भगवतराव बल्लाळ यासी कोकणपटीच्या बंदोबस्तास सरकारांतून रवाना केले होते. त्यांणीं घाटाखाली जाऊन किल्ले विश्रामगड व किल्ले घोसाळा व किल्ले बिरवाडी, प्रांत राजपुरी, या तिहीं किल्लेयाचा सरकारचे आज्ञेप्रमाणे बंदोबस्त करून असता, लोकसुद्धा हुजूर येणेंविशीं आज्ञा जाहली. आज्ञेप्रमाणें हुजूर निघोन आले. मागा रा चिमाजी माणकर, मामले तळा, व बाबुराव पासलकर, तालुके अवचितगड, याणीं सरसुभाकडील लोक घेऊन किल्यास वेढे देऊन, रसद बंद केली. ते किल्ले बी तपशील.

१ किल्ले विश्रामगडास एक महिना वेढा दिल्हा. किल्लेकरी याणीं दररोज लढाई दिल्ही. परंतु किल्ल्यावर बेगमी दाणा-गल्ला व दारूगोळा नाहीं. लोकास पाच सात उपोशणे जाहालीं. तेव्हां, किल्ला मामलेदार याणीं हस्तगत करून, किल्यावरील लोक व सरकारचे लोक होते त्यास कैदेत ठेविलें, व रघोजी वालकवडे हवालदार निा पासलकर व रामाजी गोविंद कारखानीस हे सरकार लक्षात होते, सबब मुलामाणसासुद्धा कैद करून हवलदार व कारखानीस यास बेड्या घातल्या, व सर्व वस्तभाव गुराढोरासुद्धा झाडून लुटून घेतलें. त्यास, हवालदार व कारखानीस मुलेंमाणसेंसुद्धा व लोकाची चीजवस्त ढोरगुरूदाणागल्लासुद्धा त्याचें हवालीं करून, सर्वांस मोकळीं करून, हुजूर रवाना करून देणेविसी सनद मामलेदार यास.

१ किल्ले घोसाळा व बिरवाडी दोही किल्ले याचा पूर्ववत् सरकारआज्ञेप्रमाणें बंदोबस्त असता, हाली मामलेदार याणीं किल्यास वेढा देऊन, रसद बंद करून, लढाई करितात. व किल्लेकरी याचीं घरें कबिलेसुद्धा कोकणपट्टींत होतीं तीं जप्त केलीं. त्यास, मामलेदार याणीं किल्लेकरी यासी कटकट करू नये, वेढा उठवावा, व जप्तीची मोकळीक करावी. पुढे हुजूरून आज्ञा होईल त्या प्रो वर्तणुक करावी. किल्लेकरी याचे वाटेस येकदर जाऊ नये. व तालुके-मजकूर पाौ वसूल मामलेदार याणीं घेऊ नये. किल्लेकरी याणीं वसूल घेऊन सिहिबदीखर्चाचा व किल्लेयाचा बंदोबस्त करावा. व नारो गोविंद हुजूर हशम हे लोकासुद्धा नामजादीस किल्ले बिरवाडी येथे पेशजी गेले आहेत, त्याचेहि वाटेस न जाणें. ह्मणोन मामलेदार याचे नावे सनद.

१ घर व मुलेंमाणसें कोंकणात किल्ले रामगड, तालुके विजयेदुर्ग, येथे आहे. त्यास, तालुकेमजकूरचे मामलेदार याहीं घर जप्त करून चीचवस्त सरकारात घेतली, व मुलेमाणसें कैदेंत ठेविलीं

व जामीनहि घेतले त्यास, भगवतराव नव्हाळ हे हुजूर चाकरीस असतां, त्याचें घर जप्त करून मुलेंमाणसें कैदेंत ठेवल्याचें कारण काय? तरी, त्यांच्या मुलामाणसाची मोकळीक करून जामीनपत्रें व वस्तमाव चीजवस्त घेतली असेल ती सुतळीचा तोडा आदिक रून माघारा देऊन, त्याचें चिरंजीवाचे कबज घेऊन हुजूर पाठ वणें याजविसि गंगाधर गोविंद याचे नांवें सनद

---

१

*सारांश पाहून पत्रें यावीं छ २१ रजब, सबा तिसैन

---

पत्रांक ४२९ श्री १७१८ पौष वद्य १०

यादी रघुनाथपंत आंबेरखाले यास पत्र जे —पायागडचे पोतनीसीच्या आसामीचे वेतनाविसी भल्वतराय महादेव यास तगादा करितां ह्मणोन हुजूर विदित जाहलें त्यास, तेथील वेबाट रघुनाथ रामचंद्र याच्या हातें होत आ ली आहे ते येथें येणार आहेत ते आल्यावर फडशा करून देतील आ सामीच्या ऐवजाविशीं बल्वंतराव महादेव यास तगादा न करावा ह्मणोन पत्र १

सदर्हूअन्वयें ताकीद यावी छ २८ रजब, सबा तीसैन

---

पत्रांक ४३० ॥ श्री ॥ १७१८ माघ शुद्ध २

यादी विनंति बहुलचंद भाट जोतिसी वास्तव्य पो राजकड याची पौ— मजकुरीं आमचें वर्षासन रा ९० नवद आहे येविसीची सनदाहे आज्ञा जवळ आहे त्याप्रमाणें वर्षासन आह्मी आपलें पावीत असो आतां सालगु दस्तां रा प्रतापसिंग याणीं एक साला रा नवद दिल्हे नाहींत म्हणून ता किदपत्र दिल्हे पाहिजे कीं, भटजी मजकूर याचे वर्षासनाचे रा पूर्वपासोन चालत आले आहेत त्याप्रा हाली सालगुदस्ताचे राहिले ते भटजी मजकूर याचे यास देणें फिरोन येविसीचा बोभाट येऊ न देणें म्हणून पत्र

सदरहू विप्राकडे पैके यावे छ १ साबान, सबा तिसैन

---

पत्रांक ४३१ श्री १७१८ माघ शुद्ध ४

सेवेसी सा नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता माघ शुा ४ जा णोन स्वकीय कुशल लिहीत गेलें पा विशेष राजश्री नारोपंत आपटी यांचा कारकून भरोन किल्यास नेला, ह्मणोन वर्तमान राजश्री विठो वामन देशमुख चे घरीं मशारनिल्हेकडील कारकून याणीं सांगितलें त्यावरोन देशमुखांनीं

सांगितले कीं, दोही किल्ल्यांचा सरजाम जप्त करावा, मागोन सनदहि देतो. याप्रो उत्तर झाले. त्यावरोन आवटी याजकडील कारकून यांणीं कोपरगावास आवटी यास लिहून पाठविलें. व रायगड वगैरे किल्ले येथील सिबदी दोन हजार आणावयाकरिता जासूद पो. हें वर्तमान आह्मास कळलें. त्यावरोन आपणास लिहिले आहे. तरी, मारानिलेचा कारकून धरून न्यावयास काहीं समध दिसत नाहीं कीं, कलीचे आकसामुळे धरोन नेला असल्यास चिजबस्तीची पावती घेऊन कारकून यास सोडून द्यावें. यातील कारण ह्मणाल तरी, आवटे याची भीड यजमानास किती आहे व अगत्य किती आहे, हें आपल्या ध्यानातच आहे. त्याहिमधीं मशारनिले गैरसधी कटकट करितात, हेहि नाहीं. सरकार–सनदे–वरोन जें करणें ते करितात. त्यापक्षीं तुमचे आच्यारास दोष येईल. आपला पक्ष कमी आणी सारे कारभारी पाणी घेऊन उभेच आहेत. याजकरिता आपणास जें करणे तें सरकारात विनति करोन करावे, हे चागले. चुरस वाढऊन, कलागत केली असता, यश येईल, असें कोणाचे विचारास येत नाहीं. येविसी राजश्री माहादाजीपतानीं कचा मार लिहिला आहे. त्यावरोन ध्यानास येईल. साराश, पुर्ता विचार चित्तात आणोन, चागले दिसेल तें करावें. गडकरी याजकडे रा यसोबा कळके याचा ऐवज यावयाचा, त्याची यादी पूर्वी पो आहे, त्याप्रों रा पाठवून द्यावे. बहुत काय लिहिणें ? लोभ करावा हे विनति.

---

पत्रांक ४३२ श्रीरामजी. १७१८ माघ शुद्ध ५

अपरच. राजश्री पंडत बालुवा–तात्याके नामका कागद पठायो सो पोंहोचा. समाचार मालुम हुवा. तीसपर दोनो दरबारका वेव्हार सुदामतसु चलेआयो, तीणमिाफक चलो जायया, ई मुनासवहे. छडी फोजमा हे सीरदारासु वाकनेंल डीभाईकी मारफत करार ठेरनेमे आयो. सो उणाको लिषते सीरकारमाहें आयो. जीसिवाय दुसरी बात न्हीं. राजदरबारसुं करार ठेहेऱ्या मुजब पुषताई रीयामे दो बुत्रफकी दुरुसताई जानोगा. हिदुस्थानकी मुषत्यारी सीरकारसुं पडत राजश्री जगुबाबापूकी त्रपू हे उणा हे पन सीरकारसु लीष रेहे. सारोजु वाप उणासुं करोला. श्रीमत राजश्री पेसवासाहिबकी सिरकारको सारीत्रहे बंदोवस्त हुवो. अब हजुरसु सीकहुयापर सवारी हिंदुस्थान–माहे जलदी हि आवेगी.

---

पत्राक ४३३ श्रीरामजी १७१८ माघ शुद्ध ५

अपरच. पाती आई. समाचार मालूम हुये. श्रीमंत रा पंतप्रधानकै नामे हुये षलीता पठये सो मुबमुहजुरमे गुजोरो करि, लिषेमुजब हकीकति अली-

बाहादुरखाबत मुफसल सुबानीतें जाहर कीवी श्रीमंत राजश्री रावसवाईबाजी राव पेसवाईभरेके गादीपे कायम होई श्रीमन्माहाराज नृपतीकी तरफसे पि ल्व इनायत हुये अब तमान सल्तनतको बदोबस्त जलदीही आठचारि दिनमे होवुहे राजके लिषेमुजब सिरकारमाई रदबदल करि बदोबस्तको बु बाब–सवाल लिपवेमे आई, तो पातसाहमरेमे राजको दषिनको सुबा करि जाने हैं सो बाहीमुजब दोहतरफसु बेव्हारु चलो जाबु हे सुदामतसु घरोबो इकलासु चलो आऊत है यामे दुसरी बात नही जानबी ओर समचार कुँ मर बिक्रमके लिषेते जानिवेमे आई है सिरकारी माहालमाई छेडाछेडी नही करोगा छ ४ सावान, सबा तिसेन

---

पत्रांक ४३४ ( कासिराव ) १७१८ माघ शुद्ध ५

अपरंच राजके तरफसें येक पत्र आगें दुसरा हाल योंकर दोनोही पत्र आये, सो पोहोचेके समाचार माळुम हुये अत करणसे मिलापकी उमेद है सो श्रीमंत राजश्री पतप्रधान गादीपर कायम होयके श्री महाराज नृपतीके तरफसें पिल्लत इनायत हूये अब बिचार हिंदुस्थानहीके आवनेका है यस्त पटायेसो राव–भ्रिमलालकी मारफत पोंहोचे हमेसा पत्र भेजके सतोष करोगे

---

पत्रांक ४३५ १७६८ माघ शुा ५

( पाटील याचें पत्र समुर्सिघास )

अपरंच ( राजश्री बाळुबावास्याके नामे )

कागद पठायो सो पोंह्चा समाचार वाचा तीसपर दोने दरबारका बेव्हार सुदामतसे चला आया तिग्रीमाफक चला जाय, यही मजूर हे छडी फोजमे सरदाराहुंसा करनेल डिमहरमार्पत करार ठेहरे तिसमुजब अमलमे आवेंगे बेव्हारकी कृष्णी जाणोगे श्रीमंत पेसवासाहेबकी दोल्तका बदोबस्त हुवा सबारी हिंदुस्थानमे जलदीही आवेगी हमेषा कागद लिपते रहोगे

इहा सरकार ते लिपो आमो तीसमुजब इहाकी पुपताई हे ओर राजदर मारस्त्री

---

पत्रांक ४३६ १७१८ माघ शुा ५

( संभुसिंगजीस सरकारचे )

अपरच्च कागद तुमारा आया समाचार माळुय हुये दोनो दरबारका बे व्हार सुदामतसें चला आया तिसी सच्हे जाणो दुसरी बात नही ओर समाचार राजश्री रायाजी पटेलके कागदपरसें जाणजो

---

पत्रांक ४२७ श्रीरामजी. १७१८ माघ शु॥ ५

( जयपूर प्रकरणी पत्रे. राजा यास सरकारचे. )

अपरंच. कागद आयो. समाचार मालुम हुवे. हमेशा पत्र लिखायके संतोष करजो. ओर समाचार रावसभुसिंगजीके कागदका जबाब राजश्री रायाजी पटेलने दीया है, तीनपरसे जाणजो.

---

पत्रांक ४२८ श्री. १७१८ माघ शु॥ ६

याद आन्याबा जाधव यास पत्र रघुनाथराव नेरलेकर साळोखे याचे कामाविसीं.

मौजे नेरले प्रा॥ कराड हा गाव मदहू रघुनाथराव ———

याचे पाटीलकीचा आहे. तेथे श्रीमंत पंतप्रधान याचा अमल बाबती वगैरे.

१२०० देशमुखी व सरदेशमुखी.

५०० इनाम जमिनीबाबत.

---

१७००

येकूण सत्रासे रुपये सालीना अंमल आहे. तो ऐवज सरकारातून आपल्या बेहडियात वजा घेऊन, मशारनिले याच्या कुटुंबास नेमणूक करून द्यावयाचा करार कैलासवासी श्रीमंत पाटीलबावा यांचा आहे. त्यास श्रीमंत नाना याच्या कानावर घालून सरकारातून सनद करून रघोजी साळोखे याचे नावे घ्यावी आणि ठाणे कऱ्हाड येथे आमलदार यास पत्र देऊन ऐवज दरसाल मारनिले-कडे चालवणे, म्हणोन पत्र. येकूण सनद व कमाविसदार यास एक पत्र, म्हणोन या कामाविसी आन्याबा जाधव यास पत्र.

पा॥ खासा रसानगी बुगाजी जामदार की,

रा॥ नानाच्या कानावरी घालुन, गाव सरकार अमल असेल तो आपलेकडे करऊन देवणेविसीं चिठी द्यावी.

छ ५ साबान, सबासितैन.

---

पत्रांक ४३९ | श्री | १७१८ माघ वद ५

श्री
ज्योतीस्वरुपधरणी
तत्पर माहादजी सुत
दवलतराव शिंदे
निरंतर.

दर्त्तर्फ सरकार राजश्री दौलतराव शिंदे ता कमाविसदारान व ठाणेदारान व चौकीदारान व रहदारान व घाटकरीकान व जमायेत मा सुा सबातीसैन मया व अलफ. राजश्री रामजी पाटील शिंदे यांसकडील माणसें पो नेवार्से येथून तेल तूप वगैरे सरंजाम, उट नफर साहा भरून सेपा दोन लष्करात आणतात त्यास मार्गी हसिलांविसीं मुजाहीम न होतां, यासी चौकी पाहारा देऊन, आपलाली हदपार करून देत जाणें जाणिजे छ सावान मोर्तबसुद

---

पत्रांक ४४० | श्रीशंकर | १७१८ माघ वद ११

यादी येणेंप्रमाणें पत्रें द्यावीं

१ इसेली उत्पन्न येथील कमाविसदार यांसि पत्र द्यावें कीं मौजे आव नोरी हा गाव राजेश्री राघो नीळकंठ माजकरे आहे त्यास, तुह्मी घासलकडीविसी वगैरे उपद्रव देतां, ह्मणोन कळलें त्यास, याचे गावास घासलकडीविसी वगैरे उपद्रव न देणें याचा हरयेकविशीं गौर करीत जाणें येणेंप्रमाणें पत्र

१ राजेश्री आबाजी इंगळे यांसि पत्र द्यावें कीं, प्रांत मुरादाबाद येथील फड निसीची आसामी राजेश्री सदासीव आपाजी याची आहे त्यासि, सालमजारीं दीकत करितां, ह्मणोन कळलें त्यास, याचे आसामीविसी दिकत न करणें पेशजीप्रमाणें चालत आली आहे त्याप्रमाणें चालवणें येणेंप्रमाणें पत्र द्यावें

---

२

* सदरहू अन्वयें दोन ताकीदपत्रें द्यावीं छ २४ सावान, सबा तिसैन

---

पत्रांक ४४१ | श्री | १७१८ माघ–फाल्गुन

विशेष खबर. जमाशाहाची फौज लाहोरास आल्याची खबर आल्यामुळें

* मुख्याधिकाऱ्याचें हस्ताक्षर.

तुह्मीं तात्यार लिा. त्यास, सिराची जमीयेत पहिल्यापासून भारी. व मुलूक सिरा-खालीं. तो येकदाच सोडून देऊन मार्ग देतील हें कसें घडेल ? गरमीचे दिवस जवळ आले. त्यापक्षीं दिल्लीप्रांत येऊन माघारें जाणेंयास बहूत कठीण. तेव्हा दिवस राहिले नाहींत, हाही आंदेशा आहे. दिल्लीप्रांतीं छावणी करी, तर वाचेल कसा ? ज्या गोष्टी मागें कधीं घडल्या नाहींत, तेव्हा आता तर दुरोपास्त आहेत. सबब कीं, तीस-पस्तीस पलटण आपलें व फौज व इंग्रज-नबाब-सुधा अनकूळ आपल्यास करून घेतात. हें पेशजी पामर साहेबासी तुह्मासी बोलणें जालेंच होतें. त्याचा मुलूक व जागा व दौलतीची रयाबत. त्यापक्षीं त्यास फाळजी कमी नाहीं. आपण मोहऱ्यावरी. यामुळें तेच तुमची ग्यातरजमा करून अनकूल होतील. तेव्हा, आपण घावरे होऊन त्याच्या गळा पडू लागल्यानें सुबिकी दिसेल, याचा आदेशा तुह्मी करून बोलणें व्यर्थ व लिहिणें तें समजून बोलावें. ग्यानासहि दिल्लीप्रांतीं सालमजकुरीं येतो ऐसेंच नजरेस आल्यास पकेपणें लिहिणें. तेव्हा श्रीमंताच्या कानावरी घालून पोख्तच पैरवी केली जाईल. तुम्हाकडील फौजेची तारबल आहे, त्याची खर्चाची तजवीज करणें ते करणियात येते, असे हाली पामरसाहेबास पत्र लिहिलें आहे. प्रविष्ट करून, उत्तर घेऊन पाठवावे. त्याचा आपला सरंजाम येकत्र होऊन मसलतीस पोहचल्यावरी, शाहाचा तो मजकूर किती आहे ? असो. येथील मोहिमेचें काम आटोपत आलें आहे. चिंता नाहीं. दुसरेः- येशवतराव सिंदेयाविषी तुमच्या लिहिणेंयात येतें कीं, अखेरसालपर्येत त्याजकडे सालजाब असावा. ऐसियास, तुह्मास एकदोन वेळा पेशजी लिा होतें कीं त्याजकडून पातशाहाची रजावंदी होत नाहीं. त्याच्या घरात बदोबस्त नाहीं. पैका तुह्मी घेतला असेल तर कर्ज घेतलें असेल. पातशाही खर्चाचे नेमणूकेतून यैवज घेऊन, पातशाहाच्या खर्चांत कमती पडून, फायेदा व्हावा ऐसें तर केलेंच नसेल. त्यापक्षीं पातशाहास हैराण करणें ठीक नाहीं. यास्तव हुजूर बदोबस्त करून, तुह्मास पत्रे लिा आहेत, त्याअन्वयें येशवतराव सिंदे यास तुह्मी ताकीद करून, येथील बदोबस्त करून दिल्हाप्रमाणें खुलासा करून देवणें.

---

पत्रांक ४४२ ॥ श्री ॥ १७१८ फाल्गुन वद्य ६

श्रीमंत महाराजैधिराज माहाराजै आलीजाह दौलतरावजी सिंदे बहादुर साहेबजी योग्यः--

माहाराज चेतसिंह-बहादुरका आसिर्वाद. अपरच. कृपापत्र दरजबाब पत्रके पौंहचा. अत्यत खुशी व सरफराजी हासिल हुई. इहाकी सूरत आपने करजदारी व जेरबारी अहवाल कहाँ तक विनंती करै-बकत मुलाजमतके

विनवी करैंगे इन दिनौमो फौज सरकारकी दतीआसें अकबराबादको गई सो जो सरकारसे जागीर इनायत भई है उसी रस्ते गई गाव पायमाल हुए, जिरात समेत सो सरकारमो विनतीपत्र यह भेजाहे माहाराजका भरोसा हमको सब सूरतसे है मिती चैत्र वद ६ समत १८५३ * दसत का लीने आशीर्वाद

---

पत्रांक ४४३ || श्रीरामजी ||

सीतारामजी १७१८ आश्वीन वा ७

सिधि श्रीमाहाराजाधिराज आलीजाह माहाराजा श्रीसूबेदार दोलतीरायजी सीदे जोग्य लिषत माहाराजाधिराज माहाराजा श्री सवाई प्रतापसिंहजीकेन श्री बंच्या। ऐठाका समाचार श्री जीकी कृपासू भला छे राज्यकी सदा भला चाहिजे अपरंच कागद-समाचार आयां घणा दिन हुवा सो लिषावो करावो और समाचार राव स्यभूसिंघजीका लिष्यांसू जाणाछो मिती काती बदि ७ सवत १८५३

---

पत्रांक ४४४ श्री १७१८ फाल्गुन वद्य ५

सरकारचें पत्र राजश्री जगन्नाथराम यासी जे पेशजी इकडे कारभारी कैद केले त्या भावईमुळें राजश्री लक्ष्मण अनंत फौजेंतून निघून ब्रह्मावर्ती गेले त्यास, त्याजकडे सरकारचा पैसा कांहींच नाहीं हाली सरकारांतून त्याची खातरजमा करून आणविले आहेत त्यास, पहिलेप्रमार्णे कामकाज तुम्ही ते मिळोन करित होतां, त्याप्रो तें लस्करांत आले म्हणजे करीत जावें सरकारचीं पत्रें त्यास पोहचलीं, म्हणजे मार्निले लस्करांत यावयाचा उद्योग करतीलच त्यास, पुर्वे तुम्ही जाऊन घेऊन यावें 'आगऱ्याचा किल्ला त्याजकडे पहिला होता त्याचा बंदोबस्त त्याचा ते राखतील सरकारांत त्याविषीची खातरजमा आहे तेथील हिंदुस्थानचा बंदोबस्त पूर्वंवत्प्रमार्णे तुम्ही व त्यांणीं मिळोन करित जावा ते लस्करात आल्यावर आगऱ्याच्या सनदा त्यांचे नांवें पाठवितों तवपर्यंत किल्याची घालमेल तुम्ही न करावी ते आल्यावर बंदोबस्त करतील म्हणोन पत्र

परवानगी समक्ष कृष्णाजी व धोंडीबा जामदार छ १७ रमजान, सन सबा

---

पत्रांक ४४५ श्री १७१८ फाल्गुन वद्य ५

सरकारचें पत्र जे तुम्ही पेशजी एक दोन पत्रें सरकारांत पाठविलीं त्या बरोबर खातरजमेचीं पत्रें सरकारांतून पेशजी रवाना केलींच आहेत हाली तुम्ही

---

* मेथून हस्ताक्षर चेतसिंघाचें

पत्रें सरकारात व राजश्री रायाजी पाटील याचे नावें पाठविलीं. त्यांस, पाटलाचे व सरकारचे पत्र परस्पर राजश्री धोंडीबा जामदार याचे मारफतीनें राजश्री कृष्णाजी सेटे याचे विद्यमाने मनन केली. त्यात लिहिले कीं: पहिल्या सरकारच्या पत्रावरून लस्करात यावयाची सिद्धताच केली होती. परतु आगऱ्याचे किल्याची बदनजर वरली, म्हणोन येथे कोणी समजाविलें. त्यास लोकानीं लहानमोठ्या चाकऱ्या केल्या. त्यास बक्षिस वगैरे मिळालें व आह्मी सरकार चाकरी आगऱ्यास व मारवाडात वगैरे केली व वरचेवर करित असता, परिणामीं हरामखोरी बक्षीस प्राप्त जाहाली. व फौजेतून निघाल्यास माघे दतियेवाले यानीं एक दोन गाव खालशाचे मारले, त्यामुळे चैन पडत नाहीं. त्याचें पारपत्य करून, पुढे दोन महिन्यानतर हुजूर यावयास आज्ञा पाहिजे. म्हणजे समक्ष विनति करून कितेक निखालसतेच्या गोष्टी समजावीन. पुढे सरकारातून करणे तें करावें. म्हणोन लिहिलें. त्यास सैन्यातून तुह्मीं निघोन जावे, असा सरकारचा पेंच तुम्हाकडेस नाहींच. तुह्मी गेला तेव्हा आगऱ्याचा वगैरे बदोबस्त सरकारातून आलाहिदा करणे पडतो. ऐसीयासी, पहिल्यापासून सरकारचाकरी तुह्मी येकनिष्ठपणें केलीच आहे. त्याप्रमाणें आता करावी. आणि हें पत्र पोहचलें म्हणजे तुम्ही खातरजमेनसी फौजेंत येऊन सरकारचाकरी पहिल्याप्रमाणें करीत जावी. येथे सरकारचाकरीच्या उपयोगाच्या माणसाचीच गरज आहे. तेथिल वर्तमान वरचेवर कच्चें धोंडीबा जामदार व कृष्णाजी सेटे याचे विद्यमाने सरकारात लिहीत जावें. येथें फौजचा वेढा, तेव्हा परिणाम कसा लागेल ? तशात, दरबारात वशिला नाहीं, असे अदेशे कराल. तर चिंता न करावी. येथून तुमच्या लिहिल्या अन्वयें पुरवणी होईल. आगऱ्याचें कामकाज पहिलेप्रमाणें तुम्हीं लस्करात आला म्हणजे सनदा करून पाठऊ; व राजश्री देवजी मुकुद यासहि तुमच्या जाण्यामुळें प्रतिबध सरकारातून केला होता तोहि दूर होईल. या लिहिल्याची खातरजमा ठेऊन लस्करात यावे. तुम्हाविषीं कोणी येथें हरएकविसी गैरवाका समजविल्यास येथें गैरवाका समजल्यात येणार नाही. चिंता न करावी. म्हणोन पत्र.

परवानगी समक्ष कृष्णाजी व धोंडीबा जामदार. छ १७ रमजान, सन सबा.

---

पत्राक ४४६ श्री ( नकल ) १७१८ फाल्गुन वद्य ११

यादी राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा याजकडील मतलब सुा सबा तिसैन मया व अलफ. राजश्री बाजीरावजी याचे बरे होण्याचे मतलबसंबधी राजश्री बाळाजीपतनाना, यानीं माहाडास करार करून दिल्हा तीं कलमें. त्यास हाली ठरावाचीं कलमें.

महाले आमचे नावें देऊन सनदा आमचे नांवें याव्या कलम १

महाले रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा याचे नांवे करार करून द्यावे येणेप्रमाणें करार करावे करार.

चौरागड समय त्याजखालील सरं जाम आहे त्यासुद्धा द्यावा कलम १

चवरागड पन्नास हजार रुपयांचा सरंजाम खाली आहे त्यासुद्धां द्यावा, येणेंप्रमाणें करार करावें करार.

फौज तीन हजार यांणीं, चाकरी करावी हा पूर्वीचा तह आहे सो करार सेनाबाहादर यांचा होता आतां माहास कृपा करून महाले देण्यांत येत आहे तेव्हां फौजेची चाकरी माफ करावी कलम १

तीन हजार फौज सरकारात मस लत असतां चाकरीस यावी मसलत नसतां माफ केली जाईल मातबर मसलतीस सेनासाहेब सुभा यांणीं स्वाम्या नीं यावें, हा करार पेशजीचा आहे तो आहेच येणेंप्रमाणें करार करावें करार

संस्थानिक व बिसाजी महा ळ नवस आदीकरून अठेचा ळीस हजार का ठरऊन मनमाने तैसे याचे परगणे अमुके द्यावे ऐसा करार करून घेतले आहेत त्यास, येथें बाकीफत्तारी नव्हती त्यास दहा बारा हजार रुपये ठरऊन आह्मांस सांगावें म्हणजे एका परगणियांत नेमणूक करून देण्यांत येईल कलम १

संस्थानिक व बिसाजी महाळ व नवस आदिकरून अठेचाळीस हजार तीनसें रुा पेशजीचे करारांत आहेत त्याप्रों सरकारांत माहाल महाले पो

तीन वर्षें फौजेचा पिसारा भ विशय जाला हें वारंवार बोलण्यांत येत होतें त्यास, हाल्ली कांहीं दे ण्याचा मुद्दा चालावा असा नाहीं लाचारी आहे दाहा लक्ष रुपये दे ण्यांत येतील ऐसे बोलण्यांत आले आहे त्याज्यानीं येहेसुद्धी होत नाहीं समय पोक्त सरंजाम पाहिजे याजक रितां खर्चापुरती येगमी जाली पा हिजे कलम १

मसलत खर्चें खर्चाबद्दल येतांना माहाली आठ लक्ष रुा द्यावे व भेट जाहलियावर सातलक्ष एकूण पंधरा लक्षांचा करार. त्यापैकीं माहाली येतांना च्यारलक्ष रुा तुह्मी घेतलें बाकी अकरा लक्ष रुपये द्यावयाचे हा ऐवज महाल्याचे नजरेचा ऐवज ख़ु महाकडे येणें, त्यास मजूर दिल्हा असे येणेप्रमाणें करार करावें करार.

नबाब निजामअलीखानबहादर याजकडील तह सर्वांचे मुकामी कैलासवासी रावसाहेबांनीं करून दिल्हा आहे कदाचित् नबाबाचा व आपला तह जाला कीं, कमती करून तह करावा तर आमचे कडील जे जामदाळ ठरले आहेत ते शाबून ठ राऊन द्यावे त्यांत कमती होऊं नये कलम १

आपल्याकडील नबाबाशी तह ठ रला आहे त्याप्रों नबाबासीं बोलून तह चालेल, येणेंप्रों करार करावे करार.

सरकारचे माहालांत पांवदाणा घेऊ नये त्याचेबद्दल सरदेशमुखी मांत धरार आहे सदाशिवाय नबाबा

लाऊन द्यावा. येणेप्रों करार करावें. करार.

गगाथडीबद्दल दस्ताऐवज कैलासवासी आप्पासाहेबाचे व आमचे आहेत ते न मागता माघारें द्यावें. कलम १

दस्ताऐवज माघारे द्यावें. सरकार माहालीं घासदाणा घेऊ नये. येणेंप्रों करावें. करार.

मडल्याबद्दल चोवीस लक्ष रुपये, वर्तळ्याबद्दल दोन लक्ष द्यावे, ऐसा करार आहे. तेव्हा सवीस लक्ष रुा लोभेंकरून माफ करावें. कलम १

पेशर्जी मडल्याबद्दल ऐवज घ्यावयाचा करार जाला आहे.त्ती बेरीज रुपये.

२५०००००० ऐन नजर.

२०००००० वर्तळ्या बाबद.

---

२७००००००

पौ वजा रुपये

३०००००० बुंदेल्यास पेशर्जी शिबंदीबद्दल देविले आहेत ते रुपये.

११०००००० हार्ली मसलतीबा सरकारातून द्यावयाचा करार रुा १५००००० पौ महालापासून घेतले ४००००० बाकी रुा.

---

१४००००००बाकी रुा १३००००००

तेरा लक्ष रुा सरकारात सेनासाहेबसुभा यांनीं द्यावे. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

कढून घांसदाण्याचा करार अधिक कसा होईल, येणेंप्रों करार करावे. करार.

मार्गांत येताना सरकारचे महालात कोठकोठें ऐवज घेण्यात येईल. त्यास जो करार जाला आहे त्यांत मजरा घेऊ नये. कारण फौजेचा खिसारा अतिशय जाला. सर्व प्रकारें लाचारी आहे. कलम १

मसलतसबंधें खर्चाचे ऐवजाची मखलासी सदरीं जाली आहे. त्यास सदहू कलमाची मखलाशी उगवली असे. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

मौजे सिरापूर भीमातीरीं आहे. तेथे कुरण आहे. पागेचे उपयोगी असे. याजकरिता दरोबस्त गाव देवावा. कलम १

वरकड कलमे पेशर्जी परस्परें करारांत आहेत त्याप्रमाणें बहाल व दर करार. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

मडले व चौरागड सरकारातून रघूजी भोंसले सेनासाहेबसुभा यास दिल्हा. त्याविशीं बाळाजी गोविंद बुदेले यास सनद व जमीदार यास पत्रें लागतील तीं देवावीं. देणे.

छ. २४ रमजान, सन सबा तिस्सैन मया व अल्लफ, फाल्गुन मास, मुक्काम पुणे.

पत्रांक ४४७　　　　श्री लक्ष्मीकांत　　१७१८ फाल्गुन वद ३०

राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यासी —

दंडवत विनंती उपरी आपण चिठी पाठविली ती पावोन लिहिला मजकूर कळों आला राजश्री बाजीराव याचा निरोप घेऊन सातारियास आलों ये विशींचा मजकूर राजश्री श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव लिहितील प्रस्तुत कितेक गोष्टी अडचणीच्या दिसताव परंतु ईश्वरकृपेनें उलगडतील आपली दृष्ट इकडे असावी म्हणोन लिहिलें आपलें बाणें सातारियास जालें, तेव्हां रावमशारनिलेनीं बहुता प्रकारें खातरजमा करून निरोप दिल्हा आपणहि बंदोबस्तानसीं आहेत, म्हणोन उभयतांचे लिहिल्यावरून कळों आलें ऐथि यास, आपले* दूरदेशीनें क्षेम संपादून सातान्यास जाणें घडविलें येनेंकडून मसलतीचे बहुत उपयोग आहेत इकडे दृष्ट असावी याजविशींचा प्रकार पूर्वींचा रुनानुबंध आहे, तेव्हां त्याहावें ऐसें नाहीं पूर्वी आपल्या इशान्या प्रों घडलें व पुढेंहि तैसेंच घडेल याजविशींचा मजकूर पूर्वीपासून उभयतां आपल्यापाशीं बोलतच आहेत व आताही बोलतील हिंमत बाहाळ असावी येनेंकडून श्रीकृपेनीं सर्व उत्तमच घडेल गा छ २८ माहे रमजान बहुत काय लिहिणें ? क्षेम असों दीजे हे विनंती मोर्तबसुद

---

पत्रांक ४४८　　　　श्री लक्ष्मीकांत　　१७१८ फाल्गुन वद ३०

राजश्री नारायण बाबूराव गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रो रमोजी भोंसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें विशेष तुम्हीं पत्र छ १६ रमजानचें सारसेचें सातारियाचे मुकामींहून पाठविलें तें पावलें लिहिला मजकूर कळला राजश्री बाळाजीपंतनाना राजश्री बाजीराव याचा निरोप घेऊन श्रीमंत छत्रपती याजवळ बखाचे योजने करिता आलें समागमें मीहि आलों मागाहून राजश्री बाजीराव सर्व घेण्याकरितां येणार आपणास बातमी असावी, म्हणोन राजश्री नानांनीं चिठी लिहून श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव याजकडेस पाठविली असे उभयेतां सविस्तर लिहितील साप्रत दिवस अडचणीचे कैसेंही यनल्यास आपली दिष्ट इकडेस, हें बारवार उपयोगिक काय त्याहावयाचें आहे, म्हणोन तपसिल लिहिलें तें विस्तारें कळलें व राजश्री बाळाजीपंतनाना यांनीं चिठी पाठविली ती राजश्री श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव यांनीं इकडेस पाठविली याजवरून व उभयेतांचे लिहिल्यावरून सर्व समजलें त्यास, राजश्री बाळाजीपंतनाना यांचे

---

* मेघपासून साघोचें हस्ताक्षर.

जातीशी दुसरा भाव ठेवलाच नाहीं... त्याचा इशारा यावा त्याचप्रो घडावे, हे पहिलेंहि घडले आहे व पुढेहि याचे इशाऱ्याप्रमाणे घडेल. येविशीं तुह्मीं खातरजमा करावी. सर्वात्मना लक्ष राजश्री बाळाजीपतनाना याजकडेस आहे. प्रसग अडचणीचे आहेत. जेथे हिम्मत बाहाल आहे, तेथे येविसींची चिंता काहीं असत नाहीं. श्रीदयेनी चागलेंच घडेल. जे वेळेस राजश्री बाळाजीपत-नाना याचा इशारा येईल, ते वेळेस त्याचे जवळच समजावे. यांत सर्वथैव दुसरें नाहीं. यात सर्व अर्थ आले. राजश्री बाळाजीपतनाना याचे चिठीचें उत्तर लेहून, राजश्री श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव याजकडेस पाठविले आहे व उभयतासहि सविस्तर लिहिले आहे. त्याप्रमाणे तुम्हाकडेस चिठीचें उत्तर पाठवितील व इकाडिल तपसिले अर्थ तुम्हास लिहितील. त्याजवरून समजेस पडेल. दिवस नाजूक आहेत. तेव्हा यावेळेस वरचेवर तुमचेकडून पत्र येऊन वर्तमान कळत जावे. राजश्री नानाचे चिठीचें उत्तर तुम्हांजवळ येताच, तुह्मीं प्रविष्ट करावे, आणि इकडीलविसींचे प्रकारहि बोलण्यात आणावे. फार काय ल्याहावे ? साराष हेच कीं, राजश्री बाळाजीपतनाना याचे जातीशीं एक विचार ठेविला आहेत. यातच दौलतेचे कल्याण व उपयोग आहेत. जवळ फौज किती आहे, पेंच आगावर कैसा, हें तुम्हांसहि समजोन आहे... ...ही दूर राजश्री बाळाजीपत नानाच करितील. ही खातरजमा पक्की ठेऊन असो. तेव्हा याचा बयान काय ल्याहावा ? तुम्हाकडून कोणते एक समजणें तें यथातथ्य समजावे. त्याजप्रों इकडूनहि घडेल. राजश्री नानाचे जातीवर कोणतेहि गोष्टीची काळजी न ठेविता, निश्चिंत असो. फार काय ल्याहावें ? रा छ २८ माहे रमजान. *सर्वात्मना लक्ष राजश्री नानाचे जातीकडे लागोन राहिलें आहे. जेथें हिंमत आहे तेथे श्रीजी सर्व उत्तमच घडवील. राजश्री नानाहि दूरदेशे आहेत. व इकडीलविसीं त्याजला अगत्यावाद आहे. व भरवसा ठेवितात. तैसाच येथील भाव आहे. याचा तपशील पत्रात लिहिणें लागत नाहीं. सर्व तुमचे ध्यानात आहे. बहुत काय लिहिणे ? हे विनती. मोर्तबसुद.

---

पत्रांक ४४९ श्री. १७१८

यादी

१ 'कसबे रहिमतपूर, प्रा वाई, येथील मोकदमाची व शेटेमहाजन यांसी पत्र कीं: कारकून व हुजरे व स्वार कसबे मजकूरचे जप्तीस पाठविले

---

* खाशाचे अक्षर येथून पुढे.

आहेत तरी, यांशी रुजू होऊन साल्मजकूरचा वसूल राहिला असेल तो पेशजीच्या मक्तेदारापासून रुजू घेऊन सुदामतप्रमाणें देत जाणें कलम १

---

पत्रांक ४५० श्री १७१८

यादी विठोजी मोईटे आरडगावकर. सुा सबा तिसैन मया व अलफ मलजी मोईटे यास पुत्र संतान नव्हतें म्हणोन त्यांणीं आम्हांस दत्तपुत्र घेऊन आमचें लग्न केलें हाली मलजी मोईटे मृत्यु पावले नंतर त्याचे सर जामाची वहिवाट करावयास लागलों तों माहादजी मोईटे यांणीं राजश्री बा लोबा पागेनीस यास गैरवाका समजाऊन, मलजी मोईटे यांच्या हिशांचे सरंजाम वगैरे पौ मारी येथील अमल माहादजी मोईटे याजकडे चालवणें, पुढें मनास आणोन आज्ञा करणें ते केली जाईल, म्हणोन पत्रें सरकारचीं म शारनिल्हेनें घेतली त्यावरून सरकारांतून राजश्री नारोपंत चक्रदेव यास सां गितलें कीं, माहादजी मोईटे व विठोजी मोईटे यांचे मनास आणणें त्याज वरून यशवंतराव नागनाथ यास उभयतांचें मनास आणण्यास नारोपंतांनीं सांगितलें तेव्हां, विठोजी मोईटे यशवंतराव नागनाथ यांशी रुजू होऊन आ पला म्हार सांगितला याप्रमाणें सरकारांतून मनास आणावयास सांगितलें., तें आम्हांस माहादजी मोईटे यांणीं न सांगतां, विठोजी मोईटे यास तसदी पो चऊन आणविलें कीं, विठोजी मोईटे यांणीं क्रियेस आवलीस राजी व्हावें त्यावरून विठोजी मोईटे क्रियेस राजी जाहले माहादजी मोईटे क्रियेस हरले, म्हणोन हें पत्र सादर केलें असे तरी, परगणे मजकूर येथील अमल मलजी मोईटे याच्या सरंजामाचे हिश्शाचा विठोजी बिन मलजी मोईटे याजकडे देणें

म्हणोन —————— पत्र

१ पौ नसिराबाद येथील हिश्शाचा अमल देणें म्हणोन पत्र
१ देहे—हाय दरोबस्त यांस पत्र
१ मौजे जलगांव
१ मौजे सुनसगाव
१ मौजे लडकी
१ मौजे कुळसुंबे
———
४
—————— पत्र

१ देहेहाय येथील हिश्शाचा अमल देणें, म्हणोन पत्र

१ मौजे उमाले.
१ मौजे धानवड.

---

२

———————————— पत्र

१ सुभेयास पत्र.
१ कमावीस—दार, का। नसिराबाद, यास.
१ देशमूखदेशपांडे, का। नसिरावाद, यास पत्र.
१ रघुनाथपतआबा, किल्ले असरीचे सुभेदार, यास पत्र.
१ मौजे वाठार, पा। वाई, येथील हिरशाचा अमल देणे, म्हणोन पत्र.

---

८

---

पत्रांक ४५१ श्री. १७१८

हाजी आबदुल नि। वलीआहदबहादूर हुजूर आहे, याविसीची आदेशा लिहिला. तर, शानिजामदीन याची रीत तुह्मास वाकफ जालीच आहे. येशवंतराव सिंदेयाचा प्रकार समजलाच आहे. त्यापर्क्षी येथून हाजी—आबदुल—मजीद व सरकारचे तर्फेचा मातबर कारकून नेमून दिल्हा आहे. ते उभयता हुजूर पातशाहाचे खर्चाचे माहाल वगैरेचा बदोबस्त राखून रजावदी राखितील. तुह्मी त्याचा उपर राखणें. इसमाल—बेग या ( स ) ग्वालेरीस आणावयाचें केलें. उत्तम केलें. परतु पलटणचौकीबरोबर बदोबस्त पका राखून पोहचावणें ठीक असें. नबाब, वजीर व पामरसाहेब वगैरे पत्रें आणिविलीं. तूर्त पामरसाहेबास लि। आहे. तुह्मीं मनन करून, पत्र त्यास पोहचाऊन देणें. त्याचें उतर ते लिहितील व तुह्मासी बोलतील ते सविस्तर लि।. नबाबवजीर यास आलाहिदा लिहून विशेष आहे ऐसें नाहीं. हें तुह्मीहि जाणत नसाल ऐसें नाहीं. जो सालजाब होणे तो पामरसाहेबाच्याच विद्यमानें होईल. तुह्मी लि। होतें कीं, च्यार पाच किल्ले कृष्णगडसुद्धां, आहेत. नेमणूक हे लक्ष्मण अनत यार्णी कमी केली होती, त्याप्रमाणें असावी ह्मणोन लि। होतें. तर, तें ठीक नाहीं. पेशजीची नेमणूक आहे तेच बाहाल करून बंदोबस्त राखवणें. बेदील ठाणेयाच्या लोकास न करणें. कृष्णगडास कृष्णाजी आबादास याजकडील कारकून पोहचलेच असतील. तुह्मापासीहि पावलेच असतील. तर जलद त्याची दिलभरी करून, रवाना करून देणें. ह्मणजे खातरजमेने बदोबस्त राखतील. दिल्लीचे नजीक, आणि जागा मेवातची. यास्तव बरगुजर न करणें. लौकर काम उ ( ल ) गडून देणें.

---

पत्रांक ४५२ श्री १७१८

विज्ञापना इकडील वृत्त श्रीमंत राजश्री राघोबादादा साहेब यांची स्वारी घाटीवर पर्णेयाहून साता–कोसांवर येऊन दाखल जाली, तों घाटीखालीं श्राहून रांगडे जमा होऊन, पाचसात हजार पायेदळ व स्वार च्यारसे–पाचसे याप्रों जमाव करून, ज मलपूरचें ठाणें उठऊन दिल्हें ऐसी सर्व जागा सुदीखाली रांगड्यानीं कोठी केली याजकरिता त्याचे बंदोबर व पारपत्याकारिता राजश्री मिर्जा–गनी–बेग याजला पाठविले आहेत परंतु त्यासा भरणा बहुतेकाचा बहुत आहे दुसरें या निल्हांत जागा आहेत त्या सर्व भयाभीत नाइक मृत्यपावल्यापासून जाले आहेत बिथरियेवाले व भगले व बुदले या त्रिवर्गाचें पारपत्य चांगले जाल्या खेरीज खरस बंदोबस्ताची नाहीं फौजेतहि गवगवा बहूत आहे कोणी कोणा चे येकविचारात नाहींत ऐसा प्रकार येऊन याजसाला कान्हीकराकडील उ भयताकडूनहि येकाचीहि पागापथक येऊन पावलें नाहीं यांणी त्यास हि लेहून पाठविलें आहे कीं, आपले सरंजामानिसी येऊन दाखल होणें, आप णाकडील ऐवज कान्हीकराकडे येणें त्याविषीं यांणी निक्षूण ताकीद कान्ही करास लेहून पाठविली कीं, आजवर बरातीचा ऐवज पटला नाहीं, याचें कारण काये, त्यास हालीं पत्र पावताच ऐवजाची तोडजोड लाऊन याची त्याजवरून कांहीं तोडजोड लाऊन देणार आहेत याप्रमाणें येथें लिहिलें आलें मोरले याजकडील येथें वकील राजश्री केशवराव आले होते यास कडील हि तिकडे कारकून गेला होता दोन तीन दिवस त्या वकीलास ठे ऊन घेतले होतें सिष्टाचारीकरीता आले होते दोन दिवस राहून घेऊन, दोन वर्से जातेसमई त्यांस दिल्हीत तो आपले ठिकाणीं उदास होऊन गेलेत मेहरची जागा मातबर तेथें रांगड्यानीं येऊन मोर्चे लाविले त्यांचे बंदोब स्ताकरितां कांहीं पागे पथके नेमलीत परंतु लष्कर जाऊन पावत नाहींत येथून त्याचीं ठाणीं दाहाबारा कोसांवर आहेत, तीं अद्याप उठून जात नाहींत रांगड्याची चांगली येकवेळ पारपत्यें जाल्याखेरीज जरब बसणार नाही नेंमा ळकराकडील कारभार येथें आम्हापाशीं नित्य येतात कीं, आमचा बंदोबस्त तेथें नाइक साहेबाचे पुत्र आहेत आपले विद्यमानें येखादा जाबसाल होऊन तिकडे त्याची येणी जाले म्हणजे भरवसा चांगला त्यास येईल येसेसी भुत होमें हे विज्ञापि

---

पत्रांक ४५३ श्री १७१८

यादी वनगे नानाचीं सुा सबा तिसेन मया व अलफ

१ पडदाळे मखमाली     २ थेले आहनाबादी कोरे

१ घटया किनखापी लहान     १ पागोटें ज्यादानाबादी कोरें

१ पायेजमा किनखापी
१ वही कोरी वर बनात हिरवी.
१ सोवळें मर्दानी जुनें.
१ अब्र्याची रेजा हात २ दोन हात असे
१
७

१ दुपट्टा जाहनाबादी धुवट.
१ दोरव्याचे महमुदी दुमडा हात ११
१ अतीस दुमडा हात २
२
८

१५
एकूण पंधरा सनगे आहेत.

पत्राक ४५४ श्री. १७१८

राजश्रिया विराजित राजमान्य राजेश्री भगवत रावजी स्वामीचे सेवेसीः–

पो अमृतराव रघुनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विनति येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. राजश्री काकानीं आपल्याकडून ऐवज देविला. त्याजकरिता स्वार मुजरद पाठविला. च्यार दिवस जाले. अद्याप ऐवज आला नाहीं. तूर्त दोन हजार रुपये देविले आहेत. तरी, हाली विळूरीहून ऐवजास स्वार आले तेच रवाना केले आहेत. तरी, लिा प्रो ऐवज आपली सिबदीची माणसे देऊन ऐवज चापळ येथें पावता करावा. ह्मणजे पुढें विळूरीं आह्मी रवाना करू. वरकड नवल विशेष त्यावयाजागें नाहीं. भिल्लाचा उपद्रव, यास्तव सरजाम येथे आला आहे. शेपन्नास भिल्ल ठार जाले. नित्य स्वारी होत आहे. आपल्यांकडील सविस्तर ल्याहावें. सत्वर ऐवज व स्वार पाठवावे. बहुत काय लिहिणें ? लोभ करावा. हे विनति.

पत्राक ४५५ श्री १७१८

यादी सेनासाहेबसुभा यांजकडील जाबसाल ठरले त्याची माहितगारी.

१ मागील बाकीचे ऐवजीं ठरलें ते.

८००००० पुर्जा माघारा द्यावा.

६००००० सरकारात मसलतीस आले तेव्हा येताना घाटेनें घेतले ते.

१५००००० नग्द द्यावे. सरकारचे हप्ते तीन येतील त्याजबराबर यावे ह्मणोन करार.

२९०००००

सिवाय उभयता कारभारी यास दोन लक्ष यावे ह्मणोन कुपिया करार आहे
१ कामरखोरी, येदलाबाद, कमाल, उदेपूर वगैरे महालांत पेशजी चालत आल्याप्रमाणें अमल यावा ह्मणोन दसकतीनिशीं करार आहे
१ पांचदाणा याबद्दल ठरलें तें
२१८००० नबाबाकडील माहालांत लाऊन देणें ह्मणोन करार ठरला माहाल लाऊन देणें आहे
१२००० उमरखेड वगैरे माहालांत पेशजीपासून येत आले त्याप्रो घ्यावें

३५००००
सदरहू ऐवजाचे नबाबाकडील माहाल लाऊन यावे
१ सरकारात रेवादक्षणतीर पौ चार लक्ष कमालाचे बा सनदा माहाल दिल्हे त्याविशीं मुंदेले यांस ताकीद पत्रें

---

पत्रांक ४५६ श्री १७१८

यादी रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा सुा सबा तिसैन मया व अलफ गुदस्तां सुा सीत तिसैनांत आमचे येथें आहलें होतें त्या वेळेस कैलासवासी रायसाहेब यांणीं रेवादक्षणतीरपैकीं, खेरीज चवरागड, चार लक्ष रुा आकाराचे माहाल देऊन सनदा दिल्या बितपशील—

१ पा बचाइ
१ पा बिछा तालुके दोन
१ पा बार्गी तालुके आठ
१ पा मोवरगड तालुके तीन
१ पा सोमपूर चवऱ्यागड तालुके सात
१ पा खडियाचे तालुके नव
१ पा कटोटी
१ पा पलाहो
१ पा रामगड
१ पा देवमर्धा
१ पा मुकुदपूर
१ पा संमलपूर

१२
सदरहू बारा माहालपैकीं, सरकारअंमल ज्या माहालीं असेल त्यापैकीं किले चौरागडचे सर्भावा रुा ५०००० पन्नास हजार रुपयांचे माहाल व

गांव किल्या लागले असतलि ते सरकारात किल्याचे खर्चास ठेऊन, बाकी सरकारअमली माहाल सेनासाहेबसुभा यांचे दुमाला करणें. चार लक्षाचे बेरजेहून अधीक बेरीज सरकारात अंमली असलियास सरकारांत ठेवावा, चार लक्षाचे भरतीस अमली माहालापैकीं बेरीज कमी असलियास, गैरअमली माहाल आहेत, त्यापैकीं चार लक्षाचे भरतीस कमाल आकाराचे बेरजेचे माहाल लाऊन देणे ह्मणोन बाळाजी गोविंद कमावीसदार याचे नांवे सनद व माहालानिहायचे जमीदारास पत्रे, ऐशीं दिल्हीं आहेत. त्याप्रों साप्रत सनद व पत्रे देविलीं पाहिजेत.

---

पत्रांक ४५७ श्री. १७१८

यादी सस्थान मंडले व किल्ले चौऱ्यागड राजेश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा याजकडे द्यावयाचा अलाहिदा करार आहे. त्याविशीं सनदा व पत्रे. सुा सबा तिसैन मया व अल्लफ.

१ बाळाजी गोविंद यास सनद कीः—

१ राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा याजकडे संस्थान मडले पो अठेचाळीस हजार तीनसे रुा याचा सरजाम सरकारात ठेऊन बाकी द्यावयाचा करार. त्याप्रों हालीं सरकारांतून कारकून पाठविले आहेत. याचे स्वाधीन अठेचाळीस हजार तीनशाचा माहाल करून, बाकी सस्थान ठाणें जातसुद्धा सेनासाहेबसुभा यांजकडील अमलदार येतील त्याचे हवाला करून कबज घेणें, ह्मणोन.

१ किल्ले चौरागड सरजाम सुद्धां सेनासाहेबसुभा यांजकडे द्यावा. हवालीं करून हे सनद सादर केली असे. सेनासाहेबसुभा याजकडील अमलदार येतील त्याचे हवाल करोन कबज घेणें ह्मणोन.

---

२

२ सदरहू अन्वये शिरस्ते प्रों जमीनदारास पत्रे.

१ सस्थान मडले.

१ किले चौरागड.

---

२

---

४

सदरहूप्रों दोन सनदा व दोन पत्रें शिरस्ते प्रों.

---

पत्रांक ४५८, श्री १७१८

यादी श्री रामचंद्र तुळशीबाग का। पुर्णे येथील वर्षासन का। पाटस पौ। दरसाल दोनशे रुपये रावश्री दौलतराव बाबा सिंदे यांजकडील नेहमीं नेम णुक आहे त्याजमो कमावीसदाराकडून ऐवज येणें

———————————————— रुो।

७३७॥ बाकी सा। फाल्गुन अखेर शके १७११
१४०० सा। सन इहिदेतिसैन सा। सन सबातिसैन साले ७, दरसा ल रुो २०० प्रो।

———

२१३७॥
पौ। वसूल ———————————————— रुो।

९७॥ शके १७१४ चैत्र
२०० शके १७१६ समस तिसैन बा।

———

२९७॥
बाकी येणें ———————————————— रुो।
१८४०

———

पत्रांक ४५९ श्री १७१८

याद मसुदा

१ मल्हारजी कनसे व हनवंतराव कनसे, मौजे पिंपळवडी, प्रा। पयेठण तुजकडे बहिरजी ताकपीर याचे स्वाधान आवघाव कारभार समयी जवाहर व कापड दरवाबी फितूर करून घेऊन आलास ते सरकारी रुजू न करितां, आपले घरीं अस्त वसलास हनान सरकारांतून मसा ला रुो। १००० हजार काये मुजमळ चीजवस्त असल ती सरकारात घेऊन येणें *

———

पत्रांक ४६० श्री १७१८

यादी कलमें

१ दौलतीसमर्थे हिसेब श्रीयंरूप कैलासवासी याचे वेळेपासून आजपर्यंतचे आहेत, त्याजवर मसलाशा करून प्याच्या व हिसेबाअन्वयें आमचा ऐवज सरकारांत येणें निघेल त्याचा फडशा करून यावा

---

* हे दौलतराव शिंद्यांचे तोंडचे शब्द कारकुनानें यथोच्चार लिहून काढले आहेत

१ नगरचा किल्ला व दौलताबादचा किल्ला, महाल सरंजामी, सुदामत-पासोन आहेत. त्यासुद्धा दोन्ही किल्ले द्यावे.

१ मामले बीड दरोबस्त व प्रो पाथरी व प्रो नेवासे, हे तिन्ही माहाल दरोबस्त लाऊन द्यावे.

१ दौलतीसमधे वगैरे किरकोळ कलमे आहेत तीं उगऊन द्यावीं.

१ हालीच्या बोलण्याबाबत ऐवज येणे आहे तो झाडबाकी फडशा करून द्यावा.

---

५

येकूण पाचही जाबसाल कलमाप्रमाणे उगऊन द्यावे.

---

पत्राक ४६१ श्री १७१८

यादी राजश्री नारायण बाबूराव वैद्य यास राजश्री सेनासाहेबसुभा याणीं दरबार खर्च वगैरेचे ऐवजीं कृपा करून दिल्ही. त्याचा ठराव सुा सबा तिसैन मया व अलफ.

१ तूर्त करून देण्याची.

१ प्रात वराड येथे दोन हजार रुा तनख्याचा गाव वशपरपरापुत्रपौत्रादि इनाम करून द्यावयाचा करार ठरला आहे. त्याच्या सनदा करून द्याव्या.

१ चिरंजीव अन्याबा यास पालखीसुद्धा तीन हजार रुा तैनात करून देण्याचा ठराव जाहला आहे. त्याप्रों सिलेखान्याकडून दरमहाची परवान रुा अडीचशेंची सदर देवावी. कलम.

१ पदरचे कारकून यास आा तीन, दर दोनशाप्रों, करून देण्याचा ठराव जाहला आहे. त्याची नेमणूक करून देवावी.

---

३

१ बशर्त मडल्याचा आमल बसल्यावर खातरजमा पटे ऐसी हर्मीचिठी रुा पन्नास हजाराची सावकारी अनभवावी.

---

२

---

पत्रांक ४६२ श्री १७१८

श्री महाराजाधिराज श्री महाराजा श्री राजा मर्दन-सिंघ-देव एतेश्री पंडित मुख्यप्रधान श्री माधवरावजीके आशीर्वाद वचने. इहाके समाचार भले

है उहाके समाचार भले चाहिये अपरच राव। प्रीथीसिंघजूनें काशी नरसिके ते मौजे यवा यह गाव इनायत दियोहै सो चलत आयो है ताको तुमने साल्मुदस्तां अपती करी है अपती उठायके मसारानिले के वेटाप श्री त्र्यंक टराव काशीके तरफ गाव चलो आयो है उत्तम माफक चलाउतो

॥ श्री ॥

पतश्री मुख्य प्रधान श्रीराव सवाई माधौराइज

---

पत्रांक ४६३ श्री १७१८

यादी पत्रें

८ राजश्री बाळाजी इगळे यास सामील जावें म्हणोन

१ भूपाळवाले यांस पत्र

१ पेंढारी यांस पत्र

१ बाळाजी इगळे यांसि पत्र की, लिहिल्याप्रमाणें पत्रें पाठ विलीं व पथ सरंजाम ठेवणें

१ उज्जनीस तोफखान्यांतून तोफा मोठाल्या दोन द्यावयाची परवानगी चिट्टी

१ इमामखान आरोणेस आले आहेत, त्यासमागमें सरंजाम आहे त्यासहि पत्र

---

५

२ राघोगडास गिराद्याचा दंगा आहे त्यास तेथें बंदोबस्तास पत्रें कीं, स्वारशिपाई तेथें पाठवणें

१ राजे जाल्मसिंगची कोटेवाले यास

१ राजगडास रावतसिंग व प्रतापसिंगजीस कीं, दोनशें स्वार पाठवावे

---

२

१ सरकारचा कारकून पाठविला पाहिजे कीं, फौजेत, हिशेब ठेवील

---

पत्रांक ४६४ श्री १७१८

मसोदा

यादी पत्रें सरकारचीं —

१ किल्ले मुकमराबाद राजश्री जगन्नाथराम याचे स्वाधीन केला आहे त्यास तुम्ही रुजू होऊन सरकार–चाकरी करीत जावी, म्हणोन

१ २ राणोजी कदम किलेदार.

६ पागे तैनातीस आहेत त्यास

१ माधव बाबूराव

१ वेंकोजीराम

१ रामजी ताकपीर

१ दारकोजी वाबळे

१ राजाराम यशवत

१ अमरोजी शिंदे

---

६

---

७

१ विश्राम अनत याचे नावे पत्र कीं, किले अकबराबाद सरकारातून जगन्नाथराम याचे स्वाधीन केला आहे.

---

पत्रांक ४६५ श्री ( मसूदा ) १७१९ वैशाख शुद्ध १५

कर्जरोखा शके १७१९ पिंगल नाम सवत्सरे वैशाख शुा १५ ते दिवशीं खत लिखिते धनकोनाम राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस यासीं रिणकोनाम रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा, मुा पुणें, आत्मकार्यालागीं पर्वतसबधें मुद्दल घेतले रुा ३०००० तीन लक्ष चादवड छापी सुलाखी. यास व्याज दरमहा दरशेहे रुा १ एकोत्राप्रमाणे बिनसुट. मार्गशीर्ष वद्य १ या मुदतीस मुद्दल व्याजसुद्धा, ऐवज चादवड, पुणें याचें मुकामीं देऊ. हा रोखा लिहून दिल्हा. सर्व हस्ताक्षर खुद्द.

साक्ष.

१ नारायणराव वैद्य. १ गोविंदराव पिंगळे.

१ श्रीधर लक्ष्मण. १ कृष्णराव माधव.

---

पत्रांक ४६६ श्री १७१९ आषाढ शुद्ध ९

नेमणूक. सरकार राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा सुा समान तीसैन मया व अल्लफ, सन १२०७. राजश्री आनद बाबूराव यासीं सालीना बमय पालखी, रुपये ३००० तीन हजार याचा दरमाहा रुपये अडीचशेंप्रमाणें इा छ १३ माहे शवाल सन १२०६ पासोन सिलेखान्याकडून पावत जाईल. शिवाय कारकून आा ३ तीन, निा राजश्री नारायण बाबूराव, दर असामीस रुा दोनशेंप्रमाणें सालीना रुा साहाशें खासा स्वारी वऱ्हाडप्रातीं गेलियावर नेमणूक करून देण्यात येईल. सदरहू प्रों करार, छ, ७ मोहरम, सन मजकूर,

---

पत्रांक ४६७ श्री ( नकल ) १७१० भाद्रपद शुद्ध २

राजश्री दारकोजी वाबळे गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री दौलतराव शिंदे रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणे विशेष पो नेमावर पंचमहालपैकीं काटाफोडा व सत्वास व पाणीविडवाचे गाव बजा करून पो मार व तो गजोर व तो हरणगाव येथील फडणिशीची आसामी, राजश्री आपाजी मुधाजी कुळकर्णी श्रीगोंदेकर याचे पुत्र म्हणपाचे लढाईत असमा लागोन मृत्यु पावले, ऐसें जाणून दरखी असामीची नेमणूक सालीना बारमाही वेतन रुपये ३०० एकूण तीनसें सालमजकुरापासोन देऊन ही सनद तुम्हांस सादर केली असे तरी मारनिल्हेचे हातें दप्तरचें कामकाज घेत जाऊन सदरहू तीनसें रुपये सालमारापासून सालदरसाल वंशपरंपरा पावसीत जाणें पन्यापैकीं मजरा पडतील शिवाय जमीन बिघे सुमारी ६० साठ इनामी व गावगनो भेटी परभारें देवीत जाऊन, फडणिशीचा कानूकायदा चालवीत जाणें ही सनद मारनिल्हेस वहिवाटीस द्यावी रयाना छ १ माहे रोयल सुा समान तिसैन मया व अल्लफ बहुत काय लिहिणें ? हे विनंती मोर्तबसद

---

पत्रांक ४६८ श्रीलक्ष्मीकांत १७१९ भाद्रपद शुद्ध ७

शिक्का

आज्ञापत्र सेनाधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री रघोजी भोंसले सेना साहेबसुभा ता मोकदम मौजे मायगाव पा धुगांव प्रांत वराड सुा समान तिसैन मया व अल्लफ, सन १२०७ मौजे मजकूर हा गांव सन मजकूरचे अवल सालापासोन सरकार हिस्सा राजश्री नारायण बापूराव वैद्य यांसी इनाम दिल्हा असे तरी मशारनिल्हेसी रुजू होऊन सरकारहिस्याचा अंमल देणें जाणिजे छ ६ माहे रोयवल मोर्तबसुद बार.

---

पत्रांक ४६९ श्री १०१७ भाद्रपद शुद्ध १०

राजश्री सदाशीव भाईजी व यायाजी भाबाजी कामगारी पो आंबड गोसावी यांस —

स्नेो महाराज्य होळकर दंडवत सुा समान तिसैन मया व अल्लफ फा ग्याहामाडवे व मौजे गोंदी पो मजकूर हे दोन्हीं गांव राजश्री दादाजी गगाधर यांजकडे आहेत तेथें तुम्हीं स्वारप्यादे पाठवून, नख्त ऐवज व सर्चेवच वगैर मनस्वी पैका घेतला, म्हणून विदित जाहलें त्यास, मारनिल्हे सरकार उपयोगी यांचें अगत्य जाणून, यांजकडील गांवास उपद्रव न व्हावा, येविशीं पेशजीं दोनतीन पत्रें सादर जाले असता, मागती दगा करितां हें नीट नाहीं

त्यास हाली पत्र पावताच, याजकडील गावाकडून नख्त ऐवज व खर्चवेंच घेतला असेल तो दरोबस्त ऐवज माघारी देऊन, पुन्हा उपद्रव न देणें. जाणिजे. छ ८ रोावल. बहुत काय लिहिणे ? मोर्तबसुद.

---

पत्रांक ४७० श्री १७१९ भाद्रपद वद्य १४

श्री.
ज्योतीस्वरुपचरणीं
तत्पर माहादजी सुत
दवलतराव शिंदे
निरंतर.

दस्तर सरकार श्री दौलतराव शिंदे ता

काादारान व ठाणेदारान व चौकीदारान व रहदारान व बाजेलोकान जकायत महालानिहाय. सुा समान तिसैन मया व अलफ. रा कृष्णराव महिपत साठे याजकडील जासूद जोड्या दोन पुण्याहून पो देवास येथे जात आहेत. त्यास मार्गी जाताना व येताना मुजाहीम न होता, नदीनाला व आपलाली हद्द पार करून देणें. जाणिजे. छ २७ सफर. मोर्तबसुद.

---

पत्रांक ४७१ श्रीम्हाळसाकांत. ( नकल ) १७१९ भाद्रपद वद्य १४

राजश्री माहितराव मैराळ कादार प्रांत आबड यासीं:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रीा काशीराव होळकर. सुा समान तिसैन मया व अल्लफ. मौजे आतरवाळी सराठी हा गाव राजश्री नागो जिवाजी याजकडे सरकारांतून आहे. तेथील वस्तभाव घोडीं वगैरे चिरंजीव मल्हारराव होळकर याजकडील सदाशिव भाईजी याणीं नेलीं असतील, त्याची टिकाणीं लागून याची यासी माघारी पावलीं पाहिजेत. याजकरिता हें पत्र सादर केलें असे. तरी तुह्मी मारनिलेकडील गावची वस्तभाव घोडीं वगैरे जेथें ठिकाणीं लागेल तेथून आणून याचीं यासीं पावतीं करणें. जाणिजे. छ २७ रोावल. बहुत काय लिहिणें मार्तब.

---

पत्रांक ४७२ श्रीम्हाळसाकांत. १७१९ आश्विन शुद्ध ७

राजश्री पागापथके वगैरे सरकारी लोक मुा आबड गोसावी यासीं:—

श्रीा काशीराव होळकर रामराम सुा समान तिसैन मया अल्लफ. राजश्री येशवंतराव गंगाधर याजकडील मौजे व्याहा माडवें वेगोदी परगणें मार येथें

मुसांकडून उपद्रव लागतो म्हणोन हुजुर विदित जालें त्यावरून हें पत्र सादर केलें असे तरी तुम्हीं मारनिल्हेकडील गावास काडीमात्र तोशीस न देणें वोमाट आलिया ठीक पडणार नाहीं जाणिजे छ ६ रजब यद्दत काय लिहिणें !

---

पत्रांक ४७३ श्रीम्हाळसाकांत १७११ आश्विन शुद्ध ९

कपतान दिा मुसावस फिरगी निा सरकार गोसावी यांसी —

अज काशीराव होळकर सुा समान तिसैन मया व अलफ तुमचें हुजुर प्रयोजन आहे याकरिता हें पत्र सादर केलें असे तरी, तुम्हीं देखत पत्र कूच करून, पलटणसुद्धां हुजूर येणें जाणिजे छ ८ रबिलाखर यद्दुव काय लिहिणें !

---

पत्रांक ४७४ श्री १७१० कार्तिक वद्य १०

आज सुमा रा दौलतराव शिंदे ता मोकदमानी कसब्याहमाबर्वे, पाा आंवड सुा समान तिसैन मया व अलफ मल्हारजी छोम्हडे हुजरे, निा सरकार, यांजी हैस उंमाजी म्हसका खीलारी याजबरोबर, सरकारच्या म्हैसी चारणीस गेल्या त्यात होती कसबे मारच्या मुकामीं सी म्हैस थकली सबब विठूजी पाटील कसबे मजकूर याच्या स्वाधीन करून, पुढें म्हैसी चारणीस घेऊन गेला ठा म्हैस पाामाार सुदामतपणें देत नाहीं म्हणोन समजलें त्यावरून ताकीद सादर केली असे तरी, पाामाार यासी ताकीद करून म्हैस याची याचे स्वाधीन करून देऊन पावसी घेणें येविषयीं फिरून वोमाट आलिया कार्यास येणार नाहीं जाणिजे छ २३ जमादिलावल मोर्तबसुद

---

पत्रांक ४७५ श्री १७११ माघ वद्य ६

वेदशास्त्रसपन्न राजश्री नारायण दीक्षित स्वामींचे सेवेसी —

विद्यार्थी बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जावें विशेष तुम्ही सरकारचे लक्षात पडिल्यापासून वागत आहां सांप्रतचा प्रसग अडचणीचा याजकरितां येथून विनंति होत जाईल ती माहाराजानीं कृपा करुन मान्य करीत असावी, हें करणें मुख्यकोट येविसी राजश्री सिवराम नारायण सागतील रा छ १० सामान, सुा समान तिसैन मया व अलफ *यद्दत काय लिहिणें ? हे विनंति

---

पत्रांक ४७६ श्रीम्हाळसाकांत १७१० माघ वद्य ११

राजश्री वामनाजी हरी कादार पाा आंबड गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रीा काशीराव होळकर दंडवत सुा

---

* येथून हस्ताक्षर समाई बाजीरावाचें

समान तिसैन मया व अल्लफ. को व्याहामाडवे व मौजे गोंदी पो मजकूर हे दोन्ही गाव श्रीमताकडून राजश्री यशवतराव गगाधर याजकडे आहेत. तेथे तुह्मी नगरपट्टी बा। तगादा करिता म्हणोन विदित जाले. त्यास, हरदू गाव श्रीमताकडून मारनिलेकडे दुमाला. तेपक्षीं तेथील नगरपट्टीचा ऐवज मागणे नीट नाही. यास्तव, हे पत्र सादर केले असे. तरी तुह्मीं येविषई हरदू गावास मुजाहीम न होणे. जाणिजे. छ २४ साबान. बहुत काय लिहिणे ? मोर्तबसुद.




---

पत्रांक ४७७ श्री १७१९ फाल्गुन शुद्ध १४

आसिर्वाद उपरी. तुह्मी गेल्यापासून नागपुरास पाऊन तीन पत्रे रा गोविंदराव बापू याचे कबजात दोन व उलडोल याचे गड्यासमागमे एक एकूण तीन पत्रे पाठविलीं तीं पावली. इकडील मजकूर तरी बितपशील:—

राजश्री नाना सिंद्याचे लष्करात राहिल्यानतर आह्मास सरकार वाड्यात बोलाऊन आणून आजपर्यंत ठविले. जेवणाची वगैरे सर्व सोय चागली. श्रीमताचा नमस्कार केल्यास होतो. घरीं चौकी बसली होती तेही श्रीमतानीं कृपा करुन उठविली. आठ दाहा दिवस जाले. आह्मांस सर्वांबरोबर पैका सामर्थ्यापेक्षा अधिक मागतात. सर्वांची वाट पडेल तसी आह्मींहि आपली तोंड पाहू. कदाचित वेगळींवेगळीं बोलणीं ज्याची त्यांनीं केल्यास, आमचेहि उत्तर जे योजले ते तुह्मास समजावे. सरकारातून बाहेर निघाल्यावर तैनातेंत चार ++आहेत ती घेऊन चाकरी करा, असे सरकारचे ह्मणणे पडल्यास, आमचे मानस सर्वात्मना आहे जे विनती करावी. कनिष्ट बधूचे नावे करार करून द्यावी. ते चाकरी करितील. मीहि जवळच आहे. असे जाहलियास उत्तमच. नाहींतर ईश्वर उपेक्षिणार नाहीं. असा बुद्धीचा पक्केपणें निश्चय करून, ईश्वरावर भाव ठेऊन, स्नानसध्या करीत सुखरूप राहू, हाच निश्चय. कलम १

आह्मी स्नान सध्या केली असता तुमचे नुकसान कसे म्हणाल तर,

म्हणोन लिहितों कसें म्हणाल तर, आम्हांपाशीं पैका काम म्हणोन घेता मर अपराधी आहों तर जें मर्जीस येईल ते पारपत्य करावें सरकारात ओढ आहे तुम्हीं सरकारचे चाकर जें मिळविलें तें धावें, असें म्हणू लागल्यास, शपथपूर्वक आम्हीहि दे णार श्रम मोठाले म्हणून अधिक ठर्णे मागू लागल्यास, आमचे जवळ द्यावयास नाहीं कोणाचें कर्ज करा वयाचें नाहीं, व मिळवही नाहीं ते व्हा ईश्वरसत्तेनें जें दैवी असेल तें घडो आता सर्वस्वदानात मातुश्री व तुम्ही वधू याचे विभाग आहेत त्याविषयीं बोलून पाहू नाहीं तरी, सर्वांचीहि गती एकानिमित्त अशी होणार असल्यास होऊ येविषयीं तु मचें आमचें बोलणें सातेसमयीं झालें च आहे यांस जसा प्रसग घडेल, तसें तुम्हांस लिहू आम्हीं सरकारचा क्यांत गेल्यावर भोंसल्याकडे येणें जाणें रा नानासंबधी काय कसें म्ह णोन ऐकयलें पुरसीस जाली जे वास्तविक येणें जाणें तें आम्हींहि सा गितलें कलम १

तुमच्या तिकडील मनस्वी वात म्या येतात तुम्ही तर काहींच लि हित नाहीं हें काय ? जे वास्तवीक असेल ते लिहित जावें लिहिल्यास आंगावर येइ असें करू नये माहि तगारीनें लिहित जाणें कलम १

श्री मातुश्री आयायाई व सर्व ये थेंच आहेत आठ पधरा दिवसीं याइस रवाना करावी, असा विचार आहे मग पाहावें कलम १

तुम्हीही मोठ्या लोकांचे पदरीं आहा वडिलांनीं त्याचा लोम चागला स भाळिला आहे व तेही थोर आहेत उगीच बसलेत तरीं पोटास तुमच्या देतील, अशी आमची खातरजमा आहे दुसरेही च्यार इष्टमित्र आहेत समय जाणतील सर्व बरच आहे कलम १

तुम्ही येथून तेथें गेलां मार्गानें कसे सुखरूपतेनें गेला किंवा कसें ? भेटी कधीं कशा जाल्या ? कोणेस्थ ळीं आहां ? भेटीनंतर बोलणीं कधीं जालीं ? हा तपशील आम्हास समज ला नाहीं तुम्हीं लिहावा तोही लि हिला नाहीं आम्हांस तिकडील वर्त मान समजत नाहीं असें म्हटलें अ सतां, लोकांत कृत्रिम करितात असें मतें सर जें तेथें आढळेल तें आ म्हांस व सरकारांत परस्पर लिहित जावें याची मर्यादा येथून कोणी प्र हस्थ कोणी कामावर जाईल तोंपावे तों कामावर कोणी गृहस्थ जाणार, असें आम्हीही ऐकतों खरें असल्यास मागाहून समजेल आम्ही येथें अव घर्णीस असू, पत्र पावतें होणार नाहीं, म्हणोन बहुदा लिहिलें नसेल, असें वाटतें त्यास चिंता नाहीं सर्व लिहित जावें पत्रें पावतील उत्तरेंहि येत जातील कलम १

इकडील वर्तमान तरी बराबरच व पुढील चालीचे वगैरे अर्थ तुम्हास स्वारीसुद्धा वातम्यावरून व अकबारा वरून समजत असेल कलम १

आम्हीं सरकारच्याक्यात दोघों त व भोंसलांस विनती केली वरी

जाण्याची परवानगी जाली आहे. जात येत असावे, चार दिवस जाले, कळावे. कलम १

इत्यादिक गोष्टी इकडील तुह्मास समजाव्या व तुह्माकडील आह्मांस पुढे समजत जाव्या. नाहीं तरी, कोण करितात, हे न समजतां अनेक अदेशे मनात येतात. ह्मणोन तपशीलवार लिहिले आहे. श्रीमत पुण्यवान दयाळू आहेत. जो जशी निष्ठा ठेवील त्यास तसे फळ येईल, हे मनात आणून जे करणे ते करीत जावे. याउपर पत्रे वरचेवर पाठवीत जावी. रवाना छ १२ माहे रमजान. फाल्गुन शुद्ध १४ बहुत काय लिहिणे ? हे आशीर्वाद.

शेवेसी विसाजी बल्लाळ सा। नमस्कार विनति विशेष. लिखितार्थ परिसोन पत्राची उत्तरं समर्पक यावी. कोणे गोष्टीविषयीं चिंता न करावी. श्रीरामचंद्राच्या इच्छेकरून सर्व पार पडतील. सर्वांचा साभाळ करणार श्रीहरी आहे. विस्तार काय लिहू ? हे विनती.

---

पत्रांक ४७८ श्री १७१९

याद मसुदा.

१ मौजे खेडें, परगणे आवड, तुकोजी पा। वगैरेमुळें तुजकडे करज भवानदास मारवाडी मौजे ताडेकर याचे असतांना मागनीस येतो. त्यास तू दडेलीच्चा गोष्टी सांगतोस आनि पिटून लावितोस, म्हणोन मारवाडी याने विदित केले कीं, मजवर जबरदस्ती पाटील करितो आणि माझा फडशा सुदामत करीत नाहीं. त्याजवरून तुजला हें पत्र सादर केलें असे. तर, त्यास मशाला रुा। १०० सेभर देणे. हें खतपत्र मारवाडियाचा खडशा रोखाचा बरहुकूम व्याजसुधा करून देणे. येविसीचा फुरुन बोभाट आल्यास कारयाम येनार नाही. म्हणोन *पत्र.

---

पत्रांक ४७९ श्रीलक्ष्मीकांत. १८१९

राजश्री नारायणराव वैद्य गोसावी यासीं:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री। रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुह्मी पत्र पाठविले ते पावले. तेथील लिहिला मजकूर कळला. त्यास, तुह्मीं तेथील प्रसंगास आहां. तेव्हा याचप्रमाणे वरचेवरी पत्र पाठऊन वर्तमान लिहीत जावे. वरकड येथून नवल विशेष ल्याहावे, ऐसे नाहीं. यापूर्वीं तुह्माकडेस

---

* हें सर्व पत्र दौलतराव शिंद्याच्या हातचे आहे. भाषा शाहूमहाराजाच्या भाषेसारखी आहे.

पत्रें पाठविली आहेत त्यांचे उत्तराची मार्गप्रतीक्षा करीत असों संप्रतहि जो मजकूर लिहिणें, तो राजश्री सदाशिव बापूजी यांसीं लिहिला आहे तुम्हांसी बोलतील, त्यावरून●

---

पत्रांक ४८० श्री १७११

यादी मौजे यासकडील कारभारी यांस साल्मसकुरापासून गांव यावया या करार सु॥ समान तिसैन मया व अल्लफ रु॥ १५००० यांस नांवनिशी
१४००० श्रीधर लक्षुमण मुनसी रु॥ १४००० यास्ती गांव
७८०६॥ मौजे मुडगांव प्रांत वराड रु॥
७०९६॥ ऐन
३५४८। इनाम निमे
३५४८। सरंजाम निमे

---

७०९६॥
७०१॥। सरदेशमुखी
६००० कसबे सानोळ, प्रा॥ वराड, अंमल दरोबस्त कमाल, खेरीज तनस्याप्रों 'सरदेशमुखीमुद्दां रु॥ १२००० निमे मानिस्देख सरंजाम
१९३॥ मौजे हिंगणगांव पो सरदेशमुखी रु॥ २६८। पो

---

१४०००
१४००० कृष्णराव माधव यास रु॥ १४००० सा॥ गांव किता गाव रु॥
६५०० मौजे आसलगांव कमालपूर रु॥
१०४६॥ मौजे टाकळी माहुली सनसा देसीक सरदेशमुखी रु॥
५४५॥ मौजे पळशी वैध

---

८०९७॥
पौ वजा मोकासी रु॥ १२५९
बाकी रु॥ ६८३२॥।
असस्त वगैरे १६७।

---

७०००

---

● पुढील मद गहाळ

यासी बयान.

३५०० इनाम निमे.

३५०० सरंजाम निमे.

---

७०००

६००० कसबे सोनाळें निमे सरंजामास.

१००० मौजे टाकळी खार्ती २२७५॥= पौ वजा जातां मोकाशी रुा ३७४ बाकी रुा १९०१॥= पौ निमे सरंजामास रुा ९५०॥-

अंतस्त वगैरे ४९८≡

---

१४०००

१०००

७००० रामचंद्र दादो यास ७००० रुा यासीं गांव

२३७५।= मौजे मालेगांव तनखा रुपये ३४१२।≡॥ पौ वजा मोकाशी रुा ५७० बाकी रुा

२८४२।≡॥ मौजे मालेगांव तनखा रुपये ३४१२।≡॥ वजा मोकाशी रुा ५७० बाकी रुा

२३८४। मोजे सांवरगाव तनखा रुा २८४८। पौ वजा मोकाशी रुा ४६४ बाकी रुा

१७४८ मौजे हिंगणें तनखा रुा २४१४ पौ वजा रुा

३९७॥ मोकासा.

२६८। सरदेशमुखी.

---

६६६

बाकी रुा

१२५।०॥ जाजती अंतस्थ वगैरे

---

७०००

यासी बयान.

१७५० इनाम चौथाई.

५२५० सरंजामास तीन हिसे.

---

७०००

---

३५०००

---

पत्रांक ४८१ श्री म्हाळसाकांत १७२० ज्येष्ठ शुद्ध २

( शिक्का असे )

दस्तक सरकार राजश्री काशीराव होळकर सा कमावीसदारान व ठाणेदारान व जमीनदारान व जकातेवालेलोकान मो हाय सुा समान तिसैन मया राजश्री येशवंतराव गंगाधर यांजकडील कारकून लष्करांतून शिरोंजेस जात आहे बराबर घोडीं व माणसें व उंट वगैरे आटाला त्यांस मार्गी कोणे विषीं मुजाहीम न होतां सुा राहसील तेथें चौकी पाहारा देऊन, आपलाली हद्दपार करून देणें जाणिजे छ १ जिल्हेज मोर्तबसुद

---

पत्रांक ४८२ श्रीलक्ष्मीकांत १७२० आश्विन वद्य १

सुा रावजी अमृतरावजी गोसावी यांस —

दंडवत विनंती उपरी आपणाकरिता विजयादशमीचे पोशाख पाठविले आहेत तपशील

१ तिवट पैठणी लाल,
१ शेला पैठणी लाल
१ किनखाफ छेडीदार.
१ जामेवार मलमल बंगाली

---

४

राजश्री विनायकराव

१ तिवट पैठणी आंबाशी
१ दुपट्टा पैठणी आबाशी आस्मानी कांठी
१ किनखाफ अहमदाबादी
१ जामेवार बऱ्हाणपुरी फर्द दोन

---

४

सदरहूप्रमाणें पोहचतील रा छ १५ माहे जमादिलावल हे विनंती मोर्तबसुद

---

पत्रांक ४८३ श्रीम्हाळसाकांत १७२० आश्विन वद्य ११

राजश्री बाळोजी इंगळे कमाविसदार पो सिरोंस गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री काशीराव होळकर रामराम विनंती उपरी पो मार येथील दरखदारांचे हातें दरखाचें काम घेत नाहींत,

म्हणोन सरकारांत विदित जाले. त्यावरून हे पत्र तुम्हांस लिहिला असे. तरी दरखदाराशी वहिवाट व कानूकायदे पेशजीपासोन चालत आले आहेत, त्याप्रमाणें ज्याचे काम त्याचे हातें घेऊन वेतनाचा वगैरे ऐवज निर्वेध पावता करीत जाणें. येविषईचा पुन्हां बोभाट येऊं न देणें. रा छ २५ जावल, सु॥ तिसा तिसैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें ? हे विनंती. मोर्तब असे. शिक्का असे.

---

पत्रांक ४८४ श्री. १७२० पौष शुद्ध १२

श्रीमत मातुश्री गंगाज्यान्हवी बयाबाई व ताई वडिलाचे सेवेसी:—

आज्ञांकित यशवंतराव धोंडदेव कोल्हटकर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता॥ पौष शुद्ध १२ पावेतों आपले आशीर्वादें घरीं सर्व सुखरूप जाणोन स्वकीय कुशल लेखनाज्ञा करीत असिले पाहिजे. विशेष. फार दिवस वर्तमान तिकडचें कांहीं नाहीं, म्हणोन काळजी वाटते. अकस्मात रा॥ पांडोबा तात्यांनीं शहराहून पौष शुद्ध २ स सविस्तर लिहून पत्र पाठविलें. त्याजवरून आद्यंत मजकूर कळों आला. येथून दोन च्यार पत्रें श्रीमत राजश्री आपाचे नावें लिहून सविस्तर लिहिले होतें, त्याजवरून सेवेसीं मजकूर अवगत जालाच असेल. तूर्त या प्रांतीं उणा आहे. परंतु बाहेरचीं वर्तमानें ऐकोन चित्तास काळजी वाटते. कोणते वेळेस काय घडेल समजत नाहीं. होळकर याची फौज उजेनप्रांतीं दाहापाच हजार आली होती. तेथें लढाई होऊन बरोबरी जाली, म्हणोन वर्तमान आहे. शिंदे याचें लष्कर पूर्वस्थळावरच स्वस्थ आहे. या वेगळें इकडे नवल विशेष नाहीं. आमचेकडील कुशल व राजश्री तात्याकडे माणूस गेलाच असेल. त्याजकडचें वृत्त सविस्तर लिहून पाठवावें. सार्वकाळ पत्रोंतरीं सांभाळित असावें. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

पत्रांक ४८५ श्री. १७२१ आषाढ शुद्ध १

राजश्री रंगराव महादेव गोसावी यांसी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री॥ दवलतराव सिंदे दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणें. विशेष. राजश्री आपाजी मुधाजी यांजपासून तुम्हीं रसदेचा ऐवज घेऊन, पो॥ धर्मपुरा हा माहाल सांगितला. त्यास, अलिकडे राजश्री आनंदराव पवार याचे तुमचे चित्त शुद्ध नाहीं. सा॥ पवार यांणीं आपाजी मुधाजीकडून माहाल काढिला आणि रसदेचा ऐवज त्याजपासून घेतला. त्याचा फडशा तुमचे विद्यमानें जाहला नाहीं, म्हणोन विदित जाहलें. त्यावरून हें पत्र तुम्हास लिहिलें असे. तरी माहाल मारनिलेकडे कायम ठेऊन वहिवाट घ्यावी. हें न जाल्यास रसदेचा ऐवजाचा...

म्यांसुद्धां तुम्ही आपलेकडे फडशा करून ऐवज फडशा करावा या छ २७ सफर, सुा मयातैन व अलफ बहुत काय लिहिणे ? हे विनंति. मोर्तबसुद




पत्रांक ४८६ श्री १७२१ भाद्रपद शुद्ध २




मा अनाम देशमुख व देशपांडे, पो आकोट, प्रांत वराड, यांस बाजीराव रघुनाथ प्रधान सुा मया तैन व अलफ मौजे बुडगांव, पो मजकूर येथील निमे अमल रामचंद्र दादो, दीा राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेब, यांजकडे सरंजामास चालत होता त्यास, ते मृत्यु पावले सबब सदरहू अंमल सरकारांत जप्त करून, वसीची कमावीस राजश्री त्रिंबकराव अमृतेश्वर यांजकडे सांगितली आहे ते दूर करून सासमजकुरापासून राजश्री नारायण बापूराव मौजे मजकूरचा निमे अंमल जातीचे तैनातेंत बदल मुशाहिरा करार करून दिल्हा असे तरी तुम्ही मशारनिल्हेकडे रजू होऊन, अंमल सुरळीत देवणें जाणिजे छ १ रबिलाखर. आज्ञाप्रमाण




पत्रांक ४८७ श्री १७२१ आश्विन शुद्ध ७

वेदशास्त्रसंपन्न राजश्री नारायण दीक्षित स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थी बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार विनंति. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुम्हांकरितां विजयादशमीचा पोशाख.

सनंगे सुमार.

३॥. तुम्हास

१ तिवट पैठणी.

१ जाफरखानी.

१ महमुदी.

॥ किमखाप.

३॥.

३॥. यज्ञेश्वर दीक्षित यांस.

१ तिवट पैठणी.

१ जाफरखानी.

१ महमुदी.

॥. किमखाप.

३॥

७

येकूण सात सनगें पाठविलीं आहेत. घेऊन पावलियाचें उत्तर पाठवणें. जाणिजे. छ ५ जमादिलावल, सुा मयातैनवअलफ. बहुत काय लिहिणें ? हे विनंति.

पत्रांक ४८८ श्री. १७२१ माघ शुद्ध ५




राजश्री विश्वासराव नारायण गोसावी यांसी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित दौलतराव शिंदे विनंति उ०

परी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जावें विशेष राजश्री आपाजी रामचंद्र माळगांवकर याचा व जोशी मोरेश्वर यांचा देण्याघेण्याचा लढा आहे त्यास उभयतांचीं बोलणीं तुमचे विद्यमानें चालीं असतां, हाली जोशी मोरेश्वर आपाजी रामचंद्र याचे घरीं उपद्रव करित आहे, म्हणोन विदित जाहलें त्याजवरून हें पत्र तुम्हांस लिहिलें असे तरी तुमचे विद्यमानें बोलणीं जाली असतां, घरीं जाऊन उपद्रव करावयाचें प्रयोजन काय ? तरी त्यांचीं माणसें याचे घरीं बसलीं असल्यास, बेमुरवत उठऊन देणें आणि पुन्हा याचे घरीं उपसर्ग होऊ न देणें फिरोन बोभाट येऊ न देणें रा छ ४ रमजान, सुहुर सन मयातैन व आलफ बहुत काय लिहिणें ? हे विनंति

मोर्तब
सुद

पत्रांक ४८९ श्रीगणेशायनम १७२१ फाल्गुन शुद्ध ११

श्रीकुलदेवतायैनम श्री महाकाली महालक्ष्मी महासरस्वत्यैनम श्री दुर्गादेव्यैनम श्रीसिद्धेश्वर व श्री विपळेश्वर व श्रीधूतपापेश्वर स्वामीचे सेवेसी —

चरणरज सिद्धेश्वर भटिपराराम चींचळकर कृतानेक सां नमस्कार विज्ञापना तागाईत माघ बहुल सप्तमीपर्यंत स्वामीचे कृपेंकरून यथास्थित असों विशेष विनंति ऐसिजे —स्वासगत लग्नाचा निश्चय फाल्गुन शुद्ध त्रयोदशी सोमवारीं करून शरीरसंबंध वेदशास्त्रसंपन्न राजश्री सिद्धेश्वर दीक्षित ठकार यांशीं केला आहे ऐशास, आपण सर्व कुलस्वामी व अध्ययानीं येऊन न्यून असेल तें पूर्ण करून कार्यसिद्धी केली पाहिजे सर्व अभिमान आमच्या स्वामीस आहे कळावें बहुत काय लिहावें ? सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना

पत्रांक ४९० श्री १७२१

याद्दी शेपाजी सिंदराव यासकडे नवाब निजाम अलीखान बाहादुर यांचे सरकारांतून इनामी गांव वंशपरंपरेनें अनुभव करावा म्हणोन सनद जाली आहे व जातीस जागीर आहे त्यास पोंवदाणा श्रीमत राजश्री सेनासाहेबसुभा त्यांजकडील आहे तो सेनासाहेबसुभा यांणीं माफ करून, इनामी गांवचा इनाम वंशपरंपरेनें करून देविला पाहिजे व जातीस जागीर आहे तेथलि मार निलेचे जातीचे इनामी सनदा व जातीचे जागीरीच्या अलाहिदा सनदा महा ल्या सुहुर सन मयातैन व अलफ गांव तपशील—

२ इनामी गांव पो पालीक उर्फ घेरनवट सरकार नांदेडपैकीं
१ मौजे फरकडे
१ मौजे निंबेवाडी

२

५ जातीस जागीर देहेसुमार
४ पो च्यार टाणे सरकारपैकीं.
१ मौजे देगाव.
१ मौजे घेरुळें.
१ मौजे सोनवटी.
१ मौजे पांढरगळे.

४

१ मौजे नांदेडखोड, पो लोहगाव, सरकार पाथरी.

७ ५

याचा तनखा रुा

२०२५ इनामी गाव दोन.
१४५० मौजे फरकडे.
५७५ मौजे निंबेवाडी.

२०२५

४४०० खासगत जागीर.
३००० पो चार ठाणें पौ दोहे चार याचा तनखा एकदर
१४०० मौजे नादखोड पो लोहगाव सरकार पाथरी देहे १

६४२५ ४४००

याजविषयीं सनदा व पत्रें सुमार.

५ इनामी गावच्या इनाम वंशपरंपरेनें म्हणोन.
१ शेषाद्री सिंहराज याचे नावें.
१ जमीदाराचे नावें.
१ कमावीसदार घांसदाणीयांचे नावें वर्तमान भावी पत्र द्यावे जे, पा पालीम व लोहगाव येथील घास-

दाणीयाचा आद आहे त्या पो दोन गावचा वाव
दाणीयाचा ऐवज सरकारांतून मारनिलेस इनाम
करून दिल्हा आहे त्यास, या मारनिले मुकोती
पैकीं मजरा देऊन, बाकी ऐवज घ्यावा

२ मुकदमाचे नांवें

८

२ जागीरीचे गावाविषयीं मारनिल्हेचे जातीस सरकारचा घा
सदाणा माफ केला असे, म्हणून सदरहू अन्वयें पत्र

७

१ शेषाद्री सिंहराव यांचे नांवें
१ वर्तमान भावी कमावीसदार यांचे नांवें

२

एकूण सात पत्रें श्रीमंतास विनंती करोन साल्मजकुरीं उपद्रव व ऐवज न देणें पडे, ऐसें ल्हावें

---

पत्रांक ४९१ श्री १७२१

सेवेसी सां नमस्कार विज्ञापना ता मदवार पावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष काल निरोप घेऊन आलों ते अस्तमानी पोहोंचलों चिरंजीव रा नरहर बापू शहरात भेटले त्यांणीं सांगितलें कीं, मी कामगिरीस जातों तेथून आल्यावर पत्र देईन से लष्करातून चंद्रोदयीं निघोन नगरास गेले फडणीस तेथें होते त्यास नेलें बरोबर फौज आहे हें वर्तमान श्रीमंतास आज कळलें त्यावरून मर्जी दिक आहे रा बाळोजीबाबा सकाळीं वाड्यांत जाऊन लष्करांत गेले आहेत नगराहून बक्षी व बाळोबाचात्यास आणावयास सांगितलें आहे आज गोविंदराव बापू यांचे घरीं हुजरातचे लोक बसले आहेत दोन आठवडे व येक हुमाही देवों, ऐसा करार परबा करून वाड्यां तून लोक त्याणीं उठऊन आणिले त्यास आठ दिवस जाहले ऐवजाचा फडशा करून द्यावा ह्मणोन बसले आहेत आबा शेळूकर यांस तुम्याचीं वस्त्रें परवांचे दिवशीं जाहलीं सातेन्यास कारभारास वाल्या जोशी पो होते येथें आणविले आहेत रावसाहेब यांचा अद्याप मुक्काम आहे कृष्ण जाहालें नाहीं पावीपत आणावे लोक वात्या पळोन गेले बाळोजीबावांनीं त्र्यंबकचा किल्ला महिपतराव मामास सांगितला काळ वसें दिसही यांची प्रकृति बरी आहे

कपूचे कुच्य होऊन हडपसरावर गेला आहे. करवीराकडे त्यास मोहीम सांगितली. याप्रों वर्तमान आहे. पिकलीं पाने पांचशे पा आहेत. केशर मागाहून घेऊन पाठवितो. सेवेसीं श्रुत होय. हे विज्ञापना.

---

पत्राक ४९२ श्री. १७२१

पुा विनती उपरी.

करवीरचा मजकूर तरी: येथें श्रीमंत राजश्री सिंदे याजकडे तिकडील बोलणाराचे बोलणें रा सर्जेराव घाटगे वगैरे याचे विद्यमानें पडोन राा विस्वासराव घाटगे सर्जेराव यांणीं व राजश्री जोसीराव यांणीं येथें जलदीने यावें आणि तहाचे बोलणे बोलावे. तोवर पधरा रोज गोळागोळी होऊ नये. ऐसीं पत्रे सिंदे याजकडील तेथे गेलीं आहेत ह्मणोन आइकण्यात आहेत. शिवाय बाजारात बोलणीं आवाया बोलतात कीं, वीस लाख रुपये करार करावे. पोतूनें निमे दाहा द्यावे. यात निमे सरकार व निमे सिंदे. या खेरीज कलमे काय असतील ते असोत. परतु चिकोडीमनोली तालुके राजमडलाकडे राखावे, अशी बोलणीं या आवाईत आहेत. याकरिता तुह्मास फार कळावे, ह्मणून सूचनार्थ लिहिणें आहे. पायाशुद्ध तह जाहालियास, सर्व यथास्थित आहे. परतु कैसें घडेल, ते पाहावें.

---

पत्रांक ४९३ श्री. १७२२ चैत्र शुद्ध १२

श्रीमत राजश्री पतप्रधान साहेबाचे सेवेसी:—

आज्ञाधारक आपाजी पायगुडे दडवत विज्ञापना. तागायत छ ११ जिलकाद पावेतों मुक्काम नजिक किल्ले कावनई साहेबाचे कृपाकटाक्षें पागापथकाचें व सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष ......... डोगर कावनई .........जमा जाहलें होते यास्तव आस्वलीचे मुकामीहून कुच्य करून किल्यानजीक आलो. फौजेचे दहशतीने कोळी डोगर सोडून पस्याकडे गेला. छ. ७ जिलकादीं कोळी यानीं किल्लेपस्यास येलगार केला. किल्लेकरी सावध होते, व राजश्री बापूजीपत गार्दीसुद्धा येऊन पोहचले. कोळीयाचे पारिपत्य थोडेंबहुत जाहले. आम्हास कोळयाची बातमी लागताच, छ मजकुरीं स्वार होऊन गेलों. मौजे खेडानजीक दक्षणेस डोगरालगती गाठी पडली. आम्हांकडील निकड पाहून, दहशतीने कोळी पळून पहाडात गेले. गोळागोळी बरीच जाहली. त्याजकडील तट्टे, पथकातील लोकानीं दहापधरा पाडाव करून आणिलीं. तें समयीं पाईचे बरकदाज असते तरी कोळयाचें पारिपत्य जाहले असते. स्वाराचा इलाज अवघड डोंगरावर कळतच आहे! याप्रातीं कामागिरी नेमल्यासारिखें सरकारकामाचा बदोबस्त होय तें जाहलें पाहिजे.

तालुकदार यांजकडील पाईंचे लोक व लदर्वाई सामान एक मागा
साहाणों, सणके कोळी मेदानांत येत नाहीं मागाहून सविस्तर लेहून कळऊ
रोजमरियाविशीं लिहिलें, त्याचे उत्तराची आज्ञा जाली पाहिजे सेवेसीं श्रुत
होय हे विज्ञापना

---

पत्रांक ४९४ श्री १७२२ चैत्र

*पौ मिती वैशाख वद्य १२ शके १७२२*

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री लक्ष्मीनारायण दीक्षित स्वामींचे
सेवेसीं —

विद्यार्थी येशवंतराव महादेव सां नमस्कार *विशेष आपण पत्र पाठ
विलें तें पावलें वेदशास्त्रसंपन्न राजश्री मोरेश्वर दीक्षित यांस औषधा करितां
मंजूर दोन तोळे पाठवावा, म्हणोन लिहिलें त्यावरून दोन तोळे मजूर मा
णसाबराबर पाठविला आहे पावेल आपल्यास औषध पाठवावयाचें तें,
आठाचौं दिवशीं राजुरास जाणार आहे, तेथें गेल्यावर पाठवीन
औषध राजुरास राहिलें आहे येथें नाहीं वरकड राजकीय नवल
विशेष लिहिणेसारिखें नाहीं राजश्री सिद्धेश्वर महिपत म्हणोन कारकून सर
कारचे हे फौज जमा करून गायकवाडावर जाणार, म्हणोन म्हणतात आणि ख
डण्या घेतात त्यासह त्यामार्ती येणार आहेत बहुत प्रळय या प्रांतीं केला
आहे ! तो लिहितां पुरवत नाहीं ! आपण सावध असावें यास विचार काढा
मात्र नाहीं याजकरिता लिहिणें आहे बहुत काय लिहिणें? लोभ असों दिजे
हे विनंति

---

पत्रांक ४९५ श्री १७२३ वैशाख वद्य ९

सेवेसी विनंति सेवक कचो जनार्दन, निसबत केशो भिकाजी, फडनीस
सां नमस्कार विज्ञापना ता छ २२ माहे जिल्हेज मुा लष्कर नजीक वर्दा
वद्या येथें सेवकांचे वर्तमान यथास्थित असो विशेष इकडील वर्तमान छ
१७ मीनहूस विनंतिपत्र लिहून मुकाम पेंचगवा येथून सेवेसीं रवाना केलें
आहे त्यानंतर येणेंप्रमाणें:—

१ छ १८ मीनहूस तेथून कूच होऊन मौजे नामखीपचोर, परगणें रत
लाम, येथें मुा केला चिमाजी बुळे याचे कनिष्ट चिरंजीव गोविंदराव बुळे
पाळणेंसे स्वारांनिशीं येऊन भेटले राजश्री यशवंतराव होळकर सामोरे गेले
होते समागमें त्यास घेऊन आल्यावर, ते आपले मिसलीवर गेल्यावर त्यांचे
येथें सरदार गेले त्यांणीं वस्त्रें सिपट घेत्सा दिल्हा फलम

---

* संक्षेपार्थ मामुली शब्द आर्मी सोडले आहेत

१ उज्यनींत मीरखापठाण व दुदरनेक फिरगी, चिमाजी कृष्ण ऐसे फौजेसुद्धा गेले होते. ते, बाळोजी इगळे व लक्ष्मण अनंत याचा सलुख, बाळाजी अनत पागनीस याचीं पत्रे आल्यावर, होऊन भेटी जाल्यामुळें, ठाणें बसवायाची मसलत राहून, येथून सरदारानीं पत्रें त्रिवर्गास पाठविलीं की, तुह्मीं फौजेसुद्धा महत्पुरास जावे. त्याजवरून ते महत्पुरास गेले. तेथून तुलसाजी वाघ याजवळून येवज घेऊन, सरजाम जप्त करावा या बेतावर गेले. कलम.

१ इगळे व लखबा एकत्र जाहाले. उखबा उदेपुराकडे गेले. इगळे मल्हारगडाकडे आले. सरदारास लखबाकडे न्यावें, सवत्र लक्ष्मण रघुनाथ फौजेसमागमे आहेत. सलूख उभयताचा जाला नवता, तोपरियत याची कूच जल्दी करून सरदारास न्यावे हे जरूर होती. आता मतलब जाल्यामुळें जरूर नाहीं. लखबा चितोडाहून उदेपुराकडे गेले. कलम.

१ सरदार याणी रतलामची खडणी चाळीस हजार रुपये घेतले. पुढें देवळेप्रतापगडास जाणार तो तेथील वकील रुजू होऊन भेटले. जाबसाल होत आहे, तों इगळे याणीं फौजेसुद्धा देवळेप्रतापगडावर शह दिल्हा. घासदाणा मागतात. त्याजवरून सरदाराची मर्जी क्रूर जाली. इगळे याणीं होळकर याचे गावास उपद्रव दिल्हा, याजकरिता लढाई घ्यावी हा विचार आहे. फिरगीमरिखा याजलाही पत्रे जलद यावयाविशीं गेलीं आहेत. साप्रत, देवळे प्रतापगडाचा शह सरदारानीं सोडून, छ मजकुरीं येथे मुकाम केला. आबाजी लक्ष्मण शभर स्वारानिशीं सरदारास मुा मजकुरीं येऊन भेटले. येतेसमई महेश्वरावरून आले. पत मशारनिले आले आहेत. यावर काय घडेल ते पाहावें. गोवर्धन ( भील ? ) समागमे आहे. कलम.

१ मीरवजीर हुसेन दोनशे स्वार व पायदळ पाचशे ऐसे आपले सरजामानसी. त्याजला महत्पुरास मागील मुकामाहून रवाना केलें.आणि वराता महत्पुरावर लाख रुपयाच्या केल्या. ऐवज वाघाकडून घेऊन, वरातदारास देऊन, त्याजला येथें घेऊन यावें, या बेताबर रवाना केला. कलम.

१ चिमाजी बुळे याचे चिरजीव विठुजी याचे चिखलदे वगैरे महालच्या जप्ती राजश्री आनदराव पवार याजकडे सागून, सनदा करून दिल्ह्यासिवाय पवारं मजकूर याजला चाळीस हजार नक्त दिले. त्याणीं थोरले काम नागोपताचें करून दिल्हें, म्हणोन बक्षीसी दिली. बुळेमजकूर कनिष्ट येथे आले. त्याणीं जाबसाल लावला. लाख रुपये घेऊन, महालाची सोडचिठी देऊन, मुक्त करावे, शभर स्वारानसी चाकरी करू, याप्रमाणे बोलणे संताजी लाबहातेचे विद्यमाने लागलें. हाली बुळ्यावर वराता करून दिल्ह्या, हशमी शिलेदाराच्या. कलम.

---

येणेंप्रमाणें घ्यानास येईल उत्तराची आज्ञा होऊन खर्चाचा बंदोबस्त जाला पो हे विज्ञापना

---

पत्रांक ४९६ श्री १७२२ वैशाख

श्रीमंत राजश्री नानाजीसाहेब साहेबाचे सेवेसी —

आज्ञाधारक राणूजी पाटील व भिकाराऊत वगैरे, समस्त लहान मोर मौजे काठीपिंपळगाव अर्ज रामराम विज्ञापना काल लष्कराचा मार कालचे पत्रावरून कळला व आज कांही आम्ही आपले शिवेवरून फिरली आपले गांवाजवळ श्रीमताच्या पागा दाहा आहेत गायकवाने तमाम चिठ्या (करून) लोक आगांजागां धरून नेले आपले गांव पागामुळें अगले त्यास, कांहीचा दगा जाणोन, बाबांचे खासगतहुजूरच्या कलम व धाणदार ऐसें रविवारी दों प्रहरां आणले दररोज रो १ शिवाय लुराक, याप्रमाणें आहे त्यास, याप्र माणें आयस्ता आहे नरसिंगचा राघोबा जाला रुपाया दग्यात ठरला त्या चा तगादा रा बळवंतराव माऊचा स्वार आला होता +++ हे विज्ञापना

---

पत्रांक ४९७

पैा ज्येष्ठ कृष्ण २ शके १७२२ श्रीसांब १७२२ ज्येष्ठ शुद्ध १५

श्रीमद्वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री दीक्षित स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थी बापू गोखले यांचे अनेक सा नमस्कार विज्ञापना ऐसीजे: आपली आज्ञा घेऊन निघालों तो गुरुवारीं पंचीस कान्हेरास पोहोंचलों यानंतर राजश्री येशवंतरावजी यांजबरोबर बुधरास आलों ते ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा पावेतों आपले कृपावलोकनकरून आनंदायमान सुखरूप आहे विशेष श्रीमंत अमृतराव, बाळोबातात्या, आबा चिटणीस आपली चक्रदेवप्रभृति *नकारमंडळ सर्व एकत्र होऊन, नफारास दस्तक द्यावा, असा ठराव जाला तो श्रीमंत यांजी रायास कळला त्यांनीं दयलतरावास सांगून बाळोबास कैद करविला त्यामुळें अलिकडेस उभयतां श्रीमंताचीं चित्तें शुद्ध नाहींत शिंदे यांचा विचार तर लखबा व अलीबहादूर, येशवंतराव होळकर, यांचा सर्व एक विचारें होऊन, हिंदुस्थानांत दवलतराव यांस ठिकाण ठेविलें नाहीं इकडेस अमृतराव व दव लतराव यांशीं सुरूच लाऊन दिल्ही आहे कोणीही इलका न त्यास परंच आहे श्रीमंत दादाविषई आपाजीपंत यांणीं दवलतराव यांसी बोलणें करून, पन्नास लक्ष रुपय द्यावे त्यापैकीं निमे सरकार व निमे तुम्ही, असें घेऊन हिंदु स्थानांत तुम्हीं जावें त्यानें कबूल केलें त्यावरून मशारनिल्हे यांनीं कारकून पाठविला त्याचें प्रत्युत्तर, आमचा अदृष्टियोग असल्यास सर्व घडेल,

---

*नाना फडणीस

आह्मास कपर्दिक द्यावयास मिळत नाही. तेव्हा तो विचार राहिला. बाजीराव याचे चित्तातून यास द्रव्य न पडता घेऊन जावे. परतु अमृतराव याचें भाषण विचार पाहाता, तूर्त न आणावे. यामुळे साप्रत राहिले. यास चांचवड किल्ला जुन्नरापासून पाचा कोसावर दिल्हा. ३० सहस्र रुपये दिल्हे. आमचे यजमान तर वधूचा विभाग करावा ह्मणोन येथे आले. येऊन त्यानीं याणीं उभयता दादाचे पायावर हात ठेविले. आपण जसा विभाग कर्तील त्यास आह्मी राजी. यानंतर विभाग होतील, त्या अन्वये गेनेसीं लिहून पाठवीन. येथील आमचा विचार तर कोण्या रीतीचा आहे तो तीर्थस्वरूप आपा आटापधरा दिवसा घरीं आल्यावर कळेल. हें पत्र ब्रह्मभटजी जवळ देऊन वडिलास दाखवावें. आपला पुण्यास जावयाचा बेत कसा झाला, हें लिहावयाविषयीं आज्ञा जाली पाहिजे. बहुत काय लिहिणें? हे विज्ञापना.

हेच पत्रीं वेदमूर्ती ब्रह्मभट व बाळकृष्णभट यास सा। नमस्कार. कृपावृद्धी लोभाची करीत जावी. हे विनती.

---

पत्रांक ४९८ श्रीशकर. १७२२ आषाढ शुद्ध ११

श्रीमत वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री नानाजी स्वामीचे सेवेसी:—

विद्यार्थी विश्वनाथ महादेव थथे सा। नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता। आषाढ शु॥ ११ गुरुवार पो। स्वामीचे आसिर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. स्वामीनीं कृपा करून पत्र पाठविलें. ते पाहून बहुत समाधान जालें. इकडील वर्तमान तर: श्रीमत राजश्री दादा जुनराहून निघून वद्य ३० रविवारी राजश्री बळवतराव वाकडे याचे बागात सध्याकाळीं आले. शु॥ १ सोमवारीं तेथून निघून गारपिरावर आले. मी भोजन करून गेलो होतों. श्रीमत चौघे व सिंदे आले होते. भेटी मोठ्या समारंभेकरून जाल्यानतर, सिंदे लष्करात गेले. श्रीमंत राजश्री बाबासाहेब याचे खवासखान्यात राजश्री दादा बसले होते. त्याच्या मागें राजश्री रामरावनाना बसले. समारंभेकरून वाड्यात गेले. चार घटका श्रीमतासीं एकांत होऊन, नतर मुरलीमनोहराचे वाड्यात राहिले. आठ दिवस मुहूर्त वाड्यात यावयास नवता. याजकरिता आले नाहींत. सर्व मानकरी व ग्रहस्थ मडळीच्या भेटी, आज अका दिवस जाले, होतात. याजमुळें घटकाभर फावत नाहीं. शु॥ १० मगळवारीं राजश्री सिंदे याच्या येथे मेजवानी श्रीमतांस जाली. अमृतराव गेले नाहींत. उभयता व राजश्री दादा गेले होते. जवाहीर त्रिवर्गास दिल्हें. वरकड मानकऱ्यांस वस्त्रें दिल्हीं. श्रीमतानीं दादास आजपो। सा पोषाक दिल्हे. कठी मोत्याची व शिरपेंच दिल्हा. शिंद्याकडील कठी व शिरपेच आला. शुद्ध ११ बुधवारीं दाहा घटका दिवसास मुहुर्तानसीं वाड्यात आले. ग्रहस्थ मडळी वाड्यात आली होती. सर्वांस विडे दिले. आपला आसीर्वाद सांगितला. मी माझें

पत्रात लिहिलें होतें यजमानाची स्वारी आलीच असेल माझा आशीर्वाद सां गावा, यासी बोलले आपलें पत्र यजमानास आल्यास त्यात त्याहावें की, विश्वनाथ नाईक याचे पत्रीं आशीर्वाद लिहिला होता, तो प्रविष्ट त्यांणी के लाच असेल यासी लिहिलें असता समक्ष लयाशी येणार नाहीं सूचनार्थ लिहिलें आहे श्रीमंत रावश्री बाबासाहेब, पांच दिवस झाले, फडावर येऊन बसतात कारभाराही कांहीं मनास आणू लागले आहेत आपले आशीर्वादें क रून बंदोबस्तही लवकर होईल, ऐसें दिसतें मागाहून होईल तें लिहून पा ठऊ वेशाविशीं कल्पना भाली आहे याश सर्वदा विपरीत बोलतात अद्याप स्वस्थ आहेत आपणास कळावें बहुत काय लिहिणें ! लोभ करावा हे विज्ञापना

तीर्था गंगाभागीरथी मातोश्रीबाई यांस बालकाचा धा नमस्कार विनंती लिा परिसोन लोभ करावा हे विज्ञापना

पो आषाढ या १ शके १७२२

---

पत्रांक ४९९ श्रीगजानन १७२२ श्रावण शुद्ध ११

पुा वडिलांचे सेवेसी शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना रावश्री येशवंतराव होळकर यांचे लष्करांत रा बाळाजी भाईजी व सदाशिव भाईजी व राम चद्रजी लोहारेकर बोरनारे जवळ आहे तेथील गृहस्थ हे होळकराचे बहुत स्नेही आहेत पेशजी मल्हारराव याचा कारभार रामचद्रभाईजी करीत अ सत पुढें मल्हारराव यांची गर्दी जाल्यावर उभयता सदाशीवपंत व राम चद्र यांस काशीराव याणीं कैद केलें ते दोन वर्षे कैदेत बाफगावचे किल्या वर होते पुढें बाळाजी भाईजी लोहोऱ्याहून येऊन, कांहां विचारमाफक दर बार खर्च काशीराव यांचे लष्करात व हुजूर यासी करून, उभयतां बंधु मो कळे केले आणि घरीं लोहोऱ्यास गेले त्यासकडे आमचा ऐवज साडेचारसें येणें आहे त्यांचा आमचा स्नेह बहुत आतेसमई दोन तीन वेळां आम्हांकडे भेटावयासी आले होते घरीं जाऊन, दोन तीन महिने राहून, पुढें येशवंत राव होळकर यांचे लष्करांत जावयाचा मंडवा मारानिलेचा होता त्यास, ते घरीं जाऊन एक वर्ष जाहलें कोठें आहेत याचा ठिकाण नाहीं त्याचा व होळकर याचा स्नेह येथील केवळ+।+।+होता त्यास या तिघांचा शोध तेथें पारकाईनें लावावा तिघांतून एक तेथें असल्यास, आम्हांस लिहोन पाठ वावें आमचें पत्र व तुम्ही आमचें भाऊ असें कळलें असतां प्राण देऊन, तुमचे माहालाचा समस्त बदोबस्त करितील आणि आमचा पैकाही त्याज कडे आहे तरी याचा शोध अगत्य लावावा यर्थ असतां येशवंतराव व ते बंधू यासी घरोबा होता याजकरितां लिहिलें आहे शोध लागल्यास जलद लिहून पाठवावें म्हणने तुम्हांविशीं वगैरे एक पत्र पाठऊं म्हणजे ते सर्व

बंदोबस्त करितील. हा भरंवसा जाणोन, वडिलांस लिहिलें आहे. वरकड सविस्तर यजमान याणीं तुम्हास लिहिले आहे. त्याजवरून कळेल. आपला जीव जे गोष्टीने सुटून देशी येणें होई, असा विचार असेल तो करावा. सविस्तर ल्याहावे. हे विज्ञापना. छ १२ रोवल, श्रावण शुद्ध १३ शके १७२२ सन इहिदे मयातैन व अल्लफ.

---

पत्रांक ५०० श्रीगणपती. १७२१ श्रावण वद्य ५

वेदशास्त्रसपन्न राजश्री लक्ष्मीनारायण दीक्षित स्वामीचे सेवेसी:—

विद्यार्थी बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावे. विशेष. श्रीचा उत्साह भाद्रपद चतुर्थीचा सरकारात आहे. याजकरिता आपणास पालखी पाठविली आहे. तरी आपण सत्वर निघोन यावे. जाणिजे. छ. १८ रबीलावल, सुा मयातैन व अल्लफ. बहुत काय लिहिणे हे विनती.

---

पत्राक ५०१ श्री. १७२२ वैशाख शुद्ध ९

अजम सिद्दी बिलालखा दामोबतहूं.

अज दिल्हे येकलास सिदोजीराव नाईक निंबाळकर सरलष्कर सलाम. येथील खैरखुसी जाणून कलम ताजा करीत जावें. तुम्ही जदीद सिदी व अरब व हिबसी याचे उमेदवारीचा मजकूर लिहिला. त्यास विलायत आरब याचा सिरस्ता दरमाहा रुपये १६ व सिदी याचा दरमाहा रुपये १३ तेरा व मालपे याचा दरमाहा रुपये ११ येणे प्रो आहे. त्यास तेथे किती लोक असतील तें पत्र पावताच घेऊन येणें. सिवाय हिबसी व सिलेदार घेऊन येणें. घोडेमाणूस पाहून बंदोबस्त करून दिल्हा जाईल व तुमचे जातीचा बंदोबस्त येथें आल्यावर हुजूर करून देऊ. जाणिजे. छ ८ माहे जिल्हेज. ज्यादा काय लिहिणें ? हे किताबत.

---

पत्राक ५०२ श्री १७२२ आश्विन शुद्ध १

श्रीमंत महाराज राजश्री बाबासाहेब स्वामीचे सेवेसी:—

विनती सेवक नारायण बाबूराव वैद्य कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना ता। छ २९ जावल मुकाम नागपूर येथें स्वामीचे कृपाकटाक्षेकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे. विशेष. मजवर सकटाचा समय प्राप्त जाहला. याजकरिता आपले वर्तमान स्वामीस समजावें म्हणोन, चिरंजीव सदाशीव लक्ष्मण जोशी यांनीं तपशिलें लिहिले आहे. त्याचें मनन कृपा करून समक्ष होऊन माझे सकट दूर होय, अशी आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. दुसरी गत पायांशिवाय नाहीं. व मीही जाणत नाहीं. ये विषयीं आर्या श्लोक:—

त्व मम जननी जनकस्त्वमेव बंधु कुलंच शीलंच ।
त्वयि निष्ठुरतां याते तृणमपि वज्रायते मयीशान ॥ १ ॥
फार काय लिहूं ? सेवसीभुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक ५०३ श्रीनाथप्रा १७२२ कार्तिक वद्य १४

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री नारायण दीक्षित ठकार स्वामीचे सेवेसी —

सेवक दौलतराव सिंदे दंडवत विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणें विशेष मौजे माहागाव येथील बाळोजी बिन फुरंगोजी व सुलतानजी बिन मानाजी व राणोजी बिन धोंडजी चव्हाण पाटील यांची पाटीलकी पूर्वीची असतां, अलीकडे सुलतानजी बिन मुरारजी व आपाजी बिन सुलतानजी व मुरारजी बिन सुलतानजी लाड यांणीं घटाईनें पाटीलकीचा सोळावा हिस्सा देतात अलीकडे त्यांतही खलेल केली म्हणोन समजलें त्यावरून हें पत्र आपणास लिहिलें असे तरी आपण लाड यासी बरें वजेनें ताकीद करून चव्हाण यांची पाटीलकी सुदामत पाधून चालत आली आहे, त्याप्रों चालवीत, तें करावें येविसीं पुन्हां बोभाट न ये तें करावें रा छ २७ जमादिलाखर, सुा इहिदे मयातैन व अलफ *बहुत काय लिहिणें ? हे विनती

मोर्तब
सुद

---

पत्रांक ५०४ श्री १७२२ कार्तिक मार्गशीर्ष.

यादी मौजे कामगाव व मौजे काठी पिंपळगांव पो गंगापूर हे दोन्ही गांव वेदशास्त्रसंपन्न राजश्री रामचंद्र दीक्षित व लक्ष्मीनारायण दिक्षित यांजकडे सरकारांतून इनामी आहेत दोन्ही गांवांवर मोत्याजी गायकवाड यांनीं फौजसुद्धां येऊन दगा करून जबरदस्तीनें ऐवज घेतला, वितपशील रु १००० मौजे कामगाव सुा मयातैन सन १२०९ चे सालीं अजमासें खर्चसुद्धां यांचे नुकसानीसुद्धां १००० मौजे कांठी पिंपळगांव सुरसन मयातैन सन १२०९

---

पत्रांक ५०५ श्री १७२२ मार्गशीर्ष शुद्ध ८

आशीर्वाद उपरी येथील वर्तमान मार्गशीर्ष शुद्ध ८ इंदुवार पावेतों यथा

---

*येथून हस्ताक्षर दौलतराव शिंद्यांचें

योगीं पडणार नाहीं येविशीं श्रीमंतांची निक्षूण ताकीद आहे दुसरे पत्राचा आक्षेप न करितां, ब्राह्मणाचा बोभाट येऊ नये रा छ ७ रजब

---

पत्रांक ५०७ श्री १७२२ मार्गशीर्ष शुद्ध १५डिसेंबर

राजश्री मोत्याजी कालगावडे गोसावी यांसी ---

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री बाजीराव रघुनाथ प्रधान आशीर्वाद सुा इहिदे मयातैन व अलफ क्षेत्र टोंकें प्रवरासंगम कायेगांव या क्षेत्रीं तुम्हीं ब्राह्मणास उपद्रव देऊन बेअब्रू करून लवणीचा ठराव केला त्यांत ब्राह्मणा पासून ऐवज घेऊन बाकीचे ऐवजास श्री देवाचे डागिने घेतले आहेत, ह्मणोन हुजूर विदित जालें त्यावरून सरकारांतून खिजमतगार आा २ नाठ ऊन हें पत्र सादर केलें असे तर टोंकें वगैरे येथील क्षेत्राचे ब्राह्मणापासून ऐवज व देवाचे डागिने घेतले असतील ते खिजमतगार यांचे गुजारतीनें माघारी देऊन पुढें तीहीं क्षेत्रींचे ब्राह्मणास व रयतीस उपद्रव न करणें येवि षईं फिरोन बोभाट येऊं न देणें जाणिजे छ १३ रजब आज्ञा प्रमाण मोर्तब शिक्का

---

पत्रांक ५०८ श्री १७२२ मार्गशीर्ष वद्य १



॥श्री॥
श्री म्हाळसाकांतचरणीतत्पर
मल्हारजीसुत खंडेराव
होळकर

मा अनाम विनसिंग मंडलोई, पो धरणगांव, यांसी येशवंतराव होळ कर सुा इहिदे मयातैन व अलफ राजश्री आपाजी सुभाजी यांजकडे पो मजकूरची मामलत पेशजींपासून असता, तुम्हीं कामाकाजाविषईं दिक्कत करितो, म्हणोन हुजुर विदित जाहलें त्यावरून हें पत्र सादर केलें असे तरी मशारनिले यांशीं कोणेविषीं दिक्कत न करितां, काम काज मागाहून करीत आले त्यात खेच पडूं न देणें येविषीं पुन्हां बोभाटा न ये तें करणें जाणिजे छ १४ रजब मोर्तबसुद ( शिक्का असे )

---

पत्रांक ५०९ श्री. १७२२ मार्गशीर्ष वद्य २

श्रीवेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री लक्ष्मीनारायण दीक्षित यांप्रति:—

बाळशास्त्री अनेक नमस्कार. विशेष. तुमचे पत्र सोनईचा मुकामीहून मार्गशीर्ष शुद्ध अष्टमीचें पाठविले तें पावले. त्यातील मजकूर सविस्तर विदित जाला. हेंच वर्तमान श्रीमंतास विदित जालें. त्याजवरून राजश्री मोत्याजी काळगावडे यास सरकारचे ताकीदपत्रासह खिजमतदार असामी दोन पाठविले आहेत. ते आपल्याकडे येतील. आपण तिरस्थळीचे पाच पाच ब्राह्मण पुढें करून, हुजरे बराबर देऊन, काळगावडे याजकडे पाठवावे. या दों असाम्यांचीं नांवें, बयाजी डोके व दारूकजी घुले. याचा रोजमुरा रुपये मार्गशीर्ष वद्य प्रतीपदेस रवाणा जाले, कामागिरीस आहेत, तोपर्यंत रोजमुरा क्षेत्रावर वरगणी घालून देणें. येक रोजमुरा रुपय्ये १४ देऊन रवाणा करणे. पुढे कामकाज चागलें जाहलियावर यास खुशाल करून वाटेस लावणे. हे अनेक नमस्कार.

---

पत्रांक ५१० श्रीम्हाळसाकांत. १७२२ मार्गशीर्ष वद्य २

राजश्री मोत्याजी कालगावडे गोसावी यासी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रो काशीराव होळकर राम राम विनंति उपरी. क्षेत्र टोंकें आदीकरून तिरस्थळी येथे मनस्वी उपद्रव देऊन ब्राह्मणाची बेअब्रू करून ऐवज घेतला, ह्मणोन बोभाट आला. ऐशीयासीं, क्षेत्राची जागा. आजपावेतों परराष्ट्र आलीं, त्यानीं देखील तेथें उपसर्ग न देता ब्राह्मणाचा बहुमानच केला. असें असोन, तुह्मीं स्वदेशी असता यातील विचार कांहीं न पाहता, ब्राह्मणास मारहाण केली, ऐवज घेतला, हें चागले कीं काय ? यास्तव, हें पत्र लिहिलें असे. तर इत.पर तिरस्थळीस कोणेविसीं उपसर्ग न करिता, ऐवज घेतला असेल तो माघारा देऊन, ब्राह्मणाचें समाधान करून, चीजवस्त ऐवज पावल्याचीं त्याचीं पत्रे घेऊन सरकारात पाठवणें. हे न घडल्यास येथे श्रीमंताची मर्जी नीट न राहता अवघड पडेल. या कामास सरकारातून खिजमतगार आा २ रवाना केले आहेत. याचे गुजारतीनें लिा प्रमाणें जाबसाल उरकून, तेथील ब्राह्मणाची कबज पाठाविणें. रा छ १५ रजब, सुा इहिदे मयातैन व अलफ. बहुत काय लिहिणे ? हे विनति. मोर्तब सूद. शिक्का.

---

पत्रांक ५११ श्री. १७२२ मार्गशीर्ष वद्य ७

श्रीमंत महाराज राजश्री नानाजी स्वामीचें सेवेसी:—

विद्यार्थी परसरामभट धर्माधिकारी व मल्हार रामचंद्र कुळकर्णी साा नमस्कार विनती विज्ञापना ताा मार्गेश्वर वद्य ७ पावेतों यथास्थित असों. विशेष.

भलीकडे गावचें वर्तमान यथास्थित आहे काल रा आपामट गोखले पु ण्याहून आले त्यांनीं वर्तमान सांगितलें श्रीमंत पुण्याहून निघून सासवडचे मुक्कामीं गेले तेथून यशोदाबाई व नानाफडणीसाची बायको व उभयतांचीं कुटुंबें व प्रतिनिधी यास पुरदरीं ठेऊन, श्रीमंत मागती सासवडचे मुक्कामीं आले तेथें सखाराम घाडगे याणीं कांहीं लेख्यावर पाठविली तेथें गरीबगुर बांचे पांघुरणें वगैरे भांडे नेलीं तें वर्तमान श्रीमंतास कळलें त्यावरून घा डगे यास बोलाऊन आणलें सांगितलें कीं, हें काय ? घाडगे याचें ह्मणणें कीं, मला पुसून गेली नाहीं मग श्रीमंताचे ह्मणणें पडलें कीं, हा कांहीं पु ण्याचा मुक्काम नाहीं, सासवडचा मुक्काम आहे अशा त्याच्या कराल तर कामास येणार नाहीं तुमें समागमें यावयाचें काम नाहीं तेच क्षणीं घाडगे मार यास पुण्याकडे काढून दिलें होळकराचा मूल घाडगे याचे स्वाधीन करावा, म्हणोन घाडग्यास समागमें नेलें होतें शेवटीं मूलहि न देतां, या री तीनें काढून दिल्हा पुण्यांतील लोक तमाम बाहेर जात होते, हें वर्तमान श्रीमंतास कळलें त्यावरून बाळोजी कुंजर याकडे पुण्याबाहेर चवकीचें काम सांगितलें त्यावरून भोंवत्या चवक्या बसल्या आहेत पुण्यांतून माणूस चव कशीवेगळे बाहेर निघू देत नाहीं तमाम भाडेकरी यांच्या घरीं चवक्या व बसिल्या आहेत याप्रों वर्तमान आहे मोत्याजी गावडे याणीं तिरस्तळीपा सून ब्राह्मणांची बेआब करून पैका घेतला, हें वर्तमान शास्त्रीबावानीं श्रीमंता स समजावलें त्यावरून श्रीमंताचें ह्मणणें कीं, काय करूं, माझा कांहीं उपाय चालत नाहीं ज्या उद्देशें बाहेर निघालों, तें कार्य शास्त्यास सर्व दुःखांचे पार पत्य होईल प्रतिनिधीचे मुलकावर घाडगे यांची जसी होती तेव्हा श्रीमं तांनीं प्रतिनिधीस आज्ञा केली कीं, त्याची जसी ठठऊन तुह्मी आपला अमल बसवा ते जबरीस आले, तेव्हा प्रतिनिधीकडील जोर पोंहोंचला प्रतिनिधीचे शिपायीनें घाडगे याचे शेंदोनसें लोक मरून, नाक कान घेऊन पुण्या कडे रवाना केले बाळशास्त्रींचें कुटुंब व खबरदपीचे कुटुंब पुरदरास गेलें काशीराव होळकरास तीन लक्ष रुपये देऊन आज्ञा केली कीं, फौज ठेऊन सत्वर सासवडचे मुक्कामीं बोलाविलें आहे शिंद्याचें कुटुंब जामगांवास आलें गोपाळरायाचा मुक्काम पंधरा दिवस जामगांवींच आहे गावड्याचें लष्कर निंबरीपांच्यागांवकडे गेलें आपण गेलेत ते दिवशीं बरेंच निभाऊन गेलेत दुसरे दिवशीं भेंडाळ्याकडून तेरा स्वार आलें त्यांनीं दौलताबादकर याणीं इकडे येत होता, त्यांस भेंडाळे याचे+++बयल घाणी बांस हुटलें त्यास पाशीं दोनशें रुपये रोख होते व पांघुरणें व आणिकही लोकांचीं पांघुरणें घे ऊन नीट कळबीनें अंमळनेराकडे गेले शिवाजी पा याचे मळ्यापासून मागतीं आपले गांवाकडे आले ते सरकारचे मळ्यालगतून गंगेंत उतरले गंगेंत घाड्यास पाणी पाजून आस्तान पाणोयावर चढल्ले, तो मारवाडी बोंवलीत आणा

त्यावरून आह्मी पांच पन्नास माणसे घेऊन मागे गेलो. तों ते निघून गेले. पुढे प्रवरासगमापुढे चिंचा आहेत. तिकडून आपाभट गोखले व टोकेकर दोघे ब्राह्मण येत होते. त्यासहि लुटले. टोकेकराचे दोचारशाचें वित्त गेलें. आपाभटाचे पन्नासा रुपयाचे वित्त गेले. मग ते स्वार गोधेगावावरून सायंकाळीं जामगावीं आले. तेथें वाटसोर लुटले. त्याजपाशीं दोंहजाराचें वित्त होते. त्या प्रमाणे त्या तेरा स्वारानीं गर्दी केली. प्रस्तुत आंधारी रात्र आली आहे. भोवतालचे खेडे उज्याड आहेत. महारामागाच्या हाळ्या जमल्या आहेत. त्यास, गावात गस्त फिरली पाहिजे. तरुत महिना पधरा दिवस दोघे मुसलमान प्यादे ठेवावे. दिवसा वेशीजवळ राहून रात्रीं गस्त देत जातील. आपली आज्ञा होईल, त्याप्रमाणे करू. राजश्री बाळाजी यशवत काल गाडापुरास गेले. तूर्त लोकास कऊल देतात. मग पुढें मागती प्रथम दिवस आहेच. पेंढारी याची आवई उठली होती. परतु ते गलत वर्तमान. ते तूर्त लाब आह. लखामापूरची यात्रा तूर्त राहिली- श्रीनिवास गोसावी वारले. त्याची स्त्री सती गेली. वरकड वर्तमान सर्व यथास्थित असे. आपलेकडील सविस्तर वर्तमान लिहावयास आज्ञा जाहली पाहिजे. बहुत काय लिहिणे ? हे विनती.

---

पत्रांक ५१२ श्रीमार्तंडप्रसन्न. १७२२ मार्गशीर्ष वद्य १४

श्रीमत राजश्री नानाजी स्वामीचे सेवेसी:—

विद्यार्थी परसरामभट धर्माधिकारी सां नमस्कार विज्ञापना ता मार्गशीर्ष वद्य १४ पर्यंत आपले आसीर्वादें करून यथास्थित असे. विशेष. आपण आज्ञापत्र पाठविलें, त्याप्रमाणे जागलीचा बदोबस्त केला. दोन मुसलमान चाकरीस ठेविलें. त्याचा दरमहा दोघां मिळून ५॥ केला आहे. काल पुण्याहून राजश्री बाळशास्त्रीनीं हुजरे २ व पत्रे सरकारचे व काशीराव होळकर यांचे मोत्याजी काळगावडे यास पाठविली कीं, तिरस्थळीचे ब्राह्मणापासून बेआब करून रुपये घेतले तें माघारीं हुजरे याचे गुजारतीने देऊन क्षेत्रीचे ब्राह्मणाची पावती हुजूर पाठऊन देणें. ह्मणून बहुत पर्यायें करून लिहिले. ते हुजरे काल सायकाळीं टोक्यास आले. आज टोकेकरानीं समस्त ब्राह्मण देवळांत मेळऊन प्रवरासगमकरास व आपले गावास पत्र आपले नावें पाठविलें. त्यावरून आह्मी येथून मल्हारपतास पाठविलें होतें. तेथें समस्ताचे विचारें निश्चय ठरला कीं, तूर्त हुजरेच गावडे याकडे पाठवावे. आपले गांवचे [illegible] एक एक द्यावें. तेथें हुजरे पत्र देऊन, त्याचीं प्रत्योत्तरें [illegible] होतात, त्याप्रमाणे आपले माणसानीं येऊन सागावे त्यान [illegible] च्यार च्यार ब्राह्मणच जावेसे ठरलें. तर त्याप्रमाणें [illegible]वावे. तूर्त यास शास्त्रीबावानीं लिहिल्या अन्वयें [illegible]

माही रोजमरा रुा १४ याव व आपले माणसें जातील त्याबराबर हुजरे यांव व माणसास पोट सर्वांस रुा १६ एकूण तीस, टोंके १० प्रवरासगमे १० आपलें गांव १० याप्रमाणें निश्चय ठरला उदईक आमवास्या परवां प्रती पदेस रवाना होतील पत्राच्या नकला करून व शास्त्रीबावाचें पत्र ऐसें पाठ विले आहेत कागदी मजकूर बराच आहे आपली आज्ञा येईल त्याप्रों करू. आज पुण्याहून राजश्री राघोपंत गडबोले व आणीकही पन्नास साठ्या श्रीका श्रीचे यात्रेस जावयास आपले येथें मुकामांस आले राघोपंत तात्याचे वाड्यां स उतरले आहेत त्याचें ह्मणणें कीं, श्रीमंत कैलासवासी आनदीबाईच्या आस्ती आहेत त्या आम्हाबराबर देण्याविषयीं श्रीमंत बाजीराव साहेबांचे खासदस्तुरपत्र आपणास आहे त्यास, भेट जाली पाहिजे हा मजकूर सवि स्तर बाळाजी नाईकानीं लिहिला आहे त्यावरून ध्यानास येईल अलीकडे आपण गेल्या तागाईत कांहीं एक उपसर्ग नाहीं चोराच्या हिलाच्या वरचे वर विरस्थळीवर होतात परवाचे दिवशीं टोकेयास माणसें आलीं होतीं त्यांनीं टोक्यांतून वाटसारूचा घोडा येथें उतरला होता तो नेला वाटसरूचें ह्मणणें कीं, घोडा बनाजीशेट सोनईकर याचा आहे ऐसें बोलून तो उठून सोनईस गेला मग तो काय करतो न कळे ! काळ यशेश्वर बर्वेकर लोकसू पीचा नातु पुण्याहून आला त्यानें वर्तमान सांगितलें दौलतराव शिंदे कूच करून आवीलीस आले एक कपू अद्यापि पुण्यासच आहे गोपाळराव भाव गांवींच आहेत याप्रमाणें आजपर्यंत वर्तमान आहे पुढें होईल त्याप्रमाणें लिहून पाठऊं आपलेकडील आनदाचें वर्तमान लिहावयास आज्ञा करावी बहुत काय लिहिणें ! हे विज्ञापना

स्वामीचे सेवेसी मल्हार रामचंद्र कुळकर्णी चरणावर मस्तक ठेऊन थोर साष्टांग नमस्कार लिखितार्थ परिसोन लोभाची वृद्धि असावी हे विनंती

---

पत्रांक ५११

पो पौष शुद्ध ६ श्री १७२२ पौष शुद्ध १

श्रीमंत राजश्री नानाजी स्वामीचे सेवेसीः—

विद्यार्थी पराधारभट धर्माधिकारी कृतानेक सां नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता पौष शुद्ध ३ पावेतों यथास्थित असें विशेष श्रीमंताचें व काशी राव होळकराचें पत्र घेऊन हुजरे आले होते ते गावव्याचे छपकरात जाऊन स्वामीची भेट घेतली त्यांनीं बोलणें केलें त्यानें उत्तर केलें कीं, राऊत पाठ ऊन विरस्थळीचें ब्राह्मणांस आणून त्यांची खातरजमा करून कुशाच पाववी देतों तेव्हां हुजरे यांनीं उत्तर गावव्यासीं केलें कीं, तुह्मी राऊत पाठऊन आणविणार तेव्हां ब्राह्मण भडकतील, येणार नाहीं, आह्मीच जाऊन आणितों त्यावरून हुजरे येथें आले आहेत विरस्थळीचे ब्राह्मणांस चला ह्मणतास

त्याजवरून आह्मीं काल तीर्थस्वरूप श्रीमत रा तात्याकडे गेलो. त्यांजला हे वर्तमान विदित केले. त्यांनीं एकच उत्तर केलें कीं, आह्मांस या कामात कांहींच समजत नाहीं, तुह्मास जसे सुचेल तैसें करावे. त्याजवरून आपणास विनतीपत्र लिहिले जाते कीं, येविशींचे उत्तर काय ते ल्याहावें. त्याप्रों वर्तणूक केली जाईल. दुसरें तीर्थस्वरूपजीचे व नकारपूर्वकाचे आज दोन दिवस खलबत होत आहे. खळ्याची चौकशी नकारपूर्वका......कुल समजाविली. मग मल्हारपत कुळकर्णी याजला बोलाऊन विच्यारले कीं, खळ्याचा हिशेब समजावणे. त्याजवरून मल्ल्र आह्मापाशी आला. आह्मीं त्याजला सागितले कीं, तुह्मीं जाऊन सागा कीं, पत्रके श्रीमत नानासाहेबापाशीं आहेत. याप्रो मल्लूस सागितलें. त्याने जाऊन याप्रो विनति केली. परतु रावजीपतानीं कच्चे खर्डे समजाविले, ह्मणून मल्लूने सागितले. त्याने नकारपूर्वक व कुळकर्णीमंडळी कुल तीर्थस्वरूप याचे ममतेने आहेत. सर्व भट का......

---

पत्राक ५१४

पो पौष शुद्ध १४ सोमवार जाबसूद. श्री. १७२२ पौष शुद्ध १४

श्रीमत राजश्री नानाजी स्वामींचे सेवेशीः—

विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी सां नमस्कार विनती विज्ञापना. येथील क्षेम ता पौष शुद्ध १४ पावेतो आपले कृपेंकरून सर्व यथास्थित असों. विशेष. आपण मसाल्याकरिता जिनस आणविली. त्यास, एथें काहाराकडून +++ सोय पडेना, ह्मणोन दोन रुपयाची विकत वजन १८ आठरा शेर घेऊन पाठविले आहेत. पावतील. सरकारचे हुजरे व पत्रे गावडे यांणीं तिरस्तळीपासून खंड घेतला तो माघारे देण्याविषईं आले होते. तो मा पेशजीं पत्रीं आपणास लिहिलाच होता. त्यावर टोंकेश्वर व प्रवरासगमकर यांणीं विचार केला कीं, पाच पाच ब्राह्मण पाठवावे. ह्यावरून जयरामपत वगैरे टोकेकर ४ व प्रवरासगमकर नत्थोबा चाडाळ वगैरे ६ व आपले येथून चिरजीव गणोबा व मल्हारपत कुळकर्णी पाठविले होते. त्यास गोधवणी मुक्कामीं गावडे याची भेट जाली. तिहीं क्षेत्राचे यादी लिहून घेतल्या. उपरात ब्राह्मणास मनस्वी शिव्या देऊन उत्तर केले कीं, तुह्मी देवाचे डागिने का मोडले, त्यास ते डागिने द्या, तेव्हा तुमची सुटका होईल. हुजरे मुडदार ! याच्याने काहीं एक जरबेची गोष्ट बोलवेना ! असो ! मग जैरामपतानीं करार केला कीं, इतकी पट्टी केली तैसी आताही गावात जाऊन पट्टी करून देवाचे डागिने करून देऊ. गावडे याचें ह्मणणे कीं, श्रीमतास लिहून पाठवा कीं, आह्मी डागिने करून देतो, याप्रमाणे लिहून द्या. मग जैरामपतानी करार केला कीं, येथें लिहिले कशास पाहिजे, आह्मी टोकियाहूनच लिहून पाठऊ. ऐसे करार केला. तेव्हा सुटका झाली. मग रुपयाचा जाबसाल कळतच आहे ! उगेच काहीं

विशेष राहिले होते, ते आणीकही दाहा बारा रुा खर्च जाला आणि खराब जाले याप्रमाणे जालें मल्हारपंतास हिशेब घेऊन पौष वद्य १ प्रतिपदेस पाठऊन देतों बहुत काय लिहिणें? हे विनती आज्ञा येईल तर एक दिवस आह्मीही येऊं देव दर्शनही होईल व आपलीही भेट होईल व एक दिवस राहून मागती येऊ हे विनती अवेसी विनती सेवक मल्हार रामचंद्र कुळकर्णी सां नमस्कार हिशेब घेऊन प्रतिपदेस येतों हे विनती

---

पत्रांक ५१५ श्री १७२२ पौष वद्य १०

विद्यार्थी गोपाळभट दामले कृतानेक सा नमस्कार विनंति विज्ञापना ता पौष वद्य १० पो यथास्थित असो विशेष कृपा करून रा अप्पाजीपंताबरा बर रुा ५० पन्नास पाठविले ते पावले आपण जिनस दिला तो गावखीवर घाऊन शनवारी संध्याकाळ पो येऊन पोहचेल गावच्याचें वर्तमान ऐकिल्यांत आलें कीं, शिवाजी यशवंत यांणीं गावढा लुटून घेतला तेथून मुजरत जळकेकर पाटील आला त्याने वर्तमान सांगितलें, तें हां खरेंच आहे पंचवीस स्वारानशीं पळून गेला धरकच सर्व सलतनत लुटून घेतली राजश्री दवळराव शिंदे याचा मुहूर्त माघ शुा ५ चा आहे तेथून वेदशास्त्रसंपन्न परशराम भट टोंके आले त्यांनीं वर्तमान सांगितलें, सध्या नगरास गेले, तेथून चांभार गोंदास जाणार, तेथून आलियावर आमगांवींहून कूच करून भामावास येणार. कळावें परंतु सदरी फौजेनशीं टोंक्यास व परशरामभट टोंके यांचे घरीं येणार, हें खचित वर्तमान आहे धरकच सारी फऊज तोफखाना वगैरे धाभुळगांवचे मार्गे जाणार याप्रों वर्तमान आहे बयाची निरमळ्याचे गावखीवर खोळगट सवा पाठविला त्याचे पावलियाचे उत्तर आलें नाहीं ते त्याहावें बहुत काय लिहिणें? हे विज्ञापना सेवक अंताजी गोंधदेव सां नमस्कार

---

पत्रांक ५१६ श्री १७२२ पौष वद्य ११

*राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री माजीपंत स्वामींचे सेवेसी —*

पोष्य गंगाधर गणेश साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता *पौष वा ११ पावेतों यथास्थित जाणून स्वकीयें लिहीत जावें विशेष तुह्मी* वीा दाखाची रवानगी केली ते येथें सुखरूप पावले आह्मी यावे सवब *माणसें गावली ठेविली* कालपासून इकडे पेंढारी, *निा शिंदे,* याची भायई दाट उठली भागानगराकडे जाणार दहापांच कोशीं स्वार पेंढारी आदळसे, अधी आवई दाट बोलतात सबब राहिलों तुरर्तीद काम जरूरीचे, यामुळे गुंता जाहला गावली माणसें उगीच ठेवावी, तर तुह्मी रागें भराल, जाणून माघारी पाठविली आहे अमावास्या झाल्यावर येथूनच माणसें घेऊन येतों तुह्मी मार्ग लक्ष नये आजच निघणार होतों परंतु दोघा चापांनी मोडे घातले

व दुसरें काम जरूरीचें प्राप्त जालें. सबब राहिलों. तुह्मीं रागे भरू नये. वोढी-मुळे कांहीं सुचत नाही. तुह्मापाशीं येऊन येथें लठीकवाद कोठवर घ्यावा. तुह्मास सर्व ठावकेच आहे. तुह्मी तेथे घाबरू नये. पेढारी आपले तिकडे येत नाहींत. वरकड मार, यजमान तेथे आले आहेत. फार मर्जी सरक्षावी. राजश्री बाळाजीराव व काशीनाथराव मराठे याचाही समाचार घ्यावा. त्याची मर्जी खुष ठेवावी. तुह्मास येथून सरजाम दाळ तुरीची वजन ८।३।, हरभऱ्याची ८८१ दीडपाव, सालमिश्री ८८८९, १ व दादानी दिला ३।, रोख, बापूबरोबर पाठविले आहेत रु. वीस हे घ्यावे. उत्तर पाठवावे. पौषआकार जाला. तुह्मास कळावे. महारास मगळवारचे पाहोस दिल्हे आहे. बहुत काय लिहिणे ? हे विनति. पुण्याहून राजश्री पताची स्वारी येणार, असें वर्तमान तुमचें तेथें आहे, ह्मणून दादा सागत होते. यजमानस्वामींचे पत्र नाहीं. तिकडे आणखी काय वर्तमान असेल ते लिहून पाठवावें. हे विनति.

---

पत्राक ५१७ श्री. १७२२ माघ शुद्ध ११

श्रीमत राजश्री नानाजी स्वामींचे सेवेसी:—

विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी सा। नमस्कार विनती विज्ञापना येथील कुशल जाणून ता। माघ शुद्ध ११ पर्यंत यथास्थित असे. विशेष. परवा जिवता दळयाबरोबर पत्र पाठविलें तें पावलें. पुण्याचे पत्र पाठविलें ते तिळाच्या पिशव्या नव, मल्हारपत कुळकर्णी याचे माणूस पुण्यास गेले, त्याबराबर पाठविली. कळावे. रा। दवलतराव शिंदे निबदेहरे येथे आला, ह्मणोन वर्तमान आहे. खचित आला. पुढें पुण्यस्तभाची आवई आहे. बाहेर अफवा ऐकतों कीं, खटला राहोरीचे मुक्कामीहून पुणताब्याकडे रवाना करून, सडा तिरस्तळीकडे येणार. ऐसें लोक बोलतात. वरकड सर्व मजकूर यथास्थित आहे. देवीचद वाणी आपणाकडे आला आहे. राजश्री व्यकटरावजी गाडापुरकर आपले गावीं बावनपागेचे गर्दीपासून आहेत. ते मुलींचें लग्न येथें करितात. त्यास राजश्री शिवरामपत तात्याचा वाडा च्यार दिवस लग्न करावयास जागा प्रशस्त आहे. याकरता त्याची परवाननी पाठऊन द्यावी. आ + + नारोपतास सागून त्याची चिठ्ठी पाठऊन द्यावी. वरकड नवल विशेप जालियास लिहून पाठऊ. बहुत काय लिहिणें ? हे विज्ञाप्ती.

महाराजाचे सेवेसी मल्हार रामचद्र कुळकर्णी सा। नमस्कार. लिखितार्थ परिसोन लोभाची वृद्धी असावी. हे विज्ञाप्ती.

राजश्री विनायकबापूस सा। नमस्कार.

---

पत्रांक ५१८ श्री. १७२२ माघ वद्य १

श्रीमत राजश्री नानाजी स्वामींचे सेवेसी:—

विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी सा। नमस्कार विनंती विज्ञापना येथील क्षेम ता। माघ वद्य १ पावेतों आपले कृपेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष काल पत्र आपलें आलें लिहिल्याप्रों येथील रा। ब्रह्मभटजीपासून घेऊन, देवीचंद मारवाडी यास देऊन, त्याची पावती घेतली रा। दौलतराव शिंदे येथठाणींहून कूच करून, आज कासारवाडीचे मुक्कामास गेले याप्रों वर्तमान आहे यो रा। परशरामनाना टोंके मवरासगमकर यास शिंदे यांचें पत्र आलें होतें त्यावरून ते लष्करात गेले चिरंजीव गणोबाही आज शिंद्याचे लष्करात रा। मनोहरपंतआपाचे कामानिमित्य गेला आहे एका दो रोजां तो आला म्हणजे सविस्तर वर्तमान कळेल त्याप्रों लिहून पाठऊं आज वर्तमान ऐकिलें कीं, किल्ले नगर शिंद्यानीं सरकारांत भीमराव विस्के कामकाज कि त्यापें सरकारातून रा। यशवंतराव सुभेदार यांकडे सांगितलें, म्हणोन आज तिसरे प्रहरापासून यवता आहे मोहन तेली गांवांतून गेला म्हणोन आपणास कळलें त्यावरून आपण लिहिलें त्यास, त्याचा बाप धामोरीहून आला त्याकरता तो बापास घेऊन देवदर्शनास खेरिचवे यास गेला होता तो काल गावास आला कळावें दुर्गापेट्या १ व टाहाळ रुपये २ पाठविले आहेत पावतील बहुत काय लिहिणें ! हे विज्ञापी

सेवेसी मल्हार रामचंद्र कुळकर्णी सां नमस्कार लिखितार्थ परिसान लो भाची वृद्धि असावी हे विज्ञापी

रा रा विनायक बापूस उभयताचा नमस्कार पांघुरणें व नभार पाठविली ते पावली हे विनती

---

पत्रांक ५१९ श्री १७२२ माघ वद्य ४

श्रीमंत राजश्री नानाजी दीक्षित यां प्रति —

परशामभट धर्माधिकारी सां नमस्कार विनंति उपरी येथील क्षेम ता। माघ वा। ४ इंदुवासर जाणून स्वरूप असो विशेष श्रीमंत राजश्री बापू योंची लग्नाकरितां मूळचिठी आली कीं, अगत्य अगत्य यावें असें लिा आहे यो रा। परशाम नाना शिंद्याच्या लष्करांत गेले होते, ते गांवास आले भेटीह निवळहि झाली नाहीं। आम्हीसहि दाहावीस ब्राह्मण गेले होते त्यांस दक्षणा विठ्ठलपंत बापूनीं देऊन वाटे लाविलें असामीस दोन रुपये देऊन वाटे लाविलें परशामभटासहि तोपमास रा। मिळाले रा। मल्हारराव होळकर सुभेदार यांचा पुत्र समागमेंच आहे गोट, निशाण, वेगळाच चालत असतो लष्कर दर कुच गेलें यन्हाणपुरापावेतों मुक्काम होत नाहीं ++++ श्रीमंत पुणियास आले पडल्यांचे वाड्यांत आहेत सरकार बाड्यांत अद्यापि गल नाहींत लष्कर गारपिरावर आहे पुन्हां लष्करांत येणार ऐसी वदंता आहे बाहेर स्वारी निघणार ऐसें ऐकिलियांत आलें, + ++ हे विनंति,

पत्रांक ५२० श्री. १७२२ माघ वद्य १०

श्रीमत राजश्री नानाजी स्वामीचे सेवेसी:—

विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी सा। नमस्कार विनंती विज्ञापना ता। माघ कृष्ण १० पो आपले कृपेकरून यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान बाळोजी कुजर याचा बधू पागे मौजे निवरी पाचेगांवचे मुक्कामीं आहे. पुढें गगातीरास अ.ठ पधरादिवस कालक्षेप करणार. सिवारची कही करितो. राजश्री शिवराम जोगीबाबा पुण्याहून काल शनवारीं प्रात:काळींच टोंकेयास दाखल जाले. त्यानीं पुण्याचे वर्तमान सागितलें व चिरंजीव आणानीं मौजे शेवल्यास कारकून पाठविला. त्यानीं सागितले कीं, श्रीमत शिवरात्रीस भिमाशकरीं जाणार. तेथे श्रीमत अमृतराव साहेबही येणार. उभयताचे भेटी होणार. आणानीं लिहिलें कीं, अमृतराव थत्ते याचा हिशेब व पत्रें पो ते पावले. त्यावरून त्यास तगादा केला. त्याचे ह्मणणे कीं तूर्त ऐवज नाहीं. त्यास, आह्मी पुढेंही उद्योग करीतच आहोंत. या प्रमाणें लिहिलें. लग्नासही येत होतों, परतु कुजराचे पागेचे गडबडीकरिता राहिलो. वरकड वर्तमान सर्व यथास्थित असे. सरकारचाकरीस सावध आहोंत. कामामुळें कितकिास सतोषअसतोष आहे. आमचे लक्ष स्वामींचे पायाशीं, अतर तिळभर नाहीं, येविशीं खातरजमा आहे. आह्मीही एखादी गोष्ट करू ती खातरजमेचीच करू. आह्मास पुण्यास चिंरजीव आपानीं बोलावले. परवा चिरजीव यशोबाची रवानगी केली. तेव्हाच बेत होता. परतु आपली आज्ञा घेतली नाहीं ह्मणोन राहिलों. आता शिवरात्र जाल्यावर जावें लागतें. आपली भेट जालि. यावर जाऊ. राणूजी हवालदार समक्ष आला आहे. यास रानचे रखवालीविषई ताकीद करावी. महारपोर परवानगीशिवाय आणू न पावे. आमचा दाब ठेविल्यास सरकारचाही दाब रहातो. बहुत काय लिहिणें हे विनती.

शेवेसी मल्हार रामचद्र कुलकर्णी सा। नमस्कार. लिखितार्थ परिसोन लोभाची वृद्धी असावी. आह्मास सर्व आधार आपले पायाचा आहे. लिहावें असा अर्थ नाहीं. सर्व प्रकार माझे चालवणें साहेबास आहे. हे विज्ञाप्ती.

---

पत्राक ५२१

मसुदा. श्री. १७२२ फाल्गुन शुद्ध.

श्रीमत राजश्री पतप्रधान यासी:—

प्रती लक्ष्मीनारायण दीक्षित कृतानेक आशीर्वाद येथील क्षेम ता। फालगुन शुद्ध + पावेतों मुकाम औरगाबाद येथें आपले कृपेंकरून कुशलरूप असों. विशेष. राजश्री जिवाजी यशवंत बावनपागे फौज सुद्धा कायगावीं शुद्ध ३ रविवारी येऊन राहिले. त्याचे मागें पेंढार एक हजार दुसरे दिवशीं आलें. त्यांची व याची लढाई जाली. पेंढार चारपाचशें जखमी व दोनशें ठार

पावनपागे पांणीं केले पैन्ताराम तीन कोश हटनिलें मागाहून कपू पलटणें व तोफा घेऊन आला त्यानें तोफा सुरू केल्यावर, शिवाजी यशवंत फौजसुद्धा गंगापार उतरून गेले नतर कपू व पेंढार कायगावावर मुकाम करून, पेंढा त्यानें गांवाव लूट केली ब्राह्मण आदिकरून सर्वत्रांस वस्त्राहरण जालें ! श्री कृपेंकरून यायकाची आवरू व श्री रामचंद्र दीक्षित याचा व आमचा वाडा ऐसे दोन वाडे मात्र निरोपद्रव राहिले वरकड कायगावावच पेंढा त्यांनीं उपद्रव केला हा ईश्वरीक्षोम! असो ! सर्व गेल्याची क्षीत नाहीं आपले प्रतापेंकरून मागती सर्वत्रांस प्राप्त होईल वर्तमान श्रुत असावें ह्मणोन लि हिलें आहे विशेष काय ल्याहावें ! लोभ असों द्यावे

---

कोल्हापूर

पत्रांक ५२२ श्री १७२२

राजश्री येसाजीपंतआपा स्वामी गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य सेवेसी शिदोजी जगथाप मुकाम कर वीर सां दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेख नास आज्ञा करावी विशेष आह्माकडील वर्तमान तर मातुश्री याईसाहेबां च्या व कागलकरांचा बिघाड जाहला पौष शुद्ध अष्टमीस आह्माकडील फौज तयार होऊन कागलावर गेली होती तों कागलकरहि जमावसुद्धा बाहेर पडले मग त्याची आमची दृष्टादृष्ट जाहले, परंतु काहीं युद्ध जाहले नाहीं च्यार घटका उभें राहून फिरून कागलास गेले त्यांचा जमाव दोनशें स्वार व च्यारशें प्यादे असें आहे वडिलास कळावें, ह्मणोन लिहिलें आहे दुसरें वर्तमान, वरी शुा ८ अष्टमीस कागलकरांनीं बाईसाहेबांचा मामा ! गुरूं मारून नेले दोनशें गुरें व मेंढरें पांचशें असें नेलें गावांतील माणसें जखमी पांचसात व ठार एक पडला कागलकराकडीलहि थोडे बहुत जाहले आमचे प्यादे रुईस तीसपसतीस पाठऊन दिले आहेत रुईची फार आवाई आहे आपलें पत्र आल्यावर राजश्री भगवंतरावासहि हटकिलें त्यास, त्यांणीं उत्तर दिलें कीं रा शिवाजीपंतआपा आले ह्मणजे काय तें सांगू वडिलीं लिहिलें होतें कीं, फौजेस खाऊन राहावयाचें प्रयोजन नाहीं त्यास, त्यांणींहि थोडें बहुत पोटास दिलें आपण सुप्याकडील वाडे लिा त्यास, तिकडील शाह मातबर असला तर, तसेंच लिहून पाठवणें, ह्मणजे आह्मीं निकाल काहा डून येऊ नाहींतर, चार दिवस तह ह्मणोन जरूर राहूं बहुतकरून आण्णा आले ह्मणजे तेहि निरोप देतील बहुत काय लिहिणें ! हे विनंति

सेवेसीं बाळाजी गंगाधर सां नमस्कार. लिा प्रविष्ट वडिलीं आशीर्वाद- पत्र पाठऊन परामर्ष केला पाहिजे हे विनंति

---

पत्रांक ५२३ श्री. १७२३ चैत्र शुद्ध ३

वेदशास्त्रसपन्न राजमान्य राजश्री लक्ष्मीनारायण दिक्षीत स्वामीचे सेवेसी:—

विद्यार्थी यशवतराव महादेव सा नमस्कार विनति येथलि कुशल ता चैत्र शुद्ध ३ जाणुन स्वकीय कुशल लिहित असिले पाहीजे. विशेष. तुह्मीं पत्र पाठविले ते पावले. रा जिवाजी यशवत याचे व कपूचे दग्यातून कायगावकर याची तसनस बहुत जाली, ह्मणोन विस्तारे मजकूर लिहिला, तो सविस्तर कळला. ऐशास, ईश्वरी क्षोभ ! त्या गोष्टीस मनुष्याचा उपाय राहिला आहे, असा अर्थ नाहीं. साराश, दग्यापूर्वी निघोन सातान्यास जाऊन राहिला ही गोष्ट फार उत्तम केली. कायगावकर ब्राह्मणाविशीं श्रीमत राजश्री दादास सागावें. साहित्य होईल तेथवर करावे, ह्मणोन लिहिले. त्यास, साप्रतचे दिवस सर्वास काळजिचेच आहेत. त्यात ही सवड पाहून सूचना करितों. चिरजीव नारायणराव याचें लग्नकार्य फाल्गुन वा अष्टमीस उरकून घेतले. आपणास कळावे. बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे. हे विनती.

---

पत्राक ५२४ श्री १७२३ चैत्र वद्य ५

श्रीमत राजश्री नानाजी स्वामींचे सेवेसी:—

विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी सा नमस्कार विनती विज्ञापना. येथील क्षेम ता चैत्र वद्य ५ भृगुवारपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण गेलियावर काल गुरुवारीं पेढारी कपूची गडबड बहुत जाली. राहोरीचे मुक्कामीं बुधवारीं होते. गुरुवारीं कूच करून खडाळ्यास, नजीक पुणताबे, येथें मुकामास गेला. कोन्ही ह्मणू लागले कीं, आपलें गावावरून येतो ह्मणून तिन्ही गाव बहुत घाबरले ! श्रीमत तीर्थरूप त्यानीं मातोश्री माईस व आपा वगैरे मडळीस गाणगापुरीं वाटेस लाविले होतें. पाठऊ नका ह्मटले. परतु त्याचें धैर्य पुरेना, म्हणोन वाटे लाविले. मग सायकाळी माघारी आणिले. वाणी याचे हिशेब एकदो रोजा तयार करून पाठऊन देतो. तूर्त बेलदारास खर्चाची फार अडचण आहे. या करता तूर्त बाळा गुरवाबरोबर अगत्य दहा रुपये तरी पाठवावे. अनमान न करावा. आपले वाड्याचा कडबा एकादो रोजात वसूल करतों. तात्याकडील त्याजकडे पोहचवितो. सातान्याचा सातान्यास पाठऊं. कळावे. बावनपागे यासी व जरीपटके ५ पानसे वगैरेसी लढाई जाली. बावनपागेचा मोड होऊन, तमाम बुणगें लुटलें. बावनपागे सडी फौज पाच सात हजारानसी निघून गेला. याप्रों वर्तमान जालें. बहुत काय लिहिणें ? हे विज्ञप्ती.

स्वामींचे सेवेसी मल्हार रामचद्र कुळकर्णी सा नमस्कार लिखितार्थ परिसोन लोभ करावा. वाणीयाचे हिशेब व तगटाची वाटणी तयार करून पाठवितो. हे विज्ञाप्ती.

---

पत्रांक ५२५ श्री १७२३ वैशाख शुद्ध १०

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री नाना दीक्षित स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थी गोविंद भिकाजी गडबोले कृतानेक सां नमस्कार विनंती येथील कुशल ता वैशाख शुद्ध १० पर्यंत आपले कृपेकरून मुक्काम कसबे पुणे येथें सुखरूप असों विशेष आम्ही पैठणाहून सडे होऊन निघलों तो चैत्र वद्य एकादशी गुरुवासरीं सुरक्षित पावलों मार्गी पेंढारी वगैरे यांचे दंगे पूर्वी होते, ते निवारण जाहले इतक्याकरितां मार्गाची निभावणी निर्वेध जाहली पानशे व पुरंधरे फौजेसहीत वाळकीच्या समोर होते त्यांचा उपद्रव काहींचा मात्र वरकड किमपि नाहीं +++ आता दिवसेंदिवस सुचिता दहीस पडत चालली आहे पेंढार वगैरे खानदेश प्रांतीं गेलें आता सरकारची मात्र फौज पारने राजवळ आहे +++ विठोजी होळकर, येशवंतराव होळकर यांचा बंधू, हजार दोन हजारानिशीं निराळा फुटून, मुल्खांत दगा बहुत केला गांवचे गांव उध्वास पाडिले परंतु हल्लीं धोंडोपंत गोखले यांचे चिरंजीवांनीं कैद करून पुण्यास पाठविला त्यास मार देऊन हत्तीचे पायांशीं वैशाख शुद्ध चतु र्थीस बांधोन मारिला वरकड मजकूर यथास्थित आहे श्रीमंत राजश्री बाबा साहेब यांची स्वारी लौकरच अनरथानीं निभावयाचा बेत आहे च्यातुर्मास यास तिकडेस होईल, असा बेत आहे सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक ५२६ श्री १७२३ अधिक ज्येष्ठ वद्य १२

सेवेसीं विनंति सेवक सदाशीव आपाजी चरणीं मस्तक ठेऊन शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना ता अधिक वद्य द्वादशी मु॥ अटें स्वामीचे कृपेक रून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष अधिक पौर्णिमेचें पत्र स्वामी स लिहिलें आहे तें पावलेंच असेल येथील मार तर मिरखां याचा भाचा समशेरखां व शामहमदखां पठाण यांणीं अका हजार स्वो लढणी घेऊन आणि माहालापासून गांव गांव लढणी करून पवरा धीसपर्यंत ऐवज नेला देवी पुन्याचे जवळ जाऊन काम करून गांव जाळून टाकला लढणी वगद माहा लची ठरली होती, तिचा ऐवज पाठविला शिवाय आणखीं ठेऊन घेतला असता नेल्या आहेत, सोडू देत नाहींत माहालची खरावी बहुत केली लावणीचे दिवस एक एक या गांवचे निसुक बैल एक राहिला नाहीं दाणा वेगळे गेले रयतेची या वेळेस बहुत खरावी झाली खातरजमा करीत आहेत काय लावणी होईल ती खरी पेंढारी यांचे स्वार त्याचे फौजेंतूनच काहीं माहालात रखवालीस चालीस आणिली आहेत पेंढारी यांचे फौजेचा जमाव बहुत जाला आहे मीरखान यांणीं व होळकराची पत्रें त्यास आणिलीं परंतु खातरेस पत्रें टेविनात व धूम मनस्वी करूं लागले याजकरितां त्यांसी बोलावयाकरितां येथून मीरजीस रो बापूजी गोविंद कमाविसदारांनीं पाठविले

होते. त्यास काहीं ऐवज यावा असे ठरऊन स्वार च्याळीस माहालात रवाना केले आहेत. ऐवज ठरला तो आपणासीं समजला नाहीं. किती ठरला असेल तो लिहून पाठवीन. सुश्यालपुरचे वर्तमान रा बाबूराव बावानी लिहिलें आहे. सविस्तर कळेल. जमशेरखा पठाण याची फौज शिकारपुर परगण्यात गेली. त्या वेळेस येथून पागे, गावशिबंदी, सवार कसब्याकडे पाठविलीं. पाचच्यार दिवस तेथें सरजाम राहिला. पुढे फौज निघून देगीपुन्याकडून गेली. शेवेसीं विनती. सेवक सदाशिवचरणीं मस्तक ठेऊन शिरसा नमस्कार विज्ञापना. शिबंदीची रवानगी अष्टग्राम तेथून माघारी केली. पागा दोतीन दिवस राहिली. तेव्हाच ही रा रामराव आपाजी देईनात. हाणो लागले.*

---

पत्रांक ५२७ श्री. नकल. १७२३ ज्येष्ठ शुद्ध ३

वेदमूर्ती राजमान्य राजश्री परशरामभट नाना व समस्त ब्राह्मण क्षेत्र प्रवरासंगम स्वामींचे सेवेसीं:—

सेवक त्र्यंबकभट सभारंजक मु॥ वेजापुर सा॥ नमस्कार विनती उपरी येथील कुशल ता॥ जेष्ठ शुद्ध ३ दोनप्रहरपावेतों मुकाम मजकुरीं सर्व मंडळी कुशलरूप असों. विशेष. आपणापासून स्वार जाले ते मु॥ मारीं दोनप्रहरीं पावलों. याननर लष्करचें वर्तमान तरी फत्तेसिंग माने याची फौज आठ हजार आपरखुल येथें आहे. मोंगलाईत काहीं उपद्रव नाहीं. शिंदे याची टाणीं उठोन आपले टाणें वसवितात. वेरुळाकडे दोनतीन हजार फौज टाणे वसवावयासीं गेली आहे. तिचा शोध करून बनलें तर वेरुळाकडे होऊ. इकडील फौज तूर्त काही आपल्याकडे येत नाहीं. वेरुळाकडील बातमी राखीत जावी धामधूम विशेष काहीं दिसत नाहीं. एखादें पत्र जोख्यास पाठवावे. तिकडोन बंदोबस्त जाल्यास उपयोगी पडेल. आपल्याकडील सविस्तर वर्तमान ता॥ लि॥ पाठवणे. स्वस्थ असावे. कळावें. बहुत काय लि॥? कृपा लोभाची वृधी करीत जावी. हे विनती.

ता॥ हेंच वर्तमान टोंक्यास कायगावीं पावते करणे.

---

पत्रांक ५२८ श्री. १७२३ आषाढ शुद्ध १

श्रीमत राजश्री नानाजी स्वामींचे शेवेसीः—

विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी सा॥ नमस्कार विनती विज्ञापना येथील कुशल ता॥ आषाढ शुद्ध १ परियेंत आपले आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. रा॥ सरजेराव घाटगे जामगावास आले. हे दृष्टीनें माणसे पाहून आलें. बहुतकरून इकडूनच जावयाचा बोलवा आहे. काल प्रवरासंगमकराचे पत्र आले कीं, आमचे येथील च्यार ब्राह्मण जामगांव पावेतों जा-

---

* पुढील बंद गहाळ.

सात, बुसाकडील कोणी पाठवा त्यावरून दोघां चवघांस विच्यारलें परंतु कोणी जावयास सिद्ध होईना मग चिरंजीव गणोबा आज पाठविले ते आज प्रवरासंगमींच राहिले उदईक तिरस्थळीं मिळून दाहापांच ब्राह्मण जाणार वो घाशिरामपंत रा शाळीग्रामवाडी पुण्याहून उदईक जाणार याप्रमाणें वर्तमान आहे सरजेरायाची आवई इकडून जावयाची फार आहे पाटेनें मोठी धूम करतो ! कदाचित् इकडून आला तर च्यार रुपये खर्चवेंच पडला, तर कैथी समधीन करावी ! येथील विचारें तर सर्व ध्यानातच आहे त्यास, जैसी आज्ञा येईल तैसी वर्तणूक केली जाईल श्रीमंत अमृतराव साहेबही सासळपाथलेया वर पुणतांब्याचे सुमारें आले आहेत इकडे सुभानखांही सेवगावचे ल ( ग ) त्यास आहेत याप्रमाणें वर्तमान आहे पुढें होईल तें लिहून पाठऊ दुसरे पुण्या कडून जरीपटका वगैरे पांचच्यार हजार फौज गारदीं्डची नदी उतरून यांचे मार्गे आले श्रीमंत मोहोरीजनर्शी बाहेर निघाले ! डेरा गारपिराबर दिल्हे पुढें विशेष वर्तमान आढळल्यास मुजरत लिहून पाठऊ हे विज्ञप्ती

---

पत्रांक ५२९ श्री १७२३ आषाढ शुद्ध २

श्रीमंत रामभी नानाजी वडिलांचे सेवेसी —

अपत्यें विनायकाचा सां नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता आषाढ शुद्ध २ पो वडिलांचे आशीर्वादें यथास्थित असे विशेष येथें सर्जेराय यांचे दंग्यामुळें लोक भयाभीत * झाले आहेत आपले पुण्यानें ईश्वर काय पार पाडील तें खरें ! बहुत काय लिहिणें ! लोभ करावा हे विज्ञापना

---

पत्रांक ५३० श्री १७२३ आषाढ शुद्ध ४

विद्यार्थी गोपाळभट दामले सा नमस्कार विज्ञापना ता आषाढ शुद्ध ४ मंगळवार पावेतों क्षेम असों विशेष पत्र पाठविलें तें पावलें सरजेराव महा दुष्ट ! कायगावचे मार्गे आल्यास विश्वास नाहीं ! या अर्थी सातारियाहून भा डीं वगर आलीं तीं व कायगांवची भोडीं रा करावीं व एक मसल मार्गच आहे तों पुरें रवाना करावी, म्हणोन लिहिलें ऐसियास, सरजेराव कास पावेतों जामगांवींच होता नेवासें वगैरे महालची चुकोती सोनईस पाणाजी शेट्ये यानकडे ठरावयाची सांगितली त्याजवरून नेवासें वगैरे माहालची खंडणी पंचवीस हजार को ठरले ऐसें परस्परें वदंतेनें ऐकलें गांडापुरीहून बाळाजी वेशवंत याचे कनिष्ट चिरंजीव गेले आहेत तिरस्थळीचें पोरणें त्यास सोईचें पडेल याप्रों पत्र सोनईहून काणी गृहस्थानें प्रवरासंगमीं

---

* येथें झा आहे, जा नाहीं झालें—ला—ली अशी अक्षरघटिका १७२३ पासून पुढें दहीस पडते, तत्पूर्वी प्राय आले—ली—ला अशी अक्षरघटिका असे

पाठविलें. त्यावरून टोकेकर व प्रवरासंगमकर व आपले येथील गणोबा धर्माधिकारी सिदू गाईकवाड सोनईस गेले आहेत. तेथील बातमी आज सायकाळपावेतो येईल. त्यावरून कूचमुकामाचे वर्तमानहि समजेल. कोणत्या मार्गे जावयाचा रोख, हेंहि समजेल. त्याअन्वये आज्ञेनुरूप वर्तणूक करावयासी येईल. बहुधा नेवासे व गाडापूर या माहालाची चुकोती जाली, त्या अर्थी आपलाले माहाल चुकऊन बेलापुराहून मार्ग निघाल्यास काढतील, असे भासतें. याऊपरे न कळे. + + + हे विज्ञापना.

---

पत्रांक ५३१ श्री. १७२३ आषाढ शुद्ध ७

श्रीमत राजश्री नानाजी स्वामीचे सेवेसीः—

विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी सा॥ नमस्कार ता॥ आषाढ शुद्ध ७ भृगुवार प्रहरदिवसपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष. काल आपणाकडे पत्र पाठविलें. त्यावर दोप्रहरा रा॥ सरजेराव घाडगे याची स्वारी प्रवरासगमीं दाखल जाली. अगोदर कपू पुढें आला. त्याची कही प्रवरासगमात गेली. त्यानीं लाकूडफाटा वगैरे फार गर्दी केली. पाचच्यार घरे झोबाडले. दोचव घरचीं पाघरुणें, भाडीं, वस्तभाव वरचेवर हातीं लागले ते नेली. त्यावर खासा स्वारी आलियावर, चाळीस तुरुक स्वार रखवालीस देऊन, कही मारून काहाडली. नतर वो॥ रा॥ बाळभट आपाचे भेटीस गेले. भेट घेऊन हात जोडून उभा राहिला कीं, तुमची आज्ञा होईल तर बसेन. मग आपा बसा ह्मणाले, तेव्हा बसला. भोजन आपाचे घरींच जाले. त्यावर आपानीं सागितलें कीं, कालेगावास गगा उतरावयास जावे. नावाहि दोनच्यार तिकडेच आहेत. तेव्हा, त्यानें कबूल तर केले. व लखमापूर, वरखेडे, कायगाव टोंके, प्रवरासगमास पाचागावास काडीमात्र उपसर्ग न करणे. तेव्हा त्यानें कबूल तर केले. परतु कंपूचा आग्रह आहे कीं, याचघाटें उतरावें. नावाहि सावखेड्यापर्यंत काल आल्या, ह्मणोन बातमी आहे. पुढे रामडोहाचे खडकावरून नाव चालत नाहीं. आज पाणीहि दोन हात उतरलें. त्यापक्षीं नाव तर खडकावर चढणारच नाहीं. मग नाववाल्यानीं युक्तीनें चढऊन आनलियास उपाय नाहीं. परतु बहुतकरून कालेगावास जाईलसें दिसतें. परतु कपूचा आग्रह आहे. अलीकडे उतरल्यास फार खराबा करतील. काल प्रवरासगमकरास शभर रो॥ खर्च पडला. शिवाय, तुरुक स्वारास चाळीस रो॥ पडले. ते सरजेरावाने आपले जवळून दिल्हे. पुढें येयेच उतरावयाचा बेत जाला, तर सर्वांचे मानस कीं, दोन तुरुक स्वार आणावे. + + + आज पलीकडे सहश्रभोज्यन करणार. दोनतीन मुकाम आहेत. मागाहून नवल विशेष वर्तमान जाल्यास लिहून पाठऊ. + + + गावातील लाकूड व...... पूल तोफास नावेंत घालायाकरिता नेतील. धूमहि करतील. परतु आपण चिंता न करावी. उतरणें फार करून येथे होईल.

पत्रांक ५३२ श्रीगजानन १७२१ आषाढ वद्य १

पैवस्ती आषाढ वद्य ५

विद्यार्थी गोपाळभट दामले सां नमस्कार विनंती येथील क्षेम ता आषाढ वद्य ३ मंगळवार, दोनप्रहर दिवस, पावेतों यथास्थित असे विशेष सर्जेराव घाटगे फौजसुद्धा कूच करून आज सेंधूरवाड्यास गेले कूच कालच होणार होता परंतु आरब चाकरीस होते, त्यांची तलब चढली होती, सबब अडून बसले नंतर सहराह होऊन, तलबेचा फडशा करून दिल्हा आणि रुकसत केलें याजमुळें काल राहिले आज फौजसमेत गेले गांवांतून बेगारी माणसें पंचवीसतीस गेले आहेत मव्यांतील बाळबच्चेखेरीज यांचलें सर्व ईश्वरकृपेनें व कैलासवासी नानांचे पुण्यप्रतापें करून पार पडलें जास्या दुष्टच । यांचा विश्वास आबालवृद्धांस नवता परंतु श्रीरामेश्वरकृपेनें पार पडलें । येळ साता त्यास आहेत, ते उदईक चंद्रोदई तेथून रा करावयासी आज्ञा घ्यावी म्हणजे येथें च्यार घटका दिवसास पावतील + + + हे विज्ञप्ती

---

पत्रांक ५३३ श्री १७२१ आषाढ वद्य १

पैवस्ती आषाढ वद्य ५ बुधवार.

श्रीमंत राजश्री नानाजी स्वामीचे सेवेसीं —

विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी सां नमस्कार विनंती विज्ञापना ता आषाढ वद्य ३ मंगळवार प्रहर दिवसपर्यंत वर्तमान यथास्थित असे विशेष रा सर्जेराव बापू घाटगे यांचे कूच कालच होणार होतें परंतु कांहीं आरबांचे तंट्यामुळें काल मुकाम जाला कालच मोठें विघ्न होतें भावनपागे याचे मां बंद होतें आरबांसीं व त्यांसीं कटकट लागली होती सेवटीं आरबानीं रा/ घेऊन आपले जबरीनें रात्री निघून गेले आज रा सर्जेराव बापूंनेही कूच करून सेंदूरवाघेयास मुकामास गेले सरकार सविस्तर वर्तमान लिहून पाठऊ बहुत काय लिहिणें ? हे विज्ञापना

---

पत्रांक ५३४ श्री १७२१ आषाढ वद्य १२

यादी नारायण बाबूराव वैद्य यास नागपुरास कामगिरीस पाठविलें त्यास, ता छ २९ मोहरम सन मयातैन ता मोहरम मसेर सन इहिदे मयातैन पावेतों मारनिल्हेस गुा दीधी जमाखर्चाची यादी अलाहिदा आहे त्या यादीस शिलक निघाली आहे ते मुा इसने मयातैन व अलफ

रा

५८६८॥

यादीं खर्च रा

११६४ बापूराव विश्वनाथ वैद्य यांस पेशजी

नागपुरास भोंसले याजकडे पाठविलें होतें. त्याजबराबर सरकारचे खासबरदार व उटें वगैरे होतीं त्यास इा छ २८ रो वल सन इहिदे तिसैन ता छ १६ जिल्काद अखेर साल सन खमस तिसैन पावेतों खर्च जाह-ला तो बा यादी देवावयाची. छ १६ जिल्हेज सन सबा तिसैन विा परशराम रामचद्रः—

रुा ३४२०

पैा वजा खासबरदार दिा हाय यास तैनाते प्रा एक माही कापड आख पावा-वयाचे त्याबा दर रुा चार आख प्रों नक्त ल्याहावें. ते अडीचपटप्रा नक्त खर्च लिा आहेत त्यास, नक्त चौपट प्रा किंवा अडीचपटप्रा द्यावयाचे याचा दफ्तरचा दाखला निघेल त्याप्रा पावावयाचे. सबब वजा रुा

१०।।। जाजी निकम दिा धारोजी भिकरे.
४५। दिा सोमाजी जाधव.
११।। कृष्णाजी लोढा.
११।। लबाजी खाडेकर.
११।। हैबतजी भोसला.
१०।।। नरोजी यादव.

४५।

५६

बाकी रुा

२५०४।। नारायण बापूराव वैद्य कामगिरीस नागपुरास पेशर्जी गेले होते. त्याजब-द्दल खासबरदार व उटे सरकारातून दिल्हे होते. त्यास इा छ १७ जिल्काद सन सीत तिसैन ता छ २९ जिल्हेज सन तिसा ति-सैन अखेर साल पावेतो खर्च जाहला तो

या याद देण्याची छ १ रो षल सन म
यातैन रुा ४५१०

पैकीं रुा

---

५८६८॥

नारायण बाबूराव वैद्य यांस रघोजी भोसले सेनासाहेब सुभा यांजकडून ऐवज पावला त्या पौ पांच हजार आठशें साडे आडसष्ट रुा शिलक राहिली ते जमा धरून सदरहू यादी प्रा खर्च लिहून जमाखर्च करणें

छ २४ रो षल आषाढ मास सन इसने मयातैन जमाखर्च करणें

---

पत्रांक ५१५ श्री १७२३ श्रावण शुद्ध ७

पौ पत्र शुा ७ शके १७२३

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री व्यंकट रायजी स्वामीचे सेवेसी —

पो आबाजी नीळकंठ सा नमस्कार विनंति येथील कुशल ताागायत श्रावण शुद्ध ७ पा वर्तमान यथास्थित असे विशेष आपण एक दोन वेळां पत्रें पाठविलीं तीं पावलीं गांवाविशीं लिहिलें त्यास, राजश्री तात्याकडून अशुरदार आला त्याजबा पत्र येयून पा तें पावलेंच असल येयून कारकून राबाळाजी गोपाळ मुजरद सेंदव्यास पाठविले त्याणीं होळकर याची व पाराजी पंत—बाबा यांची भेट घेऊन गावचें वर्तमान सविस्तर सांगितलें नारोगणेश याचे चिरंजीव याचीहि भेट घेतली त्याणीं उत्तर केलें कीं, हे गांव बापाचे इनामी आहेत राजश्री येशवंतराव होळकर यांणीं तुळसाजी याव यांस दत्त पुत्र देऊन सरंजाम त्याचा त्याजकडे सांगावा, असा करार केला आहे तेव्हा इनामीगांव जरी सरंजाम न दिल्हा तरी हे गांव त्याचे त्याजकडेस देणें प्राप्त त्यांत रदकबीस नेमून मिळेस्तव कर यांस कर्ज लाखों देणें आहे तेव्हां गोष्ट घडत नाहीं गांवची मोकळीक होणें कठीण त्याचे मिळेस्तव गांव दिसे ते पुण्यास राहिले याप्रमाणें उत्तरें जालीं काशीराव होळकर निघोन महेश्वरास गेले याप्रा वर्तमान आहे पुढें कर्तव्य तें करून कार्य होय तो अर्थ करावा राजश्री भिकाजीपंत तात्या प्रसंगीं असते तरी कांहीं साहित्य करिते ते पुण्यात राहिले, तेव्हां गोष्ट विलग पडली आम्हाकडील वर्तमान तरी इतके दिवस शिंदे याजकडील उपद्रव होऊन माहाल लुटले गेले त्यास हाली शिंदे याजकडील फौजसुद्धां पारनर्मदा जाहाले सरजेरावहि तापी उतरून गेले शिंदाकडील उपद्रव येथपत होळकर इकडे येऊ देत नाहीं परंतु भियाजी येशवंत दाहा हजार पायदळस्वारांनिशीं बोधागडाहून उतरून मोठा दगा मांडला आहे त्यामुळें गांवें बेचिरास, घरें दारें जाळून मोकळीं केलीं

पुन्हां दगा........जाईल असा अर्थ ठेविला नाहीं. असो.........
अखेर श्रावण येतो. भेटीनतर सविस्तर कळेल कीं, पहिला आहे तोच आहे.
कळावें. बहुत काय लिहिणे ? लोभ करावा. हे विनंति.

---

पत्रांक ५३६ श्री १७२३ श्रावण शुद्ध ११

पौ छ ८ जावल सन इसने मयातैन, भाद्रपद मुा कोपरगाव.

शेवेसी लक्ष्मण आपाजी साा नमस्कार विज्ञापना तागायत छ ९ रारवर पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. ठाणसिंग याजबरोबर पत्रें, किल्यात बाहेरील झाडून मडळी लोकसुधा आत आल्याचें वर्तमान लिहून पाा, त्यावरून सविस्तर कळलेच असेल. महत्कार्य जाहले ! किल्ला हस्तगत होणें दुरापास्त होते. परतु आपले पुण्यप्रतापे कार्यसिध्धी जाहली. अलीकडील वर्तमान: जोतिबा निंबाळकर याजकडेस मोठाच अपराध. याजकरिता पायांत बेड्या घाल्न कैद केला. व हाकोजी नाा नादगीकर व गोंदजी व दादजी नाा पेडणेकर, येकूण असामी तीन यासीं बेड्या घातल्या. व लछीराम याचा भाऊ आनदराम यास बेडी घातली. सदर्हू पाच असामींस बेड्या घातल्या. शिवाय गोपाळराव बेड्याशिवाय कैद करून ठेविला आहे. बाकी मोठ्याच अपराधाचे च्यार आा सुलतानराव, शिव सावत, गणोजी वाघ, गणोजी बोरकर मोकळेच सध्या आहेत. त्यास, याचेपुढे कसें काय करावयाचें, त्याविशीं सरकारची आज्ञा घेऊन लिहून पाठवावे. आज्ञाप्रमाणे पुढील कर्तव्य करू. काल श्रावण शुद्ध १० दशमीस लोकाची हजिरी घेतली. गयाळ असामी बाद घातली. व दोषी पचवीस तीस असामी दूर केली. आणखी पनाससाठ आा बदलावयाची आहे. ती एकदमच बाद घालू ह्मटल्यास, ठीक नव्हे. पुढे सोईसोईने जसें जसे दिसेल तसतसें करू. बाहेरील सवाशे लोक रायचद, जुमारामबकस व बारगीर, गोलदाज व किरकोळ आह्माजवळ चौकी पाहाऱ्यास आहेत. जिर्मीत पनास लोक आरबाचे आहेत. दुर्गाडींत जुमाजमादार पचवीस लोक सुधा आहेत. बाकी शभर लोक देहुडी व कचेरी मिळोन आठ प्रहर जवळ असतात. किल्यातिल ब्राह्मण सरदार याचे लोक व भडारमडळ व सजणार्जीराव याची अनुकूळता पक्केपणें आहे. याउपर किल्याविशीं आपण किमपि काळजी न करावी. सुलतानराव याचे वळण * बाळाजीपंत पटवर्धन याजकडे आहे. सध्या दरबारीं चाल बाळाजी पताची. यास्तव पारिपत्य तो मोठेंच केलेंच पाहिजे. यास्तव सरकार परवानगी घेऊन उत्तर पाठवावें. त्याप्रमाणें करू. शेवेसीं श्रुत होय. हे विज्ञापना.

---

* पुण्यात कवठीच्या आड्यासमोरील पटवर्धनाच्या वाड्याचे मूळ मालक. येथें थोड्या वर्षांपूर्वी ट्रेनिंग शाळा होती.

पत्रांक ५३७ श्री १७२३ भाद्रपद शुद्ध प्रारंभ

पौ छ ८ जावल सन इसने, मुा कोपरगांव

पुा सां नमस्कार विज्ञापना पाछापूरचें वर्तमान सरजेराव घाटगे यामकडून आपा देसाई निपाणकर यानकडे सांगितलें आहे आपा देसाई या जकडून निळकंठराव म्हणोन कमावीसदार आहेत निळकंठराव, लिंगो केशव व बापू देशपांडे याचे आप्त आहेत देशपांडे व कमाविसदार एकचित्तानें चालतात देशपांड्याचे व शेखमिराचें वांकडें तेव्हां देशपांड्यांचें राहणें पाछापुरीं होईना यास्तव, शेखमिराचें पारिपत्य करावें हा सर्वांचा मानस या स्तव, दोन हजार लोकांचा जमाव केला शेखमिरास कळलियावर पहिले चारपांचशें लोक त्याजवळ होतेच हालीं दोदोनशें नवे ठेऊन यांची त्यांची नवी लढाई झाली! पहिले लढाईस शेखमिरा कचकरला दुसरे लढाईस निळकंठराव कचरले यामुळें देशपांडे मंडळी देवजीसुद्धां पळून गोकाकेस गेला दाहावीस माणूस ठार जाहाले एकादोघांचीं डोकीं मारिलीं एकास तीरमार करून मारिला पांच साहा आा कारकून अंकल्याच्या ठाण्यांत कमावीसदाराकडून होते, ते धरून नेले ते जिवानिशीं मारणार म्हणून बोली आहे मग यापुढें काय करील नकळे साप्रत कित्तुरकर तीनच्यार हजार जमावानिशीं शेखमिरास सानुकूळ जाहाले आहेत तेहां (यह?)++++++ मोठेंच जाहलें दाहापांच हजार फौज व तोफा (येऊन?) + जयिटी व कित्तूर व शेखमिरा याचें पारपत्य करवील तेव्हां वस्ती होईल म्हणून ताळुका उज्याड पुरावा माखिला आहे तुम्ही पाछापूरची सनद पाठविणार तेव्हां सनदेनें अमल बसविणें अर्थ नाहीं सनद निघाल्यास फौज इकडे येणार त्यास, सरकारातून ताकीद करवावी कीं, पाछापूरचें ठाणें खर्च न घेता बसऊन द्यावें नाहीं तर, उगीच सनद घेऊन सरकारचा उपकार कामाचा काय? यामागें परशरामभाऊ मिरजकर यांची फौज या प्रांतीं राहून संस्थानिकांचीं पारपत्यें मालास करीत होते अलीकडे या प्रांतात दाब अगदींच नाहीं, याप्रों जालें आहे आपणांस कळावें म्हणोन लिा आहे सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति

---

पत्रांक ५३८ श्री १७२३ श्रावण वद्य ५

पौ भाद्रपद शुद्ध १ शके १७२३

श्रीमत वेदशास्त्रसंपन्न महाराजराजश्री तात्यासाहेब स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थी केशवराव दत्तात्रय व नारायणराव बाळकृष्ण कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम ता श्रावण वा पंचमी शुक्रवार जाणून स्वामीचे आशीर्वादेंकरून स्वस्थ क्षेम असों विशेष कृपा करून आशीर्वाद पत्र श्रावण शुद्ध सप्तमीचें मुजरद हरकाऱ्यावरावर पाठविलें तें वद्य तृतीया बुधवारी संध्याकाळीं पावोन दर्शनातुल्य लाभ जाला मासलावतला बहादूर व सुभान

याची चवकशी तुमची मुर्जी करावी आम्हास पथकशीचें ज्ञान नाहीं यास्तव याईस व तात्यास पुणियास आणविस्यास पा देसॉ आपलें व त्याचे विचारें होईल तसें करावें, व किल्याच्या बदोबस्तास कोण विश्वासूक असेल तो पा काम मोठें प्रामाणिक, एकामी, जातीचा पाहून पाठवावा त्याचे स्वाधीन किल्ला करून, आम्ही पुणियास येतों कुशाजी पेशक हुजऱ्या पाठविलात त्याप्रमाणें येथें येऊन आमचे रजेतलयेत राहून सांगितल्याप्रमाणें वर्तणूक करून कार्यसिद्धी केली माणूस बहुत चागला प्रसगानें कळसें कुशाजीविषीं पेशजीं लिहिलेंच आहे लिहिल्याअन्वयें हवालदारीचें काम याजकडस जाहल्यास, दादा! बहुत सुख पावाल, म्हणोन लिहिलें आहे युक्तीस येईल तसें करावें आमचा आग्रह कोणती गोष्टीचा नाहीं गायींची चौकशी आम्हांस करा म्हटल्यास, आम्ही साफ करणार नाहीं मागें, बधूनानाच्या चौकशीस आपण पाठवीत होतां, परतु आपण कबूल केलें नाहीं यास्तव, हालीं करणें तें समजूनच करावें येथें कारकून मंडळी आहे त्यात बुधवेव्हार इशमनीस कोणाच्या तथ्यावलेख्यांत व लोभात अगदीं नाहींत बापूराव बापट कामकाजाच्या उपयोगी मात्र आहेत पुढेंहि बापू राव उपयोगींच पडावयाचे शाहणा माणूस, दमाचा, प्रामाणिक आहे इतर सारे रोजगारेच आहेत! रोजगार करावासा व टगो धन्याचें हित हो अगर अन हित हो, त्याची काळजी त्यांस नाहीं! रामचद्र ललतो, रामचंद्र नरसि, रामचद्र भिकाजीपत जवराचा (!) मेहुणा म्यकपा च्यार असामी कोणत्याहि उपयोगाचे नाहींत दरमहा पैका कोठून द्यावा ? पैक्यास ठिकाण नाहीं यास्तव च्यार असामीस सध्या निरोप देण्याविषीं पत्र पाठवावें काहीचा उपयोग नाहीं! राजश्री दाजीबा गर्दे याचे तीन आहेत त्यास म्हणोन चालवावें लरें. परतु यजमानाचें हित करावयाचें ज्ञान नाहीं आणि बळवतराव याजकडे जाऊन आमचेंहि अनहित इच्छितात! असो! याउपर आमचे नावें पत्र पा कीं, दाजीबाचे च्यार सध्या पैक्याच्या वोढीमुळें दूर करावें, पुढें ठेवावयास येतील टेविले असता कामास येणार नाहीं म्हणोन अलाहिदा पुरवणी दाखवावया उपयोगी लिहाव्या असाम्यांची वेगळी स्पष्ट लिहून पा म्हणजे असाम्या बद घालितों याउपर पुढें बारीक टें समजेल तें लिहून पाठविलों उत्तर येईल, त्याप्रों करावयास येईल मृगापासून आजपर्यंत पर्जन्य आठप्रहर नित्य पडतो शेतें गेलीं सध्या धारण अडीच पायलीची च्यार महिनें जाहाली आहे महागाईमुळें शिबंदीचा रोजमऱ्याचा नेट विशेष होतो त्याचाहि उपाय नाहीं गावात खर्चामुळें पेशजीं पट्टी करीत होतों परंतु बसे च्यानें गावांतहि बसवा हाऊन वैश व रयत पळून गेली तेव्हां स्थलपत्र जो भेटकरांस देऊन गावावर आणिलें हाली किल्यांत बन्देबस्तास येव्हा पात त्या हे वर्तमान कोण्पानीं ऐकून सलाबत लादली कीं, आम्ही बसेजा कसा होता, पुढें आमचें पारपत्य ऐसेंच करतील यास्तव दोन च्यार असामी

जार्वीटीस गेले आहेत. आही तो पट्टीचे नाव घेतले नाहीं. किल्याप्रकरणींच बदोबस्तास गुतलों. त्याची त्याणीच काक्षा घेऊन गेले आहेत. वरकड सारे गावातच आहेत. जाहाले वर्तमान लिहिलं आहे. याऊपर आह्मीं आपले तर्फेने दिलदिलासा देऊन, गेले त्यास आणवितों. साराष........साधन करावयास जावे तो मसक (?) साधत नाहीं. अशा गोष्टी किल्याच्या एका वसेड्यामुळे जाहल्या आहेत. कच्चे वर्तमान लिहिलें आहे. कळावें. सेवेसीं श्रुत होय. हे विज्ञप्ति.

---

१७२३ भाद्रपद वद्य ५

श्री.

पत्रांक ५४०

पौ। भाद्रपद वद्य ९

विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी व मल्हार रामचंद्र कुळकर्णी मोजे कायगाव सा। नमस्कार विनति विज्ञापना येथील क्षेम ता। भाद्रपद वद्य ५ पर्यंत आपले कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. + + + हालीं वर्तमान डाल–टन कपू पलटण अमदानगर, याचा मुक्काम आपले येथे जाला. टीडमाम होत आला. त्यास अद्यापि कूच करीत नाहीं। मनश्वी उपद्रव करिता! सरजामाची चिठी दुसरे वेळेस केली. त्याचा मजकूर मोहगम पूर्वीचे पत्रीं लिहिला होता. त्यानें जबरी करून चिठी प्रो सरजाम घेतला. आह्मी पचवीस मडळी घेऊन लष्करात गेलो. परतु त्याचे गावीं काहींहि दया नाहीं! रदबदलीन माणूस चिठी प्रो व्यावा म्हणू लागला. + + + त्यास, आता कसेंही करून याचे सरदार कर्नेल याचें पत्र फरगी लिपीचें आले तर हा कूच करील; नाहीं तर हा मासपक्ष येथून उठत नाहीं. याकरता त्याचा हरकारा व पत्र घेऊन पाठवावे. सरकार शिंदे याचें पत्र दाखविलें. परतु मानीत नाही. याकरता करनैलाचें पत्र आलें पाहिजे. तर शिवराची पेरणी होईल. यानें मोठी धूम केली. कुणब्याचे गरती बायकोचे आबरू एकदोघींची घेतली।! व गावात उपद्रव होतो. तो पत्रीं लिहिता येत नाहीं.+ + + + + + +

---

१७२३ आश्विन वद्य २

श्री

पत्रांक ५४१

पौ। छ ११ जावल सन सलास मयातैन, भाद्रपद मास शु॥ १३.

अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य राजश्री रघुनाथ धोंडदेव गो। यासी:–

सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार. सु॥ इसन्ने मयातैन व अलफ. मुबई व साष्टी वगैरे ठिकाणीं सरकार महालातून कसाई गुरें नेऊन दुराचरण कर्मे करितात. येविशींचे बदोबस्तास जनाजी बिन विठोजी समले व रामराव मेघःशाम कारकून यास हुजुरून पाठविले आहेत. तरी हे कसाई व त्याचे मिलाफी वगैरे गुरें ता। आठगाव व प्रा। साष्टी येथून नेतात, त्याची

चौकशी उभयतां करून सरकारांत समजाविताल त्याअन्वयें हुजुरून आज्ञा करणें ते केली जाईल हुसी येविशीं अडथळा न करणें जाणिजे छ १४ ज मादिलाखर, आज्ञा प्रमाण लेखनसीमा

---

पत्रांक ५४२ श्रीमार्तंड प्रा १७२१ कार्तिक शुद्ध ५

श्रीमत राजश्री नानाजी स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी व मल्हार रामचंद्र कुळकर्णी मौजे कायगांव यांचा नमस्कार विनती विज्ञापना येथील कुशल ता। कार्तिक शुद्ध ५ पावेतों आपले आशिर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष डालटन कूच करून सोमवारीं वेरुळास गेला आत्माराम बावा वागनीस यांची फौज वेरुळास गेली वेरुळकरासीं यांची लढाई लागली आहेच वैजापुराकडे धामरायाची पागा आहेच बावनपागे इकडे येतात, म्हणोन आवई आहे गांवची पेरणी जाली मोंघळे चांगले तारीं लागले आहेत सालमारीं पर्जन्य फार, यामुळें पेरणी मागस जाली परंतु मोंघळे चांगले आहेत मग तें कसें होईल तें पाहावें + + + हे विनंती

---

पत्रांक ५४३ श्री १७२२ कार्तिक शुद्ध ७

राजश्रियाविराजित राजमान्यराजश्री गंगाधरपंत यांप्रति रामचंद्र दीक्षित आशिर्वाद उपरी येथील क्षेम ता। कार्तिक शुद्ध ७ रविवार पावेतों यथास्थित असों विशेष अलीकडे तुमचें वर्तमान पत्र येऊन कळत नाहीं व लष्करचें बावमीचें वर्तमान कळत नाहीं इकडे लष्करचें वर्तमान कीं, मीरखान पठाण व गोपाळराव व श्रीपतराव व पेंढार ऐसें मल्हारणपुरीं येऊन दाखल जाले ते इकडे येतात, म्हणोन श्रीमतांचे डांकेचें वर्तमान गांडापुरीं व मयराधगर्मीं श नवारीं आलें येणें करून चित्त चिंताक्रांत आहे मिरखानाचे फौजेची दहशत मारी आहे याजकरितां विरस्थळीं घाबरली आहे त्याउ,*शहरीं फौजेचें पक्कें वर्तमान असेल तें लिहून पाठवावें शहरीं पक्की बातमी नसल्यास धेंडुरणीस मुजरहू बातमी करितां मजुरदार पाठऊन, पक्की बातमी आणवून, कोणीकडे जातो हें सविस्तर बातमी आणवून लिहून पाठविणें अथवा शहरीं वर्तमान पक्कें असलियास, तुमचें उत्तर लवकर पाठवावें म्हणजे तुमचे लिहिल्यावरून मुलामाणसांची शहरीं यावयाची तजवीज करू हे आशीर्वाद

---

पत्रांक ५४४ श्री १७२३ मार्गशीर्ष वद्य ३

समा माहालपोता कमावीस बावा रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांजकडे

---

* अवरंगाबादेस

सहमान महालें रेखाउत्तरतीर याजवा ऐवज सरकारात घ्यावयाचा ठरला आहे. त्यापैकीं सुा आनंदराव बापूराव वैद्य यांणीं भिकारीदास जोहरी याजकडून देविले. ते हुंडी परशराम नाईक अनगळ. चांदवड रुा

१९७०० छ १५ साबान.
१०३०० छ १६ साबान.

---

३००००

तीस हजार रुा चांदवड पोता जमा असेत. छ १६ साबान, सुा ह्सने मयातैन व अलफ.

---

पत्रांक ५४५ श्रीशंकर. १७२३ पौष वद्य १४

वेदशास्त्रसंपन्न राजश्री दीक्षित बाबा स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक येमाजी गायकवाड कृतानेक सा। दंडवत विनंति. येथील क्षेम ता। छ २७ माहे रमजान जाणून स्वकीय लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे. यानंतर अबदुल रजाख देशमुख पा। उडणगाव यांणीं आपले भाऊ-बंदी + + + जिवें मारिले. त्यास त्याच्या बाइका व मुलें श्रीमंतापाशीं फिर्याद जाली. श्रीमंत राजश्री रघुनाथराऊ दादासाहेब या प्रांतीं आले. त्यासमई भेटीस बोलाविलें. त्याग, गैरहजर होऊन, पळोन जाऊन, त्याणीं देशमुखी जप्त करून, सेलवडेस ठाणें बसऊन सेटा लाविला! राजश्री नारो बाबाजी सुभेदार साहेब याच्या स्वाधीन ठाणें केलें. त्यास, आक्षाम नेना. ह्मणून आह्मीं श्रीमंतास अर्ज केला कीं, ठाणेयात कारकून दुसरा हुजूरचा ठेवणें. त्यास, त्याणी रा। सदाशीवपंत कारकून ठेविले. देशमुखीची नजर घेऊन, यटा गुमस्तगिरी आह्माकडे दिली. आह्मीं त्याचे गुमास्ते पेशजीचे आहेत, तेच ठेविले. अखेरसालीं देशीं गेलियाजवर, श्रीमंत जप्ती पंचाईत करून मोकळी करतील अगर त्याच्या खातरेस येईल त्यास गुमास्तगीर सांगतील. ते मुलखाचे खावद. त्याणीं जप्ती केली, ठाणें बसविलें. त्यास, अबदुल रजाख मार्गे कईत. फिर्याद वतन. त्याचें ठाणे मारिता त्यास आपल्यास जाग कोठें पाहिली! वतन जाऊन ठिकाण नाहींसें होईल. असें कर्म न करावें. श्रीमंत पुणियास आलियाजवर, त्यासपाशीं जाऊन, हवाल सांगोन, अर्ज करून, त्याची कृपा निर्माण जाहलियावर ते स्थापना करितील. त्याची नालीस शहरीं केलीयानें त्यास विशाध येईल. ऐसे न करावें. तुह्मी त्यास फजित करून सांगणें कीं शहरीं नालीश कार्याची नाहीं. जर त्याणीं तुमचे नाइकिलें, नालीश केली, तरी त्यास ठिकाण नाहींसें होईल. येथें वार्ता उडाली आहे कीं, बहिर बक्षी आला आहे तो खेळवाडेवर येतो. ऐसी रोज आवई उडाली. याजमुळें पा। उडणगाव फरारी जाहला. शिवणेंहि फरारी जाहलें. बहुत धूम माजविली.

रोज पळ सुटला सेलवाड वैराण जाहली त्यास, साहेबीं कृपा करून नबाव शाहानवाजखानी यांस सांगोन, सेलवाड व उडणगांव याजविशीं खारखास चिठी मोहिरेनशीं देऊन पाठवणें श्रीमंत राजश्री माधवराऊ आपल्या पद रचे आहेत म्हणून हे अर्ज साहेबास लिहिली साहेबीं चित्त घालून, खामखाई खरखास चिटी घेऊन पाठविली पाहिजे नाहीं तरीं, उडणगांव परगणा वैराण जाहला मधीची दहशत भारी पडली यामुळें रयत फरारी जाहली या गोष्टीचा बंदोबस्त साहेबाखेरीज होणार नाहीं म्हणून अर्ज सेवेसीं लिहिली विनति लिहिली हे मान्य करून, खरखास चिठी घेऊन पाठवणें देशमुख आपलेपाशीं राहों देणें श्रीमंत पुणियास आलियावर, आमचे यजमान व साहेब मिळोन, त्याचा अर्ज करून मग जें होणें तें होईल बहुत काय लि हिणें ! हे विनतिलख

---

पत्रांक ५४६ श्रीलक्ष्मीकांत १७२३ माघ वद्य ९

पो छ २२ सवाल सुा इसन्ने मयातैन, माघ

राजश्री पतप्रधान गोसावी यांसीः—

दंडवत विनती उपरी गोसावी यानीं खासदस्तुरचें पत्र राजश्री नारायण बापूराव यांज समागमें पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखन—अभिप्राय अवगत जाहला, व मशारनिलेचेंही बोलण्यावरून सविस्तर समजण्यांत आलें असेल यांसीं राजश्री श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव यांची विदा मुहूर्तेकरून बाहेर केली, येविशीं पेशजी लिहिलेंच आहे सांप्रत, उभयतां स्वार होऊन आले आहेत त्यास, कित्येक सलाह मसलतीचे प्रकार उभयतांसीं व राजश्री नारायण बापूराव यांसीं बोलण्यांत आले आहेत सर्व अर्थ बोलतील, त्यावरून कळों येतील रा छ ११ माहे शावान सुहाप्रत विशेष काय लिहिणें ! कृपा लोभ असों दिला पाहिजे हे विनती

---

पत्रांक ५४७ श्री १७२३ माघ वद्य १४

राजश्री नारायण बापूराव स्वामी गोसावी यांसी —

विनंती उपरी राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब यांणीं सनसबा सितैनांत दरबारखर्चाबाबत तीसहजार रुा तुमचे विद्यमानें दिल्हे त्यापैकीं सत्राहजार सातशें पन्नास रुा खर्च होऊन, बाकी बाराहजार दोनशें पन्नास रुा शिलक राहिली, म्हणोन तुम्हीं हुजूर सरकारांत समजाविलें तो ऐवज व्यवस्थेनें खर्चावयाचा बा बा देणें ॥ चिंतो वामन कारकून निा दफ्तर याजकडे रुपये १२२५० बाराहजार दोनशें पन्नास देविले असेत तरी पावते करून,

पावलियाचें कबज घेणें जाणिजे. छ, २७ सवाल सु॥ इसने मयातैन व अ-लफ. हे विनंति.

वार.

लि॥ चितो वामन, मदरहू बरातेप्रो बाराहजार दोनशे पन्नास रु॥ चाव-वड भरून पावले. छ ७ जिल्काद. हस्तें पांडुरंग रामचंद्र ढमढेरे. सु॥ इसने मयातैन. हस्ताक्षर खुद.

---

पत्रांक ५४८ श्री १७२३ फाल्गुन वद्य १

पौ फाल्गुन वद्य ३ इंदुवार प्रात:काळ जाबसुद.

श्रीमंत राजश्री नानाजी स्वामींचे सेवेसी:—

*विद्यार्थी परशरामभट धर्माधिकारी सा॥ नमस्कार विनंति विज्ञापना ता॥* फाल्गुन वद्य १ परियंत आपले आशीर्वादेकरून वर्तमान यथास्थित असो. विशेष. काल मंदवारीं दों प्रहरा रात्रीं श्रीमंत तात्याकडे पत्र सातारियाहून आलें. मा॥र कीं, पेंढारी आजळ्याचा घाट शुक्रवारीं चढला. त्यावरून लोक फार भयाभीत होऊन गेले. ब्राह्मण मंडळी फार गेली. आतां राहता पौ कुणबी व च्यार घरें ब्राह्मणाचीं आहेत. त्यास धैर्य पुरत नाहीं. वस्ती फार गेली. याकरितां लोक भयाभीत होऊन, निघावयाची जलदी करीत होते. त्यास, खातरजमा केली कीं, पेंढार घाट चढला अशी पक्की बातमी आली, ह्मणजे सरीसर्वत्र एकदाच निघून जाऊ. याप्रों खातरजमा केली. परंतु लोकास धैर्य पुरत नाहीं. आपल्याकडील बातमी कांहीं कळत नाहीं. त्यास, शहरात पक्की बातमी असेलच. त्याप्रों लिहावी. + + + हे विनंति.

---

पत्रांक ५४९ श्री १७२३ फाल्गुन वद्य ३

श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री + + जी यासी प्रति लक्ष्मीबाईचे अनेक आशीर्वाद उपरी येथील क्षेम तागायत फाल्गुन व॥ ३ रविवार पावेतों कायगावीं सुखरूप असों. विशेष. तुह्मी बयाजी सोनवणी याजबरोबर पत्र पाठविलें ते पावलें. लिहिला मजकूर सविस्तर कळला. इकडील वर्तमान तर: कायगावचे कौलास आज प्रारंभ केला. दुसरें, राजश्री धोंडोपंत गोडबोले तोफखान्याचे सुभा मालेगावीं होते. त्याशीं व शामतखा पठाण व गावडे व अचबीसिंग वगैरे नि॥ होळकर यासीं लढाई जाली. धोंडोपंत यांनीं सिकस्त खाल्ली. याजकडील तोफा व पलटणी झाडून कापून काढिलें. जातीनिशीं धोंडोपंत आतेगाव वामळे येथें आहेत. समागमें हजारपांचशें लोक आहेत, असें ह्मणतात. परंतु सत्य मिथ्या न कळे. याजकडील फौज दीडशें राऊत काल शन-वारीं कायगावीं मुक्कामास होते. कांहीं उपद्रव जाला नाहीं. आज कूच करून

पुढें गेले घोंडोपंत पुढें होते यामुळें पठाण वगैरे यांस कांहीं प्रतिबंध होता तो मोकळा जाला हालीं जादवराकडे येण्याची आवई बोलतात घाट चढ त्यास ठीक नव्हे मग भी काय घडविणें ते कळवील हालीं बयाजी पाठविला आहे तुम्हा समागमें माणूस अधिक असावें सा पाठविला आहे बयाजीबरोबर वास्तर पाठविली आहे पावेल बहुत काय लिहिणें ! हे आशीर्वाद

---

पत्रांक ५५०　　　　श्रीमार्तंड　　　　१७२१ फाल्गुन वद्य ८

आमदारखानापैकीं सुा इसने मयातैन देणें रघोजी भोसले सेनासाहेबसुभा याजकडून नागपुराहून दसरेयाचे पोशाख सरकारांत सांडणीस्वार घेऊन आले त्यांस निरोपसमई इनाम साल गुा प्रों साल मजकुरीं असामी २ यास दर ४० प्रों रवानगी याद कापड आख ८०

ऐशीं आंख देणें छ २२ जिल्काद

---

पत्रांक ५५१　　　　श्रीमार्तंड　　　　१७२१ फाल्गुन वद्य ८

पोतापैकीं सुा इसने मयातैन देणें रघोजी भोसले सेनासाहेबसुभा याजकडून नागपुराहून दसरियाचे पोशाख सरकारांत सांडणीस्वार घेऊन आले त्यांस, निरोपसमई इनाम साल गुा प्रों साल मजकुरीं आा २ एा रु २० वीस व्हा देणें छ २२ जिल्काद

---

पत्रांक ५५२　　　　श्री　　　　१७२१

यादी हैबतराव आटोळे धुरंधर समशेरबहादर विज्ञापना ऐसीजेः—

सरकारची सेवा बहुत दिवस सर लष्कर याभबरोबर करीत आलों सुरसन इसने मयातैनचे सालीं सरकारांतून सरजामाची जप्ती केली याजकरितां विनंती करावयासी कारकून हुजूर पाठविले आहेत सरजामाचीं गांवें व खेडीं बहुतामुळें बिलकूल उज्याड जालीं सबब, सरदारी फार घोटांत आली त्यास, स्वामींनीं कृपाळ होऊन, शेवाचाकरी घेऊन, सरंजामाचे मोकळिकीविशीं आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत

---

पत्रांक ५५३　　　　श्री　　　　१७२१ माघ वद्य ११

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री नारायण बापूराव स्वामी गोा यांसी —

पो अमृतराव रघुनाथ नमस्कार विनंती उपरी येथील कुशल लिहीत जाणें विशेष राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांजकडे एक लाख रुपयांचे वरातेपैकीं तीस हजार रुपये राहिले आहेत त्यास, सेनासाहेब

सुभा यांचे कारभारी पुण्यास आले असेत. तरी, सदर्हू ऐवज राजश्री विठ्ठल बल्लाळ याचे हवालीं करणे ऐवजास बहुत दिवस जाहले. येथे खर्चाची वोढ आहे. याजकरता ऐवजाचा उलगडा लौकर पाडून देणें. जाणिजे. छ २४ शवाल सुा इसने मयातैन व अल्लफ. बहुत काय लिहिणें ? हे विनती.

---

पत्राक ५५४ श्री. १७२४ चैत्र शुद्ध १३

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गगाधरपत तात्या स्वामीचे सेवेसी:—

पो रामचद्र रावजी सा नमस्कार विनति उपरी येथील क्षेम ताा चैत्र शुाा १३ जाणून स्वकीय लिाा. विशेष. नथू हलकारा लष्करातून आला. बेलापुरावर दोनचार मुकाम आहेत. पुतार्बे उज्याड आहे. परतु चवकी होळकरानें पाठविली की, भलताच न लुटी. मग तेच काय करतील ते करोत. बेलापूर उज्याड. परतु त्याजला भक्षावयास मिळतें. घरें खाणावीं. दाणा, कडबा लागतो तो नेतात मनस्वी धामधूम करितात. ते पत्रीं लिहिता पुर्वत नाहीं. घर उकरून जाळितात. बेलापुराहून पुताबियासहि दोनचार मुकाम होणार, म्हणून बोलतात. ऐसे नथू मारानें जबानीं सागितले. खासास्वारी होळकराची बेलापुरास आली. परतु तोफखाना राहुरीवरच आहे. मुकाम फार ऐकून येथील गरीबगुरीब भयाभीत जाले. बायकामुले बाहेर आजच लाविलीं. परतु फार भितात. उद्या परवा गाव बेचिराख होईल, असे दिसते. बहुत काय लिहिणें ? हे विज्ञप्ति. इत्यादि.

---

पत्राक ५५५ श्री. १७२४ चैत्र शुद्ध १३

पौ चैत्र वद्य १ सोमवार.

वेाा राजश्री ब्रह्मभट यांसीं:—

प्रति लक्ष्मीनारायण दीक्षित नमस्कार विनति येथील क्षेम ताा चैत्र शुाा १३ पावेतो मुाा पुणें येथें सुखरूप असों. विशेष. मी आल्या ताा तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर वरचेवर लिहून सविस्तर कळवीत असावें. यानतर कायगावचे वर्तमान लुटल्याचें आइकिलें होते. परतु येथे आल्यावर पक्की बातमी समजली कीं, सर्व क्षेम आहेत काहीएक उपद्रव देखील जाला नाहीं. तुम्ही स्वस्थ असावे+++हे विनति

---

पत्राक ५५६

पो छ ६ मोहरम शके १७२४ श्री. १७२४ चैत्र वद्य ८

राजश्री पंतप्रधान गोसावी यांसीं:—

दडवत विनती उपरी गोसावी यानीं खासदस्तुरपत्र पाठविले तें पावोन

जाहला राजश्री नारायण बाबूराव यांशीं व उभयतांशीं बोलणीं झा

याचा मजकूर मशारनिलेनीं लिहिला असेल सांप्रत समक्षता व्हा वयाचा विचार जो दूरदेशीनें ठहरला तो त्रिवर्ग लिहितील त्याप्रों परस्परें मनांत यावाचा, यात बहुत चांगलें आहे म्हणोन लिहिलें तें कळलें व त्रि वर्गांचे लिहिल्यावरूनहि येविशींचे सर्व भाव समजण्यात आले त्यास, आपण इकडेस अंत करणापासून लोभ ममता ठेऊन आहेत, हें समजोन खातरजमा पहिली होती ती अधिकोत्तर जाहाली आहे येथीलहि नि सीम भाव जावी शीं स्वचित आहे हा प्रकार उभयतांनीं बोलण्यात आणलाच आहे तेव्हां याचा तपशील पत्रांत ल्याहावा, ऐसें नाहीं जो बेत उभयतांनीं आपणांसीं केला आहे तो दूरदेशीचे मार्गे फारच चांगला पोख्त आहे तोच स्वचित असे यांत येथून कदापि दुसरें व्हावयाचें नाहीं जो बेत होईल त्याप्रोंच ते थून घडल्यास तेथा सारिखें इकडून घडेल व जैसा इशारा येऊन पोहोंचेल तदनुसार अमलांत येईल, हे खातरजमा पुर्ती असावी एतद्विषयींचा मजकूर उभयतांस व राजश्री नारायण बाबूराव यांशीं लिहिण्यात आला आहे बोलतील त्याजवरून कळों येईल रा छ २२ माहे जिल्हेज सुज्ञाप्रति विशेष काय लिहिणें ? कृपा लोभ असों दिला पाहिजे हे विनंति मोर्तबसुद *

---

पत्रांक ५५७ श्री १७२४ चैत्र वद्य १०

पो मिती चैत्र वद्य १२ गुरुवार

सहस्त्रायु चिरंजीव लक्ष्मीनारायण दीक्षित यांप्रति गोविंद दीक्षित आशी र्वाद उपरी येथील क्षेम चैत्र वद्य १० तिसरा प्रहर जाणोन स्वकीय लिहिणें विशेष तुम्हीं दोन पत्रें पाठविलीं तें एक दोप्रहरीं व एक तिसरे प्रहरीं पा वोन वर्तमान कळों आलें लष्करचे गडबडीमुळें लोक भयाभीत जालें, म्ह णोन विस्तारें करून लिहिलें त्यांस राजश्री आबाजी महादेव व त्रिंबो वि ठ्ठल या उभयतांस मल्हारपतांशीं आमचे नांवें पत्रें लिहणें त्यास मजकूर कीं, आपले सैन्याचा रोख तिरस्थळीवर यावयाचा आहे, म्हणोन येथील ब्राह्मण सर्व भयाभीत जाले आहेत, त्यास आपलें अभयपत्र आलियास लोक निश्चित राहतील याप्रों पत्रें देऊन माणसें लष्करास पाठवावीं तेथील उत्तर आश्वासनाचें आलें तरी उत्तमच जालें नाहींतर, तुम्हीं इकडे याव याचें करावें वे॥ बाळकृष्णभट हाली टोकियांत आहे त्याजला वे॥ नारायण जोशी यांजला भेटावयासीं सांगितलें आहे तिकडेहि पाठऊन बदोबस्त जेथ- वर होईल तेथवर करून घ्यावा लष्कर नगराहून कूच जाहालियास तिरस्थ ळीचे दाहावीस ब्राह्मण पुढें पाठविणें बहुत काय लिहिणें ? हे आशीर्वाद

---

* हें सव पत्र रघुजी भोंसल्याच्या हातचें आहे

पत्रांक ५५८ श्री. १७२४ वैशाख शुद्ध ६

अपत्ये शामरावजीने चरणावर मस्तक ठेऊन शिरसा नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत वैशाख वद्य ६ मदवासर मुकाम मोलेगाव जाणून स्वकीय कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. वडिलीं आसीर्वादपत्र श्रीमत वेदशास्त्रसंपन्न राजश्री नाना दीक्षित कायगावकर याचे माणसासमागमें पाठविलें ते पाऊन मार कळला. लिहिलें कीं फौजेचे वर्तमान दिनचर्येचें सविस्तर लिहा पाठवणें ह्मणोन पत्रीं आज्ञा. त्यास, श्रीमत राजश्री येशवतराव होळकर हे आमळनेर नजीक बाहादुरपुर येथें आहे. जाण्याचा इरादा दक्षणेस मालेगाव चांदवड इकडे यावें, व एक बोलावा कीं बऱ्हाणपुराकडेस जावें. राजश्री माणे व गणपतराव हे येरंडोल वगैरे येथील खंडणी घेऊन पाऱ्होळ्यास आले. तेथे रोखा तिनिलक्षाचा केला. तेव्हा पाऱ्होळकर लढाईस सिद्ध जाला. एक लढाई चांगली किल्यासीं जाली. माणे मागे फिरोन मुकाम ह्मसवे येथे आले. मग तह पडला. नंतर पाऱ्होळकर हे माण्याचे लष्करात मेजवानीस गेले. वस्त्रे घेऊन आले. दुसरे दिवशीं माणें यासीं किल्यात मेजवानीस बोलाविले. सैपाक सिध करून बोलाऊ पाठविलें. तेव्हा माणे याचें ह्मणणें पडलें कीं, दोनहजार सरंजामानिशीं किल्यात येऊ तेव्हा पाऱ्होळकर याचे चित्तास आलें नाहीं. पचवीसा स्वारानशीं मात्र यावें. ते माण्यानीं कबूल केले नाहीं. मग......मेजवाणीचा सरंजाम माणे याजकडेस पाठविला. तो माणे याणीं माघारा दिल्हा. तो पाऱ्होळेकर यानीं शेला पागोटे घेतले होते, ते माघारे पाठऊन दिल्हे. मग तीं माणे याणीं तीनलक्षाचा ( रोखा ) केला. याणीं उत्तर सांगून पाठविलें कीं, दारूगोळा मात्र आहे. पैकाउतर मिळणें कठीण. असें बोलणे मात्र होऊन, माणे मुकाम करून आहेत. येशवतराव पाऱ्होळ्यास माणे याचे कुमकीस येणार. किल्यात पाणी नाहीं, इतक्याणीं मात्र जेर आहे. पुढें काय होईल ते पाहावें. येशवतराव याजकडेस गेला होता. त्याची भेटी घेऊन दरकूच ललिंगास आला. वाडी लुटली व माडीही घेतली. तेव्हा किल्लेदार तीस हजार रुपये द्यावयास सिद्ध. हें पठाणाचे मनास न आले. लक्ष रुपये द्यावे आणि किल्ला खालीं करून द्यावा, याप्रमाणे बोलणें पडलें आहे. अद्यापि काहीं ठरावात आलें नाहीं. ललिंगाचा गुता उरकला ह्मणजे पठाणानीं मालेगावास यावे, अशी बोलवा आहे. रोखा चौलक्षाचा केला आहे. माण्य जाल्यास उत्तम......

---

पत्रांक ५५९ श्रीशाळसाक्षात १७२४ वैशाख शुद्ध १०




तैनात जाबता सिलेदार नदीव एकांडे फारकून कृष्णाजी अनंत आा
१ तैनाव दरमाही नक्की शिरस्ता सुा इसने मयातेन व अलफ रा॥

६०० जातीस
१०० धार्गिद पेशा या

---

७००

एकूण असामी एक यास तैनात दरमाही नक्की शिा रा। यासर्से करार केले असेत पौ नाणेमटा वगैरे व दरबार खर्च वजा होऊन, बाकी तैनातीचें धाईचे मार्गे पावलें चाकरी इमानी इतबारें करावी हजिरीस घोडे तीनशावर किंमतीचे लागेल लढाईत घोडे निशाण पुढें पडिस जाहाल्यास दाखला पाहून किंमत पाचाचे मतें ठरेल ती दिल्ही जाईल छुर्टीत नगारा, निशाण, नौबत, ढाल, पालखी, व हत्ती, खजीना व तोफा सांपडेल ते सरकारांत दाखल करावी चाकरीची तेरीख छ ८ सावान सन मार पासून चालू असे आणिजे छ ९ माहे सावान मोर्तबसुद

---

पत्रांक ५६० श्री १७२४ वैशाख शुद्ध १०

सहस्रायु चिरंजीव रा श्यामराव नाना यांसीं गणेश शिवराम आशीर्वाद उपरी येथील कुशल ता वैशाख शा १० मुा को नेवासें येथें यथास्थित असो विशेष तुम्हीं श्रीमंत वेदशास्त्रसपन्न रा नाना दीक्षित कायगांवकर याचे मानसा समागमें शेनवारचें पत्रें पाठविलीं ते मंगळवारी साहा घटका रात्रीस पावलीं मार अलाहिदा तुमचें पत्र आमचें नावें होतें, त्यानमुधां सविस्तर समजला ईश्वरें मोठें अरिष्ट आणिलें प्राण यांचणें कठीण आले यानकरितां तुम्हीं इफवील सला न पाहतां सर्व गडळी निघालां, हें बहुत चांगलें केलें येथें येऊन पोहोचावें मग पुढें श्री जसें घडवील तसें घडवो

तेथील बंदोबस्त करून लौकर निघोन यावें. लोभ कीजे. रा मिती वैशाख वा ९ मगळवार प्रथम साहा घटका रात्र हे आशीर्वाद.

राजश्री रामचद्रपत आपा स्वामीस सा नमस्कार विनंति उपरी चिरंजीव शामराव मडळीसुधा निघोन येतात, त्या पक्षीं मागें मालेगावीं आता तुम्हींच आहा. आणि चिरजीव असले तर विलग ! वेळ प्रसगास तुम्हाशिवाय दुसरियाचें धैर्य काय आहे ? मुले लकर प्राण वाचून मात्र येतात. परतु यजमानाकडील वस्तभाव किल्यात आहे. त्याची तजवीज अगोदर लिहिल्याप्रो करून माणिकपुजास रवाना करावा. तो माणिकपुजहि जागा बाकी नव्हे जाणून, तेथच टेविलें. त्यास, हे आपले माथा मोटें अपयश आहे. बरे वाईट जाल्यास तोंड दाखवावयास जागा नाहीं. याजकरिता आतां तुमचे प्राण वस्तभाव जवळ आहे. कळेल तसें सरक्षण करून, आह्मास वर्तमान कळवीत जावे. लोभ कीजे. हे विनती.

---

पत्राक ५६१ श्री. १७२४ वैशाख वद्य १

श्रीमत वेदशास्त्रसपन्न राजमान्य राजश्री नानाजी स्वामीचे सेवेसीं:—

विद्यार्थि गणेश शिवराम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता वैशाख वा १ आपले कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. यानतर पत्रीं आज्ञा कीं, रा येशवतराव होळकर याची बातमी थाळनेरास दाखल जाल्याची ऐकिली होती पुना माघारें गेल्याचें ऐकतों. येविशीं सत्यमिथ्या खचित वर्तमान आणवावयाकरिता मालेगावीं माणूस पाठवित असों. त्यास, तुमचे पत्र पाठऊन देणें म्हणून आज्ञा. त्यास, मालेगावीं माझे कनिष्ट बधू चिरजीव शामरावजी आहेत. त्यास पत्र लिहून पाा आहे. हें मनन होऊन रवानगीची आज्ञा व्हावी. म्हणजे तेथून सविस्तर बातमी येईल. लखोट्यावर शामराव शिवराम म्हणून लिा द्यावे. आणि माणसास सागावें, गणपतराव मोकाशी याचे घर पुसावे ह्मणजे गुता पडणार नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्राक ५६२ श्री. १७२४ वैशाख वद्य १

श्रीमत वेदशास्त्रसपन्न राजमान्य राजश्री नानाजी दीक्षित स्वामीचे सेवेसीं:—

विद्यार्थि गणेश शिवराम कृतानेक सा नमस्कार विज्ञापना. आपण पत्र पाा तें पावले. मालेगावींहून तुमचें येथे पत्रे आलीं त्यात येशवतराव होळकर याचे लष्कराची बातमी काय आली ते लिहावी, म्हणोन आज्ञा. ऐशास, मालेगावाहून श्रीमत राजश्री गोपाळरावबापा याची पत्रें परवा आलीं. त्यात

मार येशवंतराव होळकर थाळनेरास आहेत पचवीस हजार फौज व पेंढार वगैरे चाळीस हजार परियंत जमाव आहे काशीराव होळकर येशवंतराव यांजपासून निघोन सेंदव्याचे किल्यांत गेले ते तोफा फिराऊन किल्याचा व दोबस्त करून आहेत काशीराव आपलेपासून निघून गेल्यामुळें, येशवंतराव यांस अविश्वास होऊन, खानदेशात माने यांस समागमें काशीराव याजकडील आपाजीसिंग व गणपतराव नारायण दिवाण होते, त्यांस माने यांजला येशवंतराव यांणीं लिहून फायद करविलें, आणि माने अमळनेरचे सुमारें होते व शहामतखान पठाण माचलपुरावर होता, त्याजला निकडीनें आपले जवळ बोलाऊन नेलें म्हणून जमावसुधा येशवंतराव थाळनेरावर आहेत एक रोख दक्षिणेवर मावयाचा व एक येत बराणपुराकडे जावें असे दोन येत आहेत बातमीस माणसें गेलीं आहेत पुढें वर्तमान येईल तसें लिहू या अन्वयें मालेगावचे पगात मार आहेत स्वामीस कळावें पुढें समजल्यासारखें विनंति लिहिल्यास, आज्ञेप्रमाणें आळस करणार नाहीं आपण मालेगांवीं माणूस पाठविलें आहे, तें आज यावेसें आहे त्यांस, आलें म्हणजे मजीकडील तिकडे काय शुद्ध असेल, तें कळेल महाळाहि पत्र आलियावर अधिकउणें कळविण्याविषीं आज्ञा असावी सेवेसीं श्रुत होय हे विज्ञाप्ति

---

पत्रांक ५६३ श्री १७२४ वैशाख वद्य १

पुा तीा राजश्री बाबा महिलांचे सेवेसीं:—

नाहींतर मालेगावास पठाणी मोरचे लावावे यापों येशवंतराव याची ताकीद मोरचे लावले म्हणजे येशवंतराव यांणींहि मालेगांवीं यावें या प्रों त्याची बातमी खचित येशवंतराव होळकर याचे लष्करांतून पत्रें येथें कोणकोणास आलें मालेगांवीं येण्याचा मोठा इरादा आहे येथेंहि खबवच आहेत ईश्वर काम मडवील तें पाहावें परंतु ठीक नाहीं पठाण येथून लष्कीगास बारा कोसावर आहे एका दों रोजात मालेगांवीं येईल त्याचा येईल दुसरें श्रीमंतांणीं दुसरे येशवंतराव याजकडेस पा होते त्याजबा एक हत्ती व पांच घोडे वगैरे नजर श्रीमंतांस, एक कारकून अगोदर देऊन, पा आहे काल मुकाम मालेगांवीं होता दुसरे यासीं किल्यात बोलाविलें होतें त्यांणीं वर्तमान सांगितलें कीं होळकर याची चाल कांहीं ठीक नाहीं बहुत मुद्दे घातिले आहेत हे मुद्दे प्रों जाल्यास, मग आम्ही कांहीं ठाणीं घेणार नाहीं व उपद्रवही होणार नाहीं याप्रों मोलणीं जालीं उगेच समाधानास्तव हत्ती वगैरे पाठविले आहेत परंतु त्याचे ध्यानास श्रीमंत वगैरे कोणीच नाहीं याप्रों या प्रांतांत गर्दी आहे येरंडोल भडगांव येथें सरदणी माणे यांणीं घेतली असतां पुन्हां येशवंतराव यांणीं रोखे केले तेव्हां निरुपाय म्हणून येरंडोल भडगांव उच्याड जाली काशीराव होळकर हे यशवंतराव म्हणून फुटून सेंदव्यास

किल्यांत जाऊन बसले आहेत. शिंदे याजकडील फौज गोपाळरावभाऊ बऱ्हाणपुरास अलीकडे एक मजल आले आहेत. सरजेराव वगैरे हेहि ब्ऱ्हाणपुरावर आहेत. मालेगाव वगैरे येथील गुते उलगडून मग ब्ऱ्हाणपुरास जावें. याप्रों येत आहेत. मग काय घडेल ते पाहाव. आणिक नवल विशेष ल्याहावयायोग्य नाहीं. जिवाजी येशवतहि येशवतराव होळकर याजपाशींच आहेत. सेदुर्णी वगैरे महालात ठाणीं जिवाजीचींच आहेत. कोणी महाल वस्तीस राहिले नाहींत. ऐसे आहे. कळावें. बहुत काय लिहिणे ? हे विज्ञापना.

---

पत्रांक ५६४ श्री. १७२४ वैशाख वद्य ४

वो। श्रीमत राजश्री नाना दीक्षित नाना स्वामीचे सेवेसीं:—

पो। शामराव शिवराम सा। नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता। छ १८ मोहोरम पावेतों पेठ मालेगाव यथास्थित असे. विशेष. आपण तीा। राजश्री गणेश शिवराम याचे पत्र नेवासियाहून पाठविले तें पावले. त्यात मजकूर कीं, लष्करचें वर्तमान होळकराकडील वगैरे दिनचर्येचे सविस्तर लिहून पाठवावें. त्याजवरून तीर्थस्वरूपजीचे नावे पत्र लिहून पाठविलें आहे. त्याजवरून आपले ध्यानास येईल. अलाहिदा पत्र तीा। स लिा। आहे. तो लखोटा नेवासियास पावता करावा. बहुत काय लिहिणे ? लोभाची वृद्धी करावी हे विज्ञप्ति.

---

पत्रांक ५६५ श्री ( नकल ) १७२४ वैशाख वद्य ७

राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा गोसावी यांसी:—

सकलगुणालकरणअखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य श्री। बाजीराव रघुनाथ प्रधान आशीर्वाद विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असिलें पाहिजे. विशेष. आपणाकडे सस्थान गढेमडळे रेवाउत्तरतीर याजबाबत ऐवज पेशजीं सरकारात घ्यावयाचा करार केला आहे. त्यापैकीं, वद्दल देणे, नारायण बाबूराव वैद्य याचे गुजारतींनें कठी मोत्यांची एक सालमजकुरी सरकारात खरेदी केली. त्याची किंमत रुपये ११९००० एक लक्ष एकोणिस हजार रा। देविले असेत. तर पावते करून पावलियाचें कबज घ्यावें. रा। छ २१ मोहरम, सुा। इसन्ने मयातैन व अल्लफ. बहुत काय लिहिणें ? लोभ असों दीजे. हे विनति. सिका बार.

---

पत्रांक ५६६ श्रीसाव. १७२४ वैशाख वद्य ९

श्रीमत वेदशास्त्रसपन्न राजमान्य राजश्री लक्ष्मीनारायण दीक्षित स्वामीचे सेवेसी:—

विद्यार्थी बापू गोखले याचे अनेक सा। नमस्कार विज्ञापना विशेष. ता।

वैशाख वैद्य ९ पावेतों आपले आशीर्वादेंकरोन श्रीसमीप खुशाल असों विशेष आपण पत्र व वर्षी पाठविली ती पोंहचती केली त्याचें प्रत्योत्तर आणोन आपणाकडे पाठवावें, त्यांस प्रविष्ट केल्यावर दुसरे दिवशीं ज्वर ये ऊन अस्वस्थ पडलों त्यावर, पोर्णिमेअनतर स्नान केलें आतां शरीर स्वस्थ झालें त्यास, हालीं जाऊन कागदाचें प्रत्युत्तर पाठविलें आहे पावेल अ णखी वो चिंतु जोशी कायगांवकर आले होते त्यांनी श्रीमताची भेट बक मटद्वारा घेवली परतु मोरोपंत गोखले याच्या मधूनी भेट उत्तम झाली होती याचा विचार काय असेल तो यावरून ध्यानास येईल तथापि भेटी नंतर श्रीमत वो हरिहर दीक्षित सातान्यास असतात साप्रत ते आपल्या भेटीस येणार म्हणोन सांगितलें त्यावरून रा विसोबा नाईक थत्ते यास विचारिलें कीं हरिहर दीक्षित कोणते ! तेव्हा विसोबानाईक यांणीं सांगितलें कीं, श्रीमंत रा मो रामचद्र दीक्षित वाल्या यांचे बधू ते बहुत थोर आहेत पुण्यास त्यांचे येणें बहुत नाहीं स्नानसध्या बहुत करीत सातान्यास असतात याचा विचार काय असेल तो लिहावा मलाहि पुसलें कीं, त्याचा सप्रदाय बोलावण्यापासून यायाचा नाहीं त्यास, श्रीमंत वा नानाजी यांस लिहून काय विचार असेल तो समजवावायाकरीतां लिहिलें आहे आणीक चिरंजी वांनी पत्र पाठविलें आहे त्यास, तेंहि आपल्याकडे पाठविलें आहे हालीं वर्तमान तर पुण्याकडील सखाराम घाटग्या नगरास दो चौ दिवसीं येतील पुण्यांत नाकेबदी श्रीमताची बसली हालीं कारभार श्रीमतच स्वतां करीत कळावें काहीं दिवसीं विदुराचें पारपत्य होईल कळावें बहुत काय लिहिणे ! हे विज्ञापना

रा बाबा गोळे यांनी याद पाहून असेली मागारी दिल्ही यादहि मागोन पाठऊन देतों हे विज्ञापना *

---

पत्रांक ५६७ श्री १७२४ वैशाख वद्य ११

यादी खिसमतगार निा शागिर्दपेशा स्वारी राजश्री पंत प्रधान सुा इसने मयातैन कामगारीस येशवतराव होळकर मानकोजेस जावात सवय रो घुमाही छ १ सवालचा सा

५ सकोजी भिस्यारा

६ शिदोजी सावत

---

११

---

* हे सर्व पत्र बापू गोखल्यांच्या हातचें असून यालबोधींत आहे

११ छ १ जिल्हेजचा रोजमुरा दुमाही.

---

२२

दोन खिजमतगार मेहेरबान होळकर यांजकडे कामगिरीस जातात. सबब, रोजमुरे दुमाही दोन एा बेरीज रुपये देणें. (पो ) छ २४ मोहरम, वैशाख रुन इसने मयातैन. चिठी लिहिणें.

---

पत्रांक ५६८ श्री १७२४ वैशाख वद्य ११

( फारशी शिक्का आहे. )

सा मो मौजे कायेगाव प्रो गंगापूर. मुा इसन्ने मयातैन व अलफ. तुह्मी फौजेचे दहशतीकरिता हवालदील जाहलांत, ह्मणोन राजश्री नारो वल्लाळ यांनी हुजूर विदित केलें. त्याजवरून कौल सादर केला असे तर, तुह्मी खातरजमा राखोन मौजे मजकुरी आबाद राहणें. फौजेचा उपसर्ग तुह्मांकडे कांहीं लागणार नाहीं. सा छ २४ मोहरम. मोर्तबसूद.

---

पत्रांक ५६९

पौ जेष्ट वद्य १२ श्री १७२४ वैशाख वद्य ११

यकायेक व नारफ अगाह नाना दीक्षित सलामत:—

अजतरफ शाहमादख्वां बहादर बाद बंदगी आंकी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे. विशेष. आपण फौजेचे दहशतीकरिता हावलदिल जालांत, ह्मणोन राजश्री नारो वल्लाळ यांनी सांगितलें. त्याजवरून आपणास पत्र लिहिलें असे. तर, आपण फौजेचा वसवास चित्तांत न आनितां खातरजमा राखोन मौजे कायगावीं स्थिरता करावी. आपणाकडेस कांहीं उपसर्ग लागणार नाहीं. बहुत काय लिा ! सा छ २४ मोहरम हे कितावत.*

---

पत्रांक ५७० श्री १७२४ वैशाख अखेर

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गंगाधरपंत तात्या स्वामीचे सेवेसीं:—

सेवक लक्षुमण उमाजी मुा सोलेगाव रामराम विनंती उपरी तुह्मी महादूवराबर पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. लष्करचे वर्तमान तर: बंगस याचा मुा मौजे काठीपिंपळगांवावर होता, अशी वातमी होती. परंतु, सतेमिथे हें कांहीं पुरतें कळलें नाहीं. दुसरें श्रीमंत येशवंतराव होळकर याचा मुकाम पुनतांब्यावरच आहे. त्याचा रोख वैजापूरचा दिसतो. ऐसें पत्र मेसीभालगावचें सोलेगांवकरी यांसी आलें. मेसीपासून खंडणी बागसानें रुा

---

* फारशी चौकोनी ढबू पैसा एवढी मोहोर आहे.

तीनशें घेतली परंतु मोंगलाई गांवचाही भीर. भामगावास आले को सेंदूरवरें हेही पळलें ऐसें वर्तमान आहे आर्हीं बुधवारीं कामगांवास आला आपले गांवचे दरोबस्त गुर्डेगांवाकडे गेलें आपणास कळावें ह ह

---

पत्रांक ५७१ श्री १७२४ वैशाख अखेर

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री दीक्षित बाबा स्वामीचे सेवेशी:—

रमाबाई जाधवराव दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असिलें पाहिजे विशेष बहुत दिवस जाले पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं त्यास, ऐसें नसावें सदैव येणारावरावर पत्रद्वारें आनंदवीत असावें यानंतर होळकर यांजकडील फवज बहुत देशीं घांट चढून आल्या, यामुळें बहुत चिंता लागली आहे कांठीपिंपळगांवावर पठाण याची फवज आली, म्हणोन वर्तमान ऐकतों त्यास, येविशींची बातमी आपल्यास पक्केपणें असेल त्यास पठाण कोठें आला आहे, पुढें कोणीकडे जाणार, खंडण्या घेतात, किंवा लूटलबाडी करितात, हें सविस्तर वर्तमान लिहून पाठवावें त्यास होळकर यांचे लष्करची बातमी असल्यास तेही त्याशामी बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति

---

पत्रांक ५७२ श्री १७२४ वैशाख

श्रीमद्वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री नानाजी दीक्षित स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थि गणेश शिवराम साष्टांग नमस्कार विज्ञापना येथें आज वर्तमान दाट ऐकण्यात आहे कीं, येशवंतराव होळकर यांची धुळ्यावर त्यांचा स्वारी आली त्याजवरून आपणास लिहिलें आहे तरी मालेगांवीं आपला गडी गेला तो कालच याबाबत आपलें लिहिण्यांत काल होतें त्यास, माणूस आलें असल्यास, तेथील काय पत्र आलें असेल, तें पाठवावें अथवा मालेगांवचें माणूस आलें नसल्यास, आज आलियावर सविस्तर कळविल्यास आज्ञा असावी येथें आज वर्तमान ऐकतों येविशींचि आपलें ऐकण्यांत कसें आहे, तेंहि लिहिलें पाहिजे सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक ५७३ श्री १७२४ वैशाख

विशेष. राजश्री येशवंतराव होळकर यांजकडील फौजा या प्रांतीं येताव यामुळें विरस्थळीं क्षेत्रस्थ ब्राह्मण भयभीत जाले परंतु सर्व ब्राह्मणांची काळजी आपणास यामुळें येविशींचा बंदोबस्त जालाच आहे येणेंकरून या फत्तेसिंगराव मामे व नबाब अमीरुद्दौलाबहादर यांणीं उपसर्ग दिल्हा नाहीं परंतु अमीरुद्दौला यांचें ठाणें को पीड किनगाव वगैरे पो पैठण येथें आहेत ते वेधून का सातारेनजीक औरंगाबाद येथें स्वारासमागमें ठाणेदार चिठी

पाली जे, नबाब यांनीं आह्मांस वरात कायगांवसातारे हरदू गांवावर दिल्ही आहे. त्यास, कमरखुलाई वगैरे रुा ६०० देऊन वरातीचे जाबसालास येणें. याप्रों चिठी घेऊन स्वार सातान्यास गेले. त्यांनीं तेथें उपद्रव विशेष दिल्हा. याच अन्वयें चिठी मीा मारीं कायगावीं आली. क्षेत्रास उपसर्ग होऊ नये, याप्रों आज्ञा निक्षुन आहे. असें उभयता सरदार याचेंहि सागणें पडलें. परंतु या संस्थानाकडे काा सातारे पाा मार व पाा गांडापूर पाा कायगाव व काठेपिंपळगाव व पों नेमभे पौ मौजे जोलके ऐसें च्यार गांव सरकारातून सदावर्तीचें बेगमीस देणें आहे. यास्तव, सदरहू च्यारी गाव व त्र्यस्थळीं क्षेत्रास उपसर्ग हरएकाविषयीं देऊं नये. याप्रों माने व अमीरुद्दौला यास पत्रें असावीं. या अन्वयें सख्त आज्ञा आहेच. परंतु पत्रें असल्यास विशेष बचाव होईल. सस्थानाचा अभिमान सर्वोपरी आपणासच, त्याअर्थी विशेष लिहा-वेसें नाहीं.

---

पत्रांक ५७४ श्री १७२४ वैशाख.

विशेष. आपण खासा स्वारी, फौजसुद्धां, खानदेश प्रांतीं आल्याचें वर्तमान ऐकून बहुत संतोष जाहला. पुढें राजश्री फत्तेसिंगराव माने वगैरे फौजा या प्रांतीं रवाना जाल्या. जनवार्ता सैन्याचा उपद्रव. याजमुळें तिरस्थळीं क्षेत्रस्थ ब्राह्मणांस भय उत्पन्न जालें. सालगुदस्ता क्षेत्र कायगांव पेंढारी यानीं लुटलें. त्या भयामुळें अधिक भय प्राप्त जालें! परंतु फत्तेसिंगराव माने क्षेत्र पुणतावे येथें आले. त्या मुकामीं त्र्यस्थळीं क्षेत्रस्थ ब्राह्मण श्रीफल घेऊन गेले. त्यांनींही अभय दिल्हें जे, आह्मास येविशींची सुभेदाराची आज्ञा आहे जे, क्षेत्रास उपसर्ग देऊ नये. त्याजवरून सर्वांस सतोष जाला. हालीं नबाबअमीरुद्दौलाबहादुर फौजेसुद्धां काा नजीक कायगाव गाडापूर येथें आले. त्याजकडीलही किमपि उपसर्ग क्षेत्रास लागला नाहीं. त्याजवरून माने यांचें सांगणें पडलें त्याप्रों ताकीद आहे, हें सर्वांस अनुभऊन सतोष जाला. तो पत्रीं कोठवर ल्याहावा! पूर्वापार आपले सरदारींत या संस्थानचा अभिमानच आहे. तदनुसार हालीं आपणासही अभिमान आहे, हें दृष्टोत्पत्तीस आलें. या सस्थानाकडे पाा गांडापूर पों कायगाव व काठेपिंपळगाव व कसबें सातारें पाा मार व मौजे जोळकें पाा नेवासें हे चार गांव सदावर्ताबद्दल इनामी आहेत. त्यास, साहा वर्षें या प्रांतीं शिंदे वगैरे फौजा होत्या. त्याचे उपसर्गामुळें एक पैसा नाहीं. सालगुदस्ता शिंदे हिंदुस्थानात गेल्यापासून काहीं वस्ती जाली, प्रस्तुत अमीरुद्दौलाबाहादर पों आबड येथें गेले. त्यांचे मागें ठाणें बिडकी किनगांवींहून ठाणेदार याणीं सातारेयास चिठी पाठविली जे, मौजे कायगांव व सातारे दोन्ही तनखा दिल्ही आहे, त्यास कमरखुलाई व मसाला ६०० रुपये देऊन जाबसालास येणें. त्याजवरून अमीरुद्दौला याजकडेही कोणी बोलण्यास

पाठविले आहेत बहुतकरून आपली सक्त ताकीद आहे त्याजवरून निभारण होईल परंतु वारंवार उपद्रव लागतात, त्याचा विस्तार पत्रीं काय लिहावा ! सांप्रत, या फत्तेसिंगराव माने व अमीरुद्दौला यांस व आणखी पागे वपथके यांस सदरहूप्रों निक्षून ताकीदपत्र असल्यानें ठीक पडेल पूर्वीपासून या संस्थानाचा अभिमान आपले सरदारींत आहे त्याप्रों आपण चालवितात हें श्रेयस्कर आहे एक अभयपत्र तिरस्थळीं क्षेत्रस्थ समस्त ब्राह्मणांस असावें

---

पत्रांक ५७५ श्री १७२४ वैशाख

विशेष आपण त्यारीसुद्धा खानदेशांत आलां पुढें या प्रांतीं फौजसुद्धां येणार हें वर्तमान ऐकिल्यावर बहुत संतोष जाहला राजश्री फत्तेसिंगराव माने वगैरे फौजासुद्धां पुढें याप्रांतीं रवानगी झाली अनवार्ता जे, उपद्रव आहे या अमुळें तिरस्थळीं क्षेत्रस्थ ब्राह्मण भयाभीत आले परंतु सर्वांचे मनांत कल्पना आली जे, मुख्य ठिकाणाहून क्षेत्रास उपसर्ग होऊं नये, अशी ताकीद असेल असें जाणून माने यांजकडे तिरस्थळीं क्षेत्रस्थ ब्राह्मण श्रीफळ घेऊन गेले तेथें गेल्यानंतर ब्राह्मणाचा सन्मान करून आपलें नांवें सर्व ब्राह्मणांस अभय पत्र दिल्हें की, स्वस्वधर्में स्नानसंध्या करून राज्याचें अभीष्टचिंतन करून असावें त्याजवरून परम समाधान जालें आणि लौकिकांत ऐकिल्यांत आहे जे, ब्राह्मणांविषयीं बहुत ताकीद मकिपुर सर आहे त्याप्रों अनुभवहि दृष्टो त्पत्तीस आला पूर्वापार आपले सरदारींत व संस्थानाविषयीं आस्थाच आहे तेणेंकरून ईश्वरें सर्वोपरी यश्वंच केलीं प्रस्तुत, आपणाकडील फौजाचीहि वर्तणूक पूर्वसांप्रदायानुरूप होईल येथील संस्थानाकडे पा गोदापूर माहाल चे मौजे कामगांव व काठेपिंपळगांव व जोगळें पो नेवासें असे गांव आहेत त्यास, पागेपथके यांचा उपसर्ग हरएकविषीं न व्हावा, येविषीं ताकीद आहेच परंतु याअन्वयें ताकीदपत्र असावें या तिरस्थळीस, शिंदे या प्रांतीं होते तों पावेतों, बहुत छळणा झाली हालीं मीरखान पठाण वारीसिंगचे येथें आले येथें गंगा उतरावयासी येणार, ऐसें ऐकितों त्याजवरून तिरस्थळी बहुत भयाभीत आली त्यास या क्षेत्राविषयीं मीरखां यांस निक्षुन ताकीद पत्र * असावें

---

पत्रांक ५७६ श्री १७२४ ज्येष्ठ शुद्ध ४

राजश्री नारायण बाबूराव स्वामी गोसावी यांसी —

विनंति उपरी शुक्री छ २ सफरचें पत्र पाठविलें तें पावलें यशवंतराव होळकर याची चाल इकडे, याप्रों वर्तमान अहूंकाहून आहे येविषींचा वि

---

* हा मसुदा आहे

चार करणार स्वामी समर्थ आहेत, म्हणोन लिहिलें. त्यास, या मजकुराचें रा बाळोजी कुंजर याजकडून काल पत्र आलें. त्याचें उत्तर सविस्तर लिहून पाठविलें आहे. त्यांत तुह्मांस व रा निंबाजी भास्कर यांस घेऊन विचार करावा. असें लिहिलें आहे. तें तसेंच करतील. दुसरा मजकूर तुह्मीं नाजुक लिहिला व नावनिशीची याद अलाहिदा पाठविली ती पावली. सगतवार मजकूर चांगला लिहिला तो हुजूरचेंहि मनास प्रशस्त वाटला. नांवनिशीं लिहिली त्यांत एकाधे ठिकाणीं एकाधा गुण मिळतो, एकाधा मिळत नाहीं. याजकरिता आणखी नावें, आवास व तुह्मांस सुचतील तीं या कामास योग्य अशा माणसाचीं लिहून पाठवणें. जाणिजे. छ ३ सफर. हे विनंती.

पो छ ४ सफर ज्येष्ठ शुद्ध ६ शुक्रवार शके १७२४

---

पत्रांक ५७७ श्री. १७२४ ज्येष्ठ शुद्ध ११

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री नाना दीक्षित स्वामीचे सेवेसी:—

विद्यार्थी धोंडो बाजीराव कृतानेक सां नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता। ११ माहे सफर पर्यंत यथास्थित असे. विशेष. येथून सडी फौज तयार होऊन पटाण नि॥ होळकर याचे फौजेवर गेली. याची त्याची लढाई जुपली आहे. श्रीहरी कृपा करून यश येईल तेव्हां खरें. परतु फौजेस खर्चास पाठविलें पाहिजे. याजकरितां रोजगुदस्ता शिदूजी पा॥ आपणाकडोन येथें आलें होतें, त्यासींहि समक्ष बोललों होतों. त्याणीं आपणास निवेदन केलेंच असेल. आणि विनतिपत्र लिहिलें आहे. तरी, काहीं ऐवज पाठऊन द्यावा. एथें ऐवज येऊन दाखल जाहल्यास चिठी लेहून पाठऊ. परतु, या प्रसगीं स्वामी महाराजानीं आनमान केल्यास आपल्यास युक्त दिसणार नाहीं. भरवसा जाणून विनतिपत्र लिहिलें आहे. अव्हेर न करितां पाचहजार पर्यंत सरबराई करून पाठवावी व गांडापूरचे वाणीउदमी निघोन कायगांवास आले आहेत. त्यास ताकीद करून येथें पाठऊन द्यावें. आणि कांहीं दोन खडीची कणीक व दाहा पधरा मण तादूळ व डाळ तुरीची एक खडी व तुपाच्या जोड्या एक दोन बैलावर घालून पाठऊन द्यावे. येविशी तिळमात्र आणमान होऊ नये. तेथून सरंजाम न आल्यास कायगावास येईल. नंतर आपण दोष ठेवितील. जाणून सरजाम जलद पाठऊन द्यावे. व ऐवजावीशी अनमान न करितां ऐवज हरतरवीज करून पाठऊन द्यावा. या प्रसगास सरबराई केलियास, तीर्थस्वरूप राजश्री मलबादादा याजवर बहुत उपकार आहे. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

पत्रांक ५७८ श्री १७२४ ज्येष्ठ शुद्ध ११

स्वामीचे सेवेसीः सेवक बोडो बाजीराव कृतानेक सां नमस्कार विनंती विज्ञापना येथून फौज लाखुरावर पठाणाचे फौजेवर जाऊन लढाई मेतली तोफा वगैरे हस्तगत झाल्या त्याला पठाण व मान्या हे दोनचे लोकानिशी लाखुरास गेला आहे गांवचा आसरा करून बीध लपविला आपले कृपेकरून प्रहरादोनप्र हरांत तोही हस्तगत होईलसें दिसते ईश्वरम्यस्थळीचे आशीर्वादें फत्ते जाहली आपणास कळावें, म्हणोन विनंती लिहिली आहे आगाऊ ऐवजाविशी विनंती पत्र लिहिले आहे तरी, या प्रसंगास तूर्त दोन हजार रुा पाठऊन द्यावे येणेकरून स्वामीचा लौकीक होऊन मखमादाराचा यांजवर बहुत कृपा केलीशी होईल आणि उपकाराचा अर्थ बहुत दिवस आठव आहे बाकीमाच ताकीद करून शिलस रवाना करून यावा मरंवसा जाणून विनापित्र लिहिलें आहे तरी, भगत्यरूप ऐवजाची सरबराई करावी येथेल अनमान करूं नये अनमान केलियास तुम्हांस श्रीची शपत असे येपत घाढून लिा म्हणोन यागास न यावें असूद जाणून विनंती येपतपुरस्कार लिा आहे येविशी श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक ५७९ श्री १७२४ ज्येष्ठ शुद्ध ११

वेदमूर्ती राजमान्य राजश्री हरभटबाबा व सखारामबापू स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थी सखाराम सदाशीव करद्वय जोडून सां नमस्कार विज्ञापना येथील क्षेम ता ज्येष्ठ शुद्ध ११ मुकाम लष्कर नजीक पुण्यस्तंब येथें आपले आशी र्वादेंकरून यथास्थित असों विशेष आपण कृपा करून आशीर्वादपत्र पा ठें पावलें लिहिला मजकूर कीं, श्रीमंत रा येशवंतराव होळकर यांच्या फौजा घांटाखालीं उतरल्या आहेत त्यांचे दहशतीनें क्षिरस्थळींचे ब्राह्मण भयाभीत जाले हें ऐकून ब्राह्मणमंडळी येथल्याचे मुकामीं आली ते समयीं रा मामांची भेट करून सरदारांचें अभयपत्र दिल्हेंच होतें हालीं गांडापूर प्रांतीं रा बापू माणे आले त्यांजला व पागेपथके येतील त्यांजला एक ताकीदपत्र घेऊन पा द्यावें ऐशियास, आपलें पत्र आलें तें बाबास दाखऊन दकारचीं पत्रें दोन व रा बाबाचें एक एकूण येणेंप्रा सेवेशीं पा आहेत पावतांच लष्क रचा करभार आणि वर आस्तवस्त फार, आपल्यास उपद्रव लागल्यास यथाप्र पत्र लिहीत जावें ते बंदोबस्त करितील चिंता नाहीं ह ह ह

---

पत्रांक ५८० श्री १७२४ ज्येष्ठ शुद्ध ११

वेदमूर्ती राजमान्य राजश्री हरभटबाबा व सखारामभट स्वामीचे सेवेसी —

सेवक रामराव बगाजी कृतानेक सां नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता ज्येष्ठ शुद्ध ११ मुकाम लष्कर नजीक पुण्यस्तंब जाणोन स्वकीय कुशल

लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. ( सर ) कारी फौजा गंगातीरीं आल्यामुळें तिरस्थळीचे ब्राह्मण बहुत भयाभीत जाहले आहेत. त्यावरून पत्र पाठऊन, क्षेत्रींचे ब्राह्मणाचीं खातरजमा करून, फौजेकडील सरदारांकडूनही कोणेविशीं उपसर्ग न लागे, तो अर्थ करावा. म्हणोन विस्तारें लेखन केलें. त्यावरून राजश्री फत्तेसिंगराव माने यांजला पेशर्जी सांगून खातरजमाचीं पत्रें दिल्हींच होतीं. हालीं आणखी सांगून सरकारीपत्र व कोणी हरामी यांचे नांवें चिठी असें पाठविले असेत. येथूनही ताकीद करावयाची तितकी करीतच आहोत. सरकारीपत्र तुमचे क्षेत्राचे नांवे व स्वारप्यादा याचे नांवें ताकीदपत्र दिल्हें आहे. तें ठेऊन घेऊन, जो कोणी येईल त्याजला दाखऊन, आपले जवळ ठेवींत जावें. उपद्रव लागणार नाहीं. येविशीं रा बाजीकडीलही ताकीद आह्मास पहिल्यापासून आहे. परतु आमचे चालेल तेथवर आळस होणार नाहीं. आपलेंही सर्व ध्यानातच असेल. बहुत काय लिहिणें ? लोभ करावा हे विनंती.

---

पत्रांक ५८१

पो जेष्ट वद्य १३ श्री १७२४ ज्येष्ठ वद्य ११

श्रीमत वेदशास्त्रसपन्न राजमान्य राजश्री नानाजी स्वामींचे सेवेसी:—

विद्यार्थी नारो बल्लाळ चितळे चरणावर मस्तक ठेवून सा नमस्कार विज्ञापना ता जेष्ट वा ११ मदवार मुा लष्कर नजीक वैजापूर येथें स्वामीचे कृपेकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं पत्र रा धोंडोपत याजबा पाठविलें तें पावले. व जबानीं मारनिलेनीं सांगितले त्यावरून वर्तमान कळलें. लष्करचा दगा बहुत, ह्मणून तिरस्थळीस भय फार जाले, तुमचे खातरजमेचे पत्र आलें म्हणजे आह्मी स्वस्त राहू ह्मणून आज्ञा. त्यास, आह्मी येथे आपले सेवक आहों. त्यापेक्षा आपणास कोणे गोष्टीचा उपद्रव लागणार नाहीं. त्यावरून भाईशामतखासाहेबापाशीं बोलून आपणास एक पत्र व गावकरी यासीं कौल पठाणाचा पा आहे. पत्रात आपली फार खातरजमा करून पत्र खासाहेबानीं स्वामीस लिा आहे. त्याप्रों स्वामींनीं गावातून बाहेर कोठें न जावें. मी येथें आहें, तेव्हा खातरजमा असो द्यावी. आपण म्हणतील कीं, कालचें पत्रीं सूचना लिा. त्यास येथें आम्हीं खासाहेबाशीं पक्की खातरजमा आपलेविशीं करून वचन घेतलें. तेव्हा आमचीहि खातरजमा जाली. त्यावरून धोंडोपताबरोबर पत्रें पा, आहेत. पावतील. व जबानी मारनिल्हे विनति करितील. त्यावरून कळेल. लष्कर बहुतकरून तिकडे येऊ देणार नाहीं. दाहापाच कोशीं जाणार. जवळ लष्कर आलें ह्मणजे ताकीददार व कारकून गावास पा. मौजे काटीपिंपळगावींचा कौल पा,

तो गांवास पा यावा तेथेंहि ताकीदवार पा दोन रस्त लष्करचे आहेत मग पाहावें + आपण स्वस्थ असावें, बहुत काय लिहिणें हे विज्ञापना

---

पत्रांक ५८२ अखीफ १७२४ आषाढ शुद्ध १२

साहेब मेहेरबान दोस्तां बापूराव सलामहू

अजतर्फ सैद जाफरअलीखां बाहादूर बादजसलाम आंकी येथील खैरसल्ल जाणोन तुम्हीं आपली खमरखुषी कलमी करून दिल आराम करीत जावें दिगर मजकूर बादमुदत खत पाठविलें तें नेकसायेत पोहोंचून कमालखुषी हांसल जाली खतात मजकूर कीं येशवंतराव होळकर यामकडील फौजा बाट पदोन मीरखां पठाण वगैरे आले म्हणोन वर्तमान ऐकिलें त्यावरून आप त्यास लिहिलें असे तरी मीरखा कोठें मुकाम करून आहेत, व जावयाचा रोख कोण्हीकडे आहे, फौज व पेंढार वगैरे जमाव किती असे, म्हणोन लिहिलें ऐसीयास, सांत होळकर सर नेवुरबार, सुलतानपुरावर आहेत मीरखां पठाण नागडे वल्हेगांवचे दरम्यान मुकाम आहे फौजहि आठ दाहा हजार, हिंदुस्थानीं जावयाचे येत दोन आहेत एकतर आंबाडाकडे जावें, एक गंगा उतरून पार व्हावें येणेंप्रों मग पहावें, कोण्हीकडे जातात शाहमतखां चि ठ्ठवर आहेत नाशिकास संबंधा येता आहे मान्यामें वर्तमान आपणास व मसलेव असतील तुम्हीं आपलें वर्तमान हरवक्त कलमी करीत जावें ता छ ११ माहे रबिलाखर ज्यादाचे लिा प्यार मोहबत असो दीजे हे किताबत

---

पत्रांक ५८३ श्री १७२४ आषाढ शुद्ध १४

यादी नाना पुरंधरे व बाळोजी कुंजर यांजवळ ठरलें तें सुा सलास म मातैन व अलफ, माहे रबिलावल छ १२ रोज बुधवार

दाहा हजार व पागा मिळोन द रमाहा रुा २५००० यांची हजीरी
४००० करोल
६००० आडदस्तारी वगैरे

---

१००००

दोरा सरासरी रुा २५ प्रो सत समास लिहून घावि सोर्कात दोरा मो आहे त्याची मालमत्त होऊ मेये याप्रों बोलणें आहे

गारद व तोफखाना वगैरे पुरंधरे यांचे विचारें तोफा ठरतील त्याच माजीव तोफा पंधरा व पांच हजार गारद व दोन हजार फौज यांचा बं दोबस्त अलाहिदा गोविंदराव प्रो श्रेणे यांणीं करावा त्यांचा दरमाहा या आकार गोविंदराव यांचे विच मार्गे ठरला आहे त्याप्रों

हुजूर फौज ठेवायवाची घोंडोपा वगैरे जे ठरले आहेत त्याप्रों रहावें

सरजामी जे आहेत व येतील त्याची रवानगी व्हावी.

१ आगरे.

१ प्रतिनिधी.

१ मानकरी व सरजामी पथके विंचूरकर वगैरे.

१ चिंतामणराव.

१ गोखले.

नानापुरंधरे यांणीं तोफखान्याकडील पानशे वगैरे यापैकीं जो ठरेल ते बरोबर न्यावे.

---

पत्रांक ५८४ श्री. १७२४ आषाढ कृष्ण ४

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री येशवतराव याप्रति—

लक्ष्मीनारायण दीक्षित अनेक आशीर्वाद उपरी येथील क्षेम ता। ७ आषाढ कृष्ण चतुर्थी रविवार पावेतों कायगावीं यथास्थित असे विशेष. बहुत दिवस तुह्माकडून पत्र येऊन कुशल मजकूर समजत नाहीं. तेणेकरून चित्त सापेक्षित आहे. तरी असें नसावें. सदैव पत्रद्वारें कुशलवृत्तलेखन करून तोषवीत असावें. यानंतर आह्माकडील वर्तमान ता, या प्रांतीं फौजा आहेत. त्यांचें वर्तमान परस्परें कळेतच असेल. फत्तेसिंग माने यांनीं तिरस्थळीवर हा काळ पावेतो कृपा केली आहे. पुढील न कळे ! मीरखा पठाण दाहा हजार हिंदुस्थानी, शिवाय पेंढार ऐशा जमावानिशीं वारीसिंगवे येथून वीस कोशावर आहे. गंगा उतरावयास टोंक्यास येणार ऐसी वदंता आहे. त्याजवरून महद्भेद उत्पन्न झाला. श्री लज्या रक्षील ते खरी असो. परस्परें सदैव पत्रद्वारें कुशलवृत्त कळवीत जावें. आह्मास मङ्कुराची जरूर आहे. त्यास, दोन तोळे मंडूर कोणी सोईचा येईल त्याज बरोबर पाठवावा. बहुत काय लिहिणें? लोभ करावा. +++++ हे आशिर्वाद.

---

पत्रांक ५८५ श्री. १७२४ आषाढ वद्य ६

अज नवाब अमीरतदौला बाहादर ता। कमावीसदारान जमिदारान मौजे कायगाव सु॥ सलास मयातैन व अलफ. स्वारी याप्रांतीं नजीक आली. आपले गावास उपसर्ग होईल. सबब, अमरसिंग हलकारा पाठविला आहे. हा गावचा बंदोबस्त आपणास सांगेल त्याप्रो॥ करणे. च्यार स्वार ठेऊन, बाकी स्वारास रवाना करणें. गाव घाबरें न होय, लोक जनात आह्मावर निमित्य न ये, तें करणे. आह्मास सरकारआज्ञा कीं गंगातीरीचीं गावें यासीं

---

* यापुढील बंद गाहाळ आहे.

मुमाईम न होणें येविशीं आज्ञा म्हणोन लिा असे त्यातरजमेनें गावचा बंदोबस्त ठेऊन राहणें रा छ १९ मोह रावल मोर्तब सुद

---

पत्रांक ५८६ श्री १७२४ आषाढ वैद्य अखेर

पुढी छ २६ रावलची विनंतिपत्रें पा तीं पावलीं रा यशवंतराव होळकर याची तुमची भेट होऊन पुढी सरकारचें आज्ञापत्र त्यास दिलें व उत्तरें प्रत्योत्तरें जाली, तो मजकूर लिा तो समजला ऐशास यशवंतराव होळकर यांची तुमची भेट जाली व सरकारचें पत्र देऊन बोलणें जालें उत्तम आहे पुढी आज्ञा घेऊन आते वेळेस जें बोलणें त्याची आज्ञा समक्ष जालीच आहे त्या अन्वयें बोलून सर्व ठरेल तर्से सरत्तेवर विनंति लिहून पाठवणें मजकूर सरत्तेवर समजत जावा म्हणोन तुमच्या लिा प्रों डाक बसावयाची आज्ञा जाली आहे कळावें

---

पत्रांक ५८७ ह १७२४ श्रावण शुद्ध १

माई नवाब अमीरउद्दौला बाहादर महफुस बापदः—

अजिदिल एकलास पाराशर दादाजी व गोपाळराव गोविंद सलाम आंकी, येथील खैरखुशी जाणोन, आपकी खैर हमेशा कलमें करीत असावें दिगर आपलेकडील ठाणें कर्यें गाजापूर येथें आलें आहे, तेथून क्षेत्र कायगाव येथें स्वार पाठविले, आहेत, म्हणोन क्षेत्रींचे ब्राह्मणांचे सरकारांत बोभाट आला तेव्हां श्रीमंतांनीं आम्हास आज्ञा केली त्याअवरून आपणास लिहिलें आहे तरी ठाण्यात कोण असेल त्याजला निक्षूण ताकीद पाठऊन, स्वार पाठविले असतील त्यांस मनाई पाठऊन, एक पैसा खर्च न घेता, उठऊन न्यावे व क्षेत्र टोंक व प्रवरासंगम व कायगांव या तीहीं क्षेत्रींचे ब्राह्मण माहान समर्थ यजमान साहेबाचें कल्याणच इच्छून आहेत त्यास उपद्रव जाल्यानें कल्याण दायक नाहीं व यजमानसाहेबांचेंहि सांगणें आपल्यास आहे त्यापेक्षां आप त्याकडून क्षेत्रास उपद्रव होणार नाहीं परभारें आपल्यास न समजतां उपसर्ग होईल तरी क्षेत्रास हरएकविशीं उपद्रव न लागतां रखवाली होय तें करावें क्षेत्रींचे ब्राह्मण आपल्याकडे येतील त्यांस अभयपत्र देऊन, ब्राह्मणांचें समाधान व श्रीमंतांच्या मर्जीचा संतोष, व आपले यजमानाच्या कल्याणाबरहीव गोष्ट यावी आपण सुज्ञच आहां त्यापक्षीं विशेष काम लिहावें ? रा छ २९ रवि लावल ज्यादा काय लिहिणें ? प्यार मोहबत असों दीजे हे कितावत

---

पत्रांक ५८८ श्री १७२४ श्रावण शुद्ध २

श्रीमत सौभाग्यवती यज्ञकुंडेमंडित मातुश्री चिटकाबाई यया योसीः—

प्रति भास्कर विठ्ठल पटवर्धन सा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल

ता॥ श्रावण शुद्ध २ मंदवार पावेतो मु॥ काळसूर वर्तमान यथास्थित असे. विशेष. मान्ये याचा रोखा कान्हुरावर होऊन वीस हजारांचा खड जाला. त्याचे वसुलास स्वार आले ते वाड्यात राहून दगा बहुत केला आहे. तो पत्रीं कोठवर ल्याहावा ? ऐवजाचा भरणा होत नाहीं. पुढें काय होईल ते तें पाहावें. आपणाकडून सावजी गायकवाड आला. त्याणे आपल्याकडील सविस्तर...प्रसूत होऊन कन्या जाली, पधरावीस दिवस जाहले, पठाणाचा मुकाम कापशी वडगाववर होता, तेथून स्वार रोखा घेऊन कायगावीं आले आहेत, म्हणोन सांगितलें. त्याजवर काहीं समजत नाहीं. यामुळें चिंता बहुत लागली आहे. याजकरिता घमाजी टवळे मुजरत पा॥ आहे. तरी कायगावास काहीं उपद्रव लागला किंवा निवारण जाले, येविशीं सविस्तर लिहून पाठवावें. आपण सध्या-काळीं कोठें आहेत तेही ल्याहावें. खासा होळकर चांडवडास दाखल जाले, व पठाणही पैठणाकडे जाणार, म्हणोन इकडे वर्तमान ऐकण्यात आहे मान्ये याणीं खडण्या घेतल्या, त्या गावापासून फिरोन पठाणाच्या खडण्या होतात किंवा कसें आहे, हे सविस्तर लिहून पाठवावें. यजमान स्वामी उभयता मुला-माणसांसुद्धा पुण्यास सुखरूप आहेत. + + + हे विनंती.

---

पत्रांक ५८९* श्री. १७२४ श्रावण वद्य मध्य ७।८

यादी. रामचंद्र दीक्षित व लक्ष्मीनारायण दीक्षित कायगावकर. सु॥ सल्लास मयातैन व अलफ, उर्फ श्रावण वा॥ ५ स मीरखान पठाण नि॥ रा॥ येशवतराव होळकर याची फौजसुद्धा मु॥ मौजे कायगावीं आला. तेव्हा गावात त्याणीं दगा केला. त्याचे पुरवी एक दिवस आह्मी फौजेचे भयामुळे मुलेंमाणसेंसुद्धा गावातून निघोन सातारियास गेलो. तेथें राहन्याचा धीर पुरवेणा, ह्मणोन औरंगाबादेस आपल्या वाड्यात मुलेंमाणसेसुधा जाऊन राहिलो आणि सुभ्याची भेट घेऊन त्यास वर्तमान सांगितलें. त्याणीं बहुतप्रकारें आमची खातरजमा केली, तुह्मास कोणतेहि गोष्टीची तोशीस लागणार नाहीं, तुह्मीं आपले घरात स्वस्त राहाणे. त्याजवरून आह्मीं घरात स्वस्त राहिलों. इकडे कायगावीं पठाणानीं उपद्रव करून, गरीबगुरीब ब्राह्मण गावामध्ये सापडे त्यास धरून, बहुत मारहाण केली. त्यात च्यार ब्राह्मण मेले. गावच्या

---

* ह्या पत्रातील खोडाखोडीवरून हें पत्र मसुदा म्हणून लिहिलेलें असावें पुष्कळ ठिकाणीं खोडलेलें असून आजूबाजूनेंहि शोध घातले असल्यामुळें ह्या पत्रास वैश्वदेवातील बलिहरणाची उपमा देण्यास हरकत वाटत नाहीं. वर पत्रात ज्या शब्दावर आकडे घातले आहेत त्या शब्दापुढे जे शब्द खोडलेले आहेत ते पुढें दिले आहेत १. पठाणानीं गावात दगा केला. त्यास. २. बहुत उपद्रव केला. गावातील घरें उघडून चीजबस्त उकरून नेऊन घरास

ब्राह्मणास व आमच्या मातुश्रीस धरून लष्करात नेऊन गांवचे मुकामीं घेऊन गेले गांवची खंडणी पस्तीसहजार रुपये करून व गांवकरी मिळून वसूल देऊं लागले कांहीं वसूल दिल्हा बाकी दाहाहजार रुपये राहिले तेव्हां गांवकरी दोन ब्राह्मण पठाणाकडील दोन प्यादे घेऊन, औरंगाबादेस आम्हाकडे आले आमची त्यांची गाठ पडली ब्राह्मण आम्हांस म्हणूं लागले कीं, दाहा हजार रुपये पठाणाचे देणें राहिले आहेत त्याची तजवीज जाली पाहिजे आमचे वाडे उभयतांचे छुटले नंतर मातुश्रीस लष्करांत घेऊन गेले नंतर पठाण यांणीं विच्यार करून त्यांचीं घरेंहि खानलीं आणि मातोश्रीस आणावयाचें प्रयोजन काय, हें समजून मातुश्रीस सोडून दिल्हें नंतर आपण कूच करून गेला मातुश्री गंगेचे काठीं येऊन बसली तेव्हां मुर्तजाले याचा वकील पठाणाचे लष्करांत होता तोहि तेथें आला मातुश्रीची त्याची वाटेस नेऊरगावीं गांठ पडली तेव्हा मातुश्री कायगावास घेऊन आला मातुश्रीची व मुरतजाल्या कडील वकिलाची नेवरगावीं गांठ पडली तेथें वकीलयांणीं तसदी केली कीं, तुम्हास एकवीस हजार रुपये करार करून सोडविलें असें तेव्हां मातुश्री बोलिले कीं, सोडावयाचें कारण नव्हतें, पठाण समागमें नेते तरी जातें ! तेव्हां तसदी करून मातुश्रीपासून वाटेमध्ये रोखा रुा साडेएकवीस हजाराचा लिहून घेऊन कायगावास घेऊन आला तेथेंहि पैक्याकरितां तसदी केली पैसा निघेना, या दुसरे दिवशीं शहरास घेऊन जाऊन परभारें पंधरा दिवस भर

---

खालत्या छावित्या—कांहीं ३ हें वर्तमान शहरास आलें बायकामुळें सुद्धां ४ आणि गावची खंडणी पस्तीस हजार रुा केली त्याचा वसूलहि त्यांणीं बहुतक रून घेतला हजार दोन हजार रुपये बाकी राहिली त्याजवरून आमचे वाडे उभयताचे छुटले आणि मातुश्रीस लष्करात धरून गेले ५ तेथेंहि तसदी मातुश्रीस रुा विशीं केली त्यांनीं उत्तर केलें कीं, मजपाशीं रुा नाहीं तेव्हां दुसरे दिवशीं मातुश्रीस घेऊन आवरंगाबादेस आला, आणि कोठल्यांत कैद करून ठेविली हें वर्तमान आम्हांस समजल्यानंतर आम्ही छपून राहिलों तुम्हाकडे जाऊन बोलणें बोलावें, त्यास आम्हांसहि कैद करतील हें मनांत आणून त्यांजकडे गेलों नाहीं तेव्हा सोवारांनीं त्यांनीं मातुश्रीस सोडून व गांस आणून घातल्या त्या सर्वांत सुभ्यानें पठाणाचें नांव करून सावकारियांस वाडे संनि होते ते छुटून गाड्या भरून शहरास आणिल्या या प्रौ वर्तमान असे हें सर्व ध्यानास आणून आम्हांपासून व मातुश्रीपासून रोखे लिहून घे तले आहेत व सावारे येथील वाड्यांतील चीजवस्त नेली आहे ती माघारी देयावी व सातारियांस हरएक विशीं उपद्रव होतो तो होऊं नये असें जाहलें पाहिजे ( शेवटच्या टिपेंतील मजकूर खोडलेला नाहीं एका बाजूस अलग लिहिला आहे )

कैंत ठेविले. आम्हांस आश्रय कोणाचाच नाहीं. ज्याचा आश्रय केला तोच आम्हास मारतो ! असें समजले म्हणून तेथून निघोन धण्याच्या पायाजवळ आलों. पठाणाचे प्याद्या समवेत बसलों आहो, तों इतकियात सुरतवाले याजकडील पन्नास माणूस येऊन आम्हावर दगा केला. आम्हीं तोंड चुकविलें. तेव्हा घरातील बायका नेऊन लष्करातील बाजारात बसविल्या. तेव्हा आम्हीं गुलामहुसेन, सुभ्याकडील कारभारी, याजकडे गेलों आणि मजकूर सागितला. आम्हास म्हणू लागला कीं, तुम्हीं सरकारात पाच हजार रुा देणें व हजार रुा आम्हास अतस्थ देणें, एकूण सा हजार रुा देणें, म्हणजे तुमची मुलेंलेंकरें व चीजवस्त जी गेली असेल ती आणून देतों. त्याजवरून आम्हीं कबूल करून सा हजाराची चिठी बशर्त मुलेंलेंकरें व चीजवस्त आणून दिल्हा तर आम्हीं देऊ, म्हणोन लिहून दिल्ही. नतर बायका बसल्या होत्या त्या सुटोन घरास आल्या. पठाणाचे दोन प्यादे आले होते. त्यांणीं दोघां ब्राह्मणास घेऊन कायगावीं गेले. च्यार ब्राह्मण व आमची मातुश्री यास आणि आमचे दोनी वाडे लुटून खणून चीजबस्त घरातील घेऊन गेले.

---

पत्रांक ५९० श्री. १७२४ श्रावण शुद्ध १३

श्रीमत राजश्री जनार्दनपत दादा स्वामीचे सेवेसी:—

सेवक शिवराम कृष्ण कृतानेक सा। नमस्कार विनति येथील कुशल श्रावण शुध त्रयोदशींपर्यंत आपल्या कृपेंकरून यथास्थित असे. विशेष. बहुत दिवस जाले, पत्रीं परामर्ष न जाला. सेवक पदरींचा, साभाळ करावा. आपणास विदित असे. यानतर आपणाकडे जोडी गोवर्धन याजकडील आली. त्याबरोबर माझें पत्र चिरजीव चिटकोपतास पा। होते. त्यात चिठी आहे. ऐशियास, तें पत्र पुणेंस पोचोन प्रत्योत्तर आपणापाशीं येईल तें करावें. बहुत काय लिहिणें ! कृपालोभ असों दीजे हे विनति.

हो राजश्री दादोपत स्वामीचे सेवेसी. सा। नमस्कार. लोभास अतर न होय, तें करावे. लोभ कीजे हे विनति.

---

पत्रांक ५९१ श्री म्हाळसाकात. ( नकल. ) १७२४ श्रावण शुद्ध १३

वेदशास्त्रसपन्न राजश्री रामचद्र दीक्षित व लक्ष्मीनारायण दीक्षित गोसावी यासी:—

सकलगुणालकरणअखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्नो। येशवतराव होळकर दडवत विनति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. खानदेशप्रातीं खासा स्वारी आल्यावर, पुढे राजश्री फत्तेसिंगराव माने वगैरे फौजा याप्रातीं रवाना जा-

त्या अनवार्वा सैन्याचा उपद्रव । यामुळें कायगांव, टोंकें, प्रवरासंगम विर स्थळी क्षेत्राची आगां ब्राम्हणांस भय उत्पन्न जालें सालग्गा क्षेत्र कायगांव पेंढारी यांनीं लुटलें त्यामुळें भय अधिक उत्पन्न जालें त्यावरून क्षेत्रस्थ ब्राम्हण भीक्षु घेऊन मान्याच्या भेटीस पुण्यस्तमीं गेले त्यांनींहि अभय दिल्हें जे, आम्हास येविषीं सुभेदार साहेबाची आज्ञा आहे जे, क्षेत्रास उपसर्ग देऊं नये त्यावरून सर्वांस संतोष जाला हाली राजश्री नबाव अमीरउद्दौले फौजे मुद्दां कसबे गांडापूर येथें आले आंपलाकडे स्वारी जाणार त्यांजकडील उपसर्ग क्षेत्रास किमपि लागला नाहीं माने यांणीं खातरी केली, त्याप्रों अनुभवास सर्वांच्या आलें पूर्वापार कैलासवासी थोरले सुभेदारापासून या स्थळाचा अभिमान आहेच त्याप्रमाणें सांभाळ कराळच आम्हांकडील गांडापूर परगण्यातील तीन गाव व नेवास परगण्यांतील एक गांव, ऐसा च्यार गांव आहेत आज पाचसाहा वर्षे पायमालीनें खराब जालीं त्यांस, त्याचें व विर स्थळींचें सरक्षण घडावें, याकरितां नबाबास पत्र दिल्हें पाहिजे, म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें ऐशियास, तुम्हाकडील लक्ष्मण उमाजी यांजबराबर राजश्री अमीरुद्दौले याजला पत्र पाठविलें आहे हें त्यांजकडे पावतें करावें गांवांस उपद्रव देणार नाहींत सर्वदा पत्र पाठवून सतोषवीत जावें या छ ११ रमिलाखर, मुा सलास मयातैन व अलफ बहुत काम लिहिणें । हे विनति मोर्तबसुद सिका

---

पत्रांक ५९२ श्री ( नकल ) १७२४ श्रावण शुध ११

राजश्री केसो गगाधर साठे गोसावी यांसीः—

मुा सलास मयातैन व अलफ राजश्री येशवंतराव होळकर याची नजर सरकारावर वांकडी दिसोन, मान्येपठाण वगैरे फौजा जांपगांव पावेतों आल्या सरकारांतूनही होळकर यांचे मनातील वांकडेपणा समजोन फौजा तोंडावर पाठवावयाची तजवीज करून, पुरंधरे व पानसे याहेर काढाडले दहापंधरा हजार फौज व पांचसात हजार माणूस पायचें जमा करून, मानेपठाण यांस तबी पोंचावी हा विचार केला आहे पांडवगडचे मसलती व गेला आहां तर मेथपर्यंत समळ (फौजे) निशीं देसत चिठी गारदवड येथें जाणें आणि लिहून पाठवणें या कामास हुजुरून रा बापू विठ्ठल व दुसरे आा २ पो आहेत तरी विलंब न करणें आरब माणूस शिपाईगिरीस चांगलें होळकराची फौज कही, तेथें, योजना तशांचीच जाहली पाहिजे तरी, लौकर जाणें पोंडगच्या ठाइ सुटस्थाव चिंता नाहीं किल्याचा कद पारसा नाहीं रा वेंकटराव दसडेस पोंचोन, रा माळाजी रामचंद्र व लक्ष्मण महादेव व सखो धोंडदेव यांजपाशीं हजीरी देऊन, याचे गणतीचें पत्र हुजुर पाठऊन देणें आणिजे छ ११ रा सर.

मित्र, भिक्षुकब्राम्हण यहुतां दिवसाचे आश्रित तेथें आहे आहेत तेव्हां इत क्यांचा निरवाई करणें प्राप्त व आपला विषय तो असा आहे।

मी पुण्यात असता, कोणीएक सावकारास काम पडलें. तेव्हां, श्रीमतांनीं त्याचा भाव न जावा, याकरितां रात्रीस दोन लाख रुपये दिले दुसरे दि वशीं त्या गोष्टी निघाल्या तेव्हा आज्ञा जाहली कीं, जो माझा आहे तो समथ असतां त्याचे जसें चालवावयाचें तसें चालत आहे परतु तो दूर देशीं असतां व त्यास संकट पडलें असें मजला समजलें असतां, असेल तेथपर्यंत अशाची उपेक्षा करणार नाहीं त्या गोष्टीची आठवण मजला वारवार होते व तेथेंही स्मरण व्हावें म्हणोन ही गोष्ट लिहिली आहे सावकार कोणता तें ध्यानांत येईलच सांप्रत तसा प्रसंग प्राप्त जाहला आहे तो कसा म्हणाल तर, काशी यात्रेचें देणें सर्वच आहे व नित्यनैमित्य ज्या काळीं जें प्राप्त होतें त्याप्रमाणें खर्च करून आला दिवस लौकिकाप्रों कठावा लागतो येथील जन्मापासून स्थाई परस्परें सोयरेधायरे त्यांस देखील कर्जवाम मिळत नाहीं तेव्हां आम्ही परकीय आम्हांस कर्जवाम कसा मिळेल? तेव्हां हाही उपाय राहिला मोंसले यांस तो दैन्य दाखवावयाचें नाहीं येथील चार इष्टमैत्र म्हणावे तरी, दरबारीमार्चे घराऊ सुख दु ख सांगावें, असें नाहीं अशा चहूं कडोन अडचणी आणोन याची तोड मनांत आणिली कीं, श्रीमत समर्थ, धणी, वडील, आम्ही अज्ञान, त्यांचीं लेंकरें, तेव्हा तेच संकटातून पार पाड तील असें समजुन, पंचवीस हजार रुपये खासगीकडून कर्ज घ्यावें आणि त्याच्या हुंड्या तुम्ही तेथून करून पाठवाव्या याची फेरीविषई जशी आज्ञा येईल तसें करावयास येईल त्याप्रों कांहीं काशीस पाठवीन म्हणजे उतार साव यास लागा होईल आजपर्यंत सालाबाद बारा महिन्याचे बेगमीप्रों दोन महिन्यांची बेगमी बापतपुरस्कर नाहीं तेथून अशा उपराळा आहला असतां उपयोग होईल माझी उपेक्षा समर्थ होणार नाहीं मग परकी स्थळीं असतां कायी होईल? हा भरवंसा जाणोन लिहिलें आहे परतु तुम्हांकडून पत्रें दास विण्यास व विनंती करावयास आळस जाहल्याश उपाय नाहीं तेथें विनती केल्यावर जशी आज्ञा होईल तसें करावें

खर्च यावला असे कालदेशवर्तमान पाहून, कर्जास भेऊन, बंधू वेगळे निघावे अशा बेतांत आहेत वेगळे जाहल्यास निर्वाह कसा करावा, हाही अंदेशा वागवून आहेत मग पाहावें आमची सोय सरकारांतून काढावयाची कल्पना कोणती म्हणाल तर, पंचवीस तीस घोडीं घरचीं आहेत व आणखी पंचवीस घोडीं भरचीं करून, पनास घोड्याची पागा व त्यास हरकोठें बेगमी पुरते चार गांव सरंजांत वगैरे लावून दिल्यास, बंधू हुजूर राहून चाकरी करि तील येणेंकरून त्याची सोय निघाली वडिलाव्यास पडलेले होतील येविशीं

त्यांची इच्छा बहुत आहे जे, नांव लौकिक करावा. आण मींही थोड्या माणसांचे खर्चातून मोकळा होईन. मग वडिलाची मर्जी असेल तसा निर्वाह करोत.

१ पेशजीचा सग्रह काय आहे, तोही तुम्हांस माहीत आहे. त्याजवर साल गुदस्ता चिरंजीव बधूचें लग्न केलें. त्याचें कारण, आम्ही उभयता बंधूंपैकीं पुत्रसतती एकासही नाहीं. चार उपाय करणे ते केले. तसा हाही उपाय सर्वोनुमते करावा असें जाहाले. सबब, त्यासही नाव लौकिकाप्रमाणे वस्तवानी वगैरे खर्च केला पाहिजे. हात तर कोठें चालेना. सबब, मातुश्री व भावजई वगैरे बायकाची वस्तभाव घेऊन नवरेमुलीची भरती मात्र केली.

१ शिवाय, पाटण परगणेंयासी सालदरसाल पेढारी यांचा दगा जाता येता, व होळकराकडील नागो जिवाजी व बडवाले राजेरजवाडे वगैरे यांचा, व हालीं मीरखान याचा दगा, याजमुळे प्रांतात खराबा. तेव्हां ठाणें राखावयासंबंधीं व बंडवाले यांच्या खंडण्यासच ऐवज कर्ज काढून घालावा लागतो. हे पहिलेपासून तुम्हांस माहित आहेच व हिशेबही तेथें गेलेच आहेत. त्याजवरून समजलेच असेल.

श्रीमताच्या कृपेकरून नांवलौकिकासही आलो व चार पैसे मिळवून ससारासबधीं जीं जीं सुखें तीं सर्व भोगलीं. हें गृहकृत्य गौप्य असावे यास्तव सूचना लिहिली आहे. तुम्ही विनती करितां अशीच करावी, व तेथूनही घडेल, ही खातरजमा आहे.

---

पत्रांक ५९५ श्री. १७२४ भाद्रपद शुद्ध १

स्वामीचे सेवेसी. विनति सेवक मल्हार रामचंद्र कुळकर्णी सां नमस्कार विनति विज्ञापना ता भाद्रपद शुद्ध परियत आपले कृपेंकरून यथास्थित असें. + + + अलिकडे वर्तमानः—डालटन साहेब याचा मुख्य सरदार दीपन साहेब बऱ्हाणपुराकडून आला. भाद्रपद शुद्ध १ आपले गावी आला. त्यानेंहि बहुत गर्दी केली. शिवरामपंत तात्याची हवेली उघडून राहावयास येऊ लागला. मग मोठे प्रयासे अबादासपत सेंदुरणीकर याणीं बाहेर अभ्यकराचें वाड्यांत उतरविला. मोठी मारामार केली. ब्राह्मणाची आब ठेविली नाही. सदाशिव दिक्षितांचे आंगणांत घोडे बाधून माहाराची राहोटी दिली. मग, मोठ्या प्रयासें दुसरे दिवशीं तो माहार काहाडला. त्यानेंहि दोन हजार कडबा घेतला. कडबा कोठे मिळेना. उशीर लागला ह्मणोन, परसरामभटाचा हात बांधला, व मकवा होडले ! दाहापधरा चाबूक मारले. अंगुठा पिरगाळला. तो अद्यापि नीट जाला नाहीं. मग काल मगळवारीं दीपनसाहेब सडा उतरोन पुन्यास आला आहे. अबादासपतहि त्यासमागमेंच आहे.

आपले गावीं कपू उतरला. यानें अगोदर चदी वगैरे घेतले. तो मार

सविस्तर पत्रीं लिहिलाच आहे त्यावर, त्यानें आणखी चिठी मनश्री सरजा माची केली आसमास चिठीचा पाहता, दोनशें रुपये होऊं लागले मग बहुत प्रयत्न केला अबादासपतांनीं बहुता प्रकारें प्रयत्न केला परंतु तो ऐकेना अबादासपंतासीं त्यानें करार केला कीं चिठी माफ करतों अंबादास पुन्याकडे आला दुसरे दिवशीं नेहमीं शिपाई पाठवून सांहिंकाळपरियंत मला बसविलें सांहिंकाळीं दाहापांच ब्राह्मण तेथें पाठविले तो मनश्री बोलू लागला शेवटीं चिटीपो कांहीं जिनस घेतली बाकीहि उदईक या म्हणतो याप्रमाणें मोठी धूम केली पुढें कूचहि करित नाहीं राण फार बुडविलें सरी बाजरी तमाम घेतोच तोफेच्या चारले याप्रमाणें आजपरियत गर्दी केली पुढें काय करील, हें नकळे + + + हे विनंति

---

पत्रांक ५९६ श्री १७२४ भाद्रपद

यादी रामचंद्र दीक्षित व लक्ष्मण नारायण दीक्षित कायगांवकर यांचा फत्तेच्या निजाम व नवाजजंग यांजकडून होणें —

कायगांवीं पठाणाची फौज येऊन ब्राह्मण गांवांतील धरून मारहाण क (रून) पैका मागू लागले ससदी बहुत होऊं लागली घेतले, आणखी दाहा मागों लागले घरें लुटों लागले सबब मुख्यास मार सांगिला सुभे यांणीं करार केला कीं, पांच हजार रुपये, व एक हजार रुो दरबारखर्च ऐसा साहा हजार रुो द्यावे पठाणाची ठोक आम्ही पाठवितों तुम्हांस कांहीं तोशिस न लागतां कूच करवितों याप्रमाणें ठरून साहा हजार रुो चा दस्तऐवज सुभे यांणीं घेतला तेव्हां, पठाणाकडील आम्हास एक पैसा न पडतां त्यांणीं कूच करून जावें, कायगांवचे ब्राह्मण धोलीस पठाणापाशीं होते ते सुभे यांणीं आणून अवरंगाबादेस आपणांपाशीं पावते ( करावे ), तें कांहीं एक केलें नाहीं पठाणांनीं मारहाण ब्राह्मणास करून * लष्करांत गेले

---

पत्रांक ५९७ श्री १७२४ भाद्रपद शुद्ध ७

अमीरउद्दौला बाहादर।—

खां साहेब मुशफक मेहेरबान मीर कमोयनुद्दीन अलीखां बाहादूर यांसी लक्ष्मीबाई व सौ मैनाबाई दीक्षित पाठणकर व परशरामभट व लक्ष्मणपंत मौजे कायगांव आशीर्वाद उपरी नबाब यांचे लवाजी पो रु। २०५०० अक्षरीं वीस हजार पांचसें राहिले त्यास, सदरहू ऐवज त्यांचे सरकांत तुम्हां कडोन देविला असे हा ऐवज शहरीं गेलियावर चौथये दिवशीं दाहा हजार

---

* फुल्याच्या ठिकाणीं पुढील शब्द खोडले आहेत।—" पैका मनश्री घेतला, घाडे लुटोन नेले, सिवाय मातोश्रीस घेऊन "

रुपये आपलियास देऊं. व पुढें आठवे दिवशीं साडे दाहा हजाराचा भरणा करून देऊं.सदर वाइद्याप्रो झाडा करून देऊं हा करार लिहून दिल्हा. सही दस्तुर लक्ष्मण रावजीचा असे. सके १७२४ दुंदुभीनाम सवत्सरे * भाद्रपद शुद्ध ७
साक्ष रतनगीर बोवा गोसावी.

---

पत्रांक ५९८ श्री. (मसूदा) १७२४ भाद्रपद शुद्ध ८

जगंनाथपत यांचे नांवें पत्र पाटणास लिा दिल्हें.

विशेष. सीतलगीर गोसांवी काा पाटण येथे राहत होता. त्यास सागरवाले याणीं सस्थान घेतलें त्यावेळेस गोसावी मजकूर परागदा होऊन श्री काशींत वीसबेवीस वर्षे राहिले. हालीं सस्थान सागरवाले यांजकडोन राजश्री सेनासाहेबसुभा याजकडे सरकारांतून देविलें. तेव्हा पाटण माहाल सरकारात ठेविला. हें वर्तमान गोसावीमाार याने आइकिलें. त्याजवरोन काशीहून निघोन पाटणास तुमची भेट घेऊन आला. यासी, येऊन आह्मास भेटला. आपलें वर्तमान सागितलें. त्यावरोन गोसावी तेथील स्थाईक आणि सरकार-उपयोगी, तेथें राहिल्याने हरएक कामीं पडतील, ऐसें जाणोन, गोसावीमाार याची खातरी करून तुह्माकडे पाठविला आहे. त्यास काा पाटण येथे

१ काा मारीं मठ बांधावयासी जागा नेमून द्यावी. महिना पधरा दिवस दाहा पाच बेगारी लागल्यास द्यावे. याचे बोलणें की, तीन बागा कसब्यामध्यें आपले गुरूच्या हातच्या आहेत. त्याची चौकशी करून त्यातील एक बाग यास द्यावा. गगीबगीर गोसावी याचा मोठा बाग द्यावा. कलम १.

१ पाो मारीं गोसावी याची सावकारी बीज व नगदी वगैरे येणें आहे. त्यास, रयत रजावतीनें सरकार–नुकसान न होता, जसे ज्यापाशीं निघोन असामी कायम राहील, अशा तऱ्हेने हे मागतील. येविसीं तुह्मीं ताकीद रयतेस वगैरे करावी.

१ वस्तींत राहिल्यानतर नवी देवघेव करितील. येविशींचा तुमचा पक्ष असावा.

१ गोसावीमजकूर कसब्यांत मठ बांधून राहणार. तेव्हा दाहा पचवीस याजपाशीं अतीत राहातील. त्याचा योगक्षेम चालला पाहिजे, व सरकारचे उपयोगाचे आहेत, याजकरिता यास पड जमीन पडली आहे. त्यापैकी तीनशा रुपयाची काामारीं अगर हरएक गावीं पाटणचे माहालात चला बाधोन सरकारची सनद करून द्यावी.

---

* हे पत्र भीतीने गारून जाऊन अगदी कापत कापत लिहिलेलें आहे. पत्राच्या मथळ्यावर कोपऱ्यात फारशी मजकूर आहे.

१ गोसावीमार येथें राहणार, तेव्हां याचे किती धन्यावर व किती वाई टायर असतील यार्चे लक्ष पुर्ती ठेऊन, हरएकविसीं याची गौरसी करीत जावी

सदरहू कलमें ५ गोसावीमार दुसांमवळ आल्यानंतर शिपायों त्याची खा तरी करून याचा पुरसपाना करीत जावा फिरोन मोभाट येऊ न द्यावा रा छ ७ जावल, सु॥ सलास मयातैन व अलफ

---

पत्रांक ५९९ श्री १७२४ भाद्रपद

याद रामचद्र दीक्षित व लक्ष्मीनारायण दीक्षित कायगांवकर यांचा फडन्या निजाम नयानंग याजकडून होणें सा —

१ दीक्षित यांजपासोन रोसा ( सा ह-)चार रुपयांचा घेतला शाहा ( मा )पर्से लष्करचे बाजारात नेऊन स प्यादे पाठऊन या ज्यांस दगा करून मायकाच धरून नेलें समय, यासी बयार्थ रोसा हरएक उपद्रव होणार नाहीं कलम

१ कायगांवचे याडे छुटून पठाणांनीं नेले आणि मानुभीस धरून लष्क रांत नेऊन गांवचे मुकामीं नेलें तेथून पठाणानीं मानुभीस माघारें पाठविलें तेव्हां मार्गांत वकिलांची गांठ पडून, तसदी करून, वाटेंत रोसा नेऊरगावीं साडेएकवीस हजार रुपयांचा घेतला आहे कलम

१ सातारें येथील याडे तीन पठाणांचें नांव करून छुटून गाड्या भरून शाहरास नेल्या चीजवस्त वगैरे सर्वही गेले त्याचा फडशा होणें कलम

एकूण तीन कलमांचा फडशा करून देवणें पुढें उपद्रव न व्हावा तप सीलाची याद पाहावी

---

पत्रांक ६०० श्री ( मतलब ) १७२४ भाद्रपद

यादी मतलब सीतलगीर गोसावी पो पाटण प्रांत गर्वेमहलें

१ पो पाटण येथें आमची लेवादेवी वडिलांपासोन गला व नगदी दीन वगैरे लोकाकडे येणें आहे त्याचा तगादा आम्हीं करूं जसें अेपून निघेल, असामीची अबादी राहून, तसें घेऊं येविसीं सरकारचा पत्र असावा कलम

१ महस्याचें संस्थान जेव्हां राज्याकडे होतें तेव्हां पामअकूरची मामलत आम्हाकडेच होती ते वेळेस आमचा मठ वगैरे राहाणें गर्गीसच होतें नंतर संस्थान सागरवाले यांणीं घेतलें त्या वेळेस आम्हीं निघोन काशीस गेलों तें आज बीसपंचवीस वर्षें तेथेंच आहों सांप्रत पा सरकारांत आला हें ऐकून एथें आलों त्यास, कसयें पाटण येथें आमच्या मठाची योजना करून, जा गा बांधावयास परवानगी द्यावी दोन तीन याग आमच्या वडिलांचे हातचे आहेत ते आमचे आम्हांकडे देवावे कलम

१ वस्तीमध्यें आह्मीं राहिल्यावर चार रुपये व नाजपाणी देणें घेणें करूं. येविशीं सरकारचा पक्ष असावा. कलम.

१ कसबे मजकुरीं आह्मीं राहिल्यावर, दाहा पचवीस अतीत आम्हांजवळ राहतील. तेव्हां सरकारांतून काहीं निर्वाहा आमचा चालावा. आह्मीं सरकारचे उपयोगाचे आहों. हरएकविशीं चाकरी सांगितल्यास करूं. कलम.

१ आमचे राहणें कसब्यांत जाल्यावर च्यार सुष्ट आहेत व च्यार दुष्ट आहेत. आपलेकडील कमावीसदार तेथें आहेत. त्यास आमचे प्रतिपाळाविशीं निक्षून आज्ञा असावी कीं, हरएकविशीं याचा साभाळ करावा, कोणाचा उपद्रव वगैरे वाजवी लागूं नये. म्हणून कलम.

---

पत्रांक ६०१ श्री. १७२४ आश्विन शुद्ध.

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गगाधरराव गोविंद स्वामी गो यासीः—

पो बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. बळवतराव माधव, माधवराव अनत रास्ते यांचे पुत्र, पुण्याहून निघोन जाऊन होनवाडास जमाव करीत आहेत. सबब, त्याचे पारिपत्यास डफळे व थोरात व वागमारे व पोळ यास फौज व पायदळ जमा करून एकत्र होऊन जावयाची आज्ञा केली असे. तरी तुह्मीं पत्र पावताच फौज व पायदळ जमा करून, सारे एकत्र होऊन, बळवतराव माधव यास हस्तगत करणें आणि हुजूर पोंहोंचाऊन देणें. जाणिजे छ ५ जमादिलावल, सुा सलास मयातैन व अलफ. बहुत काय लिहिणें ? हे विनति.




---

पत्रांक ६०२ श्री. १७२४ आश्विन शुद्ध १२

सेवेसी नारो कृष्ण दोन्ही कर जोडून सा नमस्कार विज्ञापना ता आश्विन शुद्ध १२ पर्यंत मुा मौजे काराठी सुखरूप असों. विशेष. आपण आज्ञापत्र

माहाराजायरोबर पाठविलें तें पावलें लिा सविस्तर कळलें मौजे ममदूरचें वर्तमान तर गांवची शेतेंमळें तमाम, लष्करें नासिक होती, त्याणीं कापिली बहुत नाश जाला हाली लष्करें येथून कूच करून जळगांवावर गेली बुध वारीं दोन प्रहरा रात्रीं कूच्य करोन, बारामती व मैंढ्याचें मधें बुणगें ठेऊन, सड्या फौजा पुढें बारामतीचे नजीक काठेवाडीवर गेल्या माने यांचे फौजेस व सरकारचे फौजेस दोन कोसांचें अंतर आहे त्यांचीहि जमात वीसपंचवीस हजारपर्यंत आहे, म्हणोन वर्तता आहे येथें चीजवस्त आहे त्यास, बहुतेक गांव उज्याड जाहलें येथील मार तर च्यार शा शिलक जवळ बाळगोन राहणें तेव्हां ठीक व गांवचाही बदोबस्त राहील त्यास, शिलक तो मजजवळ नाहीं व गावात पट्टी करावी हरएक पीक अगदींच गेलें पुढें दुसरे पिकावर च्यार शा दुसापासोन घ्यावे तर गांवची वस्ती होणें कठीण त्यास, गांव राहे तो अर्थ करणार स्वामी समर्थ आहेत येविशींचें विनंतिपत्र गावकरी यांणीं लिहिलें आहे त्याअन्वरून श्रुत होईल दगा बहुत आहे त्यास, छत्रा कडील भांडीं वगैरे येथें आहेत त्यास, येविशींची आज्ञा यावी घरकड मार अधिकोत्तर नाहीं सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति

---

पत्रांक ६०३ श्री १७२४ आश्विन शुद्ध १२

चिरंजीव राजश्री विसाजीपंत नाना यांसी बापूजी गणेश साठये आशीर्वाद उपरी येथील क्षेम ता आश्विन शुद्ध १२ येथें सुखरूप असों विशेष तुम्हां कडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं समाचार येत नाहीं तरी असें नसावें सदैव पत्र पाठऊन संतोषवीत जावें इकडील मार गांवच्या पत्रावरून कळेल होळकराकडील मान्या व भीमरावांची फौज यांस च्यार कोसांवर अंतर आहे सरकारची फौज बुनगे बारामतीस येऊन, पुढें सड्या फौजा होऊन गेल्या आहेत बारामतीस वस्ती आहे गांव दहशतीनें उज्याड जाहलें हा गांव उज्याड होणार. मुलें माणसें मुद्दां येथें आहों छत्राकडील काम आम्हाकडे सांगितलें आहे लष्कराचा भरंवसा नाहीं घरांत भांडें व चीजवस्त आहे ती गेली म्हणजे कठीण याजकरितां यसमानास विनंती करून अगर तुमच्या विचारास येईल त्याप्रों उत्तर पा तीा राजश्री दादा कोठें आहेत ते लिा बहुत काय लिा ? लोभ करावा हे आशीर्वाद

तींा पत्रीं हवालदार व नारोपंत यांस शों नमस्कार सांगावा

---

पत्रांक ६०४ श्री १७२४ आश्विन शुद्ध १२

सेवेसीं बापूजी गणेश साठ्ये दोन्ही कर जोडून शिरसां नमस्कार विज्ञाप ना ता आश्विन शुा १२ पावेतों सुखरूप मौजे कराटी येथें असों विशेष स्वामीकडून आलिकडे पत्र येऊन सेवकांचा सामाळ होत नाहीं तरी असें

नसावें. सदैव पत्र पाठवून सांभाळीत जावे. यानंतर इकडील वर्तमानः मान्याच्या दहशतीनें भोवरगांव उजाड जाहाले आहेत. जरीपटका व मान्यास च्यार कोसाचा अतर आहे. काराठी पासून नऊ कोस आहेत. आज उद्यां तोंड लढाईचें लागणार. गाव तजावजा जाहला आहे. गावकरी यानीं अर्जदास्त पाठविली आहे, त्याजवरून कळों येईल. ब्राह्मण नित्य येत असतात. आज्ञेप्रमाणें भोजनाचा बदोबस्त करीत आहे. व पेशर्जी यमाजी भोसला याने वर्तमान विदित केलेच आहे. सेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

पत्रांक ६०५ श्री. १७२४ आश्विन शुद्ध अखेर.

श्रीमत राजश्री वैद्यबोवा मोकाशीसाहेब, साहेबाचे सेवेसीः—

अर्जदास्त अर्जदार बदेगी शरीकर मोकदम मौजे कराठी प्रां सुपे दडवत अर्ज विनति विज्ञापना कीं, मौजेमारचें वर्तमान तरः शेतमळे झाडून लुटले गेले काहीं एकदोन मळे राहिले होते. गणपतराव पानसे याच्या मुकामामुळे तेहि नवमीचे दिवशीं कूच करून गेले नतर दसऱ्याचे दिवशीं झाडून कही आली. त्याही मळ्याचा फडशा जाला. खरीफाचीहि अवस्ता तीच जाली. रब्बी पेरावी तर प्रजने नाहीं. यामुळे दोन्ही पिकाची निराशा जाली. मान्याचे लष्कर पूर्वेस बारामतीचे खालते सा कोसावर आले. जरीपटकाही आज एकादशीस कूच करून बारामतीवर गेले. मान्याचे धास्तीने गाव झाडून वस झाले. आपल्याभोंवते लोणीमोरेश्वर येथील वस्ती आहे. याजवेरान शेवेसी अर्जविनति लिहिली. गावचा धर सुटला आहे. आपली आज्ञा तर, गाव वस करू नये. त्यास, खडनीचे रोखे मान्या मनसरी करितो. पैसा द्यावयास ताकत नाहीं. गांवं वसवा, तर जाळतो. ऐसें सकट प्राप्त झाले आहे. येविषईची आज्ञा येईल, त्याप्रों वर्तनूक करू. येथें तर घटकेचा भरवसा नाहीं. कळावें. सेवेसी अर्जविज्ञापना. दहाकाचा[1] बदोबस्त करावा. दोनसे स्वो गांवच्या बच्यावाकरितां कृपा करून रा नारोपत नाना यासी पाठवावे. वितके दिवस गांवच्या बच्यावाचा लौकिक जाला. आताही आमचा सकटाचा प्रानअवस्ताचा[2] दिवस आहे. साहेबीं ये येळेस कृपावत होऊन दोंशा रुपयाचे काम करावे, म्हणजे श्रमाचे पाडाऊ[3] होऊ. निआधारी[4] झालों, याकरिता सकटाची अर्जदास्त पाठविली आहे. हे अर्जविनति.

---

पत्रांक ६०६ श्री. १७२४ आश्विन वद्य २

राजश्री नारायणराव गोसावी यासीः—

अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्नो बाबूराव आंगरे वजारतमाब सवाई

---

१ धाकाचा. दहशतीचा. २ प्राणावस्थेचा. ३ गुलाम. ४ निराधार.

सरखेल रामराम विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असावें विशेष तुम्हीं पत्र राजश्री स्वर्गनायपंत याजबराबर छ ५ रावलचें पाठविलें तें छ ११ जमादिलावलीं पावलें गांव व मजीविशीं मार लिहिला, त्यावरून व राजश्री बळवंतराव नेने यांणीं पत्र पाठविलें त्यावरून, कळों आला ऐशास तुम्हांकडून बहुत दिवस पत्रें येऊन कांहींच मजकूर समजत नव्हता त्यास हालीं मारनिल्हेनीं मुखोत्तर सांगितलें, त्यावरून अव गत जालें ऐसेंच हमेषा पत्र पाठऊन आनंदवीत असावें गाव व मजीविशीं लिहिल्यांत, त्यांस तुमच्या स्नेहापुरता दुसरा अर्थ काय आहे? पत्रोन ये ईल सरकार मार मशारनिल्हे लिहितील त्यावरून कळेल रा छ १५ माहे जमादिलावल बहुत काय लिहिणें? लोभ कीजे हे विनति श्री मोरॆयसुद

०श्री ॰ ~
राजा शाहु नरपती चरणीं
सादर येसाजीसुत बाबूराव
आगरे वजारतमाब सवाई
सरखेल निरंतर.

---

पत्रांक ६०७ श्री. १७२४ आश्विन वद्य २

विज्ञापना ऐसीजे राजश्री व्यंकटराव याची भेट जाहाली तिकडील तहकील सर्व भाव समजलें श्रीमंताच्या चिठ्या घडूकडे जातात दाहा पांच जण म ध्यस्त पडले आहेत एसंच अद्याप जें आहे तेंच आहे रा बाजीराव बरवे व पाराजीपंत यांणीं मोठे प्रात काळीं होळकराकडे जावें आणि सावरजमा क रून घ्यावी, ऐसें श्रीमंतांचे विचारें ठरलें तेव्हां पाराजीपंतांनीं यानकडे सां गून पा कीं, यामों तेथून चिठ्या आल्या, आतां माझा उपाय नाहीं, तुम चा गृहस्थ गेला त्याचें उत्तर कळावें, प्रहर दिवसपर्यंत वाट पाहतों त्याज वरून राहिले आहेत त्यास, अजूनहि पहिलेसारखी व्यवस्था जाली म्हणजे कोणतेहि घडत नाहीं मासबर मध्यस्ताचे हातें समेट जाहल्यास फार उपयोग दादा! काय कोठवर ल्याहावें? नगरावर फौज रवाना होणार. होळकरानें हा कालमर्याद श्रीमंताचे पायाशीं अमर्यादा केली नाहीं जेव्हां अंबाऱ्या दृष्टी स पडल्या तेव्हां घोड्यासालीं उतरून नमस्कार केला फौजेस ताकीद केली कीं, कोणी श्रीमंताचे फौजेकडे जाऊं नये मीं आपलें सोंवाद काळें लाऊन

घेणार नाहीं, माझा अव्हेरच केला तर मी लाच्यार आहें वगैरे बोलणीं व चाली पत्रात कोठवर लिहूं ? सारांष, समेट करून घ्यावी, हे सलाह पक्षपात कोणाचाही करू नये. दौलतीवर लक्ष, ज्या गोष्टीनें दौलतीचें कल्याण. सर्व प्रजा आशीर्वाद देईल. समेट करून घेतली असता, श्रीमताची चाकरी होळकर करून दाखवील, ऐसें आहे. गणोबा अद्याप आला नाहीं. वाट पाहतात. राघोपत रात्रीं पावला. वेंकटराव यांणीं चिठी वडिलास लिहिली आहे, त्याजवरून कळेल. ज्यास्थळीं आहा तेथून अन्यत्र स्थळी जावयाचा विचार मसलतगार याचे विचारें दिसतो. त्यास असें जाहले म्हणजे सर्वहि गोष्टी बिघडल्या. पक्केपणे मनात यावें. मग कोणाच्यानेच कोणताच विचार घडावयाचा नाहीं. इतके दिवस मसलतगारानीं मसलत दिल्ही. त्यातून हें निघाले. पुढे अणीक असें घडल्यास ईश्वरेच्छा म्हणावी. मग मनुष्याचा उपाय राहिला. पुढे कोणास आपण दोष ठेऊं म्हटल्यास, दोष घेणार नाहीं. इतःपर मर्जी. कालचे चिठीचें व या चिठीचें उत्तर मनन होऊन लवकर यावें. अज्ञानपणें मोक्ष लिहिणें पडत असलें, तर विचार करून विनति करावी. रा बुधवार, प्रातःकाळ, प्रहर दिवस हे विज्ञापना. इ. इ.

---

पत्राक ६०८ श्री. १७२४ आश्विन

यादी रामचद्र दीक्षित व लक्ष्मण नारायण दीक्षित कायगांवकर याचा फडच्या निज्याम व नवाजजग याजकडून होणेः—

१ कायगावीं पठाणाची फौज येऊन गावांतील ब्राह्मण धरून मारहाण करून पस्तीस हजार रुपये खड टराऊन निकड मांडिली. गावकरी यांणीं गावात पट्टी करून पचेवीस हजार रुा दिल्हे. दाहास जागा नाही. सबब दोघे ब्राह्मण पठाणाकडील दोन माणसे समागमें घेऊन आवरगाबादेस आले. ब्राह्मणाचे वर्तमान ऐकून विचार केला की, इतःपर जो पैसा देणे तो मातबर मध्यस्ताच्या विद्यमाने देऊन, घरे, वाडे जगऊन पुढे उपद्रव लागूं नये. या भावीं सुभे यासीं बोलावे. ऐसी योजना करीत असता, इतक्यात सुभ्याकडील पान्नपनास जमाव येऊन घरावर दगा करू लागले. दरवाजे बद करून, सुभे याजकडे बोलावयास ग्रहस्त पाठविले. तेव्हा, सुभे यांणीं सांगितलें कीं पाच हजार रुा ऐन व एक हजार दरबारखर्च, एकूण साहा हजार रुा द्यावे. पठाणाचें कूच करीवतो, ब्राह्मण त्याणे धरले आहेत ते आणून आवरगाबादेस तुमचे हवालीं करतो. याप्रों बोलणे नेमात येत आहेच, तों तेच समई इकडे वाडियावर सुभेयाची जमीयत आली होती त्यानी बायका बाहेर काढून चावडीपुढून लष्करचे बाजारात नेल्या. हे वर्तमान आनंदराव नाि लक्ष्मणराव पेषकर याजला समजले. त्याणीं सुभे यासीं बोलून बायका सोडऊन आणवून घरीं पाठविल्या. सुभे यांणीं साहा हजार रुाचा दस्तऐवज लिहून

घेतला त्यांत लिहून दिलें आहे, यथार्थ बंदोबस्त कामगांवचा हें पत्र पाहिलें असतां मार ध्यानास येईल अस्तु ! सुभे यांजकडून पठाणाचा बंदोबस्त कांहीं एक आला नाहीं आम्ही तुम्याच्या भरोंसियावर बेफिकीर असलों तिकडे पठाणांनीं मार्ग लुटोन, लाखों रुपयाची चीजवस्त नेली ब्राह्मण व मातुश्रीबाईस धरून घेऊन गेले बाईपाशीं कांहीं नाहीं समजोन, ब्राह्मणस हित बाईस पठाणांनीं सोडलें इकडे सुरतवाले यांणीं जमीयत पाठऊन साता रियास बाडे छुटून चीजवस्त गाड्या भरून पैठणदरवाज्यानें शहरांत आणि त्या तिकडे बाई लष्करांतून येतांना सुरतवाले यांचे वकिलांनीं अर्जविलें कीं, तुमचे सुटकेनिमत्य पठाणांशीं एकवीस हजारांचा करार करून हवाल्यांत आलों ते द्यावे ऐसी निकड करून एकवीस हजार रुपयांचा दस्तऐवज करून घेतला आहे याप्रमाणें वर्तमान आहे त्या प्रकरणीं त्यांजकडून फलान्या व्हावा

१ साहा हजारांचा दस्तऐवज माघारा यावा
१ एकवीस हजारांचा दस्तऐवज माघारा यावा
१ * + + + चीजवस्त कुल माघारी यावी

---

२

१ डुकरखोरा पहाड सातारियाचे राणांत आहे तेथें आमचा रमणा आहे येविशीं सरकारची सनद असतां, हालीं औरंगाबादेकडील आहे, म्हणून आपण घेतात आम्हांस गवत मेऊं देत नाहीं त्याविशीं ताकीद होऊन पूर्व वतप्रमाणें चालावें

---

पत्रांक ४०९ श्री १७२४ आश्विन

*भाई नाना दिक्षित:—*

पंडत साहेब मिसियार मेहेरबान अजतरफ महमदशाहखां सलाम नियाज आके तुम्ही खातरजमेनें येथें येणें तुमचे व आमचे मध्यें कुरान व गगाजी आहे कोनेहि बिघाई दगाफटका होणार नाहीं व जे शा आमचे माफी राहिले, त्याचा बंदोबस्त करून पाठविणें व तुम्ही जरूर जरूर येथें येणें मागती औरंगाबादेस जाणें असलें तर जावें खातरजमेनें यावें कांहीं वसवास न करावा व त्या वेळेपासोन हें लष्कर येथें आलें किती बंदोबस्त घराचा व गांवचा कराराबाकी लोक व कोनीहि तुमचे असवायास हात लावित नाहीं मा ऐवज बाकीचा यावा नाहींतर मुखत्यार आहांत तुम्ही येथें आले, म्हणजे ऐवज तनखाचा आमचा वसूल होईल तो घेऊ, व घेरेरे वगैरे असवे

---

* फाटलें आहे

उठून भेऊन जाऊं, न पुढें गानसे रस्तवाळीस गावच्या टेऊं, व हरएकाची खातरजमा करून देऊं. व अगर तुह्मी हाजर न व्हाल व रुा न पाठवाल, तर तुमचा अमल गावात बसणार नाहीं व आता ज्या पैक्याचा करार लक्ष्मण बापू याणें केला तो पैसा आह्मी घेऊं कळावें हे कितावत.

---

पत्रांक ६१० श्री शंकर. १७२४ आश्विन–कार्तिक

श्रीमद्गुरुवर्य राजमान्य राजश्री दीक्षितबाबा वडिलांचे सेवेसीः—

विद्यार्थी रावजी खमलाखर कृतानेक सा। नमस्कार विनंति उपरी. आपण कृपा करून आशीर्वाद पत्र पाो ते पावलें. सैन्याचें, पठाणाचें वर्तमान तरः या प्रांतीं मवत्सरवारीं पाो रोसे खंडणी घेतली. करजगाव सायखेड करून, येथें ब्राह्मणाची विपत्ती फार केली. नायगावीं मुकाम आहे, असें ऐकितो. येथें तो मान्याचे ठाणेंच आहे. इकडे येत नाहीं. कोल्हारचें वर्तमान कांहीं समजलें नाहीं. आज्ञेप्रमाणें आल्यागेल्याचा वर्तमान लिहित जाईन. येथील वर्तमान तरः पूर्वी आपाचे पत्रीं लिा।च होतें. त्यावरून समजलेंच असेल. बहुत काय लिहिणें ? हे विज्ञापना. द.

---

पत्रांक ६११ श्री. १७२४ कार्तिक शुद्ध १

राजश्री नारायण रावजी वैद्य स्वामीचे सेवेसीः—

पाो सदाशीव रगनाथ बानवळे सा। नमस्कार विनंति येथील कुशल, ता। का। शु॥ १ बुधवार मु॥ चिखलगाव, नजिक किल्ला रोहिडा, येथें स्वस्तक्षेम असों. विशेष. गावातून स्वारी निघाली ते समई घरीं भोजन करीत होतों. नतर निघोन स्वारी टेंकडीवर होती तेथें आलों. नमस्कार करून पाठीमागें टेकडीखाले उभा होतों. तेथें गडबड जाली. सा, मार्गे अबराईत आलों. तेथें उभा होतो. तो तेथें रा। श्रीपतराव भैराळ व राजश्री दाजीबा आले. त्याणीं सागितलें, येथे उभें राहू नये, मार्गे गर्दी जाली. मी श्रीमंताजवळ होतों. स्वारी तेथून निघाली. कोणीकडे गेले हे समजलें नाहीं. तुह्मी येथें उभे राहू नका, आमचे बराबर चला. ते व मी दोन कोस बराबर होतो. पुढें त्याची आमची चूक पडली. आह्मी सोमवारीं रात्रीं तोरणा किल्यानजिक किल्यात राहिलों. तेथून दुसरे दिवशीं आंबवड नागनाथाचे येथें आलों. तेथून आज बुधवारीं मु॥ मारीं येऊन, एका ब्राह्मणाचे घरीं राहून, श्रीमंत यजमान साहेबास विनंति लिहिली व आपल्यास हें पत्र लिहिलें आहे. तर, स्वारी कोठें आहे हें कळावें, ह्मणजे सेवेसीं येऊन पोहोंचतों. वेळेस तेथे गडबडीमुळें स्वारी अंतरली. त्याणें अशा फेऱ्यात पडलों. जवळ पाणी पिण्यास पात्र देखील नाहीं. अशी अवस्ता आहे. तर, देखतपत्र उत्तर यावें. जेथें

आपण व श्रीमत माहाराज यजमान साहेब असतील, तेथें येतों बहुत काय लिहिणें? लोभ असों दिजे हे विनति

---

पत्रांक ६१२ श्री १७२४ कार्तिक शुद्ध ९

राजश्री नारायण राव गोसावी यांसी --

असंखितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो बापूराव आगरे बजारसमाव स वाईसरखेल रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असावें विशेष राजश्री येशवंतराव होळकर यासी लढाई जाल्याचा मजकूर परस्परें तुम्हांस समजलाच असेल फौजेंतील सरदार उपाय नाहीं तेव्हा निभाले नंतर आम्हीं पांच चार स्वारानसीं निघोन छ ३ मी --- अजीरे कुळाबा येथें येऊन दाखल जालों राजश्री राऊ पंडितप्रधान घांट उतरून कोंकणांत आले समागमें तुम्ही आहां म्हणोन समजल्यावरून, येथून राजश्री दिनकर नारायण याची रवानगी केली आहे येऊन तुम्हांजवळ बोलतील राजश्री राऊपडित यांसी विनंति करून, पुढें कर्तव्य असेल तसें लिहिण्यात यावें सरकारच्याकरीस सिद्धच असों रा छ ७ माहे रजब बहुत काय लिहिणें! लोभ कीजे हे विनंति मोर्तबसुद (शिक्का)

---

पत्रांक ६१३ श्रीलक्ष्मीकांत १७२४ कार्तिक शुद्ध ११

राजश्री नारायणराव वैद्य गोसावी यांसी —

असखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेो रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत विनति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीयें कुशल लिहित जावें विशेष तुमचे नातवास देवआज्ञा जाली, हें वर्तमान सरकारांत ऐकून चित्तास परम वाईट वाटलें तुम्हांस तो महत दु:ख जालें ही ईश्वरीइच्छा त्याची सत्ता बळोत्तर! यास कोणाचा उपाये नाहीं तो जसें ठेवील तसें राहणें प्राप्त त्याजला मुख्य विवेकच प्राधान्य तुम्ही सारे गोष्टीस समजतां तुम्हांस कोण्ही सांगावें! करून धातवण करावें येविशीं सरकारांतून ल्याहावें ऐसें नाहीं रा छ ९ माहे रजब बहुत काय लिहिणें! हे विनंति

---

पत्रांक ६१४ श्री १७२४ पौष वद्य ७

राजश्री बापूराव आगरे बजारसमाव सवाईसरखेल गोसावी यांसीः—

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रो बाजीराव रघुनाथ आशीर्वाद विनति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें विशेष राजश्री लखो मुकुंद सरकारांतून यशोदास जात आहेत, त्यास मार

निल्हे तुमच्या ताब्यांत आल्यावर याजसमागमें लोक पचवीस देऊन कल्याणास पोंहचवून द्यावे. रा। छ १९ रजब, सु॥ सलास मयातैन व अलफ. बहुत काय लिहिणें ? हे विनति.

---

पत्रांक ६१५ श्री. १७२४ कार्तिक वद्य ७

छ १९ रजब सन सलास मयातैन, कार्तिक.

विशेष. खासा स्वारी माहाडास आली. तुह्माकडून सरकारचे जाबसाल उगवावयाचे ह्मणून खंडो मुकुंद यांची रवानगी केली आहे. सविस्तर बोलतील, त्या अन्वयें उलगडा होऊन मारनिलेची रवानगी लौकर करावी.

---

पत्रांक ६१६ श्री. १७२४ कार्तिक वद्य ८

छ १९ रजब सन सलास मयातैन कार्तिक.

याद खंडो मुकुंद यास बडोद्यास जावयाचे मार्गाचे विभागणीविसीं. सु॥ सलास मयातैन् व अलफ.

पत्रें.

१ बाबूराव आंगरे यास पचवीस लोक देऊन कल्याणास पोंचवून द्यावे.

१ कल्याणचे मामलेदारानीं पचवीस लोक देऊन अर्जुनगडास पोहोचवावे.

१ अर्जुनगडवाल्यानीं लि॥ अन्वये माणसें देऊन माडवीस पोंचवावें.

१ माडवी.........स्वार बराबर देऊन बडोद्यास पोंचवून द्यावें.

१ रहदारीचें दस्तक.

---

५

सदरहू अन्वयें पत्रें देण्याविशीं आज्ञा. सदरहू अन्वयें पांच पत्रें देणें. छ १९ रजब सलास मयातैन, कार्तिकमास.

१ आनदराव गायकवाड.

१ रावजी आपाजी.

---

२

सदरहू अन्वयें दोन पत्रें देणें.

छ २० रजब सलास मयातैन, कार्तिकमास.

---

पत्रांक ६१७ श्री. १७२४ कार्तिक वद्य ९

राजश्री नारायणराव गोसावी यासीः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ बाबूराव आंगरे वजारतमाब व सवाईसरखेल रामराम विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल

लिहित असावें विशेष तुम्ही छ १६ रजबचें पत्र पाठविलें तें छ २० मिन हुज पावलें लिहिला मजकूर सविस्तर कळला त्यास, इकडील राजश्री दिन कर नारायण तेथें आहेत बोलतील त्याप्रों बासबाल होऊन वर्तमान बरचे वर लिहून पाठवीत जावें या प्रसगीं अधिकआगळें ल्याहावें, तर सर्व ध्यानां तच आहे सारांश, बंदोबस्त होऊन येई तीच मसलत करावी विस्तार ल्या हावें असें नाहीं रा छ २१ रजब बहुत काय लिहिणें। हे विनंती श्री मोर्तब्रसुद

---

पत्रांक ६१८ श्रीलक्ष्मीकांत १७२४ कार्तिक वद्य १४

राजश्री नारायणराव वैद्य गोसावी यासी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रो रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा दंड वत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीयें कुशल लिहीत जावें विशेष यापूर्वी तुह्माकडेस पत्राची रवानगी छ ६ माहे रजबची हारसेस दुसऱ्याचे पोहाऱ्याचे बमासरावर केली आहे व राजश्री सदाशिव बापूजी याहीहि लि हिलें तीं पत्रें पोंचून सविस्तर समजलें असेल त्यास सरकारचें लक्ष सर्व तुह्माकडेस आहे प्रसंगोपात बहीं तुह्मीं सुचवीत जावें, त्याच पायानीं चाल चारणा आपली ठेवावी, हेंच मनांत बागस आहे व स्तवी वारंवार लेहूनही पाठविले आहेत ही तुमची तुह्मास खातरजमा आहेच येविशींचा सपशील फार काये ल्याहावयाचा आहे ! सांप्रत, राजश्री सदाशीव बापूजी यांहीं लिहिलें व राजश्री राघो भोंडदेव लिहितील त्याजवरून कळेल वरचे वरी पत्र पाठऊन वर्तमान लिहीत जावें रा छ २७ माहे रजब बहुत काय लिहिणें । हे विनंती

---

पत्रांक ६१९ श्री १७२४ कार्तिक

श्रीमत राजश्री नाना दीक्षित साहेबांचे सेवेसीः—

आज्ञाधारक म्पिपकसी डेंबळे सा दंडवत विज्ञापना एसीजे आपण पत्र पाठविलें, तें पावोन सार समजला राजश्री नरसोपंत सात्या, दोनतीन येस आहाले, टोक्यास गेलेत दुसरें, श्रीमत आण्णासाहेब यांची पागा नेवासियास होती त्यासी फत्तेसिंग मान्याचे स्वार मेऊन, धामधूम करून, काशिनाथ हरी व आपली पागा ऐसे लष्करांत नेले, व पठाण कोल्हारावर आला, म्हणोन वर्त मान ऐकिलें त्यांसी पठाण कोल्हारावर कांहीं आला नाहीं उगीच बाजार आफवा आहे फक्तीं वर्तमान नाहीं नेवासें माहालचा सरपणास हाजार आला, म्हणोन ऐकिलें साहेयास कळावें बहुत काय लिहिणें । कृपालोभ करीत जावा हे विज्ञापना सद होऊन पागा सुटावी, ऐसें आहे इतक्यावर ईश्वर इच्छा

---

पत्रांक ६२० श्रीलक्ष्मीकात. १७२४ पौष शुद्ध २

राजश्री नारायण वैद्य गोसावी यासीः--

अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य श्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा दडवत विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जावें. विशेष. तुमचीं पत्रे सरकारात जीं आलीं, त्याचीं उत्तरें यापूर्वींच पाठविण्यात आलीं. त्यात जे ल्यहावयाचें ते लिहिलेच आहे. त्याजवरून समजलेंच असेल. साप्रत राजश्री सदाशीव बापूजी याजकडून पत्रे आलीं त्याचीं उत्तरे मशारनिल्हेस लिहून पाठविलीं आहेत. त्याजवरून मजकूर तुमचेहि समजण्यात येईल. तुमचे मुलांमाणसासमागमे सरजाम जो द्यावयाचा तो देऊन, त्याची रवानगी करून दिली. त्याजला जाऊन सात आठ दिवस जाले. हा मजकूर तुह्माकडील मडळी लिहून पाठवितील. त्याजवरून कळेल. वरचेवरी पत्र पाठऊन वर्तमान लिहीत जावे. रा छ ३० माहे रमजान. बहुत काय लिहिणें? हे विनती. मोर्तबसुद.

---

पत्रांक ६२१ श्री. १७२४ पौष वद्य २

राजश्री नारायेणजी देसाई, घनदेवी, गोः--

सेवक निंबाजी भास्कर नमस्कार विनति उपरी मुा वसई जाणून स्वकीये कुशल लिा जाणें. विशेष. राजश्री नारायेण बाबूराव याची रवानगी सरकारातून जाली आहे. त्यास, हे घनदेवीस मुकामास राहतील. तर, याचा समाचार हरएकविर्सी घ्यावा आणि भूमिये मनुष्ये मार्गाचीं देऊन पावते करावें. रा छ १४ रमजान. हे विनति.

---

पत्नाक ६२२ श्री. १७२४ पौष वद्य २

राजश्री रस्तुमजी देसाई कोा नवसरी गोसावी यांसीः--

श्री निंबाजी भास्कर रामराम विनति उपरी मुा वसई येथे यथास्थित असो. विशेष. आह्मी श्रीमतासमागमें मुा मारीं आहों. हें वृत्त परस्परें तुह्मांस कळलेंच असेल. यानतर, राजश्री नारायेण बाबूराव याची सरकारातून रवानगी जाली आहे. त्यास, हे नवसर येथे मुकामास राहतील. तर याचा हरएकविर्सी समाच्यार घ्यावा आणि मार्गाची भूमीये मनुष्यें द्यावीं. रा छ १४ रमजान हे विनती.

---

पत्रांक ६२३ श्री. १७२४ पौष शुद्ध ७

राजश्री नारायणराव गोसावी यासीः--

अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्नो बाबूराव आंगरे वजारतमाब सवाई

सरसेल रामराम विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असावें विशेष राजश्री राऊ पंडित पतप्रधान यांची स्वारी रेवदंडीयाहून वसईस गेल्या सागाईत, अलिकडे तुम्हांकडून पत्र येऊन तिकडील कांहीं स मजत नाहीं रेवदंडेचे मुकामी भेट जाहली तें समई कित्येक बोलणीं चा लणीं जाली होतीं त्यासून तेथें गेल्यावर कोणकोणते बंदोबस्त काणे तऱ्हेचे कसे जाहले ते सविस्तर सपशील लेहुन फळभावें त्यासारखें येथें विचार केले पाहिजेत राजश्री राऊपंडित यांस पत्र लिहिलें आहे त्यांचेंही उत्तर घे ऊन सत्वर पाठवावें या छ ५ माहे रमजान बहुत काय लिहिणें ! लोभ किजे हे विनंति मोर्तबसुद शिक्का

---

पत्रांक ६२४ श्री १७२४ पौष वद्य ७

दस्तक सरकार राजश्री पंत प्रधान ता कमावीसदारान व चौकीदारान व रहदारान व बाबेलोकान व मोकदमानी देहाय सुा सलास समानैन व अ लफ राजश्री खंडो मुकुंद सरकारांतून बडोदास जात आहेत बरोबर घोडीं रास सात व म्याना एक व माणसें असामी च्याळीस असेत तरी मार्गी कोणेविशीं मुजाहीम न होतां जाऊं देणें ज्या गांवीं वस्तीस राहतील, तेथें चौकी पाहारा करून आपलाली हदपार करणें जाणिजे छ १९ रजब आज्ञाप्रमाण

---

पत्रांक ६२५ श्री १७२४ पौष वद्य ७

राजश्री आनंदराव गायकवाड गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो बाजीराव रघुनाथ प्रधान आशी र्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणें विशेष तुम्हांस स्वारी माहाडास आली तुम्हांकडून सरकारचे जायदाद उगवावयाचे यामकरितां राजश्री खंडो मुकुंद यांची रवानगी केली आहे सविस्तर बोल तील त्या अन्वयें उलगडा होऊन मायनिलेची रवानगी लौकर करणें जा णिजे छ १९ रजब, सुा सलास मया तैन व अलफ बहुत काय* लिहिणें ?

---

पत्रांक ६२६ श्री ( नकल ) १७२४ पौष

यादी नाना फडणवीस याचा मंडल्याबद्दल भोंसले याजकडून दरबारास यांचा करार, विा उभयतां कारभारी व नारायण बाबूराव, रुा ५०००० पौ वजा ऐवज वसूल याचा करितो रुा १०१००० बाकी रुा १९९०००

---

* हेंच पत्र गायकवाडचा कारभारी रावजी आपाजी यांचे नांवें लि हिलें आहे

तपशील.

८४००० गगथडी प्रकर्णीं दरबारखर्च कबूल केला, बा। याद. पौ दागिने पावले २ त्या बा। काम गगथडी प्रकर्णीं जाले नाही.

३१५००० मा। केशवदास मारवाडी यांजकडून वसूल आले.

---

३९९०००

याचा भरणा.

८४००० नाना फडणवीस असतां पावले दागिन्याबा।.

१६५००० श्रिमिताच्या खासगीकडे नानानीं देविले, बा। हुंड्या ७५०००, ७५०००, १५०००.

---

२४९०००

बाकी रु।। १५००००

पैकीं वसूल रु।।

२५५००० हस्तें खंडो मुकुद जवाहीर.

१०००० आगठी हिऱ्याची.

२५०० बाळ्या हिऱ्याच्या.

---

१२५००

१३००० हत्ती नग २

८००० यात्रा सुदर.

५००० खुदाबक्ष.

---

२५५००

१५०० हत्तीचा सरजाम गाषे व चरिंदा वगैरे यांस खर्च बा। याद.

३००० दुकान खर्च दरसेंहें रु।। २ प्रों.

३०००० हुडी गु।। द्वारकादास नामें हरदास याजबा। रवाना केली ते ऐवज आला नाहीं.

२५००० कित्ता हुडी नारायण बाबूराव याणीं आणिली. ती हस्तें विठोजी गायकवाड सासवडास जाता.

१००० हुडणावळ खर्च सरासरी पचवीस हजार वगैरे.

११००० भागटीक हीरे याचा लोलकास मोत्यें व हिरे व पाचेचे लोलक.

५००० धर्मदाव बापूभट लेले.

४५००० नार्णे भजमासें विशेष अवळ नाहीं सबब चूकभूल मजुरा यावी

१४७०००

याकी रुा २०००

नारायण बापूराव यास बक्षीस रुा तीन हजार करून, सदरहु ऐवजाचा जमाखर्च समजाविल्याप्रों मजुरा असे छ ६ रमजान सलास मयातेन, पौषमास

---

पत्रांक ६२७ श्री लक्ष्मीकांत १७२४ माघ वद्य १

राजश्री नारायणराव वैद्य गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावें विशेष यापूर्वी तुम्हाकडील पत्राचीं उत्तरें बरचेवरी व रांगडे माणसाबरोबर जीं पाठवावयाचीं तीं पाठविलीं आहेत पोहोंचून सविस्तर समजण्यांत येईल राजश्री सदाशिव बापूजी यांणीं तेथील ऐकिलें तें वर्तमान तें लिहिलें होतें हें समजोन त्याचेंहि पत्राचें उत्तर पाठविलें आहे व प्रसंगींचें वर्तमान रोजी रोजदेख लिहिता कळेल बरचेवरी पत्र पाठऊन वर्तमान लिहित जावें रा छ १४ माहे शवाल बहुत काय लिहिणें ? हे विनंती मोर्तबसुद

---

पत्रांक ६२८ श्री १७२४ माघ वद्य ५

राजश्री माधवराव गोसावी यांसी —

सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो चत्रसिंग राजे भोंसले दंडवत विनति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असिलें पाहिजे विशेष बायाजी शिवराम येथून जाऊन कां बाहेर राहिला आहे त्यास घेऊन येण्याविशईं राजश्री व्यासराव हवीर यांस लिहिलें आहे त्याप्रमाणें बंदोबस्त करून घेऊन येतील त्यास, कां मजकुरीं हर कोण्ही दिकत घेऊन अडथळा केल्यास, आपण ताकीद करावी रा छ १८ सवाल बहुत काय लिहिणें ? हे विनति लेखन सीमा

श्री
श्रीरामशाहूछत्रपती
चरणकमलधिनरत
चत्रसिंह राजे भोंसले
आविरत

पत्रांक ६२९ श्री. १७२४ माघ वद्य १२

राजश्री नारायेणराव दादा गोसावी यांसीं:—

अखडितलक्ष्मीअलकृत राजमान्य श्री गुजाबा गुजर दडवत विनती येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावें. विशेष. तुह्मी पत्र पाठविले ते पावोन लिहिला मजकूर सविस्तर कळला. त्यास, त्याचप्रमाणे वरचेवरीं पत्र पाठऊन कुशल वृत्त लेहून पाठवीत जावे. येणेकरून सतोष असे. जीं पत्रें तुमचेकडून येतील त्याचींहि उत्तरे येथून पाठवण्याचे घडत जाईल. वरचेवरी तुह्माकडून पत्रे येत असावीं. प्रेम व लोभार्थ आहे तो दिवस वृद्धी पावावा, ह्माच येथील सतोष. त्याविसीं ल्याहावे ऐसे नाहीं. रा छ २६ माहे शवाल. बहुत काय लिहिणे ? हे विनती.

---

पत्रांक ६३० १७२४ माघ.

++ विले आहेत. ते सरजाम सुध्दां मौजे विचूर परगणें उत्राण येथे येऊन पोहचले. सरजाम थोडा ह्मणून त्याणीं हिमत धरून आणखी स्वार व पाव लोक जदीद ठेविले आहेत. त्यासुद्धा त्याचा सरजाम दीड हजार स्वार व दीड हजार गाडदी यो तीन चार हजाराचा भरणा त्याचा आहे. लौकरच येऊन पोहोचतील. यानतर राजश्री गोपाळराव राजेबाहादर मालेगावास येऊन महिनादीड महिना जाला, राहिले आहेत. म्हणोन त्याजकडे सरसुभाहून पत्रें पाठविलीं कीं, पठाण वगैरे याचे पारपत्याविषयीं सरकारातून आज्ञा जाली आहे, तरी सरजाम सुध्धा येऊन पोहोंचवावे व राजश्री नरसिहराव याणींहि सदरहूअन्वयें पत्रे पाठविलीं. त्याचें उत्तर चैत्र शुद्धात येतो, ऐसे आलें. परतु अद्याप आले नाहींत. त्यास सरकारांतून आज्ञापत्र सादर जाले पाहिजे. ह्मणजे सरजामसुद्धा येतील. साराश पठाण व पेढारी वगैरे याणीं प्रातात जागाजागा धामधूम मनश्वी केली आहे व हाल्लींहि बारा तेरा हजार फौजेनसीं आपले जागा मजबुदीनें आहेत. यास्तव त्याचे मुकाबल्यास आपलेकडील फौजेचा जमाव जाला ह्मणजे स्वामीचे प्रतापेकरून त्याचें पारपत्य लौकर होऊन येईल. वर्तमान कळावें, ह्मणून सेवेसीं विनति लिहिली असे. कृपा करून, ध्यानास आणून आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति.

---

पत्रांक ६३१ श्री. १७२४

यादी टपे डाकेचे पुणियापासून नामपूरमोराव्यापर्यंत बसवावयाचे सुा सलास मयातैन:—

१ मुा पुणे.
१ मौजे धाणोरे पुण्यापासून कोस ३
१ मौजे चरोळी नदी इद्रायणी कोस २॥

१ मौजे पिंपळगांव नदी भीमा कोस ३
१ कसबे केंदूर कोस ३
१ मौजे लोणी कोस ४
१ मौजे सिंगवे, पारगांव घोडनदी कोस ३
१ मौजे गानेवाडी कोस ३
१ मौजे बोरी, शिरोळी, नदी कुकडी कोस ३
१ का आळें कोस २॥
१ मौजे बोटें कोस ३
१ मौजे आंबें धारगोव नदी मुळसरी ३
१ मौजे करजुलें कोस ३
१ मौजे पाथोळी चमापूर हणमसवारी ३
१ का संगमनेर नदी प्रवरा कोस ३
१ मौजे मलदास कोस ३
१ मौजे विमोन कोस ४
१ का वेपूर कोस ४॥
१ मौजे खडागली व डांगली कोस ३॥
१ मौजे साडले तारार्चे कोस ३
१ मौजे नांदूर मधमेश्वरार्चे नदी गगा कोस ३
१ मौजे सोनेवाडी कोस ३
१ मौजे सिरसाळें कोस ४॥
१ मौजे येवूद कोस ३॥
१ मौजे रामेश्वर कोस ३
१ का लाहोनेरट गोडे कोस ४
१ मौजे पिंपरी कोस ४
१ मौजे आजमेर सवघार्णे कोस ३
१ मौजे खोडे कोस ३
१ का नामपूर कोस ३

३० ९३

पार्सी जासूद आा
६० डांकेस टप्पे ३० मो

२ कोतल.

३ कारकुनाजवळ.

१ कारकून २ जासूद.

---

६५

---

पत्रांक ६३२ श्री १७२४

यादी साहेबराम कुमदान. सुा सलास मयातैन व अल्लफ. सरकारांतून मनोहरगीरबावा गोसावी यास एक पलटणची भरती करावयासी सांगितली. त्यास, आह्मीं बावाचे पलटणची भरती बारार्गे लोकाची केली. पलटण जमऊन च्यार वर्षे पावेतो सरकारचाकरी केली. तेव्हा गोसावीबावाची व आमची कांहीं जिकीर जाहली. मग, आह्मी निघून वेगळे जाहलो. घरास गेलों. घरीं एक वर्ष राहून येथे आलों. नंतर राजश्री आबा काळे यांणीं आह्मास श्रीमंतापाशीं नेऊन भेटविलें. मग, सरकारांतून आह्मास दोनसें लोक जेजालबारदार ठेवावयासीं आज्ञा जाहली. आह्मीं पनास लोकाची हजीरी दिल्ही. आजपों सरकारचाकरी केली. खर्चास एक पैसा सरकारांतून पावला नाहीं. पदरचे हजार रुपये खर्चून खराब जाहले. त्यास, हालीं जितकी नवी भरती करावयाची आज्ञा करतील तितकी भरती करीन. याप्रों माझा बंदोबस्त सरकारांतून करून दिल्हा पाहिजे हे विनंति.

---

पत्रांक ६३३ श्री. १७२४

यादी गारदी दिंमतहाय निा आपाजी बहिरट व आपाजी कोंडे सुा सलास मयातैन व अलफ. दोनी पलटणे लष्करांत जावयाविशीं आज्ञा जाहली. त्यामध्यें बंदोबस्ताचीं कलमें:—

१ लष्करांत जावयाचें त्यास, चाकरी घेऊन पैका कोणी द्यावा ? त्यास पत्रकीं, याची हजीरी घेऊन पेस्तर माहापैकीं खर्चास द्यावें.

१ दारू, गोळी, बाण, व बाणदार देवावयाची आज्ञा.

१ तोफा तीन द्यावयाच्या त्या कोणीकडून घ्याव्या ? त्याचे दरोग्याचे कारकून ज्याचे ते बरोबर असावे किंवा कसे ? ते आज्ञा.

१ आमचे बोलणें हरएकविशीं गोविंदराव बोलतात. हालीं लष्करांत जावयाची आज्ञा. त्यास, येथे बोलणें त्याजवळच बोलावें किंवा कसें ? ते आज्ञा असावी.

१ रबिलाखरपों च्यार हजार रुपये देविले ते अद्यावत् पटत नाहीं.

आठां--चौंहों दिवसांचे मुदतीनें वरात देविल्यास मोबदला करा वयासीं येईल

---

५

---

पत्रांक ६३४ श्री १७२४

यादी निा माळोजी कुंजीर. सुा सलास मयातैन

१ तो सुवर्णदुर्ग
१ तो रायगड
१ किल्ले सातारा
१ किल्ले धनगड
१ किल्ले चंदन
१ किल्ले वदन
१ पो सुर्पे
१ पो बाहादूरपुरा
१ किल्ले पुरंधर
१ किल्ले वडना गड
१ पो एकोडी सा धारवाड
१ पो कोकुसा वामळी

---

पत्रांक ६३५ श्री १७२४

यादी गुलाम बदीयुदीखान किल्ले पेमगिरी आमचे सरंजामाचे गांव च्यार गुदस्ता सरकारांत घेतले याजमुळें खर्चाची वोढ जाहाली किल्ले दोन स्वाधीन आहेत होळकराकडील फौज किल्यानजीक आली कोणे समई कसा प्रसग येतो, याचा भरवसा नाहीं खर्चावांचून किल्यांतील लोक हवाल दील खर्चाची तारावळ यासकरितां सेवेसी विनंतीपत्र पाठविलें त्याजवरून, गांवाविषयींचा मजकूर रावजी चिंतोपंत याजपाशीं वोलावा, म्हणून आज्ञा जाली नंतर देशमुख यांणीं रावजी माऊ सरजामी गांव चलावून आणून, सरंजाम पौ किल्याकडे नेमणूक काय व जातीकडे किती, याची चवकशी केली जातीस व किल्यास मिळोन वरात सरजाम गांव मोघम आहे आमचे वडिलांकडे मोंगलाईतून सदरहू सरजाम व किल्ल होते ते भलीयाबादूर यांचे मातोश्रीचें लग्न जाहालें, तेव्हां सदरहू सरंजाम व किल्ले सरकारांत दिल्हे नतर सरकारांतून किल्ले पेमगिरी व सोनगड दोन किल्ले व सरंजाम गांव व इतलाख वरात मोघम आमचे वडिलांस दिल्हेत आजपर्यंत सरका

स्नो रामचंद्र रावजी सा नमस्कार विज्ञापना ऐसिजे लष्करची गडबड अमलची स्वस्थ आली म्हणजे, चिरंजीव ऐथेसी येतील पुणतांब्याहून कूच जाइलें, म्हणजे घोर धरेल वो पावेतों तिरस्मळीचे लोक मयाभिवच आहेत श्रीकृपेनें सर्व उत्तमच घडेल कळावें हे विनति

ता कलम कागद कोरा अगदीं येथें मिळत नाहीं अर्धा दस्ता तरी अगत्य पाठवावा हे विनती

श्रीमत मातुश्रीस यांा नमस्कार

---

पत्रांक ६१८ श्रीलक्ष्मीकांत १७२५ आषाढ वद्य २

राजश्री नारायणराव वैद्य गोसावी यांसी —

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा दं डवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें वि शेष तुम्हीं एकदोन पत्रें पाठविलीं तीं पावलीं लिहिला मजकूर कळला व राजश्री सदाशिव बापूजी याचे लिहिल्यावरून व राघो भोंडदेव यांचे वि नंतीवरूनहि सविस्तर समजण्यांत आलें त्यास, येथील प्रकार वरचेवरी रा जश्री सदाशिव बापूजी यांसी लिहिण्यांत येत आहे त्यावरून तुम्हांस सम जतच आहे व हालीही कित्येक प्रकार मशारनिलेस लिहिण्यास बाकी ठेवि ली नाहीं तेहि तुम्हीं समजोन घ्यावेत व राघो भोंडदेव यांसीहि सर्व प्र कार सांगण्यांत येत असेत ते लिहीत असतील व लिहितील, त्यावरून समजण्यांत येईल तुम्हीहि चांगलें मनन करून व तेथेंहि थोडाबयाचें तें बोलून, जी सलाह असेल ती लेहून पाठविणें तुम्हांसी येथील दुसरा प्रकार आहे, ऐसें नाहीं तेव्हां हाच भरवसा आहे कीं, जें घडणें तें समजोन घडेल व चांगलेंच समजण्यांत येईल व तुम्हीं सुचविण्यास कमी कराल ऐसें नाहीं. पुढील विचार तुमचे ध्यानात नाहींत, ऐसें नाहींत तेव्हां बरें वाईट चांगलें पाहून, जी सलाह तेंच त्याहावें येथील लक्ष तो एकच आहे, ही खातर जमा पुर्वी असावी व आहेच तेव्हा तपशील त्याहावा, ऐसें नाहीं पत्राचीं उत्तरें अति सत्वर यावींत व त्याजवर मथील लक्ष राहावें, हेंच निशांव लागून आहे आपले कडूनहि सुचतें तें लिहिण्यांत कमी करीत नाहीं व पु ढेंहि होणार नाहीं हे सर्व प्रकार लिहिल्यावरूनच लक्षांत येतील वरचेवरी पत्र पाठऊन वर्तमान लिहित असावें रा छ १६ माहे रबिलावल बहुत काय लिहिणें ? हें विनंती मोर्तबसुद घिका

---

पत्रांक ६३९ श्री. १७२५ आषाढ वद्य ४

० श्री
मार्तंड चरणीं तत्पर
बाळोजी कुंजीर
निरंतर

अज दिवाण किल्ले सातारा ता मोकदमाजी, मौजे माहागाव व सा निंब प्रांत वाई. सुा अर्बा मयातैन व अलफ. तुम्ही बैद्याचे उपद्रवामुळे तजावजा जाहाला, म्हणोन विदित जाले. त्यावरून हे पत्र सादर केलें असे. तरी, मौजे-मारीं येऊन किर्दमाहामुरी करणे. हर कोणाचा साहूकरी वगैरे उपद्रव जाहाल्यास समजोन घेऊन ताकीद केली जाईल. जाणिजे. छ १८ रबिलावल. मोर्तब सुद.

मोर्तब
सुद

---

पत्रांक ६४० श्री. १७२५ आषाढ वद्य ११

सेवेसी जिवाजी निराजी कृतानेक सा नमस्कार विनती विज्ञापना ता आषाढ वा ११ गुरुवार पावेतो मुकाम पागा कुमारगाव वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविले, ते पावलें. पत्रीं आज्ञा केली जे, गारदौड येथे शामसिंग कंपू आहे. त्यास, इंदापुरी राजश्री धुळोजी हुजरे याजकडील विठलपत आहेत. त्यानीं दोन वेळा येथील खडणी घेऊन, मागती स्वार पाठऊन, येथील चौगुला यमाजी बुमाल नेऊन बैसविला आहे. नित्य स्वाराचे खर्च घेतात. त्यास. मनाईचें पत्र घेऊन पाठवितो, ह्मणून लिा. त्यास, अद्याप पत्रें आलीं नाहींत. येथें तो नित्य उपद्रव आहे. आणि अलीकडे, राजेम्हमद तोफखानां आहे, त्याचा चुलतबधू इभ्रामखान जितींत आहे, त्याजपाशीं पागा आहे. त्यानीं येथील मोकदमाचे नावें चिठी लिहून, तमाम कुरण जसी आपल्याकडे आहे, कुरणात पागेचीं घोडीं वगैरे उपसर्ग न देणें, ऐसे लिहून पाठविलें आहे. ते व जिन्नस पत्र पाठविलें आहे, याचे बदोबस्त लवकर करून पाठवावे. आह्मी येथून जितीस सगुभाईस बोलावयास

पाठविला होता तो पागा घेऊन इभ्रामखान करकभोर्से येथे गेला आहे त्याचे कारकून होते त्यांनीं सांगितलें कीं, मोर्चेकडून चिठी आली कीं, तमाम कुरणें जसी करणें त्याजवरून चिठी पाठविली आहे नागपंचमीस गांवास येणार आहे तुम्ही येऊन भोळावें, आम्हांकडे गुन्हा नाहीं, ऐसें सांगितलें आपण तेथें सर्व बदोबस्त करून, लष्कर पत्रें घेऊन पाठवावीं पाऊस थोडा बहुत पडला आहे कुरणाची रखवाली करविली आहे गवत आठपंधरा दिवसांनीं होईल हाली घोड्यास कडबळ मका घेऊन चारितों चराववास घोडीं सोडिलीं आहेत कंपूकडील गारदोडाहून चिठ्या होऊन, तमाम आसपास कडबा म्हणोन खंडणी घेतात त्याचेहि लष्कर बदोबस्ताविशीं पत्र पाठवावें राजेमहमद याचे नांवचें पत्र इभ्रामभाईस मनाई व धुळोबी हुजरे यांजकडील विठलपंत कारकून इंद्रापुरीं आहे त्यास चिठी पाठवावी कीं, दोन वेळ घांसदाणा घेतला असता, मागती मुंगाचे दाजाचे खंडणी देणें म्हणून स्वार पाठऊन यमा चौगुला धरून नेला आहे तो सोडून द्यावा एकदर गांवास उपद्रव न देणें, म्हणोन धुळोबी हुजरे याचें पत्र घेऊन पाठवावें सिलारी याचे उपद्रव भारी आहे दों चौं रोजांनीं सगुभाईस राक्षसभुवनास ऐवज वसूल करून आणावयास पाठवितों सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना

---

पत्रांक ६४१ श्री १७२५ भाद्रपद शुद्ध १०

सेवेसी विनती सेवक बाळाजी रघुनाथ कृतानेक सा नमस्कार विज्ञापना तागायत भाद्रपद शुा १० मदवार पावेतों मुकाम नागपुर वर्तमान यथास्थित असे विशेष आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन सांभाळ होत नाहीं तेणेंकरून चित्त उदास आहे तरी ऐसें नसावें सदैव पत्रीं सांभाळ करीत जावें यानंतर आपली आज्ञा घेऊन स्वार जाहलों ते मौजे आकुळनेराकडून पैठणास आला सर्व वर्तमान ऐकिलें कीं, सरकारचीं वस्त्रें व जवाहीर व हत्ती श्रीमंत मन्याबापूपार्शी सेनाधुरंधर या पदाची घेऊन, नागपुरास सदाशिवराम गुणे यांस रवाना केलें होतें त्यास, का आंबडापुरीं पूर्वी शरीरीं समाधान नव्हतेंच, कामारी यामूचा उपद्रव होऊन स्वस्तिवडे गावीं आले तेथें उपाय केले परंतु गुणावर न पडता देवआज्ञा जाहाली हें आपणांस कळलेंच असेल त्याहावें ऐसें नाहीं पैठणाहून दरमजल वर्षा उतरून सारवाडीस आलों तेथें राजश्री मल्हारजी नाईक जासूद भेटला त्यास विचारिलें की, तुम्ही पुणें पाहून निघाल्यास चार दिवस जाले असतां मार्गींच। तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, सदाशिवपंताचा काळ वडेगांवीं झाला हें वर्तमान पुणेयास श्रीमंतांस लिहून पाठविलें त्याचें उत्तर येई तोंपावेतों वडेगांवींच होतों उत्तर आल्यानंतर, हत्ती वगैरे कारखाना घेऊन, नागपुरास जाणें मागाहून लिहिण्यांत येईल तसें करणें याजवरून सरंजाम घेऊन जावों

आम्हांस त्यांणीं विचारिले, त्यास सांगितले, त्याप्रांतीं पांच रुा येणे आहेत त्यास फार दिवस जाले, जाऊन उद्योग करावा. नतर निघोन नागपुरास श्रावण शुा २ स दाखल जालों. रा सेनासाहेबसुभा याची व मुछदीमडळी वगैरे यांची भेट घेतली. पत्रे दिलीं. भापणें ममतेचींच जाहालीं. आपल्याठायीं लोभच दिसतो. कळावे. रा माहादाजी हरी यांणीं पेशजी कटकची सुभेदारी केली होती. ती हल्लीं राजश्री राजारामपत करितात. मारानिलेस येथे मागील गोसावी व सावकार याचा पेच व अलीकडे पोटास वगैरे घेतलेयाचा गवगवा. नित्य उठोन धरणेंपारणेयासी सबध. याजमुळे श्रीमत बापूसाहेब कृपाळू होऊन, फडनिशीचीं वस्त्रे वैशाखमासीं दिल्ही. त्यापासून जातच आहेत. अद्याप पावेतो तेथील नेमणूक व कागदपत्र हातास आला नाहीं. त्यास, आतां चहू दिवसात येऊन निघोन जातील, ऐसे दिसते. मीहि त्यास ऐवजाविसीं जें बोलणे तें बोलिलों. त्यांणीं सागितले कीं, जो प्रकार आहे तो कोणताहि लोपला नाहीं, दृष्टीस पडतच आहे. सांप्रत पैसा निर्माण व्हावयाचा दिसत नाहीं. रा अनतभट चितळे याजवर सरकारचा पेच आला आहे म्हणोन रोहिले याच्या पाहान्यात आहेत, त्याजकडूनहि सध्या काहीं येतां दिसत ( नाहीं ). मामलती सबधे पेंच आहे, तो उरकल्यानतर जें घडेल तें खरे. उरकण्यास वर्ष साहा महिने पाहिजेत. याच अन्वये सर्व ज्याकडे आपले पांच रुपये याची दशा काहीं चागली नाहीं. मनुष्यमात्र खरात्रींत आहेत. त्याहिमध्ये या प्रांतींचा ऐवज वसूल विनादावा शिवाय होत नाहीं. त्यास श्रीनें कृपा केली आणि श्रीमत नाना व तात्या याची कृपा सपादून घेतली, आणि वकीलीचे काम करून घेतले, आणि पूर्ववत्प्रमाणें चालिलें ह्मणजे पाच रुा सहजात वसूल होईल, येविशीं पुणेंयास विनातिपत्रे दोन चार लिहिलीं आहेत, तेथें सविस्तर लिहिलें आहे. आपणास कळलेंच असेल. कळावे लोभ किजे हे विज्ञप्ति.

---

पत्रांक ६४२ श्रीलक्ष्मीकांत. १७२५ भाद्रपद वद्य १

राजश्री अमृतरावजी गोसावी यासी:—

सकलगुणालकरण अखंडितलक्ष्मीअलकृत राजमान्य स्नो रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा दडवत विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असावें. विशेष आपणाकरिता विजयादशमीचा पोशाख पाठविला आहे. याची यादी अलाहिदा असे. त्याप्रमाणे घेऊन पावलियाचें उत्तर पाठवावें. रवाना छ १५ माहे जमादिलावल. बहुत काय लिहिणें ! लोभ असों दीजे. हे विनती. मोर्तबसुद. शिक्का.

---

पत्रांक ६४३ (नकल) १७२५ आश्विन शुद्ध १०

दौलतराव शिंदे यांस की कैलासवासी पाटीलबावा तेरा वर्षे हिंदुस्तान प्रांतीं राहून, श्री मारुती प्रमाणें महापराक्रम करून, प्रभुदर्शनास आले त्यां समई होमहवन करून, विष्युक्त भेटी तें विपरीत जालें! परंतु, पाटीलबावा श्री नरसिंहावतारिता विलोकन करित असला आहे आणि श्रीमत कैलासवासी माधवराव नारायण मुख्य प्रधान आमचे जगत्पिते हे कोणी मेले ह्मणतात आह्मी तों कलेवर दहनच केलें कोणी जिवत ह्मणतात याचा निश्चय मन छा होईना आपलें त्यांचें परम ऐक्य होतें निरोप मात येत होते मीं जाण आहे आणि पाटीलबावा महाज्ञानी, देशीं आले त्यास, पत्रें भविष्याचीं श्री सद्गुरूचीं प्रसादपूर्वक आलीं असतां, कारभारी यांणीं पावो न दिलीं याची रुजुवात ह्मवी तर त्यांतील कोणी आहेत नाहीं हेंहि न कळे! परंतु राजश्री कल्याणराव कमेली बापू सांगतां ध्यानास येईल आपण नातु होता तें पुनत्व पावलां सवाँची स्वारी पचे माली, याजपासून मेळविलें किती, हार विलें काय, याचा विचार दीर्घदर्शी यांणीं करीत असावा सहा केलीया अ धिकार चिरकाळ ज्याचा तेच करतील मी वृद्ध, श्री महायात्रेस श्री भानूस बाळअर्पण परम संकटीं केलें त्या भेऊन जावयाकरिता भाा शुद्ध १२ शुक्रांचे अस्तापूर्वी प्रस्थान केलें त्या रवानगीची तर्तूद सेनापतीकडे व पहरयाकडे ऐवज येणें त्याचा हिशेब करून पैकीं निमे पूर्व रवानगीस देवऊन, बाकी सोई सोईनें भर्ऊ बहुत दिवसाचा कारभार. सरदारीस कधीं गोष्ट नाहीं, असें पाहिलें ना ऐकिलें परंतु अगत्य मात्र पाहिजे आणि ज्याचें त्यासची देणें हें दिल्यानेंच बरें, हें अंतःकरणीं असावें या पत्रांचें उत्तर पुण्यांतील वकीलाहाह मजला असावें सरकार अकरा वर्षांचे मजकुराची माहितगारी प्रचीतपूर्वक चिरंजीव राजश्री सदाशिवराव महाळ आपले पाग्ये होते (त्यास) कौतुकानें विच्यारिलें असतां विनंति करीत जातील माझीं कामें त्रिवर्गांनीं चित्तावर घेतल्यास केवळ सुलभ आहेत हिशेब मात्र याजवी रितीनें कराव यासी आज्ञा व्हावी ऐवज सोईवार दासयून घेईन सरकारतुकशानी कराव याची नव्हे, एकादा शब्द अयोग्य लिहिण्यांत आला, तरी मी वेड्यासा- रिखा केश, नसें, यादविशींच आहेत त्याचे बोलण्याचा व लिहिण्याचा राग कोणासही घेऊं नये मागाचें दस्तक आणि उत्तर यावें ह्मणजे सोबत पाहून दर्शनास येईन मर्जी नसिल्यास वसईस मार्ग धर असई घेतल्यापासून वसईच आहे तेथें भेटायासी जाईन तेथून सुरतेवरून श्रीनर्मदातीरीं शुक तीर्थी केश नसें भीत्यपायें आहेस, ती टाकून पायागड्याकडून उजनीस माहा काल पाहोन पुढें जाऊं पत्र १

---

पत्रांक ६४४ ( नकल ) १७२५ आश्विन शुद्ध १०

दौलतराव शिंदे यांस पत्र कीं: कैलासवासी पाटील बावा तेरा वर्षे हिंदुस्तान प्रांतीं राहून श्री मारुती प्रमाणे महापराक्रम करून प्रभुदर्शनास आले त्यासमई होमहवन करून विध्युक्त भेटी व्हाव्या तें विपरीत जाले. परतु पाटीलबावा श्रीनृसिंहासारिखा विलोकन करीत बसला आहे. आणि श्रीमंत कैलासवासी माधवराव नारायण मुख्यप्रधान आमचे जगत्पीते कोणी मेले म्हणतात. आह्मी तों कलेवर दहनच केलें. कोणी जिवंत म्हणतात. याचा निश्चय मजला होईना. आपलें त्याचे परम ऐक्य होतें. निरोप जात येत होते. मी जाण आहें, आणि पाटीलबावा महाज्ञानी देशीं आले. त्यास पत्रे भविष्याची श्री जगद्गुरूचीं प्रसादपूर्वक आलीं असता, कारभारी याणीं पावों न दिलीं. याची रुजवात हावी तर त्यातील कोणी आहे नाहीं हेहि नकळे. परतु, राजश्री कल्याणराव कचेली बापू सागता ध्यानास येईल. आपण नातु होता ते पुत्रत्व पावला. खर्ड्याची स्वारी फत्ते जाली. त्यापासून मेळविलें किती, हारविले काय, याचा विचार दीर्घदर्शी याणीं करीत असावा. तसा केलिया अधिकार चिरकाल ज्याचा तेच करतील. मी वृद्ध, मी माहायात्रेस मानूस बाल अर्पण परम सकटीं केलें. त्यास घेऊन जावयाकरिता भाा शुा १३ शुक्राचे अस्तापूर्वी प्रस्तान केलें. त्या रवानगीची तर्तूद सेनापतीकडे व ग्रहस्थाकडे ऐवज येणें. त्याचा हिशेब करून पैकीं निमे तूर्त रवानगीस देवऊन बाकी सोईसोईने घेऊ. बहुत दिवसाचा कारभार. सरदारीस कधीं बोढ नाहीं, असें पाहिलें ना ऐकिलें ! परतु अगत्य मात्र पाहिजे. आणि ज्याचे वाजवी देणें ते दिल्यानेंच बरें. हें अतःकरणीं असावे. वरकड अकरा वर्षांचे मजकुराची माहितगारी प्रचीतपूर्वक चिरंजीव राजश्री गोपाळराव हरीबापू व चिरजीव राजश्री सदाशीवराव बल्लाळ आपले पाग्ये होते.(त्यास) कौतुकानें विचारलें असता विनति करीत जातील. माझीं कामें त्रिवर्गांनीं चित्तावर घेतल्यास केवळ सुलभ आहेत हिशेब मात्र वाजवी रीतीनें करावयासी आज्ञा व्हावी.

---

पत्रांक ६४५ १७२५ आश्विन शुद्ध १०

रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा यास ( पत्र ) कीं: बहुत दिवस जाले. दर्शनाभाव म्हणून चातकन्यायें मार्गप्रतीक्षा करीत असता, पूर्वेकडून हस्तनक्षत्रास वायु घेऊन अमृतवृष्टी करीत असतो, हा स्वभाव. तसेंच श्रवणांत आलें. तेणेंकरून परम सतोष जाहला. त्यात अठराभार वनस्पतीसह जलचरस्थळचरखेचरासह आनद जाला. त्यात मी एक चातक बहुत दिवसाचा तृषार्त. तो तृप्त कसा न होय ? यानतर उभयपक्षीं हितकारक विजयादशमीचे मुहूर्तें कागद सैन्यांत रवाना केले. त्यात पांच कलमाची पुा सेनासाहेब सुभा यास कार्याचा अवसार जाणून अलाहिदा पुरवणी लिहिलीच आहे. त्यांत

सामान्याचा स्वभाव, आपलें कार्याचें स्मरण असावें, दुसरेयाचें विसरावें तसें आपण न व्हां उदारां चिरतानां तु वसुधैव कुटुंबकं, असें जाणून विस्तारें लिहिलें आहे श्रवण करून, मागील श्रवणाचें मनन करून, श्री महाराजांत जावयाचे साहित्यांत सूर्त्त हस्तक व पत्राचें उत्तर पाठवावयाची आज्ञा होऊन पथदर्शन मजला होईल तोच चद्रचकोरासम आनंद होयसें केलें पाहिजे बहुत काय लिहिणें ! लोभाची वृद्धी करीत असावें हे विनंती ये विषींचें उत्तर आपले कबील वकील पुण्यास असतील त्यास खोलून त्याहावें म्हणजे मजशीं बोलून समजाऊन उत्तरें दाखवीत असें व्हावें हे विनंति पत्र १

---

पत्रांक ६४९ १७२५ आश्विन शुद्ध १०

रघोजी भोसले यांस पुरवणी पांच कलमाची लिहून पाठविली त्याची नकल

१ सर्कारांची स्वारी फते होऊन आखियावर गारपिराचे मुकामीं साडे सा॰ हा मुल्लोकें करून लिहून पत्र दिलें होतें त्यांत साराश —हा छळवाद त्या छळवादें करून अयादवी पृथ्वी जाली तेथें ईश्वरास माधवाचा पाड काय ! त्याच पत्रावें आश्वासनावरून श्रावणी पौर्णिमेस चंद्रग्रहणीं वृद्धी आहली, हें विघ्न आणतें भेटीनंतर घ्यानास येईल तो विवाद वृंदाकृष्णाचा कूटरूपें लिहिला आहे त्यांणीं आमचें शासन केलें तसेंच भीद्वारकेच्या पेटावर टोपी वाले यांनीं तोफा मारिल्या त्या रागें स्त्रीपुरुषांनीं ऐकून मुंबईचे वराव अम कायिला हें विघ्न पाहत होतें तस्मात् अपराध ज्याचा त्याजकडून ईश्वर कर वित असतो त्याजवर पुन्हां सोंगाचे संपादनीच माठी मनन करून याचो- लीचे मुकामीं एकादशीस आलों तेथें मी भट पुढें येऊन, प्रथम भेटोन, स्नानसमई सांगोन, या स्वारीचा तीर्थोपाध्या मीच आहें, म्हणोन बोलोन, मागील पत्राचा मजकूर पुशिला सों नागपुरास राहिले म्हणून उत्तर आलें होतें सगमानजीक साहा महिले मुकाम जाला होता. त्यांत पांच सात वेळां दर्शनास कांहीं गुप्त कांहीं प्रगटपणें कार्यकारण जाणोन आलों न । समई पूर्वपत्राची नकल दाखविली ते अमात्यास रामचंद्रपंत वकील वृद्ध यांणीं पाहोन, कांहीं आश्चिर्य कांहीं कौतुक मानिते जाले त्या समई शिकारी प्रकर्ण दाखविलें व बोलिलों त्यांत तात्पर्य —मोठे मोठे शूर शूर सरदार लोक शिकारीस जात असतात त्यास ज्याणें शेर दाखविली तो बक्षीस मागतो व प्रथम ज्याणें हतियार लाऊन सावज असमी केलें, समर्ई आलें असता मागाहून दुराशनांचे लेळाचारसें आलें, त्याजवळ विभाग मागतो म्हणून पियांद भीनगरीं अमरांचा सेनापतीसमान षण्मुखी सेनासाहेबसुभा, समवेत पिढूर सर्व राजनीत जाणते, चतुर, पाहित तिर्दी समुद्राचें एकयटलें ते राजाशीं व छत्रपती व नाना नरेंद्राचेच वशाचे इच्छा करणें तें कांहीं मनास

आणून जे त्यानें उचित ते त्याचे त्यास देवऊन आपलाले नगरास जाणें उचित. नाहीं तरी, अपराजितमुद्रा मुमुक्षुते जाहालेली जारीच आहेत. माधवानी माधवास माधवात माधवासहित नटिलाचा मान बहु. सचिवाचे रीतीप्रों भावयाचा होता तो थिरगीत का जाले ? व घोडा प्रासादिक नजरेचा आला, तो नजरेने पाहून शिपायानेच हवाली केला. त्याचा खर्च पागेचेच अन्वयें येईल तसा येईल. टोळ पतगासारिखे अनंत पूर्वेकडून येऊन समुद्रास भेट गेले. त्याचा प्रश्न केला होता. तेच हे माघारी द्वारकानाथाने पा. उभयदळीं प्रचित. सत्यभिच्या दर्शनार्ना खातरजमा होईल. नाप्रत, वैशाखमासीं गोविंदराव दिवाण येणाच यानी भेट माधवंडयास जाली. सहज बोलता, श्रीद्वारकेचे प्रकरण निघालें. त्यात. त्याचें धन्याचें नाव पुसता, साहेब बसली ह्मणता सहज येऊन फसली. असें श्रीगुरुमुखातून वर्ण निघाले, त्यास साक्ष उभय आहेत. समय विशेषें भेटोन कळवितील. व सिकारी प्रकर्ण लिहोन दिल्हें. ते पाहोन कोठें ठेविलें. परंतु मालोजी घोरपडे, आमचे सरकाचे मानकरी, त्याचे घरीं उभयता बधू मेजवानीस गेला. घोडा मर्जीस न आला. ते खूण. त्या समई सिकारीप्रकर्ण दोन बद लेहून दिल्हे आहेत. प्रयाजन ज्यास आहे तें पाहू. परंतु प्रसन्नतेनें बोलणें. किंवा तरह तुह्मीं रामभक्त असता न मिळाला. मी जोसी पातडें घेऊन बहु दिवस फिरलों. त्याचे सार्थक होण्यास लवहि नलगे. परंतु पाथिकाचे छायेचीं झाडें गेलीं. त्यास बहुकाळ लागेल.

१ श्री माहायात्रेस जावयाचा मजकूर पत्रीं लिहिलाच आहे. त्यात पितरांसह देवत्रयास ज्याणीं निरपराध गाजित्याचे दस्तऐवज ज्याचे असतील त्याजकडील समर्गहि लागा नये. तरच कळयावर.

१ गयावर्जनाच्या मात्रा असामी निपुनीकी. त्याची नावनिसीः——

फडके तीन ३. त्यात पुत्र असोन आचार नाहीं आणि दत्तपुत्राचा अर्थ विश्व जाणते. त्यापेक्षा धर्मपुत्रच बरा.

भानू सतेज होता. त्याचे जाल्यास पुन्हा सतेज होईल.

त्रिंबक नारायण मनोहर सुभा अहमदाबाद, ज्याणीं कोटी तुळशी श्रीद्वारकेचे ठेसास अर्पण करावयाचा सकल्प केला.

श्रीमंत माधवराव नारायण, आमचा जगत्पिता.

हे चैन पडो देत नाहीं. त्यामुळे मोठी उत्कटा लागली आहे. घटी युगासम जाते. मी वृद्ध आणि परम सकटीं ! भानूस शिशु अर्पण केलेलें. अति लालनपालन करीत नेले. पैा, त्यास सुखासनीं बसोन शीतउष्णक्षुधातृषासह सर्व समृध्धी. भयाची बाधा न होता, मार्गी जाता जाता कालक्षेपार्थ ज्याची जे आवड ते पुरविली पाहिजे जे.

१ वृद्धास रागी, बागी, पारखी, नाडी, और न्याय ! उस पचको गुरु है उमजत अग सुभाव ॥ १ ॥

१ बाळास नाना प्रकारचे खेळ पाहिजेत

१ मुलीमुलें समक्ष परोक्ष खेळणारें.

१ नरदा चहू रंगाच्या च्यार च्यार. परंतु दोन बाजू समान त्यांत जूग न करितां एकटे निर्मळी सापडलें तरी घेऊन खेळ जमवावा

१ गंजिफा चंगा राणी कोण होती ? तिणें कल्पना केली ती मोठ्या मो ठ्यांनीं मान्य केली तितक्या सर्व पानावर नजर ठेऊन आपली आगळीक

१ ढाल तरवार, सम शिलेखाना अभ्यासह असिणें

---

या सर्वांस पैका ज्याचा त्यांणीं ठेविला आहे समजाऊन देईन त्यास ताकीद मात्र खाली पोो म्हणजे सम्यास देतील

१ परसराम नाो अनगल सातारकर यांचें कर्ज आपले वडिलांचे वडिलां कडे येणें या सन त्यांस त्यांचे घर पुण्यांतील मातें कर्जांत गुंतलें आहे त्यांणीं विस्मानिशीं आपलें खत दाखविलें आणि त्याचे चिरंजीव सदाशीवनाईकही गयावर्जनाकरितां येणार. त्यास, व्यतांपैकीं आदा आला असेल, तो वजा करून बाकी लेखाया हिशेब होईल तो दिल्या उभयतां स्वर्गगामी होतसें करावें श्रीमंत कैलासवासी थोर माधवराव बल्लाळ मुख्यप्रधान स्वामी यांणीं कर्जाचा हिशेब चहू पिढ्यांचा पाहून, त्यांचा हवाला रामचंद्रनाा परांजपे यां चा देवऊन, फेरिस्ताप्रमाणें व्यतें पाहून, फाडून टाकून, सर्वांचा निरोप घेऊन स्वासइगमन करून, कीर्ती मोटी संपादिली ! त्या काळीं आनो बीयावा येऊरास आले होतेसें वाटतें त्यांणींच खत लेहून दिल्हेलें पाहिलें आहे उदार हात तर पुण्य आणि पुरुषार्थाची सत्कीर्ति लोक गातील सर दारीस थोड कधीं नाहीं, ऐसें ऐकिलें ना पाहिलें !

---

हीं पत्र कलमें यात प्रचीतीहि आहेत ती रावजी होळकर सुभेदार यांहीं पाहिल्या उपयोगी आणि त्यिथे एकरूप झाल असल्या कल्याणदायक आहे आश्विन शुा १० शके १७२५

---

पत्रांक १४७ श्री १७२५ आश्विन शुद्ध १०

विजयमहामुहूर्ते पत्रें लष्करांत रवाना केलीं त्यांतील मजकूर स्मरणार्थ

१ येशवंतराव होळकर सुभेदार यांस कीं, पत्रा वहुल ४ मदयारीं कोतवालाचे सन्मानजीक मुकाम होता तेव्हां रात्रीं चंद्रोदरें श्रीमहागणपतीचा उत्साह महाडंमर त्यामुहुर्तें पांच गर्भासह भेटीचा योग श्रीमगद्‌गुरूचे शिष्यांचा व श्रीमार्तंडाचे भक्तांचा आदला प्रसाद व पत्र मस्तकीं वंदून कितेक वर्तीगाचें ग्रन्दरानेंकरून परस्पर भूतभविष्यादि वर्तमान श्रवण होऊन, समस्या पूर्ण झा ल्या नंतर, पचमीस आलेमुरूप होळकरांनीं होळीचा मेळ सगास करून, श्रीम

त्याचे वाड्यात जाऊन, आमची माता सीतादेवी वनवासाहून आली, त्याचें दर्शन घेऊन समाधान करून, बहुमानाचीं वस्त्रे घेऊन, स्वार जाहला. रगअ-विशिष्ट पुरुप स्वस्थानीं नाहीं, म्हणून राहिला. तो अलीकडे श्रीरामनवमीस ज्याचा जन्म, पितापुत्र एक राशीं एकासनीं बसल्या जनकौतुक ! पाटील-बावा रंग खेळता पाहिले. परंतु, गोटापर्यंत जाऊन उपहार बहुमानपूर्वक होणें राहिला. त्याचे हेतूपेक्षा शतगुणित होऊन, विश्व पाहून, सत्कीर्ति दिगंतरी जावी हे इच्छा. तें करणेंकरून श्रवण होतील. आपली स्वारी गेल्यामागे तवाई मोठी गुजरली, ते श्रीहरिहरानें राखिली ! त्या सर्वांत लहान शिशु होते तें श्रीभानूस अर्पण केलें. त्यास घेऊन श्रीमहायात्रेस जावयाकारिता भा शु॥ १३ सोमवारीं श्रवण नक्षत्रीं वृश्चिक लग्नीं आठा ग्रहांचे बल जाणोन, प्रस्थान केलें. त्याचे तर्तुदीस आपण मनावर घेऊन, अल्पविपय आहे तो, वडिलाचे आज्ञेप्रो॥ हिशेब करून, द्यावयाचा निश्चय केला, असें समजल्यावर इतर आपोआप देतील. त्यास सूचना मात्र व्हावी. यादी अलाहिदा लिहिली आहे. त्याप्रों कोणास सज्ञा सांगोन पा॥ दूरच्यास पत्र असावें तसें पा॥. म्हणजे सोबत पाहून, दर्शनास येऊन, नेक सला ज्या मार्गाची असेल तिकडून जाऊं. मर्जी नसल्यास, आमचें घर वसई भाडोन घेतली त्या दिवसापासून वसईच आहे. तिकडे सर्वांस भेटावयासीं जावेंच लागेल. तिकडूनच परभारें सुरतेवरून श्रीनर्मदा शुक्रतीर्थाजवळ उतरोन, केशनखें पापाश्रित्य आहेत त्याते टाकून, पायागडावरून महेश्वर उजवें सोडून श्रीउज्जनी महाकाळाचें दर्शन घेऊन, पुढें विचार दिसेल तसे करूं. येविशींचे उत्तर पा॥. आणि वकिलासहि आज्ञा असावी. त्याप्रों ते व आम्हीं वर्तणूक करावयासी येईल.

पत्र १.

---

पत्रांक ६४८ श्रीलक्ष्मीकांत. १७२५ कार्तिक शुद्ध १

पु॥ राजश्री नारायेणराव वैद्य गोसावी यासीः--

दंडवत विनंती उपरी. कारभारी याचे प्रकर्णीं सरकारचे मनात येऊन, राजश्री नारायेण येशवंत यांणीं लिहिलें, हे फार चांगले आहे. यातून पुढेंमागें उपयोगहि आहेत. ईश्वरें सर्वज्ञता दिल्ही आहे. याजवरून, मी आपले जागीं खातरजमा पक्की ठेऊन आहें. यातील कित्तेक तपशील मशारनिलेस लिहिला आहे, ते विनंती करतील, म्हणोन लिहिलें ते कळलें. व मशारनिलेनींहि तुमच्याप्रमाणें तपसीलेंकडून विनंती केली. त्यास, जैसे तुमच्या लिहिण्यातील बेत होते, त्याचअन्वयें एकएक प्रकार उगवण्यात आला आणि उत्तरें समर्पक लिहिलीं आहेत. तुमचे लिहिण्यात कोणतें एक उगवण्यात गुंता ठेविला नाहीं. काय अडचणीचे प्रकार आहेत ते आपले आपल्यास सोसून, माणसाचे आबताब राखून, आपलें करणें द्रिष्टीस पडावें. व या करण्यातून ऐसा

फायेदा, हा लौकिकीं दिसाया याचे पोटांत सर्व कांहीं समजतील व आहे राम काळमी या गोष्टीची भाळगून आहों, ती दूर होईल व असें करण्यांतून उपयोग मार्गेपुढें आहेत हेंच जाल्यावर, सहजच आपलें करणें सर्वांचे नव रेस आलें मग, या सतोषाएवढा दुसरा सतोष नाहीं अहोरात्र हीच चिंत वना व साहस करून असों तुसी या यागणुकींतील, तेव्हां इतकेंहि करून दासवाळ याच अर्थी ऐशा रीतीनें परस्परें हा योग आपले बुद्धीकडून ठेविला आहे ईश्वर तैसा दिवस सर्वांस समजावयाजोगा कधीं आणील ! कारभारी यांसी आजवर जीं जीं बोलणीं झालीं, व ते जे जे प्रकार बोलले, व उपयोग करून देण्याचें झटलें, ते ते सर्व तुमच्या ध्यानांत आहेत येथून कोणताएक गुता व लिहिण्यास बाकी ठेविली नाहीं आता एवढें करण्यांतून काय उचित असेल तें करून दासवार्थ ही कळकळ तुमची तुम्हांस असावी येविशींचे ममकुराची आशा व समाधान जें करावयाचें तें राजश्री नारायेण वेदवत यांसीं केलें आहे त्याप्रमाणें तें तुम्हांस लिहितील, त्याजवरून कळेल व रा जश्री सदाशिव बापूजी यांसी जे जे प्रकार लिहिले आहेत त्यांचें मनन होऊन त्यांचीं उत्तरें समर्पक यावीं हें सर्व तुम्हांकडेस आहे येविशीं+स्याहार्से, ऐसें नाहीं रा छ २९ माहे जमादिलाम्बर हे विनती मोर्तबसुद

---

पत्रांक ६४९ श्री (मसुदा) १७२५ मार्गशीर्ष वद्य ५

श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांसि प्रति —

रामचंद्र दीक्षित व लक्ष्मीनारायण दीक्षित कृतानेक आशीर्वाद येथील क्षेम ता। मार्गशीर्ष कृष्ण पंचमी पावेतों क्षेम कायगाव येथें खुशाल असों विशेष माधवराव त्र्यंबक दीक्षित पटवर्धन याचा काळ जाल्याचें वर्तमान ऐकून चित्तास खेद जाला ईश्वरेच्छा प्रमाण ! देवाब्राह्मणांचें सस्थान आणि आपले पदरचे त्यापक्षीं त्याचा अभिमान आपणासच आहे संगोपान करून सस्थान चालविलें पाहिजे बहुतां ब्राह्मणांचें हें ठिकाण आहे आम्हीं पूर्वापार पुणियास येतों तेव्हां या स्थळाव्यतिरिक्त कोठें राहत नाहीं धर्मदोन धर्मपावेतों राहणें जालें, तरी आतिथ्य आदर औपचार येथेंच होतो ऐसें बहुत विप्रमंडळींचें स्थळ आहे याची स्त्री गरोदर आहे बहुत ब्राह्मणांचे आशीर्वादें पुत्रच होईल तथापि महासूत्र प्रमाण धर्मसंस्थापना कृपाळु होऊन केली पाहिजे सारांश, हें देणें आम्हा ब्राह्मणास दिलें पाहिजे बहुतां दिवसां पासोन धर्माचें स्थान आपलें आहे देवब्राह्मणाचे सस्थानाचें सरक्षण करणार आपण आहत कारभारी बहुत दिवसांचे त्र्यंबकराव दीक्षित यांजपासून चांगलेच आहेत दीक्षितांचा काळ जाला तें समई माधवराव दीक्षित पांच वर्षांचे होते त्या दिवसापासून कारभारी यांनीं अकृत्रिम सेवा करून व्यय

हार चालविला. हे सर्वश्रुत असेलच. प्रस्तुतहि तेच कारभारी आहेत. निर्वाहा करणें आपल्याकडे आहे. बहुत काय लिहिणे ? हे आशीर्वाद.

---

पत्रांक ६५० श्रीलक्ष्मीकांत. १७२५ पौष शुद्ध २

पो छ ३ माहे रमजान सन १२०४ मुा विचरणी.

राजश्री बाबूराव विश्वनाथ गोसावी यासी.—

दंडवत विनती उपरी. मडले व नबाबाकडील जाबसाल दोन आम्हाकडील करून घेन्याचे आहेत. याचे बोलनें दरबार खर्चाचे वेगळे वेगळें जेव्हा ठहरले ते मुख्त्यारीनें ठहरवावे. मजूर असे. याचा अदेशा हरगीज न कर्ने. येविसी उभयतां तुम्हासी बोलतील ते मनात ठेऊन मुखत्यारीनेंच कर्ने. रा छ १ माहे रमजान. हे विनती.*

---

पत्राक ६५१ श्री. १७२५ पौष शुद्ध ४

विज्ञापना ऐसीजे. इग्रजाची व याची बोलणी होऊन निश्चयात आली *कलमें विा—

वरधेपलीकडे जो प्रांत तो तुमचा तुह्माकडे असावा कलम १.

मडले सस्थानाविशीचे आह्मी बोललो असतों. परतु तुह्मीं राजश्री पतप्रधान याची नुकसानी केली नाहीं. सबब तेहि तुह्माकडे असावे १

फरासिस अथवा इग्रज कोणी तुह्मांपाशीं आल्यास त्यास नोकर ठेऊ नये. कलम १

आह्मावितिरिक्त राजकारण कोणीकडे तुह्मीं ठेऊं नये. कलम १.

कटक व वराड आह्मीं घेतलेच आहे ते माघारे द्यावयाचें नाहीं. कलम १.

गाविलगड व नरनाला याचे सरजामाचा प्रात इतकें तुम्हास दिल्हें. हे तुह्माकडे असावे. १.

आमचे द्वेषी असतील त्याची साथ तुह्मीं करू नये. कलम १.

आमचा वकील तुह्मापाशीं व तुमचा आह्मापाशीं असावा. कलम १.

सदहूप्रमाणे निश्चयात आलें, ऐसे ऐकिलें. त्याजवरून विनती लिा आहे. याशिवाय आणखी काय असेल ते समजेल तसे लिहून पाठऊ. शेवेसी श्रुत होय. हे विज्ञापना.

---

* हें सबध पत्र रघोजी भोंसल्याच्या हातचें आहे.

* ह्यानाच इग्रज लोक देवगावचा तह म्हणतात.

पत्रांक ६५२ श्रीलक्ष्मीकांत १७२५ पौष शुद्ध १४

राजश्री नारायेण बाबूराव गोसावी यांसी —

दंडवत विनंती उपरी तुमी चिठी पाठविली ती पावली लिहिला मजकूर कळला त्यास, आंम्हांसी सह धारमदार करून झाला त्यांजकडून आतां आगळीक व्हावी, ऐसें राहिलें नाहीं पलटणें चाकर होतील, हा समय खुलास होवा त्यास, श्रीदयेनें तो प्रकार जाला नाहीं व भावी केला नाहीं सहाचा सपर्छालहि, तुम्हांकडील प्रहस्थ येथें आहेत, त्यांचे लिहिल्यावरून कळेल मसलतीचे प्रकर्णी तुम्हीं व राजश्री भीवर लक्ष्मण व कृष्णराव माधव ऐसे त्रिवर्ग त्यास कृष्णराव माधव याचा प्रकार श्रीजीनें तैसा केला ! आता राहतांना तुम्हीं उभयतां आहां तुमचे मनांत जो जो उदेश होवा, तो कोणताहि एक नाहीं पुढें धैर्य धरून चालणें आहे ज्या स्थळीं तुम्हीं जाण्याचें योजिलें होतें, त्याप्रों जाणें तीं जालें असेल परंतु, तुमची भेट जालियानंतर हे सर्व प्रकार बोलण्यांत येतील, तेव्हां सविस्तर समजण्यांत येईल धैर्य व विचार तुह्मासारखियानीं सोडू नये जैसें लिहून पाठविलें तैसें मनांत तुम्हीही ठेऊन असावें रा छ १२ माहे रमजान *नारायेण रावजी! तुम्हास मार्गे लिहिलें हेंच कीं, जें करणें तें काळावर नजर देऊन केलें त्यास, आतां सर्व माझे तुम्ही जे जे लोकती आहां त्यांहींनीं धैर्य व मसलत चुकू नये हे तुमची व माझी व उभयतांची बोलणीं जाहलींच होतीं याप्रमाणें उद्योग असावा तिघांतून एकाचा प्रकार तैसा जाहला यासी श्रीसत्ता प्रमान ! परंतु तुम्ही उभयेतां आहां तेव्हां धैर्य व मसलतीस न चुकतां परमेश्वर इतला देत जावा व भेटहि एखादे तऱ्हेनें सत्वर होइलच फार काय लिहूं ! बहुत काय लिहिणें ! हे विनंती मोर्तबसुद

---

पत्रांक ६५३ श्रीलक्ष्मीकांत प्रा १७२५ माघ शुद्ध १

वेदमूर्ती राजश्री अनंत भटजी दाजी व केसोपंत स्वामीचे सेवेसी —

पो बाजी विठ्ठल सां नमस्कार विनंति येथील कुशल ता माघ शुद्ध १ मुा देऊळगांव, पो लोहगाव, नजीक गंगातीर, आपोन स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे विशेष सांप्रत तुम्हाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी सविस्तर ल्याहावें ऐशियासि, आपण येथून कूच करून मजलदरमजल फौजेसमागमें श्रीमंत पंतप्रधान यांजकडेस जात असों दुसरें राजश्री नरहरपंत सुभेदार यांणीं पत्रें सरकारची ताकीदी वगैरे वेयाचे यकिलीची वगैरे दिल्हीं आहेत ते पावतील परंतु, यांतहि जीव नाहीं असों तुम्ही आपले माळमतीचा गुंता जैसा आणाल तैसा उगऊन घेणें बहुत काय लिहिणें ! लोभ असों दीजे हे विनंति

---

* येथपासून अक्षर व भाषा गुरु रघोजी भोसल्याची

पत्रांक ६५४ श्री. १७२५ फाल्गुन वद्य १३

साहेबांचे सेवेसीं विनंती सेवक निळकंठराव राम......कृतानेक साष्टांग दंडवत विज्ञापना ता। छ २७ जिल्काद पावेतो स्वामीचे कृपावलोकनेंकरून मु॥ पालेर, प्रो भांडेर, नजीक झांसी येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीकडोन बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाही. सदैव आज्ञापत्र सादर होऊन सेवकाचा साभाळ जाला पाहिजे. यानतर स्वामीचे हातची चिटी छ २४ रजबची सादर जाली ते छ २७ साबानीं पावली. पत्रीं आज्ञा जे, मागाहून लवकरच ग्रहस्थ पाठऊन बदोबस्त कर्ण्यांत येईल. त्यास, तीन महिने होत आले. व आज......माझा कोणताहि बंदोबस्त न जाला. आज इतके......टंत्रा. सागरवाल्यानीं सावकारास आमचे नांवें खत देऊन व्याज-मनोति घेऊन, पंधरा हजार रुा दिल्हे. तदनतर आह्मीं कूच करून झाशी-कडे जाण्याचे विचारांत होतो. इतक्यांत राजश्री आबोजी इंगळ्याची फौज व पलटणें सागरास आलीं. खटला करून पैका घ्यावा किंवा ठाणे बसवावे, हा बेत त्याचा. तेव्हां सागरवाल्यानीं आम्हास स्वारीखर्च पधरा हजार रुपये देऊन ठेऊन घेतले. त्याजवरोन इंगळे याची काबू चालली नाहीं. ते निघोन गेले. आह्मीं तेथेंच होतो. वरातेऐवजीं पैसा दिल्हा नाहीं. ते समई रा...कालपीवाले यांचीं पत्रें आलीं जे, कूच करून इकडे यावें, सर्व बदोबस्त होईल. त्याजवरोन आह्मी झासीकडे आलों. तों रो शिवराम हरी हे इंग्रजासीं सलख करून त्याजवळ आहेत. त्याजकडे वरातेचे ऐवजाक-रिता कारकून पाठविला होता. शिवराम हरीने कारकूनास सांगितले जे, वरा-तेऐवजीं पैसा मिळावयाचा नाही. कूच.........ह्मणोन ऐवज मागता, आह्मीं कोठून द्यावा.........ह्मणोन जाब दिला. जेव्हा कारकुनानीं...... ......सागितली. त्याजवरून पांच हजार रुपये मोठ्या कृता.........आह्मा-जवळ दाहा पंधरा हजार फौजेची जमियत जाली आहे. खर्चास पैशाची जागा नाहीं. फौजेचा खर्चाचा बखेडा होऊन नित्य धरणीं चाललीं आहेत. येविशीं नित्य इंग्रजाकडे वकील पाठऊन बोलणे लावलें, जे, आमची रवानगी श्रीमतानीं या प्रातीं केली आणि आपलेहि येणे सरकारआज्ञेनीं जाले. सर्व-त्रांचा बंदोबस्त आपण केला. आमचा बधेज काहींच न जाला. त्यास, आप-ला व श्रीमंताचा एक विचार असता आमचा बंदोबस्त न व्हावा, हे आप-णास योग्य नाहीं. त्याजवरोन त्याचें बोलणें पडले जें, डगाई वगैरे जागा श्रीमतांनीं आह्मांस दिल्हीं. तुमचा जाबसाल येथें काय होणें आहे? तुह्मीं या जिल्हेस राहूं नये. तुमचा बदोबस्त श्रीमतास करणें असता, तरी इंग्रजकुंपणी-बहादूर यास ताकीद जाली असती. तरी आह्मास लिहिलें येईल तेव्हा तुमचा बंदोबस्त श्रीमताच्या आज्ञेप्रमाणें वर्षदीडवर्ष जाले. श्रीमतानीं काय बंदोबस्त करून पाठविलें? तुमचें अगत्य सरकारास नाहीं. तशांत कांहीं बदोबस्त

करून द्यावा, ऐसें एका दोघांजवळ बोलले होते परंतु शिवराम हरी यांनी इंग्रजास सांगितलें कीं, याचा इरादा लढाई वगैरे जाण्याचा आहे, श्रीमंतास यांचें अगत्य फार आहे, याचा बंदोबस्त लवकरच होऊन येणार, तों पावेतों आपण खर्चास दिल्यास यांचे पाय या जाग्यांत रुपले, मग तुम्हांस व आम्हास वगैरे जाग्यास हे जरूर देतील, या प्रांतांतील हकीकत सर्व श्रीमंतास लेहून आम्हास मसलत भारी पाडतील वास्तव यांचा जावसाल कांहीं एक न करावा, म्हणजे आठ म्यार रोजांत निघोन जातील ऐसा कित्येक प्रकारें कुपाट समजाऊन, आमचा बिघाड करितात अलर्गत दाशियावाले वगैरे रागब्यासी सुचवून दोन ठाई आम्हावर लढाई पाडली परंतु स्वामींचे प्रतापें आपलेकडील हर्षर होऊन, दाशियावाल्यांचें पारपत्य होऊन, त्याजकडील दोन तोफा सरकारांत आल्या माझी रवानगी स्वामींनीं इकडेस केली ते समई मी विनंती केली कीं, आजपर्यंत स्वामींच्या पायास अंतर पडलें नाहीं, आतां आहेस उजूर करावा तरी मर्जी कष्ट होईल ऐसें जाणोन आज्ञेप्रमाणें केलें ते समई स्वामींनीं मला आज्ञा केली ते स्वामींचे ध्यानांत असेलच ऐसा दुर्लौकिक माझा झाला तफ्दला महदशेस उपाय नाहीं स्वामींनीं सत्वर बंदोबस्त करून पाठविला पाहिजे इंग्रजास स्वामींनीं छत्तीस लक्ष थोडा इजाराची जागा लगाई पो दिल्ही हे तनख्या बरहुकूम दिल्ही किंवा वसुली दिल्ही हें न कळे वसुली दिल्ही असल्यास बाकी चार लक्षांची जागा राहाती तनख्याबरहुकूम दिल्ही असल्यास, साठसत्तर लक्षांची जागा राहाती यांपैकीं हिंमतबाहादर गोसावी यांजकडे पंचवीस सव्वीस लक्ष तनख्याची जागा आहे परंतु गोसावी सरकारउपयोगीं नाहींत यांचीं कृत्यें अनन्वित आहेत स्वामींचें ध्यानांतच आहे सरकारी माहाल भांडेर व कोंचअरूप व शाहाझपरा व भेलसा व सुसरया व मोठ्ठ भीतरघर जागा वगैरे याची याद पाठविली आहे श्रुत होईल हाल ही जागा खालीं पडोन, इंग्रजाचें अनुमतें मवास खातात समशेर बाहादुर यांनीं इंग्रजासीं सुताचें बोलणें लाऊन, आपला समेट करून घेतला चार पाच लक्षांची जागा वसूली लगाई पैकीं घ्यावी, कोणाचा उपद्रव लागू नये, ऐसें इमानप्रमाण होऊन भेटी जाहाल्या आकलकोटकर भोंसले यांजकडील रा॥ नरसिंगराव अनंत पतकसुद्धां व रा॥ पिराजी नाईक निंबाळकर आम्हाजवळच आहेत नरसिंगराव अनंत पतकसुद्धां सरकारलक्ष राखोन हर एक कामाचे उपयोगीं आहेत त्याजवर स्वामींचें लक्ष असावें यशवंतराव व पवार हे समशेरबाहादर यांजजवळच आहेत येण्याविसीं लिहिलें परंतु येत नाहींत दिवाणही तेथेंच आहेत त्यांस ताकीदपत्रें जालीं पाहिजेत इकडील जाग्यांपैकीं बंदोबस्त सेवकाकडे होऊन आज्ञा पाहिजे म्हणजे सरकार किफायत लवकरच होऊन येईल मी फक्त स्वामींस जाणतों माझा अभिमान पर त्याप्रमाणें पार पाडणें स्वामींकडेसच आहे कालपीवाले इंग्रजाजवळच आहेत

त्यांचे समेटीचे बोलणें लागलें आहे. परंतु कालपी इंग्रज सोडीत नाहींत. हे कालपीशिवाय समेट करीत नाहींत. ऐसें दिसून येतें. जे काय ठरेल, ते मागाहून सेवेसी विनंती लिहीन. सर्व आधार स्वामीचे चरणाचा आहे. विनंती- प्रों पत्रें द्यावीयाची आज्ञा जाली पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्रांक ६५५ श्रीसीताकांत. १७२५ फाल्गुन वद्य १३

राजश्री खंडो मुकुंद गोसावी यांसीः--

स्नो व्यंकोजी भोसले सेनाधुरंधर दंडवत. सुरसन खमस मयातैन व अलफ. गुदस्ता तुम्हीं गेल्या तागाईत दोन तीन पत्रे पाठविण्यात आलीं. त्याचीं उत्तरेहि येत गेलीं. त्यास येथील आह्मास सर्वत्राच्या चालीरीती वगैरे गृहकृत्यास पूर्वीपासून पूर्तेपणें तुह्मीं वाकीफ आहा. तेव्हा तपसिले ल्यावेसें नाहीं. सांप्रत, या चहू महिन्यात येथें जो ग्रंथ जाला तो परस्परें तुमचे समजण्यात आला असेल. आणि राजश्री नारायणराव बाबूराव याचे लिहिण्यावरूनहि समजलें असेल. इकडून तुम्हांस न कळविण्यास कारण जे, पुर्तेपणें सर्व गोष्टीस व चालीस रावसाहेबांनिले माहीत आणि पेशर्जी आश्वीन मासी इकडून यातील काहीं एक संकेताचे पोटीं खास दस्तुरें लेहून परभारें तुमचेकडील मुख्यास इतल्ला करण्यात आला. त्याचें उत्तर तो आले नाहीं. परंतु निरोप मात्र आला जेः तेथे रावजी आणि येथें खंडो मुकुंद आहेत, तेच समजून घेतील व तुम्हासी बोलतील. त्याजवरून येथे रावजी तो सर्वोपरी वाकीबच आहेत. यास्तव आजपावेतों इकडून तुम्हाकडे लिहिण्यात न आलें. अस्तु. यातील कच्चे तपशीलाचे अर्थ सर्व भेटी अंतीं परस्परें खुलून समजतील. सांप्रत परभारें कळण्यात आले जे, तुमचें येणें इकडे होणार. त्याजवरून फार संतोष वाटला. तर, आजपर्यंत कित्तेक वेव्हारमार्ग पडद्याचे पोटीं चालले. परंतु याउपर आम्हाकडील येथे काहीं एक वेव्हाररीत वगैरे पुढें सुधे विचारें चालावें असे राहिले नाहीं. हे सारे रावजीसहि कळून आहे. तुमचेहि भेटीनंतर साकल्य कळण्यात येतील. याजवर आमचा विचार तो हाच आहे जे, श्रीक्षेत्रवास करावा. परंतु हे ठीक नाहीं. यास्तव लिहिण्याचे कारण जे, येथील सांप्रदाय पहिलेपासून चालला आहे. काहीं एक विचाराची सूचना तेथे होत असावी, नंतर कोणी एक मार्ग चालावा. अस्तु. तुह्मी तो तेथील सर्व इकडील वगैरे मजकुराचा शोध घेऊनच निघाल, हा भरवसा पक्केंपणें येथें आहे. चिंता नाहीं. परंतु, आजपावेतों गौप्यात चाललें. पुढे आह्मीं आपला मनोधर्मच करावा किंवा कशा रीतीनें राहावें, येविशीं ल्याहावे ऐसें नाहीं. हे खातरजमा पक्केपणें येथें असे. आम्हास तो त्याज वेगळा दुसरा धर्मच नाहीं. हे तुम्हासहि कळून असे. याजकरिता सूचना लिहिली असे. यांतील मनन पुर्तेपणे करणे. आणि या पत्रांतील उद्गार इकडे कोणाएकास हरगीज न सं-

मजावा या पत्राचें उत्तर सत्वर यावें जाणिजे छ २७ माहे जिल्काद बहुत काय लिहिणें ?

---

पत्रांक ६५१ श्री १७२५

विज्ञापना ऐसीजे आपल्या पत्राचे आशेप्रमाणें विनती केली उत्तर आ हलें कीं, जो पूर्वी संकेत केला होता तोच त्या मासपक्षांत सिद्ध करावयाचा होता, तो न जाहला अवघीवर टाकलें त्यातून हे निघाले त्यास सत्तरपीस आणे जाहलें त्यासमई तेरे न्याचे समागमें होते चिंता नव्हती केवळ शिंदे चालून जाते, असें घडतेंना अविचारें करून जाते, तर तेंहि ठीक नाहीं या मार्गानें तोरे ठेऊन गेले हें चांगलें त्यास, त्याजपाशीं आज सर्व आहे जें जाहतील तें पूर्वी करीत आले व पुढेंहि करितील, हा भरवसा व वांस आला आहे व पुढेंहि येइल त्यास, आतां, यांच्या तीन तोडी —एक तोड हेच कीं, पक्षीचा मोहरा खाऊन सर्वांचा उत्कर्ष जिरवणें असिल्यास ज्या स्थळीं आहेत तेथेंच राहून त्यांस सरंजाम काय असावा याची योजना क रावी सरकड कितीक दिवस प्रांतात राहून काय करितात व कोणाची धाव कोठवर येत आहे, हेहि समजेल परंतु यातून मुलखाची खराबी आहे गोष्ट सिद्ध गेलियावर संजोगणी हावयास बहुत दिवस लागतील यांतील बारीक मोठे अर्थ सर्वज्ञता जेथें आहे त्याच्या ध्यानांत आहे

दुसरें उभयताचे मध्यस्तीस कोणी मातबर याणें यावें त्याणीं त्यांस यांस चार गोष्टी उत्तम प्रकारेंच्या, द वाच्या, जरबेच्या सांगोन, रसायण करून घावें

तिसरें फौज जमा पोक्त करावी, द्रव्य आशा सोडावी, आणि आपलीही करून दाखवावी ज्याच्या चित्तांत विषमता आली असेल, त्याणें आपल्या सरंजामानिशीं रेवापार बऱ्या वाटेनें गेल्यास उत्तम न गेल्यास जोरबरोबर करून लावावें यांत दाब नष्ट सर्व आहे आमचें म्हणाल तर, गादीस जो अधिकारी होईल, त्याची भेट आमची होणें ते तुमच्याच गृहस्थाचे हातून घेऊ तेंच चांगलें आह्मी आजपावेतों दोघास जाणत होतों त्यास एक, तर सर्वांची आशा ठेऊन गेले आतां आहेत त्यांच्याठाईं दृढनिश्चय धरून आह्मीं आणि आमची चाणेगारी सवरलें चाहसात तेव्हां आमच्याकडून त्यांच्या व चनास अमान्य होणार नाहीं ही खातरजमा त्यास आली आहे व पुढें आ पथून देऊ त्यांनीं पक्षीचा मोहरा खाल्ला, तर आह्मीं येथेंच राहू त्यांचा लेख आला, हर मेऊन मध्यस्ती करून, रसायण त्यांचे मर्जीप्रमाणें उतरू. जमावमुद्दां येण्याचें पत्र आलें, तरी सिद्ध आह्मीं जो पक्ष धरिला तोच सि- द्धीस नेऊ आमचा ओढीचा प्रकार हा, त्यांच्या लक्षांत आहे *राजश्री

---

* पुढील मद गहाळ

येणेंप्रों पूर्वीपासून दरसाल ऐवज पावत आला. अलीकडे झाडा जाहला नाहीं. मध्यें च्यारपाच वेळ आह्मीं पुण्यास आलो, ते समई नेमणूक ऐवजीं मोघम ऐवज पावला—— रुा

२५००० कैलासवासी श्रमित दादासाहेब यार्णी.

३५००० कैलासवासी श्रीमत माधवरावसाहेब यार्णी.

२५००० कित्ता.

१०००० कित्ता.

——— ———

३५०००

७०००० कैलासवासी [illegible]

पत्रांक ६६० श्री. १७२६

यादी श्रीधर लक्ष्मण व कृष्णराव माधव व रामचद्र दादो दिा राजश्री रघोजी भोंसले सेनासाहिबसुभा विज्ञापना ऐसीजे. बहुत दिवस सरकार लक्ष राखून सेवा करीत आलों. यास्तव कृपा करून सरजाम व इनाम देऊन चालवावयाचा करार. त्या प्रों हल्लीं गाव लाऊन द्यावयाची आज्ञा:——

१५००० कैलासवासी रावसाहेब याचे कारकीर्दीस खर्ड्याचे लढाईत देविले ते.

२५००० माहाडास करार केले ते.

——— ———

४००००

तुह्मीं सरकार लक्षांत राहून वर्तणूक करिता. सबब खर्ड्याचे स्वारीस कैलासवासी राव यार्णी पधरा हजाराचे गाव देण्याचा करार व माहाडास पचवीस हजाराचे गाव देण्याचा करार. एकूण चाळीस. पौ हाल्लीं पस्तीस हजाराचा करार ठरला. त्यापैकीं चौथाई इनाम व तीन हिस्से जागीर एकूण पस्तीस हजाराचे गांव दरएक जागीं लाऊन. ( पुढें लिहिलें नाहीं. )

———

पत्रांक ६६१ श्री. १७२७ वैशाख शुद्ध २

रवाना ताा छ १ माहे सफर सन १२०५ दाखल छ ९ माहे जमादिलावल. श्रीमत माहाराजे बाजीरावसाहेब पडितप्रधानबहादर माहाराजाचे सेवेसी:——

बगदादचे बादशाह याजकडील सैद मुस्तफा यार्नी पारसी पत्र लिहिलें त्याची हिंदवी नकल: आमचे चुलत्याची लेक नवाबमीरअलम मरहुम यास दिल्ही आहे. त्यास, साप्रत बादशाहबगदाद याजकडून नबाबमुनीरलमुलुकबाहादूर याजकडेस जावयाकरिता हुकूम जाला. त्याजवरून बदर मुबईस येऊन गवनरबाहादुर याची भेट घेतली. त्यार्नी बहुत लोभ करून, आमचा

समजावा या पत्राचें उत्तर सत्वर यावें जाणिजे छ २७ माहे जिल्काद बहुत काय लिहिणें ?

---

पत्रांक ६६१ श्री १७२५

विज्ञापना ऐसीजे आपल्या पत्राचे मारीप्रमाणें विनंती केली उत्तर आलें कीं, जो पूर्वी संकेत केला होता तोच त्या मासपर्यंत सिद्ध करावयाचा होता, तो न जाहला अवधीवर टाकलें त्यांतून हे निघाले त्यास सततपीस आर्णे जाहलें त्यासमई तेरे न्यावे समागमें होते चिंता नमूसी केवळ घिंदे चालून आले, असें घडतेंना अविचारें करून जावे, तर तेंहि ठीक नाहीं ... ऐसे ऐकून होते हें चांगलें त्यास त्याजपाशीं आज सर्व

पत्रांक ६६२ श्री (नकल) १७२८ मार्गशीर्ष वद्य ९

राजश्री महिपतराव कचेश्वर गोसावी यांसी —

असंखितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री येशवंतराव होळकर दंडवत सुा सबा मयातैन व अलफ राजश्री लक्ष्मणराव शिवराम यांची वरात पेशजीं तुम्हांवर पांच हजार रुपयाची जाली आहे त्या प्रो एक हजार रो मार निलेस पावले बाकीचा ऐवज न देतां, घटाईचे जाबसाल करितां, म्हणून मारनिलेनीं हुजूर विदित केलें ऐशीयास, माहाल श्रीमंताकडील, त्यांचे हे आस, माहालसबंधीं आज पावेतों तुम्हांकडून श्रीमंतास आदा पावली काय, हाहि अर्थ केवळ विचार केला असतां ध्यानांत न यावा अशांतील नाहीं यास्तव हें पत्र तुम्हांस सादर केलें असे तरी दूरदेशीनें समजून पत्र पावताच पांच हजार रो बाकी राहिले ते यांचे पदरीं घालून वरातीवर भरपाई करून घेणें या उपरीं दिकत करून बोभाट नये तें करणें जाणिजे छ २२ सवाल बहुत काय लिहिणें मोर्तब्य असे शिक्का

---

पत्रांक ६६३ श्री १७२८

यादी नारायण दीक्षित व यशेश्वर दीक्षित ठकार यास सरकारांतून सालीना नेमणूक श्रीमंत कैलासवासी नानासाहेब व श्रीमंत कैलासवासी दादासाहेब यांणीं आपले हातचे करार करून दिल्हे आहेत सुा सबा मयातैन व अलफ नेमणूक— रो

७५००

ता।

३५०० नारायण दीक्षित,

४००० यशेश्वर दीक्षित

---

७५००

येणेंप्रों पूर्वीपासून दरसाल ऐवज पावत आला. अलीकडे झाडा जाहला नाहीं. मध्ये च्यारपाच वेळ आह्मीं पुण्यास आलो, ते समई नेमणूक ऐवजीं मोघम ऐवज पावला-- रुा

२५००० कैलासवासी श्रीमत दादासाहेब याणीं.
३५००० कैलासवासी श्रीमत माधवरावसाहेब याणीं.
२५००० किता.
१०००० किता.
———
३५०००
७०००० कैलासवासी धाकटे माधवरावसाहेब याणीं.
१०००० किता
१५००० किता
४०००० किता
२५००० १५०००
५००० किता.
———
७००००
———
१३००००

किता नेमणूक सालीना पावत आली रुा.
५६५ खुद्द निा.
२८० शागिर्दपेशा असामी ५
२२५ कारकून असामी २
६० बारगीर असामी १
———
५६५
४०५ वर्षासनें ब्राह्मणास आ ८
२१६ चिटकंभट अध्यापक आश्रित
———
११८६

कापड आख
४१५८ सालीना
१२०० पालखीचें एक साला आड.
———

विजयादशमीस पोपास्य २ पुणियाहून सातारा पावत आले सनगे सुमारे७
आम्य
४०० –

---

पत्रांक ६६४ श्री १७२९ पौष शुद्ध ४

स्वस्ति श्री राज्याभिषेक–शके १३४ प्रभवनाम सवत्सरे पौष शुद्ध चतु र्दसी सोमवासरे क्षत्रियकुलावंतस श्रीराजा शिव छत्रपति स्वामी याणी वेद शास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री नारायेण दीक्षित व मशेश्वर दीक्षित ठकार यांसि आज्ञा केली येसीजे –स्वामीनीं दुबाकारणें मकर सक्रमणाचे तीळ शर्करायुक्त येसाजी खोडकर सरुपश्री बाळोले हुजुर असामी दोन या समा गमें पाठविले आहेत घेऊन पावलियाचें विनतिपत्र पाठवणें जाणिजे बहुत काय लिहिणें ?

मर्यादेय
विराजते

---

पत्रांक ६६५ श्री १७३३ कार्तिक शुद्ध ७

सेवेसी नारो त्र्यंयक साष्टांग नमस्कार विनंती विज्ञापना तागाईत कार्तिक शुद्ध ७ सप्तमी मुकाम लष्कर, नजीक अजमेर, येथें स्वामींचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष मला येथें येऊन च्यार पांच महिने झाले पेशजी दोन च्यार पत्रें पाठविलीं होतीं तीं पावलीं न पावलीं, हें कांहीं कळत नवतें त्यावरून काळजी लागली होती त्यास आपण पत्र मला लिहिलें होतें तें भाद्रपद छ्या ५ पंचमीचे दिवशीं पावलें त्यांत राजश्री आपा चिटणीस याचे नांवें त्याच्या तीर्थरूपाचें व राजश्री सर्जेरावबापूस देशमुख यांचें होतें कीं, सरकारांतून मामलत श्रीमताकडून आपल्याकडे करोलीची आहे, तेथें मशीव राजश्री गोविंदराव रामचंद्र गेले आहेत, त्यास उठवून त्यावें, आणि आपले कारकून तेथें आहेत त्याचा अमल करून द्यावा, व सरकारांतून फिरंगीयाशी ताकीद आली त्यावरून चकती येथें राजश्री महिपतरावजीकडे पाठविली आहे, व जय किसन ब्राह्मण परभारा लष्करांत कागद घेऊन येईल, त्यावरून वर्तमान कळेल असें लि॥ त्यास येथील वर्तमान पहिला जामदार साहा पावेतों ठरत होता परंतु आपली खात्री होईना याजकरितां राजश्री बापू सिंदे व वाल्या सिंदे यांच्या मारफतीनें दिलें पण जामदार करावा, पुढें मागें

आलटपालट जाबसाल होऊ नये, याजकरितां त्याच्या विद्यमानें जाबसाल केला. हजार पांचसे रुपये जाजती कबूल करणे प्राप्त जाले. कागदपत्र, सनदापत्रें तयार होऊन द्यावीं; इतक्यात फिरोन बदमामलीस आले कीं, सरकारचे बोलणें पडले कीं, आमच्याकडून मामलत महिपतराव याणीं कबूल करावी, कची जमा कसी काय आहे ती समजावून द्यावी, मग त्यास काम सांगू, त्याजकडे मामलत ठेवीत नाहीं असें बोलणें पडले. त्याजवरून आम्हीं जाबसाल सोडिला. मग राजश्री बापू सिंदे याणीं सरकारातून बारा हजार रुपये ठरविले. त्यात साहा हजार रुपये रोख सरकारात दिल्हे. साहा हजार रुपये आपल्या चाकरींत ठराविले, आणि सनदा करून घेतल्या. आह्मास ह्मणों लागले कीं, आमच्याकडून हजारा करणे. तरी करावा. आह्मीं आपल्याकडे काम करून घेतले. राज्याचे त्याचे एक विचार, भाईच्यारा, राजा, त्यास सानकूल जबरदस्त फौजबंद. आपला उपाय नाही. साठ वर्षांचा अमल. आपली जागा येकवेळ हातातून गेल्यावर फिरोन येणें कठीण. आपली दाद कोठे लागेना. सरकार बदमामली लोथापुढे कोणाचे आइकत नाहीं. सागरवाले व सिवाजी विठल व नारोशंकर व पवार व जाधव वगैरे तमाम साऱ्यापासून आम्हीं पैसा घेतो व जागा जप्त करितों. आम्हीं श्रीमंतासी जाबसाल करू. चिंता नाहीं. एक साला आम्ही तुम्हापासून पैसा घेऊ असें बोलणें पडले. त्याजवरून चवदा हजार रुपये ठराविले. आठ हजार रुपये शारींत व उदारीवर साहा हजार रुपये. याप्रमाणें ठराऊन, निशा आठ हजाराची सावकारी घेऊन, सनदा, आपल्या नावें पूर्ववत्प्रमाणें मामलत याची याजकडे काईम आहे असें करून दिली. गोविंदराव रामचंद्र उठून आले. राजेयानें गावातून आठ हजार रुपये वसूल करून घेतले. पांच हजार रुपये दाडबदार, व माल पैकीं तीन हजार चकती येथे जाबसाल ठरल्यावर मजजवळ येऊन पावली. पुण्याकडील तीन मास मार्गप्रतीक्षा करीत होतो. तिकडोन कागद पत्र देखील न आला. मग करणें प्राप्त जालें. त्याचे कारण दूरदेशीं सरकारातून पत्रे येऊन हिमाइत होते, तो येथें मधींच खाऊन टाकितात. प्रमाण कोणत्या गोष्टीचें राहिलें नाही. गरीब पाहून मारितात. राजेयानें आठ हजार रुपये घेतले आहेत. त्याचे पारिपत्य होत नाही. स्वामीच्या पत्रात मजकूर कीं, घाबरे होऊन जाबसाल करावयाचा नवता, तेथें रुपये देणें पडलें आहे, आपल्यास सरकारात ऐवज देणें लागतो, त्याचें कसे होईल, ठीक केले नाहीं. त्यास, येथे आपला अमल उठवून राजेयाने बापूस पैसा द्यावयासी कबूल जाले. मग काय करावे ? तीन च्यार महिन्यात त्यानें आठ हजार रुपये घेतले. पुढें शारीचा अमलही तोच घेणार होता. बरें, जागा आपल्याकडे राहिली असता, पुढे तरीं आशा असावी. याणीं बदमामली न केली तरी, आता फिरंग्यास चकती दाखविले, उत्तर मागि-

तसें त्याणें सांगितलें कीं, आम्ही आपल्या डाकेस लिहून पाठऊं जाबसाल द्यावयाची रीत आमची नाहीं आठ हजार रुपयाकरितां राजयाचे नांवें खलिता फिरंग्याचा घेऊन पाठविला आहे आणि सहा हजार रुपये उदारीचे आपल्यास न लागावे येथून ताकीद सिंदेसाहेब यासी व्हावी, म्हणोन सांगितलें आहे पुढें अमलांत गोष्ट येईल ती खरी राजश्री महिपतरावजीचींही पत्रें आहेत व मी लीा आहेत, त्याजवरून कळेल तेथून वरचेवर फिरंग्याकडून परभारें लिहिलें यावें कीं, याचे रुपये घेतले असतील ते माघारे द्यावे व राजयाकडे आपलें कर्ज व बाकी मामलतीची येणें तीं ताकीद करून राजयाकडून फडशा होई असें लिहिलें पाहिजे व सिंदेसाहेब फिरोन पुढें कोणे गोष्टीविशीं उपद्रव न करी तें जालें पाहिजे धर्नेराव बापू यांचें वर्तमान आइकिलेंच असेल सरकारची हरामजी जाली, तेव्हां मारले गेले आतां येथें देवबाबापू सरकारचे हुजरे आहेत, तेच सारे कामकाज करीत असतात आतां वर्तमान अधिकोत्तर पुढें होईल तें वरचेवर लिहून कळवीन पहिले चाल, कोणी फौजबंद सरदार असत ते अगोदर मामलतीचा बंदोबस्त करून देत असत आतां याप्रमाणें विचार आहे शेत वाय सात्यें मग उपाय नाहीं सरदार फौजबंद आपला जाबसाल तोंडाचा करावयाचा तितका करून वरदस्त कर्ज लागत्यास, आपला उपाय नाहीं चिरंजीव राजश्री आपाभटजी माध्ये यांसी पत्र लीा आहे तें प्रविष्ट करून उत्तर आलें पाहिजे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

पत्रांक ५८ श्री १६९० फाल्गुन शुद्ध ४

वेदमूर्ती राजश्री गणेशभट हरडीकर स्वामीचे सेवेसी —

विद्यार्थी विठ्ठल कृष्ण साष्टांग नमस्कार विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय शा फाल्गुन शुद्ध ४ रविवार जाणून स्वकीय लिहित गेलें पाहिजे विशेष तुह्मांकडून याप्रत पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं देवाल्या चें काम सिद्धिस गेलें कीं नाहीं ? घराचें काम कोठवर आलें ? काय करितों हें कांहींच कळत नाहीं तरी सविस्तर लेहून पाठवणें घराचे कामाचा भरोसा फार न वाढवणें सत्वर काम करून येऊन, राजश्री शंकराजी केशव यांसी पुण्यास पाठवून द्यावयाविषीं तुह्मांस पेशवीं लिहिलेंच आहे त्याप्रमाणें घराचें काम सत्वर उरकून येऊन शंकराजी केशव यासी पाठवून देणें सारांश, खर्च वावगा न करणें काम सत्वर आटोपून घेणें चिरंजीव केशो उद्धव, विसो उद्धव यांचें वर्तमान काय तें लेहून पाठविणें पुणियास भोसले येवात म्हणून भारी गडबड जाली होती पुणें पळालें होतें आमचींही वायकामुलें पुरंदरीं गेलीं आहेत याचा सातारेवाल्यांनीं आणविल्यार आहे कळावें अद्याप भोसल्यिा कडील कजिया तुटलासा जाला नाहीं लांबला आहे पुढें किती दिवस लागतील पाहावें सारांश, तुह्मीं श्रीचें व देवीच्या देवाल्यांतील काम सांगितलें होतें त्याप्रमा, शास्त्रून करणें घराचें काम मध्यम रीतीचें लौकर करून घेणें फार थोर कराल, काम वाढवाल [ तरी ] पैसा मिळणार नाहीं जें काम कराल तें चांगलें करणें आपले कडील सविस्तर वर्तमान लि॥ पा हिजे बहुत काय लिहिणें ? कृपा करावी, हे विनंति ह ह

---

पत्रांक ५९

पौ छ ७ जिल्हेज चैत्र श्री १६९० फाल्गुन वद्य ३

तीर्थस्वरूप राजश्री दादा व तथा राजश्री बाजीपंत दादा वडिलांचे सेवेसी —

अपत्यें गणेशानें दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना ता फाल्गुन बहुल द्वितीया, मा॥ त्र्यंबकेश्वर गंगातीर, नजीक निर्मळ, समस्त सुखरूप असों विशेष आपली दोन्ही पत्रें एक सांडणी स्वाराचा व एक जासूदा या पेशीं दोन पत्रें पो तीं पावलीं लि॥ मजकूर कळला इकडूनहि पेशवी सडी स्वारी जाल्या उपरी सांडणी स्वाराबरोबर व जासूदाचा पेशीं व करें हारा वरून पेशीं तीन पत्रें पो तीं पावलींच असतील किंवा न पावलीं हें कांहींच कळत नाहीं तरी सविस्तर लि॥ पाहिजे यानंतर इकडील मजकूर तरी चादे याजकडे होतों ते समई बातमी आली कीं, भोसले पुण्यास चा लिले त्यावरून राजश्री गोपाळ रायजी व रामचंद्र गणेश व बापाची

भोसले वगैरे पथके ऐसीं सडी करून पाठीवरी रवाना केली. ते माहुराहून दरमजल वीस वीस कोस मजली करून खंदारानजीक भालकीचे मैदानांत भोसले याची आमची विसा कोसाची ( तफावत राहिली ). एक मजलीचे अंतर राहिले. तदनतर भालकीवरून पुणियाकडील वोढ सोडून, वेदरावरून भवानगर उजवे टाकून, सगारडीमगारडी पेठेवरून दररोज पाच गांवे सा गावे येणेप्रो, तो पुढे, आमच्या फौजा पाठीमागे, ऐशा झाडींतून पधरा वीस रोज याप्रो चालिलो. त्याणे फारच गणिमाई केली! तीन च्यार रोज भाकरी नाहीं. बकरीयाजवरीच जीव धरून फारच निकड करून निघोन गेले. अखेर गाठ न पडली. महिनाभर पर्यंत आमचे फौजेस पांच गावे सा गावे दौड पडली. शेवटी मथनकालेश्वराजवळ गगा उतरलो. भोसले तसेच पुढे झाडींतून चादे याजकडे गेले. पुढे मागे जावे तरी, मुलुख त्यांचा, झाडी फार. याजकरिता गगातीरानेच मुकाम मजकुरी श्रीमतास येऊन मिळाले. सहा दिवस जाहले. घोडियात व माणसात काही बाकी राहिली नाहीं. फौज अगदी सडून गेली, दोन अडीच हजार पावेतो घोडे राहिले. झाडीत पांच सहा लघने घोडियास जालीं. याजप्रो स्वारी जाली. या मागेहि येणेप्रमाणे स्वारी जाली नाहीं व पुढेंहि होणे नाही. कळलें पाहिजे. येथे श्रीमतांचे मुकाम दाहा बारा जाले. सल्ला मामला होत आहे. बोली चाली आहे. पुढे काय मजकूर होईल तो सेवेसीं मागाहून लिहून पाठवून देऊ. सारांश, आपणाकडील सविस्तर मजकूर लिहून पाठवावे. वेदशास्त्र संपन्न रा॥ जगन्नाथ देव बाबा व राजश्री मथुनाथ देव बाबा स्वामीस सिरसाष्टाग नमस्कार लि॥ परिसोन आपण माघ मासाचे आशिर्वाद पत्र पो ते या मुकामी पावले. दर्शनतुल्य सतोष जाहला. सदैव आशीर्वादपत्र पाठविले पा. लोभ असो दिजे. हे विज्ञप्ति.

---

पत्रांक ६०. श्रीगजानन. १६९१ चैत्र.

पु॥ तीर्थरूपांचे सेवेसीः—

शिरसा नमस्कार विज्ञापना. आह्मी वडिलांचे आशीर्वादे चिरंजीव सुद्धां घोडीपिर्डी निभाऊन आलो! कळले पाहिजे. बुणग्यात लिंगभट होता. सिवरें व सभरा घोड्या बुनग्यात होत्या. महतापघोडी व खोसरी दोन्ही सभर आहेत. परतु कौलीरान आहे. याजकरिता वैरणीची फार ताकीद. वैरण मिळत नाही. सालवण लागले आहे. याजमुळे लोकाच्या घोड्या फार गाजलिडतात. परंतु आपले आशीर्वादे करून सर्व ईश्वर निभाऊन आणील. कळले पाहिजे. प्रस्तुत देशीं गडबड नाहीं. जे होणे तें ह्याच प्रमाणे होईल. वडिलीं काळजी न करावी. आपणाकडील साकल्य लेहून पाठविले पो. अद्यापि मोगलसुधा

सारेच एकत्र आहेत सल्ला होतो अगर काय होईल तें मागाहून लेहून ते येथीं पाठवितों यदा निष्ठुरपणा काय निमित्य म्हणोन पुण्याहून वडिलाचीं पत्रें एक दोन आलीं ! त्यास ये सालीं स्वारींत आनद ! सा चाकरी पडिली ती लिहितां पुरवत नाहीं ! आणि निदानीं भोसल्यामागें सही स्वारी सवा म हिना पळती त्याणें पाणपत्रास रहा म्हणविलें ! मल्लगावचे मार्गात पधरा रोज सूर्यदर्शन नाहीं, दाणावैरण नाहीं ! प्राणाशीं गांठी पडल्या ! फार लोक मुवाले परंतु वडिलांचे आशीर्वादें चिरंजीव सुद्धा क्षेमरूप आलों आपल्या कडील पुणें व वाई व किल्ले व राजकी वृत्त ता लिहिलें मो भीमतांसमा गमें चाकरी निमित्य नाहीं, यास्तव आपलें पत्र पावोन आमचेंहि उत्तर न गेलें वरकड वडिलांचे पायाशिवाय आह्मांस जोड काय आहे ! रात्रीदिवस लक्ष वडिलांचे चरणाशीं आहे ईश्वर साक्ष पौष वद्य ३ पत्र वडिलीं पों तें आजी पावलें सविस्तर कळलें मौजे चातुस व वोरीचा वसूल येमुरवत करवाया सदाशिव नारायण यांशीं आणून वसूल घेतला पो सदैव आशीर्वादपत्र पा ठवावें क्षेम असावा हे विज्ञापना,

ती॥ सौ॥ सपत्न वज्रचुडेमंडित मातुश्री वहिनीबाई व उमाबाईस शिर साष्टांग नमस्कार. चिरंजीव रा तात्या व बाळाजी हरी व अंताजीपंत यांसी आशीर्वाद क्षेम करणे हे आशीर्वाद ई ई

---

पत्रांक ६१ श्री १६९१ चैत्र शुद्ध १० मंदवार

पु॥ वेदमूर्ती राजश्री गणेश भट हरवीकर स्वामीचे सेवेसी —

विनंती उपरी श्रीमंताचे लष्करचा मुकाम भंगिरा ( माइनगगा ) तीर येथें आहे तेथून फाल्गुन शुद्ध ११ चीं पत्रें आलीं त्यांत मजकूर कीं भोसले यां चांस गेले सख्या फौजा पाठीवर होत्या त्यांस तफावत फार पडली याकरितां श्रीमंतांनीं बोलाऊन आणिल्या पुनर्गे मनरथा जवळ ठेविलें होतें तेंहि व गिरा सगमीं बोलावून नेलें तोफखाना उपरखेडावर होता तोहि आणविला सारे सरदार, फाजा एक जागां आल्या या उपरी मनसबा करून, चांदास जाऊन, मोर्चे लावावे, ऐसा प्रकार आहे देवाजीपंत, भोसले याकडील दि वाण, श्रीमंताचे लष्करांत आहेत त्यानीं खंडणी भोसल्याकडे पाठविली आहे सल्याचा प्रकार घडोन आला तरी उत्तम; नाहीं तरी पुढें चांदास जावें, एसें आहे याप्रों वर्तमान लिहिलें आलें पुढें येईल तें लिहून पाठऊ पिराजी नाईक निंबाळकर पुनगिर्यांत होते ते पळून भोसल्याकडे गेले श्रीमंत फौजे सुद्धा एकवेळ चांदापावेतों जाऊन, मों निमळेकडे आले पुणियास येणार असें जालें, तेव्हां माघारे फिरून पाठीस लढे होऊन लागले ते यालेपाटास आल भोसले मालकीहून 'येदराहून मागती मार्गात शिरोन, मार्गाच्या वाटेनें

चाद्यास गेले. तेव्हां श्रीमंतही भागानगरापासून भेदकाहून माघारे फिरोन प्रस्तुत गंगातीरास आले. दोन्ही फौजा धावता थकल्या ! तीन महिने याप्रो झाले. अद्यापि प्रथम दिवस आहे ! मुलकाचा आईत भारी जाला आहे. रुकनत दौले, जाधवराऊ देखील समागमे आहेत. चिरजीव विसाजीपंत व रामचद्रपंत, गोपाळराऊ, रास्ते, ऐसे सडी फौज पचवीस हजार भो मागे होती. त्याचे माग श्रीमत होते. थोरले नुणगे पाथरीकडे पा होते. चिरंजीव बळवतराऊ श्रीमंताबरावर आहेत. फार हैराण प्रथम जाले. तुर्हा श्रीस प्रार्थना करून उभयताचे संरक्षाविशीं आगारा टाकवणे. लोभ कीजे हे विनति.‡

---

पत्रांक ६२.

पो। ज्येष्ठ वा। १३ शनवार श्रीशकर. १६९१ वैशाख.

चिरंजीव राजश्री बापूराव यासी प्रति विठ्ठल नरसिह आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे. विशेष. इकडील वर्तमान तरी मातुश्री अहिल्याबाई साल मजकूरीची रसद मागत आहे. व राजश्री तुकोजी होळकर याणीं बराता व सरंजाम ह्मणून पधरा सोळा हजार रुपये घेतले. नजीक वीस कोसावरी खेचिवाडियात आहेत. याप्रमाणें वर्तमान मामलेतींचें आहे। जकात तो अगदीं पडली. कारण ज्या मार्गानें वाणी येणार त्या मार्गावरी आजि तीन महिने फौज होळकर याची आहे. दोन वण जारेहि लुटून घेतले! त्यामुळे मार्ग राहिला. गल्ला स्वस्त ! पावणेदोन मण हरभरे व गहून* सवामण प्रमाणें कोण घेत नाहींत। खिचि वाडियात दोन महिने फौज आहे. त्यामुळे तमाम जागा मारून लुटून फस्त केली. सल्ल जाहला नाही. रा। नारो गणेश फौजेंत आहेत. रा। तुकोजी होळकर उदेपुरीं आहेत. शिंदेही उदेपुरीं आहेत. याप्रमाणे येथील वर्तमान आहे. ( यापुढे फाटले आहे. )...........चिरजीव राजश्री दिनकरपत यासी आशिर्वाद. देशींचे वर्तमान लिहित जाणे. हे आशिर्वाद.

रा। विसाजीपत यांसी नमस्कार. विनति उपरी सदैव कुशल वर्तमान लिहित जाणे. इकडील वर्तमान उत्तम आहे. बहुत काय लिहिणे हे विनति.

---

पत्रांक ६३ श्री. १६९१ भाद्रपद वद्य १

सेवेसी हरी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। छ १५ जमादिलावल पावेतो मुक्काम मौजे तारगव्हासी पा। पाथरी. वर्तमान तर निजाम-

---

‡ हें पुरवणी पत्र आहे. मूळ मुख्य पत्र क्षुल्लक असल्यामुळे छापलें नाहीं. मुख्य पत्राची मित्ती चैत्र शुद्ध १० मदवार आहे.

* गहूं शब्दातील अनुनासिकाबद्दल हा न आहे.

अलीचीं पत्रें आलीं होतीं कीं, हिंदुस्थानची मसलत आहे, तर आपण पुढें बराणपूरपर्यंत जावें, आम्ही मागाहून येतों वकिलाचीं पत्रें आलीं ते, नि आमअली निश्चयें येतात, मुरादखान आले म्हणजे येथून निघणार. त्यास, मुरादखान व कृष्णराव बल्लाळ लवकरच आऊन पोंहचतील हे तेथें गेलिया वर पत्रें येतील ते स्वामीस लेहून पाठऊ श्रीमंत नांदेड वसमत पर्यंत जाणार असें आहे सेवेसीं श्रुत होय, हे विज्ञापना तीर्थरूप राजश्री आबा लष्करांत आले आहेत त्यांचे कामकाजाचा उलगडा लवकर होय, ते गोष्ट केली पा हिजे हे विज्ञापना

---

पत्रांक ६४ श्री १६९१ माघ वद्य ६

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्यराजश्री नारो वासुदेव का दार पो गोसावी यांसी—

सेवक नारायणराव बल्लाळ नमस्कार सु॥ सबैन मया व अलफ रघोजी आ मोन्या मौजे वामणगांव, पो दि येथें राहत होता तो मौजे मजकुरा हून गैर हजर होऊन मौजे भा र गाव पो आंबाड येथें जाऊन राहि ला आहे त्याणें वामणगांवकर गा याचा गाडा मठ पिंपळगांव येथला होता, तो अटकाविला आहे, आणि म्हणतो कीं, माझी वस्तभाव वामण गांवीं राहिली आहे ते द्यावी, म्हणजे गाडा देईन त्यावरून पेशजीचे कमावि सदारास पत्र सादर केलें होतें कीं, रघोजी मजकूर यास व वामणगांवकरांस मौजे गोलटगांव पाहिजे, जाल्नापूर येथें पचाइत नेमून दिल्ही, तेथें रघोजी मजकूर यास पाठवणें, वामणगांवकर यांस दामाजी परगणेयाचे कमाविदार पाठवितील त्यावरून वामणगांवकर गोलटगांवास गेले रघोजा मार पंचाई तीस गेला नाहीं त्यावरून हें पत्र तुम्हास सादर केलें असे तरी मार याचे वस्तभावेचा वामणगांवकरांकडे लढा असेल तरी, त्यास विपंचाईतांत ताकीद करून पा लढा नसता छ्याडी करून गाडा दाबून ठेविला असेल तरी बरें बरेनें ताकीद करून गाडा देवणें येविशीं फिरून बोभाट येऊ न देणें जाणिजे छ२९ सवाल बहुत काय लिहिणें? मोतबसुद

---

पत्रांक ६५ श्री १६९२

सेवेसीं विज्ञापना कोंकणचें वर्तमान तरी तुळाजी आगऱ्याचे लेक दोघा जण परागंदा होऊन सिद्दीगडास गेले होते ते हालीं विजेदुर्गावर येणार ऐसी बातमी विजेदुर्गाहून आली आहे विजेदुर्गाचे आरमाराशीं लढाई जाहली, ऐसेंहि बोलतात त्याजपाशीं आरमारहि फार आहे दाहा हजार फौज आहे हुमज सामील आहे व समागमें हैदरअलीचीहि फौज आहे राजश्री

विसाजीपंत सुभेदार काल एकादशीस रात्रीस मुहुर्ताने पुणेयास गेले. राजश्री बाबुराव राजवाडे गांवाची फारच चौकशी करीत आहे ज्या गांवाची एकदा पाहाणी जाहली व चौकशी जाहली. त्या गावची आता चौकशी होत आहे. सेवेसी कळावें ह्मणोन लिहिले आहे. राजश्री विसाजीपंत सुभेदार याजपाशी येथे हरएक कामकाज पुसिले तरी ह्मणत की त्रिंबकपंतास दूर करावे. मग पूर्ववत प्रों आबाचा आमचा घरोबा आहे त्याप्रो चालो. सेवेसी कळावे ह्मणोन लिा आहे. श्रुत होय हे विज्ञापना.

---

पत्रांक ६६. श्री. १६९२ श्रावण वद्य १४

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन गोसावी यांसी.

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार सुा इहिदे सबैन मया व अल्लफ. तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें ते प्रविष्ट झालें. हैदरनाईकाकडे लोक चाकरीस व पुढे जाणार त्याची चौकशी करीतच आहों, येविशीं तालुकदारासहि आज्ञा करावी, ह्मणोन लिहिले ते कळले. ऐशास, तालुकदारांस पत्रे पाठविलीं आहेत. ते व तुह्मी मिळून चौकशी करणें. गेले असतील त्याचीं घरे, कबिले, जप्त करणे. तिकडील वर्तमान वरचेवर लिहित जाणें. जाणिजे. छ २८ रबिलाखर बहुत काय लिहिणे. लेखन सीमा.

---

पत्रांक ६७ श्री नकल १६९२ भाद्रपद शुद्ध १३

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्यराजश्री नरसिंगराव जनार्दन धायगुडे गोसावी यांसी:—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा इहिदे सबैन मया व अ. लफ. तुह्मीं विनतीपत्र छ ९ रबिलाखरचे पाठविले ते छ ११ जमादिलावलीं प्रविष्ट झाले. हैदरखान पट्टणासच आहे. टिपू हल्लीं होन्नुरावर दक्षणतीरीं आहे. अलीकडे उतरला. ऐशी बातमी सावनूरकराची आली. त्यावरून आह्मी सर्वांनीं तयारी करून त्यास गाठावें ऐशी तजवीज तयारी केली. तों फिरून सावनूरकराची बातमी आली कीं, दक्षिणतीरींच आहे. त्यास गांठावे फार सर्वांच्या चित्तात आहे. गाठ पडिलियावर होणे ते होईल. सोंधे प्रांतीं धामधूम करावी तरी तिकडे पर्जन्य. त्याहिमध्ये धारवाडचे तालुकियाचीं सरकारचीं खेडीं व सोंधेकरांचीं खेडीं एकास एक लगतीं. एकाचे आश्रयानें एक आहे. तीं मारावीं न मारावीं येविसी आज्ञा असावी. ह्मणोन लिहिले ते कळलें. ऐसीयास, हैदरखान व टिपूची बातमी लिहिली व टिपूस गाठावयाचा मजकूर, तर तो नदी उतरून उत्तरतीरीं आल्यास, तुह्मी पार-

पत्य करावें हें उचित तुर्ही, राजश्री धाहाबी भोंसले, व जनार्दनराम माव मर सरदार तिकडे असता, कांहींच काम न जाहालें तर कसें ? याउपर चां गली यातनी राखून त्यास नतीजा देणें सोंधे प्रातांचे गाव मारावयाचा मज कूर लिहिला तर हैदरनाईक पट्टणास आहे टिपू दुंगमद्रापार चेनगिरीस आहे तुर्ही तिचे सरदार तीन चार हजार फौज आहे सोंध्यांत त्याची फौज नाहीं, असें असतां सोंध्याचे गांव मारावयाचा तुम्हांस विचार पडला अ पूर्व आहे ! आपले गांव राखून त्याचे गाव मारावे तर वाजीव अतःपर तुम्ही लिहिलेप्रमाणेंच कराल करावें आणिजे छ १२ जमादिलावल व हुत काम लिहिणें ? लेखनसीमा

---

पत्रांक ६८ श्री ( नकल ) १६९२ भाद्रपद शुद्ध १४

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन धाम गुडे गोसावी यांसीः—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा इहिदे सबैन मया व अ लफ राजश्री जनार्दनराम यांचें हुजूर प्रयोजन आहे, तर मा निल्हे पयक सुद्धां पत्रदर्शनीं हुजूर पाठवून देणें जाणिजे छ १३ जमादिलावल बहुत काय लिहिणें ? लेखन सीमा

---

पत्रांक ६९ श्री ( नकल ) १६९२ भाद्रपद वद्य ३०

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्यराजश्री नरसिंगराव जनार्दन धामगुडे गोसावी यांसी —

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार सुा इहिदे सबैन मयावअलफ टिपू चेनगिरीस होता तो श्रीरंगपट्टणच्या रानांत गेला कांहीं पांच सातशें राऊत जडे अन्वटीकडे आले म्हणोन बातमी आली व जडे अन्वटीचे राऊ तांचे सोंडावरी नबाबाचेहि राऊत व हशम गेलेच आहेत सूर्वे तिकडे विशेष गडबड नाहीं तथापि तुर्ही पांचशें राऊत त्या प्रांतांवर बंकापूरसमीप ठे वणें राजश्री भिवराव* पटवत यांस तोफखान्यासहित मनोळीच्या पारपत्यास जावयाची आज्ञा केली असे तर तुम्ही पांचशें राऊन बंकापुराकडे पाठवून बाकी जमावानिसी भिवराव याजपाशीं येऊन, मनोळीचें ठाणें हस्तगत क रणें आणिजे छ २८ जमादिलावल बहुत काय लिहिणें ? लेखनसीमा

---

* पानसी

पत्रांक ७० श्री ( नकल ) १६९२ आश्विन शुद्ध ११

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन धायगुडे गोसावी यासी:—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा इहिदे सबैन मया व अल्लफ. राजश्री भिवराव यशवत तोफखानासुद्धा मनोळीस पाठविले. तुह्मी हैदरखानाचे फौजेच्या तोंडातर ५०० पांचशे राऊत नकापुराजवळ ठेऊन तुह्मी व राजश्री शाहाजी भोसले मनोळीस येऊन, मारानिले व तुह्मी एकत्र होऊन, मनोळी हस्तगत करणे ह्मणोन तुह्मास पत्रे भुजरत जासुदाबरोबर पाठविली ती पावलीच असतील. तिकडील बदोबस्त करून, तुह्मीं मनोळीस यावयाचे केलेच असेल नसेल तर करणे. भिवराव यशवत निरोप घेऊन येथून गेले. तुह्मीं जलद येऊन यास सामील होणे. जाणिजे. छ १० जमादिलाखर. बहुत काय लिहिणे ? लेखन सीमा.

---

पत्रांक ७१ श्री ( नकल. ) १६९२ आश्विन शुद्ध १३.

अखडित लक्ष्मीअलकृत राजमान्य राजश्री नरसिंगराव जनार्दन धायगुडे गोसावी यासी:—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा इहिदे सबैन मया व अल्लफ. धरमहट्टीस बाबूराव अनद राहून मवासगरी करितो, सेठाणे वगैरे ठाणी त्याणी बळाविलीं ती घेतली पाहिजेत, ह्मणोन राजश्री नारो बाबाजी याणीं हुजूर लिहिले. ऐसियास, मनोळीचे काम मातबर. तें घ्यावयाची आज्ञा तुह्माकडे आहे. मनोळीस जाता सहजांत धरमहट्टी वगैरे ठाणीं जाता जाता सुटतील तर सोडवून जरीं दोन च्यार दिवस गुता पडेसा असेल तरी आधी मनोळीस जाऊन मनोळी घेऊन उपरान्त येता धरमहट्टी वगैरे नारो बाबाजी सागतील त्याप्रमाणे ठाणीं घेणे. जाणिजे. छ १२ जमादिलाखर बहुत काय लिहिणे ? लेखन सीमा.

---

पत्राक ७२ श्री लक्ष्मीकात. १६९२ आश्विनशुद्ध २

राजश्री गोसावी यास:—

अखंडितलक्ष्मी अलकृत राजमान्य स्नो जानोजी भोसलें सेनासाहेब सुभा सुा इसने सबैन मया व अलफ. पा आब्रड हा माहाल राजश्री पतप्रधान याकडून राजश्री तुकोजी होळकर यासी आहे. तेथे नजर घासदाणा घेऊ नये, ऐसा करार असे. मेजवानीचा फडशा राजश्री रामाजी बल्लाळ याचे विद्यमाने नामपूरचे मुक्कामी हुजूर जाला आहे. तरी सालमजकुरी तुह्मीं थाल

मजकुरास घांस दाणा वगैरे काही इतका उपसर्ग न देणे जाणिजे छ २ माहे रजब बहुत काय लिहिणे ? मोर्तबसूद

---

पत्रांक ७३ श्री १६९३ आश्विन शु॥ ५

(असल प्रा नकल)

राजश्री रामचंद्र नाईक पराजपे व आबाजी नाईक फाळके, सावकार पुणेकर, गोसावी यासी —

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो महादजी शिंदे दंडवत सुा इ सबे सबैन मया व अलफ तुह्मापासून पुणियांचे मुक्कामी सन समानांत व सन तिसात व जवाहीर वगैरे घेतले त्याचा हिशेब छ १ सावान कार्तिक शु॥ २ सन मजकूर पो रुो

११९५२२॥ ऐन मुद्दल
३५९१४ व्याज
७२०० हुंडणावळ

---

१६२६५६॥=

पैकीं आदा रुपये

३१८६९॥ कोट्या ना ऐन व व्याज

१००००० रामचंद्र काशी कामदार मा अंतरवेद मामलतून घेतले

बाकी देणे राहिले ३१०८७ रुा आंके (आंख) एकतीस हजार सत्यायीं रुा यासी व्याज दरमाहे दरसदे दर १ एकोत्रा प्रमाणे कार्तिक शुा शके १६९१ स्वरनाम संवत्सरेपासून दिल्हे माइल आणिजे छ ४ माहे रजब बहुत काय लिहिणे ? हे विनंती मोर्तब

---

पत्रांक ७४ श्री (नकल) १६९३ आश्विनशुद्ध ६

राजश्री बाळाजीपंत लेले स्वामीस —

विनती उपरी किल्ले येळगाव पैा पन्नास माणूस राजश्री त्र्यंबकराव मा माकडे कर्नाटकांत रवाना करावयाची नेमणूक पुणियांत केली आहे त्यास, किल्ले मजकुरीं माणसाची भरती थोडी आहे ह्मणोन राजश्री महिपतराव चि ब्रनाथ यांहीं सांगितले त्याजवरून रजयदलीमुळे पंचवीस माणुस मना क रून बाकी पचवीसासच रवाना करावयाची नेमणूक केली आहे तरी सदरहू लिहिल्याप्रमाणे किल्ले मजकुरांतून पचवीस माणसांची रवानगी कर्नाटकांत करणे रा छ ५ रजब, सन इसन्ने हे विनंति

---

पत्रांक ७५ श्री. १६९३ आश्विन वद्य १४

राजश्री नारो आबाजी गोसावी यांसी:—

सुा इसन्ने सबैन मया व अलफ. किल्ले पुरंधर व किल्ले वज्रगड देखील सरंजामाचे गांव येथील सालमजकूरचा वेहेडा जाला पाहिजे. तरी साल-गुदस्त सन इहिदे सबैनचा हिशेब तपशीलवार व सालमजकूर अवल सालची हजिरी ठिकाणवार व सरंजामाचे गावची जमाबंदी वगैरे कागद वेहेड्याचे उपयोगी दरकदार कारकुनाबराबर पाठवून देणें. जाणिजे. छ २७ रजब.

---

पत्राक ७६ श्री. १६९३ आश्विन वद्य

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री महादजी नारायण गोसावी यांसी:—

सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सुा इसन्ने सबैन मया व अल-फ. तालुके अमदानगर येथील सालमजकुरींचा वेहेडा जाला आहे. तरी साल-गुदस्त सन इहिदे सबैनचा हिशेब गावगन्ना जमाबंदीसुधा व सालमजकुरी अवल सालची लोकाची हजीरी वगैरे कागद वेहेड्याचे उपयोगी दरकदार कारकुनाबराबर देखतपत्र हुजूर पाठवून देणें.

---

पत्रांक ७७. श्री. १६९४ वैशाख शुद्ध १२

निळकंटराव गोविंद शिवराम याचे पुत्र यास वस्त्रे वगैरे विा राजश्री रावसाहेब रुबरु पाहून दिल्ही. सुा इसन्ने सबैन मया व अल्लफ. जामदार-खाना पैकीं छ १० सफर पोषाख खासगी राजश्री नारायणरावपैकीं कापड आख.

| | | |
|---|---|---|
| ११८ | तिवट छिटी बापुरी | १ |
| ४०० | दुपटा पैटणी | १ |
| ६७॥ | झगा छिटी मुलतानी | १ |
| ११३ | तुबा किनखापी | १ |
| ६९८॥ | | ४ |

जवाहीरखानापैकीं छ १२ सफर वस्त्रे दिल्हीं ते समई चौकडा मोत्याचा एक एकूण किंमत रुा ३२१५।॰॥

---

मोत्ये रति २७ वजन तोळे ०।१॥।॰॥

एकूण किंमत रुपये ३२०० मोत्यें ४. सोने दर तोळा रुपये १५८= प्र-माणे किंमत रुा १५।०॥। सोने तोळे १८८१

निमसखानापैकीं छ १० सफर मास पोषास दिल्हा त्यास विजारेस दाल रेशमी निरख गज २॥

---

पत्रांक ७८ श्री १६९४ भाद्रपद वद्य २

सेवेसी आबाजी बाजी कावरस व रामचद्र महादेव परांजपे विनती श्री मत महाराज राजश्री शिवाजी महाराज स्वामी यासी तालुके चिमोडी व म नोळी दिल्हे आणि त्यांकडोन ऐवज घ्यावयाचा करार केला रु॥१२५०००१ बाराळख पंचास हजार एक सदरहु रुपये यांचा हवाला आम्हीं घेऊन ऐवज भरिला आणि दोन्ही तालुके ठाणींसुद्धां राजश्री आपाजी शामराव यांचे नि सबतीस सावकारींत श्रीमत महाराज स्वामी यांणीं ठेवून करार करून दिल्हे आहेत त्यामों मुद्दल व व्याज, मनोती व दरबार सर्व सुद्धां ऐवज फिटे तों दोन्ही तालुके आम्हाकडे असावे मधे महाराजांनीं आपाजी शामराव यांशीं व आम्हांशीं हरएक गोष्टीविषयीं दिकत आणून तालुकेयाची घालमेल क रितील किंवा सरकारात आणखी मध्यस्ताचे हातून हरएकविशीं लोभ दाख वून संधान करितील आणि तालुक्याची भाळमेळ करवितील किंवा भगवंत आपाजी व राजश्री शेषो नारायण याचे कर्जाचा फडशा महाराजांकडून होणें आहे, तो सुरळीत न केल्यास सरकारातून मानिल्हे तालुक्यांस उपद्रव कर वितील, तर आमचा पैका करारप्रों अगोदर देयावा मग कर्तव्य तें करावें अथवा आमचा पैका फिटे तों पुस्त पुन्हा करून घालमेल होऊ देऊ नये भगवंत आपाजी व शेषो नारायण याचा कांहीं पैका निघाला, आणि सरकारां तून देवणें, तरी परभारें महाराजांकडून देयावा आमच्या दोन्ही तालुक्यांस उपद्रव लागों नये येणेंप्रमाणें करार करून अभयवचन दिल्यास सेवक या कामांत येतिल कलम सदरहुप्रमाणें तुम्हीं विनती केली त्यास तुम्ही वेवसयास या कामात येऊन ऐवजाचा भरणा करणें तुम्हास श्रीमत महाराज छत्रपती स्वामी यांनीं दोनी तालुक्याचा ऐवज अपाजी शामराव यांचे विध मानें लाऊन दिल्हा आहे त्याप्रमाणें घेत जावें सरकारांतून दोन्ही तालु कियांस उपद्रव होणार नाहीं कदाचित महाराज स्वामीकडून तालुकियास उपद्रव जाला, तर सरकारातून पुस्तपुन्हा राखून तुमचा पैका व्याजसुद्धां फिटे तोंपर्यंत तालुकियाची घालमेल होऊ देणार नाहीं येणेंप्रमाणें करार छ १६ जमादिलाखर, भाद्रपद मास, सन सलास सबैन

---

पत्रांक ७९ श्री. १६९४ आश्विन वद्य १२




दस्तक सरकार राजश्री पंत प्रधान ताा कमावीसदारान व चौकी-दारान व रहदारान व जकाती देहाय. सुाा सलास सबैन मया व अलफ. राजश्री बाळाजी जनार्दन फडनिवीस यांचे तांदूळ खडी १० दाहा खालोन फिरगाण कल्याण प्रातातून पुणियास आणितील. त्यास, आणू देणें. जकातीचा तगादा न लावणें. जाणिजे. छ २५ रजब. आज्ञा प्रमाण. लेखनसिमा. बार.

पैाा छ २४ जिल्काद.

---

पत्राक ८० श्री. १६९४ मार्गशीर्ष वद्य ११.

राजश्री बिरोजी गारे गोसावी यासी:—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेाा साबाजी भोसले सेनासाहेबसुभा रामराम. सुाा सलास सबैन मया व अल्लफ. मौजे पेद पेठ पोरलावल हा गाव कृष्णाजी वामन याजकडे मोकासा सुदामतपासून चालत होता. त्यास देवआज्ञा जाली. याजकरिता त्याचे पुत्र राा केशवराव कृष्ण याजकडे पेसजी प्रो करार करून दिल्हे असे. येविषयीं पेसजी सनदा सादर जाल्या आहेत. तर मौजे मजकूराचा मोकासा दरोबस्त मारानिलेकडे चालवणें. सालमजकुरींचा वसूल तुह्मीं घ्याल तर देणे येईल. जाणिजे. छ. २४ माहे रमजान.

---

पत्राक ८१ श्री. १६९४ माघ शुद्ध ८.

राजश्री सभाजी जाधवराव गोसावी यांसी:—

अखडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्रीो नारायणराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणे. विशेष. तुमच्या

लोकांनीं तुह्मासीं गवगवा केला आहे, ह्मणोन कळलें तरी तुह्मी लोकांसह वर्तमान हुजूर येणें येथें ल्ह्माचा प्रकार आहे तरी सत्वर येणें आणिसे छ ७ जिलकाद बहुत काय लिहिणें ? लेखनसीमा




---

पत्रांक ८२ श्री (नकल) १६९४ फाल्गुन शुद्ध १

शिक्का

आज्ञापत्र समस्त राजकार्य धुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री नारायणराव पंडित प्रधान ता कादरखान वल्लद सादुल्लखान सा कसबे वाइ सुभा हवेली प्रांत वाई सुहुर सलास सबैन मया व अलफ तुह्मी हुजूर पुणें येथील मुक्कामीं येऊन विदित केलें कीं, कसबे मजकूर येथील कोतवाली पेशजीपासून आपला आजा मियानखान त्याजकडे होती, तो हल्लीं मयत जाला, याजकरितां साहेबीं कृपाळु होऊन आपल्याकडे कोतवाली करार करून सनद करून दिल्ही पाहिजे ह्मणोन त्याजवरोन मनास आणितां, कसबे मारचीं कोतवाली तुह्मा आजा मियनखान त्याजकडे चालत होती त्यास, तो मयत जाहला सबब हल्लीं तुह्माकडे कोतवाली करार करून दिली असे कोतवाली संबंधें जमीन मल्यासुद्धां व हक्कलाजिमा, कुदामत चालत आल्याप्रमाणें तुह्मी घेत जाऊन पूर्ववत्प्रमाणें कोतवालीचें कामकाज करीत जाणें जाणिजे छ २९ जिल्काद आज्ञा प्रमाण, लेखनसीमा मोर्तब

---

पत्रांक ८३ श्री १६९५ भाद्रपद वद्य अखेर

श्रीमंतास पत्र लिहिलें आहे त्यांतील अन्वय

विशेष स्वामींनीं आज्ञापत्र पाठविलें तें सादर जाहलें छ ११ जमादिलाखरीं दोन प्रहरां दिवसानंतर गारद्यांची खटपटमुळें दियाणखान्यांत कटकट जाहली त्यांत नारायणराव मारले गेले त्यास, तुह्मी किल्ले मजकूर येथील चौकशी पाहारियाचा बंदोबस्त चांगला करणें तिकडे गुन्हांत धरू

सनिध. ते आपली संधी पाहत असतील. याजकरितां बातमी राखोन बहुत खबर ( दार ) राहणे ह्मणोन आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणे किल्याचा बंदोबस्त यथास्थित राखला आहे. साप्रत, नवाब हैदरअल्लीखान पट्टणासच आहेत. चित्रदुर्गकराकडे जमाव पाठविला होता. त्याम, तेथील तह करून जमाव पट्ट-णास आणविला.........जागा कोडगाकडे वगैरे जमाव पाठविला होता. सर्व...पट्टणास जमा केला आहे. विजयादशमी जाहल्यावर चंदावरची कुमक करणार ह्मणोन बातनी आली आहे. याउपरी काय मनसवा करतील कळत नाही. बातनीस नेहमी पाच जोड्या पाठवून वरचेवर बातनी आणवित अ-सतो. त्याचा उपद्रव इकडे द्यावयाचा डौल दिसोन आलिया ठाण्याच्या ब-दोबस्तास गिवंदी जाजती ठेवावी लागेल. गुदस्ता नबाबांनीं श्रीनिवासराव बरकी फौजसुद्धा पाठवून पुगनुर व घटक वगैरे तालुक्या खालील पाली ये-थील खडणी तीसाला करून ऐवज घेऊन गेले. व गुमनाड पाले घेऊन, तेथे ठाणे आपले घालून, चिमणाजी बाळाजी यास ठेऊन, तेथे पाचशे स्वार व पाचशे गारदी ठेविले आहेत. त्याचा उपद्रव तालुक्यास होत आहे. इकडे आरद्राचा परज्यने जुजवी पडला होता. शेते पेरलीं होतीं. मध्ये परज्यने पडला नाही याजमुळे वाळून गेली. कार्तिकात साळीचे पीक यावे ते बुडाले हल्लीं हस्ताचा परज्यने लागला आहे. स्वामीचे पुण्यप्रभावें ( पीक ) सर्व तालुक्यात होईल. वैशाखचें साळीचें पिक होईल. नबाब महमंद अल्लीखान यांणीं चंदावरास मोर्चे देऊन ते स्थळ घेणार. धर्म-सस्थान आहे. स्वामी-च्या पुण्यप्रतापें राहिल. कळेना. येंदा फौजा याप्रान्तीं आल्या तर प्रांताचा बच्याव आहे. वरकड वर्तमान राजश्री रामचद्र माहादेव शेवेसीं विनती. ( कर ) ता निवेदन होईल.

---

पत्राक ८४ श्री.

यादी बळवतराव महादेव भानु. विज्ञापना. आमची बहीण कैलासवासी श्रीमत भाऊ साहेब यास प्रथम समधास दिल्ही होती. सबब सरकारातून आह्मास तो बेलापूर येथील दिवाणगिरीची असामी दरकी अडीच हजार रुपये याची कैलासवासी श्रीमत नानासाहेब यांणीं करार करून दिल्ही. ती आजपर्येत निर्वेध चालत आली. ती स्वामी कृपाळू होऊन, असामी पूर्ववत आह्मी सरकारचे पदरचे, आमचें चालवणे अवश्यक जाणोन, असामी चाल-विली पाहिजे.

---

पत्राक ८५ श्री. १६९५ आषाढ-श्रावण

श्रिया सहस्रायु चिरंजीव राजमान्य राजश्री भाऊ यासीं प्रति काशीराव भास्कर आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत

असिलें पाहिजे विशेष तुह्माकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी ऐसें न करावें सदैव पत्रीं कुशलार्थ लिहित जावें यानंतर इकडील अर्थ तरी चिरंजीव रा। तात्या, श्रीमंत मातुश्री दर्याबाईसमागमें श्रीमंत आपासाहेबा सहित आहेत आकोटावर आले इस्माईलखान अलजपुरास आहेत श्रीमंत नानासाहेब व नवाबाचे दिवाण रुकनदौला व जग व भोसा ऐसे मिळून पंधरा हजार कवेश फौज, शिवाय पन्नास साठ तोफा, शिवाय जेजाला, बाण व गारदी ऐसे सामानानशीं नजीक अलजपुरास गेले पाहावें इस्माईलखान जुजावयासी लागेल शहरालून लागले तरी आपा साहेब लाग करतील नाहीं तरी, इस्माईलखान याचे विचारें जावसाल होणें तो होईल या आठ दिवसांत हरएक गोष्ट घडते, ऐसें आहे आह्मी उभयता श्रीमंताचे कृपेमुळें वेसरंजामीस्तव मरीच आहों चिरंजीव तात्या मातुश्रीचे समीत सुखरूप आहेत चिंता न करावी बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद

---

पत्रांक ८६ श्री नकल १६९५ पौष वद्य १

याद राजश्री बाळाजी नाईक भिडे याचा हिशेब एकंदर, सुा अबा सबैन मया व अलफ, माहे रमजान, अखेर मार्गशीर्ष पावेतों सरकारचा खिस्यानशीं दिल्हा त्याशिवाय मारनिलेचें देणें तपशील कलम रुा

१०००० किता रकमा

१५००० सन इसन्नैत सरकार भरण्यास नाईक मारनिले व नारो आपाजी व रामचंद्र नाईक परांजपे यांजकडून रुपये ५००००० पांच लक्ष देविले त्यापैकीं रद कर्ज हुंड्या परभारें दिल्हे ४८५००० बाकी देणें रुा

१५००० दरबारचा खर्च व शिलेदाराचे समजाविशी या व गैरे हिशेब रुा २२६५६७॥। पैकीं भरणा पर भारा २११५६७॥। बाकी देणें

---

३००००

२००० त्रिंबकराव हरी परचुरे यांणीं बंदर सुरतची मामलत करून रसदेचा भरणा केला असतां, त्याजकडून मामलत काढून रसदेचा ऐवज घेतला तो माघारें दिल्हा सा खर्चाचे रुपये मारनिलेस देणें पडिले

ते रुा १५२५ माहाल मार कमाविसदार व कारकून याचे मुशाहिरे देणे पडिले ते रुा ४७५ व्याजाबा.

---

३२०००

सदरहु बत्तीस हजार रुपये पेशर्जीचे हिशेबाशिवाय मारनिलेचे देणे. शिवाय व्याज सदरहु ऐवजाचे मित्या पाहून देणें असे. जाणिजे. छ १५ माहे सवाल.

---

पत्राक ८७ श्री. १६९५ माघ वद्य ४—वद्य ३०

पुा. सेवेसी सां नमस्कार. विनति. येथील वर्तमानः श्रीमत उभयता* बाई पुरधरास गेली. राजश्री नाना फडणीस व राजश्री सखारामपंत बापू व हरीपत फडके ऐसे त्रिवर्ग तेथें आहेत. राजश्री मोरोबादादा फडणीस पुणेयात आपल्या बागांत राहिले आहेत. काम कारभार सर्व बाईच्या नावें पत्रें होतात. सरकारी कारखाने पुरधरास नेतात. लोकहि सावध जालें आहेत. जिकडे ज्यांचा थारा तिकडे ते थारियास लावितात. ऐशास, राजश्री तात्यास घरास पाठवावें ह्मणोन दोन तीन पत्रानीं लिहिले आहे. त्यास, आपण लिा कीं, काका त्रिंबकराव मामाच्या लष्करीं गेले आहेत, ते आले ह्मणजे तात्यास लौकर पाठवितों, ह्मणोन लिहिले. तरी, तात्याच्या येण्यास बहुत दिवस लागतील. तरी च्यार उटे, दोन तट्टे सत्वर पाठवावी. दोन उटे राजश्री रावजीस दिलीं पाहिजेत. यास्तव उटे, तट्टे जरूर आधीं पाठवावीं. दिवसगत न करावी. कृपा किजे. हे विनति. इ० इ० इ०

---

पत्राक ८८ श्री. १६९५ फाल्गुन शुद्ध १२

राजश्रियाविराजित राजमान्यराजश्री नरसिंगराव स्वामीचे सेवेसीं:—

पो सखाराम भगवंत साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून लिहित जावे. विशेष. राजश्री विष्णु नरहर लष्करांतून आले. त्याणीं सविस्तर मजकूर सागितला तो कळला. त्यास तुमचे लक्ष इकडचे पुरतें आहे व हाली मारनिले याणीं खातरजमा केली. त्यास, राजश्री भवानराव प्रतिनिधी व राजश्री वामनराव गोविद हे उभयता तुह्मास सागतील त्याप्रो ते व तुह्मी मिळोन कर्तव्य ते करावे. सर्व गोष्टी तुह्मास समजल्याच आहेत. मेहनतीचे, कारस्थानीचे दिवस हेच आहेत. सर्व एकदिल होऊन कर्तव्यार्थ करावा. रा छ ११ जिल्हेज. बहुत काय लिहिणे. लोभ असो दीजे. हे विनंति.

---

*गगाबाई व पार्वतीबाई.

पत्रांक ८९ श्री १६९९ फाल्गुन वद्य ५

राजश्री नानाजी कृष्ण व राजश्री मावूराव विश्वनाथ गोसावी यांसी –

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो सावाजी मोसले सेनासाहेब सुभा दडवस विनती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें विशेष इकडील वर्तमान वरचेवर लेखन होतच आहे नादेडच्या मु कामीं राजश्री कृष्णराव आम्हाजवळ पोंचल्यावर तैसेंच दरकूच येत आहों तामाकडील राजकारण पहिलेंच आहे त्याजकडील शानराव गिरधर आला होता त्यास रवाने केला ज्यावितजग यासीं आणावयावद्दल राजश्री दिवाकर पुरुषोत्तम पा आणि दर मजल आलों नवाबाकडून पत्रें आलीं कीं, आपण कलबुर्गियाचे सुमारें येत असों त्याजवरून, छ १६ जिल्हेजीं राजश्री म घानी शिवराम नबाबाकडे पा रा मामाच्या तर्फेनें रा शियाजी विठ्ठल यांजकडील चिमणाजीपंत त्या समागमें दिल्हे काल छ १८ जिल्हेजीं बुधवार फाग वद्य पचमी प्रहर रात्रीस रुकनद्दौला व घर्फुद्दौला व धीरबाहदर यां च्या भेटी जाहाल्या दोन कोस ते अलीकडे आले आम्हीं व राजश्री मामा इकडून दोन कोस गेलों भेटी होऊन आपापले गोटास आलों नवाब नि जाम उद्दौला यांच्या भेटी उदईक होऊन, पुढील चालीचा प्रकार होणें आहे राजश्री रघुनाथराव दादा याजकडून मिशुणखान मवाती व राजाराम गोविंद ऐसे नबाबाकडे आले आहेत त्यांसहि नबाब उदईक विदा करणार. दादा माघारे फिरले इतकें मात्र वर्तमान आहे ठिकाणबंद कोठें आले, मखकूर काय, हा प्रकार नाहीं यासमीस माणसें गेलीं आहेत आलियावर लेहू दादाचीं पत्रें आलिकडे आम्हांस दोन तीन आलीं कीं, तुमचे मतलब होऊन येतील, तुम्हीं रा त्र्यंबक विश्वनाथ यासीं भेटला हें उत्तम केलें, तरी अती सत्वर येणें त्यास, आम्हीं साफ उत्तर दिल्हें त्याचा मशोदाही आहे सारांश, अत पर लावण होऊं नये येविशीं राजश्री तात्यानीं लिहिलें आहे, त्याजवरून कळेल येथें तो रा अगत्य पाहिजे व आमच्या लोकांचा गव गवा मिटोन आदा होणें दोन चार लाख रा कोणत्याहि प्रकारें जरूर आहे आम्हीं कायावाचामनें सर्व प्रकारें तुम्हांजवळ आहों तुम्हीं मुरलीयांस प्रांजल सांगावें निष्ठा केलीच आहे तथापि, साहित्यप्रकार अमलांत याया हें आ हुलें पाहिजे रा छ १९ माहे जिल्हेज बहुत काय लिहिणें ? हें विनंती मोर्तबसुद

---

पत्रांक ९०

पो छ २६ जिल्हेज. श्री. १६९५ फाल्गुन वद्य ५

राजश्री हरीपंत गोसावी यांसीः—

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो साबाजी भोसले सेनासाहेबसुभा दंडवत. विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. छ १६ जिल्हेजची पत्रे पाठविलीं आहेत त्याजवरून कळलें असेल. राजश्री भवानी शिवराम व राजश्री त्रिंबकरावमामाकडून राजश्री शिवराम विठल याजकडील चिमणाजीपंत मोगलाकडे पाठविले होते. छ १७ जिल्हेजी आमचा व ताम्राच्या सैन्याचा चौ कोसाचा तफावत राहिला. मौजे कवठे पा कलबुर्गे येथे आले. राजश्री रघुनाथरावदादा याजकडून भिकणखान मेवाती व राजाराम गोविंद कोणी मोगलाकडे आले होते. त्यास, छ १८ जिल्हेजी फाग वद्य पचमी सौम्यवारी प्रहर रात्रीस रुकनद्दौला व शर्फुद्दौला व वीरबाहादर दोन कोस अलिकडे आले. आह्मी व मामा दोन कोस पुढें गेलों. भेटी जाहल्या. नबाब निजामुद्दोला याच्या भेटी होऊन चाल ठहरावी हा प्रकार मात्र आहे. याउपरी व्हावी ते त्वराच व्हावी. लांबण होऊ नये. सर्व तुमच्या ध्यानात आहे. राजश्री कृष्णराव नारायण याच्या पत्रावरून कळेल. अतःपर कर्तव्य कामास दिवस लागों नयेत. रा १९... माहे जिल्हेज. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे विनति. मोर्तबसूद.

श्री

शाहुराजपदांभोजभ्रमरायितचेतसः । बिंबात्मजस्य मुद्रैषा राघवस्य विराजते.

---

त्रांक ९१.

ो छ २६ जिल्हेज. श्री १६९५ फाल्गुन वद्य ५

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री हरीपंत तात्या स्वामीचे सेवेसीः—

सेवक भवानी शिवराम सा नमस्कार. विनंति उपरी येथील कुशल ता छ १९ माहे जिल्हेज गुरुवार मुकाम मोजे इंदरगांव, पा गुंजोटी, जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असावे. विशेष. दोन तीन पत्रे आपणाकडून